# प्रांतिक स्वराज्य ?

अर्थात्

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टांतील
प्रांतिक घटनेच्या भाषांतरासह कायदा,
राजकारण, घटनाशास्त्र इ. दृष्टींनीं
केलेलें विस्तृत विवेचन.

आचार्य वि. प्र. लिमये,
वाङ्मयविशारद ( टिळक )

टिळक पुण्यतिथि, शके १८६०
१ ऑगस्ट १९३८

किंमत ३ रुपये

# निवेदन



स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् ।

तै० उ० १.११.१

प्रस्तुत ग्रंथ कां लिहिला याचें सर्वसामान्य उत्तर वरील उपनिषन्मंत्रांत सांपडेल. तथापि या खेपेला 'स्वाध्याया'नें रूढ अर्थानें वापरण्यांत येणाऱ्या 'धर्मा'चें क्षेत्र सोडून 'राज'कारणाच्या क्षेत्रांत प्रवेश केला आहे, हें मान्य करणें प्राप्त आहे. परंतु थोडा सूक्ष्म विचार केल्यास 'कुरु'क्षेत्र हेंच 'धर्म'क्षेत्र आहे असें प्रारंभींच गीता आपणांस सांगत आहे. बृहदारण्यकांत (१·४·१४) एक कथा आली असून त्यांत 'दुर्बळ मनुष्य **राजाच्या** नांवाप्रमाणेंच **धर्माच्या** नांवाचा धाक बलवान् माणसाला घालतो; आणि हा **धर्म** दुसरा तिसरा कांहीं नसून **सत्य** हाच तो **धर्म** होय (अथो अबलीयान् बलीयांसं आशंसते **धर्मेण** यथा **राज्ञा** एवं यो वै स **धर्मः सत्यं** वै तत्)' अशी सत्य, धर्म व राजा या त्रिवर्गाची ऐक्यप्रस्थापना केली आहे; या राजधर्माचा किंवा सत्यधर्माचा किंवा धर्मराजाचा अवतार पुनरपि या भारतवर्षांत व्हावा याबद्दल आपणां सर्वांचा प्रयत्न असला पाहिजे; या दृष्टीनें पाहिल्यास अभ्यासक्षेत्रांत काय किंवा व्यवहारक्षेत्रांत काय धर्मकारण, राजकारण, अर्थकारण, समाजकारण असे कृत्रिम भेद न कल्पितां सर्वांचा सामग्र्यानेंच परामर्श घेतला पाहिजे. या विचारपरंपरेंत प्रस्तुत ग्रंथाचा उगम आहे अशी माझी दृढ श्रद्धा आहे. 'कायदा' या शब्दांतील अर्थ आपण प्राचीनकाळीं 'धर्म' या शब्दानेंच व्यक्त करीत होतों. सध्यां इंग्रजांच्या राजवटींत ज्याप्रमाणें प्रत्येक गोष्टीचें नियमन 'कायद्या'नें होत आहे त्याप्रमाणें आपल्या प्रत्येक दैनंदिन व्यवहारांत 'धर्मानें' आपले पाय पसरले आहेत असें दिसून येईल. राज्यकारभाराबाबतचा जो १९३५ चा कायदा ब्रिटिश पार्लमेंटनें आपल्या या देशांत आपणां सर्वांच्या विरोधाला न जुमानतां चालू केला आहे तो

'अधर्मरूप' असून 'धर्मरूपा'नें वावरत आहे. तेव्हां या 'अधर्मा'चा नाश करून आपणांस 'धर्माची' संस्थापना करावयाची आहे. ही गोष्ट सिद्ध होण्यास 'अधर्माचें' आपणांस संपूर्ण ज्ञान असलें पाहिजे. हें ज्ञान चारदोन लोकांपुरतेंच न राहतां त्याचा प्रसार सर्वसाधारण जनतेंत झाला पाहिजे, निदान राष्ट्राच्या अभ्युदयार्थ झटणाऱ्या व खेड्यापाड्यांतून प्रसरलेल्या असंख्य लहानमोठ्या कार्यकर्त्यांना तर या कायद्याचें सांगोपांग मर्म समजलें पाहिजे, हें कोणीही कबूल करील. मुख्यतः या वर्गाकरितां प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे. अनुषंगानें त्याचा उपयोग शाळाकॉलेजांतील विद्यार्थी, कायदेमंडळाचे सभासद व सर्वसामान्य राजकारणजिज्ञासु वाचक इ० लोकांना होईल हा भाग वेगळा.

खरें सांगावयाचें म्हणजे काँग्रेसनें अधिकारस्वीकार करण्याचें ठरविल्यानंतर या कायद्याकडे अभ्यासाच्या दृष्टीनें मी पाहूं लागलों. तत्पूर्वीं व्हाइटपेपर, जॉइंट कमिटीचा रिपोर्ट, गव्हमेंट ऑफ इंडिया बिल व शेवटीं ॲक्ट हें सर्व पाहिलें नव्हतें असें नाहीं; परंतु ज्या वाटेला आपणाला जावयाचें नाहीं असें एकदां ठरलें तिकडे विशेष लक्ष कोण देतो? परंतु जेव्हां राष्ट्रीय सभेनें या घटनाकायद्याचा विशिष्ट दृष्टीनें उपयोग करण्याचें ठरविलें तेव्हां तितका हुरूप नसला तरी लक्ष देणें भाग पडलें. शिवाय इतक्या वर्षांनीं काँग्रेस कायदेमंडळांत व मंत्रिमंडळांतही शिरली या गोष्टीचा साहजिकच आपलेपणा वाटून अभ्यासास अधिक स्फुरण चढलें. गेल्या पावसाळ्यांतील मुंबई असेंब्लीच्या येथील अधिवेशनाला बहुतेक दिवस उपस्थित राहिलों. त्यानंतर या संबंधानें वर्तमानपत्रांतून एखादी लेखमाला गुंफावी अशी कल्पना येऊन गेली; परंतु हा विषय वर्तमानपत्रीय लेखांना, दिवसानुदिवस चालविण्याच्या दृष्टीनें, तितकासा अनुकूल नसल्यामुळें ती कल्पना बाजूस पडून शेवटीं हरिपुरा काँग्रेसच्या अधिवेशनाहून परत आल्यावर ग्रंथरूपानेंच हा विषय मांडण्याचें ठरवून उद्योगास लागलों. मुख्य भाग लिहून संपूर्ण करण्याला अदमासें तीन महिने लागले. परंतु ग्रंथाचा विषय हा नेहमींच चालता धावता असल्यामुळें रोज त्यांत एकसारखी नवी भर पडतच आहे. त्याच्याशीं लेखकानें बरोबर राहण्याला, ग्रंथ प्रकाशित होण्याच्या दृष्टीनें, कांहीं एक सीमा

आहेच. तथापि अद्ययावत् घडलेल्या कांहीं गोष्टी या निवेदनांतच सांगून टाकण्याचें ठरविलें आहे.

ग्रंथाचीं मुख्यत: तीन प्रकरणें आहेत. त्यांपैकीं पहिल्यांत १९३५ च्या कायद्यांतील ३ ऱ्या खंडांतील एकूण एक कलमांचें शब्दश: भाषांतर दिलें आहे, व त्या कलमांतून आलेल्या महत्त्वाच्या सर्व विषयांवर विस्तृत विवरण करण्यांत आलें आहे. हाच ग्रंथाचा मुख्य गाभा होय. या प्रांतिक विभागाची पुरवणी म्हणून दुसऱ्या प्रकरणाची योजना आखण्यांत आलेली आहे. त्यांत तिसऱ्या खंडाव्यतिरिक्त इतर खंडांतून आलेल्या प्रांतिक राज्यकारभाराच्या उल्लेखांचा त्रोटक सारांश देऊन त्यावर कांहीं कांहीं ठिकाणीं विवरणात्मक टीपा दिल्या आहेत. शेवटच्या 'उपसंहार' या प्रकरणांत या कायद्यासंबंधीं हिंदी राष्ट्राचें काय धोरण आहे व यापुढें काय राहील याबाबत समालोचनात्मक ऊहापोह केला आहे. एखाद्या विशिष्ट धंद्याच्या द्वारा मुलांमुलींना संपूर्ण शिक्षण द्यावयाचें ही जर 'वर्धा शिक्षण योजनें'तील मूलभूत कल्पना मानली तर तीच कल्पना 'या कायद्याच्या द्वारा जनतेला राजकीय शिक्षण द्यावयाचें' या रूपानें अमलांत आणण्याचा मी प्रयत्न केला आहे असें मला वाटतें. तो प्रयत्न किती अंशानें सफल झाला हें अर्थात् वाचकांनींच ठरवावयाचें आहे; कारण शेवटचे परीक्षक तेच आहेत.

एवढें सर्वसामान्यपणें म्हटल्यानंतर ग्रंथांतील कांहीं कांहीं गोष्टींसंबंधीं वाचकांचें लक्ष वेधणें अवश्य वाटतें. कायद्याच्या कलमांच्या भाषांतरांत क्लिष्टता येणें हें साहजिक आहे. एक तर कायद्याच्या इंग्रजी व मराठी परिभाषेशीं माझा परिचय नाहीं. दुसरें म्हणजे कांहीं कांहीं शब्दसमुच्चयांचें भाषांतर मराठींत कानाला चमत्कारिकच लागतें. एक उदाहरण देतों; 'अंटिल इमीजिएटली बिफोर' हे शब्द इंग्रजींत ठीक आहेत, परंतु 'लगेच अगोदर पर्यंत' ही भाषा कशीशीच वाटते. याशिवाय अशा विषयाच्या बाबत सध्यां प्रचारांत असलेली मराठी भाषा अपुरी वाटते. राज्यव्यवहारांतील जुनी मराठी भाषा नष्ट झाली आहे; मध्यंतरींच्या फारशी भाषेचाही लोप होत आला आहे आणि नवीन इंग्रजी भाषेचें अद्याप योग्य असें आत्मसात्करण झालेलें नाहीं; अशी याबाबत चमत्कारिक

स्थिति आहे. बॅ. सावरकर यांनीं मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत सांगितल्याप्रमाणें मराठींत नामधातु फारच थोडे आहेत. याचा मला पावलोपावलीं अनुभव आला. सावरकरांच्या सूचनेला अनुसरून 'आरंभिणें' 'शिफारसणें' इ० नामधातूंचा मी सर्रास उपयोग केला आहे. असें जर न करावें तर अर्धें अधिक लिहिलेलें वाक्य सर्वच्या सर्व बदलावें लागतें असें आढळून आलें. दुसरी गोष्ट भाषाशुद्धीची. अलीकडे सावरकर, पटवर्धन, अत्रे इ० च्या प्रोत्साहनानें या विषयाला चालना मिळाली आहे. योग्य मर्यादेपर्यंत ही भाषाशुद्धीची चळवळ मलाही मान्य आहे; परंतु तिचा अतिरेक मला मान्य नाहीं व भाषेलाही तो शेवटीं खपणार नाहीं. इंग्रजी शब्द अपरिहार्य म्हणून किती आले आहेत हें सहज ग्रंथाचीं दीडशें पृष्ठें चाळून पाहिलीं तों संख्या अडीचशेंपर्यंत गेली. हें पाहून मी आश्चर्यचकितच झालों. इतका आंकडा निघेल अशी माझी कल्पनाच नव्हती. सगळे इंग्रजी शब्द वेगळे काढून त्यांना मराठी प्रतिशब्द बनवून द्यावेत अशी इच्छा होती, परंतु काम वाढावयास लागल्यामुळें ती शेवटीं सोडून दिली. कोणी भाषाशुद्धिवाल्यानें सदर काम हौसेनें केल्यास व इंग्रजी शब्दांना सुटसुटीत, अन्वर्थक मराठी शब्द सुचविल्यास मी त्याचा आभारी होईन व भाषेवरही त्याचे उपकार होतील. मी स्वतः या पुस्तकाकरितां बनविलेले मराठी शब्द देतों:—( १ ) 'इन हिज डिस्क्रीशन' याचें मी 'आपल्या मर्जीप्रमाणें' असें रूपांतर केलें आहे. वास्तविक, 'डिस्क्रीशन' या शब्दाचा 'तारतम्यबुद्धि, विवेक' इ० अर्थ आहे. परंतु ज्या संदर्भानें व ज्या विशिष्ट हेतूनें कायद्यांत हा शब्द आला आहे तो लक्षांत घेऊन शेवटीं त्याचा 'मर्जी' असाच अर्थ घेणें मला भाग झालें. 'साहेबयेखत्यारीनें' असा एक शब्द जुन्या कागदपत्रांतून ( भा. इ. सं. मं. त्रैमासिक ) वापरलेला आढळून आला. परंतु तो 'रॉयल प्रिरॉगेटिव्ह' ( राजाचा खास व स्वयंभू हक्क ) याकरितां योग्य होईल असें वाटून तो घेतला नाहीं. ( २ ) 'इन हिज इंडिव्हिज्युअल जजमेंट' याला मी 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' असें रूप दिलें आहे. 'जजमेंट' यांत 'मता'पेक्षां थोडें अधिक निश्चित स्वरूपाचें कांहीं तरी आहे; परंतु योग्य शब्द योजून तें व्यक्त करितां आलें नाहीं हें खरें

आहे. ( ३ ) 'इन्स्ट्रुमेंट ऑफ इन्स्ट्रक्शनस्' याला मी 'आज्ञापत्र' हा शब्द योजला आहे. 'सूचनापत्र' हा शब्द सुचला होता; परंतु 'इन्स्ट्रक्शन' ही नुसती 'सूचना' नसून त्यांत कांहीं 'बंधनकारकपणा' घातला आहे. म्हणून शेवटीं 'आज्ञापत्र' हा शब्द जरा कडक वाटला तरी तोच योजण्याचें ठरविलें. ( ४ ) 'इन्स्ट्रुमेंट ऑफ ॲक्सेशन' याला मी 'सामिलनामा' हा नवीन शब्द तयार करून वापरला आहे. तो पूर्णपणें अन्वर्थक व सुटसुटीत आहे असें मला वाटतें. कायद्याच्या पोटकलमांतील ( ए ) ( बी ) ( सी ) इ. सदरांबाबत मी सर्वत्र ( क ) ( ख ) ( ग ) इ. योजना केली असून विवरणांतील वेग-वेगळ्या प्रकरणांना ( अ ) ( आ ) ( इ ) ( ई ) इ. नीं प्रारंभ केला आहे, हें घोटाळा टाळण्याकरितां सांगणें जरूर आहे.

आतां कांहीं कांहीं गोष्टींचा थोडा जास्त पाल्हाळ झाला आहे असें वाटण्याचा संभव आहे. परंतु तो मुद्दाम हेतुपूर्वकच केला आहे. त्या गोष्टी पुढीलप्रमाणें:—(१) मुंबई असेंब्ली व कौन्सिल यांनीं नियम तयार करण्याकरितां नेमलेल्या कमिट्यांच्या रिपोर्टांचा परामर्श (पृ. ३६२) सविस्तर घेतला आहे. (२) ब्रह्मदेशच्या सीनेटचे, गव्हर्नरनें केलेले नियम अद्याप आपल्या इकडे नवीनच वाटतील म्हणून विस्तारदोष पत्करूनही दिले आहेत. (३) मुंबई प्रांतांतील निरनिराळ्या मंत्र्यांकडे कोणकोणतीं बारीकसारीक खातीं आहेत त्यांची दुर्मिळ यादी वाचकांस उपयुक्त वाटेल. (४) ३रा खंड व इतर खंड, या प्रकरणांत कांहीं कांहीं ठिकाणीं द्विरुक्ति झाली आहे; परंतु तसें होणें अपरिहार्य होतें, म्हणून क्षम्य मानण्यास हरकत नसावी. ( ५ ) निजाम व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें झालेल्या कराराचें समग्र भाषांतर दिलें आहे. हा करार मिळविण्याकरितां हिंदुस्थान सरकार, मध्यप्रांत सरकार व निजाम सरकार यांच्याकडे पत्रव्यवहार केला. त्यांच्याकडून उत्तरें येण्याच्या दर-म्यानच्या काळांत माझे एक हितचिंतक सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचे सदस्य रा. वामनराव पटवर्धन यांनीं आस्थापूर्वक 'लीडर' पत्राचें फाईल धुंडाळून त्यांतून सदर करार शोधून दिला. त्यानंतर निजाम सरकारच्या 'कॉन्स्टिटयुशनल अफेअर्स' खात्याकडून सदर करार (इंग्रजी व उर्दू भाषेंत

छापलेला ) मला मिळाला. 'मध्यप्रांत व वऱ्हाड'चा गव्हर्नर व 'हैदराबाद व वऱ्हाडचा' निजाम, असे दोघेजण 'वऱ्हाड'वर हक्क सांगत आहेत. 'वऱ्हाडा'करितां किती पैसा खर्च करावा हें 'सिम फार्म्युल्या'नें ठरविलें आहे. 'वऱ्हाड'ची प्रजा खानेसुमारीच्या दृष्टीनें निजाम राज्यांत कां धरावयाची नाहीं असा एक मार्मिक प्रश्न डचेस ऑफ अॅथॉल या हिंदविरोधी बाईनीं पार्लमेंटांत विचारला होता; त्याला योग्य उत्तर उपभारतमंत्री मि. बटलर यांना कांहीं देतां आलें नाहीं. अशा अनेक दृष्टींनीं या कराराचें महत्त्व कसें आहे हें दिसून येईल.

आतां द्रुतगति प्रांतिक राजकारणाच्या दृष्टीनें घडलेल्या कांहीं गोष्टींचा नुसता उल्लेख करणें हें गैरवाजवी ठरणार नाहीं असा भरंवसा वाटतो. ( १ ) बंगाल प्रांतांत काढलेल्या 'टेनन्सी ऑर्डिनन्स' (कुळांबाबत वटहुकूम) बद्दल पृष्ठ ३८८ व पृष्ठ ३९२ या ठिकाणीं उल्लेख केलेला आहे. कायदेमंडळानें मंजूर केलेल्या टेनन्सी बिलास संमति मिळण्यास अजून दिरंगाई होत आहे; म्हणून या वटहुकमांतील कलमाबरहुकूम तात्पुरता कायदा करण्यासाठीं बंगाल कायदेमंडळांत बिल मांडण्यांत आलें आहे. ( २ ) वायव्य सरहद्दप्रांताच्या गव्हर्नरनें, प्रांतिक असेंब्लीनें मंजूर केलेल्या 'फ्रॉंटियर लॉज रिपील बिला'ला ( १२४ अ इ० कलमें व इतर कायदे रद्द करणारें ) संमति देण्याचें नाकारलें आहे व 'तेरी कर' रद्द करण्याबाबतचें बिल फेरविचाराकरितां असेंब्लीकडे त्यानें परत पाठविलें आहे. याला असेंब्ली व प्रधानमंडळ काय जबाब देणार हा एक महत्त्वाचा राजकीय प्रश्न होऊन बसला आहे. याबाबत गय खाऊन स्वस्थ बसल्यास इतरत्रही 'म्हातारी मेल्याचें दुःख नाहीं, परंतु काळ सोकावणार' अशी परिस्थिति निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहीं. सरहद्द प्रांतिक सरकारनें 'दारूबंदीचा वटहुकूम' काढला असल्याचें पुढें आलेंच आहे. अशी त्या प्रांतांतील एकाच वेळीं उत्साह व निरुत्साह उत्पन्न करणारी हकीगत आहे. ( ३ ) सिंध प्रांतांत सक्कर धरणाखालीं भिजणाऱ्या जमिनीवर अधिक सारा लादण्याचा विचार तेथील सरकारनें ठरविला आहे. याबाबत गव्हर्नर व मंत्री यांचें संगनमत ठरलें असून मंत्री आपल्या पक्षाला धुडकावून लावीत आहेत. प्रस्तुतचें हें मंत्रिमंडळ केव्हां गडगडेल याचा नेम

राहिलेला नाहीं. एक मंत्री ना. निचळदास म्हणाले:—" सक्कर धरणा-बाबतच्या कर्जाच्या व्याजाची जबाबदारी आम्ही मंत्र्यांनीं स्वीकारली पाहिजे; ती जर, सारा वाढवून, आम्ही पार पाडली नाहीं तर गव्हर्नरला, जादा जबाबदारीच्या नांवानें, आमच्या कारभारांत हात घालण्यास सवड फावेल; आम्ही तसें करूं देणार नाहीं." या सक्कर धरणाबाबत पार्लमेंटांत, मजूर पक्षाचे पुढारी मेजर ॲटली यांनीं केलेली एक कोटी लक्षांत आल्याशिवाय राहत नाहीं. मूळ बिलांत ५२ व्या कलमांतील ( २ ) ऱ्या पोटकलमांत 'सक्कर धरण योजना' असे शब्द होते. लॉर्डांच्या सभेंत लॉर्ड लॉइड यांनीं 'लॉइड धरण व कालवे योजना' असें नांव बदलणारी उपसूचना मंजूर करून घेतली. सदर उपसूचनेवर कॉमन्स-सभेंत भाषण करतांना मेजर ॲटली म्हणाले:—" सक्कर धरणाला एकट्या लॉर्ड लॉइडचेंच नांव कां देतां ? त्यांनीं लॉर्डांच्या सभेंत या घटनेच्या कामाला चांगलेंच धरण ऊर्फ खीळ घातली आहे, तशीच कॉमन्स-सभेंत मि. चर्चिल यांनीं घातली आहे; तेव्हां त्यांचेंही नांव त्यांत घालून दोघांचेंही चांगलें स्मारक कां करीत नाहीं ? " हा विनोदाचा भाग सोडून दिला तरी या धरणाच्या जादा जबाबदारीमुळें आज सिंध प्रांतांत घटनात्मक पेचप्रसंग निर्माण होऊं पहात आहे. अशा वेळीं कॉंग्रेस पक्षानें शेतकऱ्यांचें हित संभाळण्यासाठीं जरूर ती काळजी घेतल्यास कॉंग्रेसचें आसन त्या प्रांतांत आज ना उद्यां चांगलेंच स्थिर झाल्याविना राहणार नाहीं. ( ४ ) शेवटीं मध्यप्रांत वऱ्हाडांत सध्यां ज्या राजकीय घडामोडी चालल्या आहेत तिकडे लक्ष देणें अगदीं अगत्याचें होऊन बसलें आहे. तेथील मंत्र्यांमध्यें खेळीमेळीचें वातावरण निर्माण होऊन राज्यकारभाराचा गाडा सुरळीत चालेल ही आशा फोल ठरली; व या नित्याच्या कटकटींतून मुक्त होण्याच्या उद्देशानें परंतु कॉंग्रेसच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचा सल्ला न घेतां, मुख्य प्रधान डॉ. खरे यांनीं ना. गोळे व ना. देशमुख यांच्या सहवर्तमान राजीनामा दिला. बाकीच्या तिघा मंत्र्यांनीं ( ना. शुक्ल, ना. मेहता व ना. मिश्र ) राजीनामा देण्याचें नाकारलें. त्याबरोबर गव्हर्नरनें ५१ ( ५ ) कलमाच्या आधारें या तिघा मंत्र्यांना कामावरून काढून टाकलें. अशा तऱ्हेनें आपापसांतील दुहीमुळें हा भलता

प्रसंग ओढवला. त्यानंतर गव्हर्नराच्या निमंत्रणावरून डॉ. खरे यांनीं प्रांतांतील तिसरें प्रधानमंडळ बनविलें. त्यांत ना. गोळे व ना. देशमुख यांच्या जोडीला ना. प्यारेलालसिंग व ना. अग्निभोज (हरिजन) या दोघांना मंत्रिमंडळांत घेतलें व एक जागा पुढें भरण्याकरितां रिकामी ठेवली. परंतु या शिस्तभंगाबद्दल कॉंग्रेस पार्लमेंटरी कमिटीनें डॉ. खरे यांच्या कृत्याबद्दल नापसंती व्यक्त करून दूषण दिलें; याचा परिणाम म्हणून डॉ. खरे यांनीं आपल्या नवीन प्रधानमंडळाचा गव्हर्नरकडे राजीनामा पाठवून दिला. गव्हर्नरनें अद्याप तो स्वीकारलेला नाहीं, कारण हा राजीनामा स्वीकारावयाचा म्हणजे दुसऱ्या कोणाला तरी पाचारण करावयास पाहिजे; बहुमतवाल्या पक्षानें आपला जुना पुढारी काढून टाकून नवीन पुढारी नेमला पाहिजे, त्याशिवाय गव्हर्नर तरी कोणाला मंत्रिमंडळ बनविण्यास सांगणार? असा सगळा घोटाळा माजून राहिला आहे. महाराष्ट्र व महाकोशल (मराठी व हिंदी) या दोन्ही भागांना संमत असलेला नवीनच कोणी लायक पुढारी काढल्याशिवाय हीं प्रांतीय भांडणें मिटावयाचीं नाहींत. जुनी घाण काढून टाकण्याच्या दृष्टीनें व नवें स्वच्छ, खळखळ वाहणारें पाणी आणण्याच्या दृष्टीनें गव्हर्नरनें असेंब्ली बरखास्त करून फेरनिवडणुकीचा हुकूम काढावा, हाच एक योग्य व सरळ मार्ग, माझ्या मतानें, दिसतो.

घटनाकायद्याच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीच्या दृष्टीनें पुढें त्या त्या ठिकाणीं मी माझ्या स्वतःच्या अशा सूचना केल्या आहेत. त्या, सूचींत 'प्रांतिक स्वराज्य (?)' या सदराखालीं एकत्रित केलेल्या आढळून येतील. ग्रंथाचीं प्रकरणें विषयवार पाडतां न आल्यामुळें अनुक्रमणिका कायद्यांतील तिसऱ्या खंडांतील कलमांच्या व इतर खंडांच्या अनुक्रमानें देणेंच सोईचें वाटलें, म्हणून ती तऱ्हा अंगीकारलेली दिसून येईल. विषमांक पृष्ठांवर त्या पृष्ठांतील मजकुरांचे निदर्शक असे स्वतंत्र मथळे घातले आहेत ते वाचकांना उद्बोधक व मनोरंजक वाटल्यावांचून राहणार नाहींत. समांक पृष्ठांवर सर्वत्र ग्रंथाचें 'प्रांतिक स्वराज्य (?)' हें नांव घातलें आहे. प्रश्नचिन्हानें अद्याप पूर्ण प्रांतिक स्वराज्य मिळालेलें नाहीं, पण लौकरच तें मिळणार हा भाव दर्शिवला जात आहे. गव्हर्नरासुद्धां

प्रधानमंडळ (पृ. ८५), कौन्सिलचें अधिवेशन (पृ० १५६-७) व असेंब्लीचें अधिवेशन (पृ० २६४) अशीं तीन चित्रें योग्य स्थळीं घातलीं आहेत. प्रधानमंडळाचा फोटो व बाकीचे दोन ब्लॉक मुंबईहून माझे मित्र डॉ. नरवणे यांनीं पाठवून दिले. प्रधानमंडळाचा ब्लॉक चित्रशाळेंत तयार करून घेतला. सर्वसाधारण जनतेला असेंब्ली, कौन्सिल इ० ची कांहीं तरी कल्पना यावी एवढ्याकरितां चित्रांची योजना करण्यांत आली आहे. हिंदुस्थानचा प्रांतवार नकाशा घालण्याचा इरादा होता, परंतु तें जमलें नाहीं. शुद्धिपत्र बरेंच लांबलचक आहे, परंतु त्यांत कित्येक बिनमहत्त्वाच्या व किरकोळ अशुद्धांचीही दखलगिरी घेतली आहे, म्हणून तें तसें वाटतें. संदर्भग्रंथांची यादीही बरीच मोठी झाली आहे. ती इंग्रजींतच देण्याचें कारण, सगळीं पुस्तकें इंग्रजींतलींच आहेत, हें होय; मराठी वाचकांना ती यादी बालबोध लिपींत देऊन कांहीं विशेष उपयोग होणार नाहीं, असें वाटल्यावरून ती मराठींत दिली नाहीं. सबंध ग्रंथाला रोमन अथवा इटालिक्स लिपीचा स्पर्श झालेला नाहीं.

हें झालें ग्रंथाच्या बाह्यांगासंबंधीं. आतां शेवटीं आभार प्रद-र्शनाचें गोड काम शिल्लक राहिलें. ग्रंथाची हस्तलिखित प्रत मुद्दाम तीन चार वेळां साताऱ्याहून येऊन माझे मित्र रा. बुवा गोसावी वकील यांनीं तपासली व कांहीं उपयुक्त सूचना केल्या. तसेंच, पुण्याचे असेंब्लींतील प्रतिनिधि व स्थानिक स्वराज्य खात्याचे पार्लमेंटरी सेक्रेटरी रा. बापूसाहेब गुप्ते यांनीं कायद्याच्या कांहीं कलमांच्या अर्थासंबंधीं उपयुक्त चर्चा केली व अन्य तऱ्हेनें साहाय्य केलें. फर्ग्युसन कॉलेजांत शिकत असल्यापासून माझे मित्र असलेले व सध्यां त्याच कॉलेजांत पाली, अर्धमागधी, संस्कृत इ० भाषांचे प्रोफेसर असलेले रा. रंग. दत्ता. वाडेकर यांनीं सूचीचें क्लिष्ट काम चांगल्या व कुशल तऱ्हेनें करून दिलें. तसेंच माझे मित्र डॉ. रामभाऊ दातार यांनीं रोज मुद्रितें तपासण्याचे कामीं व सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे या ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी स्वतः अंगावर घेऊन फार मोठें साहाय्य केलें आहे. आणखी किती तरी जणांनीं आपापल्या परींनीं थोडी फार मदत केली आहे. सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीच्या ग्रंथालयाचा मला पुष्कळच उपयोग झाला. तेव्हां या सर्व मित्रमंडळींचा व सोसायटीच्या

चालकांचा मी अत्यंत ऋणी आहे. आतां ग्रंथाच्या बाह्यांगाबद्दल मुद्रकाला व अंतरंगाबद्दल लेखकाला नांवें ठेवणें अगर त्यांची पाठ थोपटणें हें सर्वस्वीं वाचकांच्या हातीं आहे.

अशा तऱ्हेनें सर्वांच्या साहाय्यानें तयार झालेला हा ग्रंथ लोकमान्यांनीं म्हटल्याप्रमाणें 'श्रीशाय जनतात्मने'—जनताजनार्दनाचे चरणीं अर्पण करितों.

आषाढ वद्य द्वादशी, १८६०<br>
(२४ जुलै १९३८)<br>
३४६, सदाशिव, पुणें (२).

वि. प्र. लिमये

## Books and other Material Consulted.




1 Provincial Autonomy—K. T. Shah
2 Federal Structure— " "
3 Parliamentary Practice—Erskine May
4 Law of the Constitution—Dicey
5 Constitutional Law—G. N. Joshi
6 Constitutional System of India—N. C. Roy
7 Government of India Act, 1935—( Commentary and Notes ) Rajgopal Ayyangar
8 Governments of the British Empire—A. B. Keith
9 Speeches on Indian Policy, Vol II — " "
10 Speeches & Documents on the British Dominions ( 1918-31 )—A. B. Keith
11 Some economic & financial aspects on British Rule in India—Z. A. Ahmed
12 Public Revenue & Expenditure in India— " "
13 Agreement between the Nizam & British Government
14 Federal Law Journal, Madras, Vol. I
15 Bombay Legislative Assembly Manual, Vol. I
16 " " Council " "
17 Bombay L. A. & L. C. " Vol. II
18 Orders in Council under the Govt. of India Act, 1935
19 Times of India Year Book ( 1937-38 )
20 Directory of the Madras Legislature
21 Hindustan Year Book 1938
22 Universal Encyclopaedia—Routledge
23 Provincial Govt. Gazettes-Bombay, Madras, Calcutta, Burma, N. W. F., Punjab
24 Parliamentary Debates on Indian Affairs
25 Digest of Rulings of Presidents, Bombay Legislative Council, 1921-34 & 1934-36

26 Young India ( 1927–28 ) Vol. III—Mahatma Gandhi
27 Harijan ( 1937–38 ) Vol. V—Mahadeo Desai
28 Provincial Assembly Debates—Assam, Bengal, Central Provinces & Berar, Bombay, Madras
29 Congress Bulletins
30 Bombay Civil Budget Estimates ( final issues ) 1937–38 & 1938–39
31 „ Budget Memorandum, 1938–39
32 Proceedings of the Joint Committee on Indian Constitutional Reform
33 Report „ „ „
34 Government of India Bill, 1935
35 Government of India Act, 1935
36 Hand-book of Indian Legislatures—Saxena

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३६ | ७ | कौन्सिमध्यें | कौन्सिलमध्यें |
| ५१ | २७ | ('मात्र...'पासून स्वतंत्र परिच्छेद समजावा) | |
| ५७ | मथळा | सरकार ? | सरकार ! |
| ,, | १० | युरोपियन | हिंदी खिस्ती |
| ७९ | ११ | सभासदास (!) | उमेदवारास |
| ८६ | ८ | लावण्यास | उपपद लावण्यास |
| १०८ | ८ | ('जीं' हा शब्द गाळून टाकावा) | |
| ११८ | ४ | ('मानाच्या दृष्टीनें...' येथून स्वतंत्र [ ऐ ] परिच्छेद समजावा) | |
| १३४ | २१ | तोफखाना | तोपखाना |
| १५८ | रकाना १९ | हिंदी, खिस्ती | हिंदी खिस्ती |
| १६२ | १८ | नाज्ञ | नाश |
| १६३ | ९ | बामूला | बाजूला |
| १६६ | १६ | मंतें | मतें |
| १८९ | २४ | अगोदरपर्यंत | लगेच अगोदरपर्यंत |
| १९१ | ६ | असें | असे, |
| ,, | १४ | कायदेमंडळांना | कायदेमंडळाला |
| १९२ | १० | सर्व साधारण | सर्वसाधारण |
| १९४ | २० | पहालजानी | पहालजानी व लाहिरी |
| १९५ | १९ | (६) | ६ |
| २०३ | चौकट | प्रतिनिधि सभांतील | प्रतिनिधिसभांतील |
| २१३ | २८ | करील. मात्र | करील: ('मात्र...' निराळा परिच्छेद) |
| २२७ | ७ | म्हणूनअंडर | म्हणून अंडर |
| २३१ | १९ | येईल. | येईल: |
| २३२ | २२ | ('अर्थात्च' हा शब्द गाळून टाकावा) | |
| २४० | २९ | ४९ विरुद्ध ४४ | ४४ विरुद्ध ४९ |
| २४४ | चौकट | इ. मांडणें, | मांडणें, इ० |
| २४८ | ६ | उपसूचना विरहित | उपसूचनाविरहित |
| ,, | १५ | बोलवावी. | बोलवावी : |
| ,, | २५ | येईल. | येईल: |

| | | | |
|---|---|---|---|
| २४९ | २ | येतील. | येतील; |
| २५२ | २६ | असेंब्ली | असेंब्ली- |
| २५३ | ८ | ठेवील. | ठेवील : |
| २५५ | १० | मद्रास | ' मद्रास |
| ,, | १२ | गव्हनर | गव्हर्नर |
| ,, | १७ | आमची | आपली |
| २५९ | ९ | विलाचा | बिलाचा |
| ,, | १६ | करील. | करील : |
| २७९ | १५ | थड | थंड |
| २९५ | १४ | ' चार्ज्ड, | 'चार्ज्ड' |
| २९६ | १० | अधिकार कक्षेत | अधिकारकक्षेंत |
| ३१२ | १७ | कायदे; | कायदे– |
| ३१८ | २६ | पगार बिलाला | पगारबिलाला |
| ३२३ | २९ | जाईल. | जाईल: |
| ३२८ | २९ | बनवावेत. | बनवावेत: |
| ३२९ | २ | अध्यक्ष | प्रेसिडेंट |
| ,, | १२ | नेहमींवास | नेहमीं वास |
| ३३० | ३० | कायदेमंडळापुढें | असेंब्लीपुढें |
| ३३१ | ७ | ८८ (१) | ८८ (२) (क) |
| ३३६ | ४ | कलम | पोटकलम |
| ३३७ | मथळा | म्हवूणन | म्हणवून |
| ३४३ | ,, | गव्हर्नेर | गव्हर्नरनें |
| ३४५ | २१ | चेअर | चेअर— |
| ३४६ | १६ | केल्या | केलेल्या |
| ३५७ | १८ | हॉस्पिट लमधील | हॉस्पिटलमधील |
| ३६५ | मथळा | ६६५ | ३६५ |
| ३७३ | ७ | जाईल; | जाईल : |
| ,, | ,, | ( 'मात्र...' पासूनचा स्वतंत्र परिच्छेद समजावा ) | |
| ३७६ | ५ | नव्हता. | नव्हता.' |
| ३९० | ९ | पोलिस फोर्स | पोलिसफोर्स |
| ३९९ | १२ | ' अंशतः वगळलेल | 'अंशतः वगळलेला |
| ४२२ | १४ | निम्मे | निम्मे. |
| ४३४ | २२ | प्रांतांचे | येथील |
| ४४१ | १८ | नफावोटापत्रक | नफातोटापत्रक |
| ४४५ | १९ | वरील कलमाच्या | वरील २१३ कलमाच्या |
| ४५५ | १७ | आहेत. | आहेत." |
| ४५६ | २० | ( 'अवतरण पुरें' हे शब्द गाळून टाकावे ) | |
| ४७८ | २३ | परारार्ष्ट्रीय | परराष्ट्रीय |
| ४९१ | ९ | एनिशिएटिव्ह | इनीशिएटिव्ह |

# अनुक्रमणिका

## खंड ३ रा--गव्हर्नरांचे प्रांत (पृ. १--४१८)

### भाग १ ला

### प्रांत



### भाग २ रा

### प्रांतिक सरकार

#### गव्हर्नर



#### प्रांतिक राज्यकारभार

# भाग ३ रा

## प्रांतिक कायदेमंडळ

### सर्वसामान्य



### कायदेमंडळाच्या सभासदांबाबत तरतुदी



### कायदे करण्याची रीत

## भाग ६ वा

### राज्यघटनायंत्र बंद पडलें असतां करण्याच्या तरतुदी



## इतर खंड--प्रांतिक घटनेची पूर्ति ( पृ० ४१९-४७४ )



## उपसंहार ( पृ० ४७५-५११ )



## सूची ( पृ० ५१२--५२८ )

---

# प्रांतिक स्वराज्य ?

## (गव्हर्मेंट ऑफ इंडिया अॅक्ट, १९३५, खंड ३रा)

## *गव्हर्नरांचे प्रांत*

### भाग १ ला

### प्रांत

गव्हर्नरांचे प्रांत

४६.—(१) वऱ्हाडसंबंधीं याच्यापुढील कलमांत सांगितलेली व्यवस्था लक्षांत घेऊन, पुढें दिलेले व या कायद्याप्रमाणे निर्माण केले जाणारे गव्हर्नरांचे प्रांत मिळून गव्हर्नरांचे प्रांत मानण्यांत येतील:—मद्रास, मुंबई, बंगाल, संयुक्त प्रांत, पंजाब, बिहार, मध्यप्रात आणि वऱ्हाड, आसाम, वायव्य सरहद्दप्रांत, ओरिसा, आणि सिंध.

(२) ब्रह्मदेश यापुढें हिंदुस्थानचा भाग म्हणून राहणार नाहीं.

(३) या कायद्यांत 'प्रांत' या शब्दाचा अर्थ,—दुसरा संदर्भ असल्यास गोष्ट निराळी—'गव्हर्नराचा प्रांत' असा होईल; याचप्रमाणें 'प्रांतीय' शब्दाचा अर्थ लावावयाचा आहे.

(अ) हिंदी संस्थानें वगळून हिंदुस्थानचा जो भाग राहतो त्याचे वरीलप्रमाणें अकरा प्रांत केले आहेत; भाषावार प्रांतरचना, नैसर्गिक विभाग इ० महत्त्वाच्या गोष्टी विचारांत न घेतां हिंदुस्थानांत ब्रिटिश साम्राज्य जसजसें पसरत गेलें तसतसें राज्यकारभाराच्या व्यवस्थेच्या दृष्टीनें

वरील भाग पाडण्यांत आले आहेत. वरील व्यवस्थेला वायव्यसरहद्द, ओरिसा व सिंध हे अपवाद मानले जातील. १९२१ पासून कॉंग्रेसनें भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाला धरून हिंदुस्थानचे २१ प्रांत पाडले आहेत. 'स्वतंत्र' हिंदुस्थानांत आपल्या राष्ट्रीय सोयीप्रमाणें व गरजेप्रमाणें आपणांस प्रांतांची पुनर्रचना करावी लागेल. लोकसंख्या व उत्पन्न या दृष्टीनें पाहिल्यास, सर्वांत छोटा प्रांत **पाव** कोटि संख्येचा वायव्य सरहद्द-प्रांत, व सर्वांत मोठा बंगाल प्रांत **पांच** कोटींचा; सरहद्दप्रांताचें उत्पन्न पावणेदोन कोटि रुपये, तर मद्रास प्रांताचें उत्पन्न सोळा कोटि रुपये.

(आ) मद्रास, मुंबई व बंगाल या तीन प्रांतांना प्रेसिडेन्सी किंवा इलाखा असें म्हणत असत. प्रेसिडेन्सी म्हणजे **प्रेसिडेन्टच्या** ताब्यांत असलेला मुलूख. ईस्ट इंडिया कंपनीच्या फॅक्टरीच्या कौन्सिलचा एक प्रेसिडेन्ट म्हणजे अध्यक्ष असे. पुढें या व्यापारी कंपनीनें मुलूख पादाक्रांत करावयास सुरुवात केली त्या वेळीं, त्या प्रदेशाचा कारभार साहजिकच या प्रेसिडेंटकडे आला; म्हणून प्रदेशाला 'प्रेसिडेन्सी' हें नांव पडलें. अशा फॅक्टरी प्रथम सुरत, मद्रास व कलकत्ता येथें होत्या. पार्लमेंटच्या १७८४ च्या कायद्यानें 'प्रेसिडेन्ट' जाऊन त्या ठिकाणीं 'गव्हर्नर' आले. तथापि प्रेसिडेन्सी हा शब्दप्रघात कायम राहिला. परंतु १९३५ च्या कायद्यानें सर्व अकरा प्रदेशांना 'प्रांत' हीच एकमेव संज्ञा मिळाली आहे. दुसरा एक फरक असा कीं, मुंबई, मद्रास व बंगाल या तीन प्रांतांवर जे गव्हर्नर नेमले जातात ते थेट इंग्लंडहून येतात; ते राजकारणपटु व मुत्सद्दी असतात अशी समजूत आहे. लोकशाहीच्या तत्त्वाप्रमाणें राज्य-कारभाराचा गाडा हाकण्यांत त्यांचें विशेष साहाय्य हिंदी लोकांना— नवशिक्यांना— व्हावें हा उद्देश. बाकीचे गव्हर्नर 'इंडियन सिव्हिल सर्व्हिस'मधील अर्थात् नोकरशाहीच्या म्होरक्यांमधून नेमतात. वरील दोन्ही तऱ्हांबद्दल १९३५ च्या कायद्यांत कोठेंच उल्लेख नाहीं; परंतु 'प्रघाता'ला जवळ जवळ 'कायद्या'चें स्वरूपच प्राप्त होतें; इतकेंच कीं, 'प्रघात' नको असला म्हणजे 'कायद्या'पेक्षां लवकर व चटदिशीं बदलतां येतो. वरील तीन्ही प्रांतांच्या गव्हर्नरांच्या पगाराबरोबर (दरमहा दहा हजार रुपये) संयुक्त प्रांताच्या गव्हर्नराचा पगार आणून बसविला आहे.

(इ) १९३५ च्या कायद्याच्या २९० कलमाप्रमाणें नवीन प्रांत बनवितां येतील किंवा सध्यांच्या प्रांतांच्या मर्यादा बदलतां येतील. त्याला प्रांतीय कायदेमंडळें व सरकारें, त्याचप्रमाणें फीडरल (मध्यवर्ती) कायदे-मंडळ व सरकार यांची संमति पाहिजे. सध्यां कर्नाटक व आन्ध्र या दोन प्रांतांची (काँग्रेस प्रांतांची) याबाबत विशेष चळवळ चालू आहे. याकरतां मुंबई व मद्रास कायदेमंडळांत अनुकूल ठराव करण्यांत आले आहेत; परंतु पुढील सर्व भाग ब्रिटिश सरकारवर अवलंबून आहे. तसेंच नवीन प्रांत जमाखर्चाच्या दृष्टीनें स्वावलंबी होतात किंवा नाहीं हाही एक महत्त्वाचा प्रश्न आहे. शिवाय आपणास १९३५ चा कायदा सर्वच्या सर्व आमूलाग्र **स्वयंनिर्णया**च्या तत्त्वाला धरून बदलून घ्यावयाचा आहे; म्हणून नवीन प्रांत बनविण्यासारख्या एखाद्दुसऱ्या बिनमहत्त्वाच्या प्रश्नासंबंधीं सरकारला कायद्यांत बदल करा असें म्हणणें शोभणार नाहीं. आपल्या डोळ्यांपुढें हिंदी संस्थानांचाही प्रश्न आहे. कर्नाटक प्रांताचाच प्रश्न घेतला, तर **कर्नाटकांत** बेळगांव, धारवाड, विजापूर, कारवार, बल्लारी, मंगलोर, कुर्ग या जिल्ह्यांबरोबरच सबंध म्हैसूर संस्थान व हैदराबादेंतील रायचूर, गुलबर्गा यांचा समावेश कां होऊं नये? ही परिस्थिति निर्माण होण्यास राज्यक्रांति होऊन गेली पाहिजे, तरच मनाजोगती घडी आपणांस बसवितां येईल. नाहीं तर स्वराज्य किंवा संपूर्ण स्वातंत्र्याच्या मुख्य बाबीवरून लक्ष उडून किरकोळ गोष्टींवर तें खिळावयाचें. योग्य मर्यादेंत सर्व गोष्टींबाबत चळवळी चालावयास हव्यात ही गोष्ट कबूल केली पाहिजे. परंतु तारतम्य सुटतां कामा नये, एवढी सूचना देणें आवश्यक वाटतें.

(ई) हिंदुस्थानच्या व खुद्द ब्रह्मी लोकांच्या इच्छेविरुद्ध ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून वेगळा करण्यांत आला आहे. या **विभक्तीकरणा**च्या प्रश्नावर ब्रह्मदेशांत कायदेमंडळाच्या निवडणुकी लढविल्या असतांना विभक्तीकरणाच्या विरुद्ध ब्रह्मी जनतेचें बहुमत पडलें आहे. १९३१ च्या कराची काँग्रेसनें ब्रह्मदेशाबाबत एक ठराव केला असून, त्यांत ब्रह्मी लोकांचा स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य केला आहे. हिंदुस्थानांत सामील होणें व पुढें केव्हांही वाटल्यास त्यांतून वेगळें होणें, हाही हक्क

मान्य करण्यांत आला आहे. परंतु ब्रिटिशांनीं आपल्या साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें ब्रह्मदेश अलग करून, हिंदुस्थान पुढें मागें स्वतंत्र झाला तरी आपलें पूर्वेकडील पाऊल पक्कें करून ठेवण्याची व्यवस्था केली आहे. परंतु हें विसरतां कामा नये कीं, हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नाबरोबरच ब्रह्मदेश, सिलोन इ० देशांच्या स्वातंत्र्याचा प्रश्न सुटणार आहे.

( उ ) अरबस्तानांतील एडन हें आजपर्यंत मुंबई इलाख्यांत समाविष्ट असे; परंतु आतां तें साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें ब्रिटिश सरकारनें आपल्याकडे घेतलें आहे.

( ऊ ) गव्हर्नरांच्या प्रांतांशिवाय इतर प्रांत म्हणजे चीफ कमिशनरांचे प्रांत. ते म्हणजे ब्रिटिश बलुचिस्तान, दिल्ली, अजमीर-मेरवारा, कुर्ग, अंदमान आणि निकोबार बेटें, पंथ पिपलोदा. ( शेवटचा पंथ पिपलोदा हा टापू अवघा १९ चौरस मैल असून तो माळव्यांतील पंडित आडनांवाच्या दाक्षिणी ब्राह्मणाकडे जहागीर म्हणून आहे. त्याचें उत्पन्न रु. १५००० असून त्यापैकीं रु. ४००० पंडित यांना मिळतात व बाकीचे रु. ११००० ब्रिटिश सरकारला मिळतात. ) १९३५ च्या कायद्याच्या ९४ ते ९८ कलमान्वयें या प्रांतांचा कारभार चालावयाचा आहे. फीडरल कायदेमंडळांत जरी यांना प्रतिनिधी निवडून देण्याचा अधिकार आहे, तथापि गव्हर्नरांच्या प्रांतांप्रमाणें स्वराज्याचे कोणतेही अधिकार या प्रांतांना देण्यांत आलेले नाहींत. इतकेंच नव्हे, तर कुर्गखेरीज इतरांना कायदेमंडळासारखी प्रातिनिधिक संस्थाही नाहीं; मग जबाबदार स्वराज्याची गोष्ट तर दूरच राहिली ! ब्रिटिश बलुचिस्तान म्हणजे क्वेट्टा प्रांत. हा सरहद्दवरील असल्यामुळें तेथें जवळ जवळ लष्करी अम्मलच चालू आहे. क्वेट्टा-भूकंपाचे वेळीं तेथें राष्ट्रीय पुढाऱ्यांना जाऊं देण्यांत आलें नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. वायव्य सरहद्दप्रांतांतील लोकांनीं ज्याप्रमाणें कॉंग्रेसला मिळून इतर प्रांतांप्रमाणें जबाबदार स्वराज्याच्या हक्काकरितां अतिशय हालअपेष्टा सोसून, झगडा केला व त्यांत यश मिळविलें त्याप्रमाणें क्वेट्टाभागांतील प्रजेनें, स्वतःच्या पायावर उभे राहण्यास शिकलें पाहिजे. गझदर, अबदुस समद प्रभृति बलुची पुढारी याबाबत जागे

झाले असून जिना, आगाखान यांच्यामार्फत खटपट करूं लागले आहेत; स्वतंत्र स्वायत्त प्रांत करतां आला नाहीं, तरी निदान सिंधला जाऊन मिळण्याची त्यांची मागणी आहे. दिल्ली प्रांतांतही ( दिल्ली शहर व आसपासचीं खेडीं मिळून झालेला प्रांत ) आपणांस स्वराज्याची घटना मिळवून घेण्याबाबत जोराची चळवळ चालू आहे; गव्हर्नर जनरलच्या खास देखरेखीखालीं तेथें पूर्वीप्रमाणेंच दडपशाही नंगा नाच घालीत आहे; अजमीर-मेरवाऱ्याची तीच दशा. त्यांचें म्हणणें 'आपणास संयुक्तप्रांतास जोडून घ्या' असें आहे; या प्रांतांतील कांहीं खेडीं, फेडरेशनमध्यें सामील होण्यास आमिष म्हणून, उदेपूर-जोधपूर दरबारांना देण्यांत आलीं आहेत. दिल्ली, अजमीर-मेरवारा प्रांतांतील दडपशाहीविरुद्ध नुकताच हरिपुरा काँग्रेसनें निषेधपर ठराव मंजूर केला आहे. तात्पर्य, वरील सर्व प्रदेशांना स्वायत्तता मिळाल्याशिवाय किंवा स्वायत्त प्रांतांत त्यांचा समावेश झाल्याशिवाय वरील चळवळ अथवा खळबळ शांत होणार नाहीं.

वऱ्हाडसंबंधी योजना

**४७.**—ज्या अर्थीं कांहीं प्रदेश ( या कायद्यांत 'वऱ्हाड' म्हणून उल्लेखिलेला ) हिज एक्झॉल्टेड हायनेस हैदराबादच्या निजामसाहेबांच्या आधिराज्याखालीं आहे, परंतु हा कायदा मंजूर होण्याच्या मितीला ब्रिटिश राजेसाहेब व निजामसाहेब यांच्यामध्यें झालेल्या व चालू असलेल्या करारान्वयें सदरहू प्रदेशाचा राज्यकारभार मध्यप्रांताच्या राज्यकारभाराबरोबर चालविला जात जाहे.

आणि ज्या अर्थीं राजेसाहेब व निजामसाहेब यांचे दरम्यान असा एक करार करण्याचा विचार चालू आहे कीं, ज्याअन्वयें निजामसाहेबांचें वऱ्हाडवर आधिराज्य चालू राहून सुद्धां मध्यप्रांत व वऱ्हाड मिळून एक गव्हर्नराचा प्रांत समजण्यांत येऊन त्याप्रमाणें त्याचा राज्यकारभार चालविण्यांत यावाः

त्या अर्थीं,

( १ ) जोंपर्यंत वरीलसारखा करार अमलांत आहे तोंपर्यंत—

( क ) निजामसाहेबांचें आधिराज्य किंवा सार्वभौमत्व चालू असून सुद्धां वऱ्हाड व मध्यप्रांत मिळून एक गव्हर्नराचा प्रांत होईल व त्याचें नांव 'मध्यप्रांत व वऱ्हाड' असें राहील;

( ख ) या कायद्यांत किंवा दुसऱ्या कोणत्याही कायद्यांत ज्या ज्या ठिकाणीं 'ब्रिटिश हिंदुस्थान' असा उल्लेख येईल त्या त्या ठिकाणीं तो 'ब्रिटिश हिंदुस्थान आणि वऱ्हाड' यांना उद्देशून

आहे असें समजावें. तसेंच या कायद्यांत ज्या ज्या ठिकाणीं राजेसाहेबांच्या प्रजाजनांचा उल्लेख येईल त्या त्या ठिकाणीं त्या प्रजाजनांत राजनिष्ठेच्या शपथेची बाब वगळून निजाम-साहेबांच्या वऱ्हाडी प्रजेचा अन्तर्भाव होतो असें समजावें;

( ग ) मध्यप्रांत आणि वऱ्हाड प्रांतिक कायदेमंडळाच्या अथवा कौन्सिल ऑफ स्टेटच्या मतदारांच्या पात्रतेसंबंधीं या कायद्यान्वयें केलेली व्यवस्था सदरहू करारांतील या बाबीसंबंधींची योजना अमलांत आणली जाईल अशा प्रकारची राहील.

( २ ) वरीलसारखा करार झालाच नाहीं अथवा झाल्यानंतर तो पुढें रद्द करण्यांत आला, तर या कायद्यांतील मध्यप्रांत व वऱ्हाड यासंबंधींचे उल्लेख मध्यप्रांताबद्दल आहेत असें समजावें; राजेसाहेब आपल्या कौन्सिलच्या सल्ल्यानें त्यांना योग्य वाटतील ते फेरफार या कायद्यांत करतील.

( अ ) वास्तविक वऱ्हाड प्रांत हा मूळचा निजामच्या राज्यापैकीं. परंतु हैदराबाद येथें ठेवलेल्या ब्रिटिश फौजेच्या खर्चाकरितां म्हणून १८५३ च्या तहाअन्वयें तो प्रांत ब्रिटिशांच्याकडे आला व त्याची व्यवस्था व राज्यकारभार मध्यप्रांताच्या बरोबर चालू झाला. असें असलें तरी निजामचें वऱ्हाडवरील आधिराज्य कबूल करण्यांत आलें. लॉर्ड कर्झनच्या कारकीर्दींत १९०२ सालीं याबाबत कायमची (?) व्यवस्था ठरविण्यांत येऊन वऱ्हाड-बाबत निजामास दरसाल २५ लाख रुपये खंडणी देण्यांत येऊं लागली. या अर्धवट परिस्थितीमुळें १९३५ चा कायदा होईपर्यंत वऱ्हाडचा कारभार फॉरेन ज्युरिस्डिक्शन ॲक्टाखालीं गव्हर्नर जनरलमार्फत चालत असे. वऱ्हाडतर्फे मध्यवर्ती असेंब्लींतील सभासद लोकनायक बापूजी अणे हे जरी लोकांनीं निवडून दिलेले असले, तरी वरील परिस्थितीमुळें त्यांची गणना गव्हर्नर जनरलनें **नेमलेल्या** सभासदांत होत आहे. १९३५ च्या कायद्यानें ही परिस्थिति बऱ्याच अंशानें बदललेली आहे.

वर उल्लेखिलेला, ब्रिटिश राजेसाहेब आणि निजामसाहेब यांचे-मधील करार, १३ नोव्हेंबर १९३६ रोजीं गॅझेट ऑफ इंडियामध्यें जाहीर करण्यांत आला. तो वरील कलमाच्या दृष्टीनें महत्त्वाचा असल्या-

मुळें त्याला जोडलेलें शेड्यूल व त्याबाबतचे कागदपत्र यांचेसह यापुढें समग्र उद्धृत करीत आहे:—

" हिंदुस्थानचे बादशहा आणि ब्रिटिश राजेसाहेब, व लेफ्टेनंट जनरल हिज एक्झॉल्टेड हायनेस असफ झा मुझफर-उल्-मुल्क वल मामलिक, निजांम-उल्-मुल्क निजाम-उद्-दौला, नबाब सर मीर उस्मान अली खान, बहादुर, फत्तेजंग, ब्रिटिश सरकारचे विश्वासूक दोस्त, जी. सी. एस्. आय्., जी. बी. ई., हैदराबाद (दक्षिण)चे निजाम यांच्या दरम्यान २४ आक्टोबर १९३६ या दिवशीं झालेला करार:—

ज्या अर्थी हिज एक्झॉल्टेड हायनेस हैदराबादचे निजाम यांच्या आधिपत्याखालील राज्यांत वऱ्हाड म्हणून ओळखल्या गेलेल्या कांहीं प्रदेशांचा अंतर्भाव होतो;

आणि ज्या अर्थी ५ नोव्हेंबर १९०२ च्या करारान्वयें हिज एक्झॉल्टेड हायनेसच्या वऱ्हाड ह्या प्रदेशाचा—ज्या प्रदेशावरील हिज एक्झॉल्टेड हायनेसचें आधिपत्य पुनः एकदां मान्य केलें गेलें होतें—ब्रिटिश सरकारनें त्याला इष्ट वाटेल त्या पद्धतीनें राज्यकारभार पहावा अशी तरतूद करण्यांत आली होती;

आणि ज्या अर्थी फेडरेशनमध्यें सामील होऊं इच्छिणाऱ्या हिंदी संस्थानांचें व स्वायत्त प्रांत म्हणून बनणाऱ्या ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांतांचें मिळून एक हिंदी फेडरेशन स्थापन करण्याच्या योजनेची चर्चा ब्रिटिश सरकार, पार्लमेंट, ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी संस्थानिक यांच्या प्रतिनिधींमध्यें झाली आहे;

आणि ज्या अर्थी पार्लमेंटनें हिंदुस्थानच्या फेडरेशनची एक घटना पसंत करून तिचा गव्हमेंट ऑफ इंडिया ॲक्ट, १९३५, हा कायदा बनविला आहे, तथापि त्या कायद्याचे निरनिराळे भाग वेगवेगळ्या वेळीं अमलांत यावेत अशी तरतूद करून ठेविली आहे;

आणि ज्या अर्थी सदर कायद्याच्या तरतुदींपैकीं कोणतीही हिज एक्झॉल्टेड हायनेसच्या प्रदेशांना त्यांच्या संमतीशिवाय आणि ऐकमत्याशिवाय लावली जाणार नाहीं;

आणि ज्या अर्थी ब्रिटिश राजेसाहेब आणि हिज एक्झॉल्टेड हायनेस यांच्या दरम्यान त्याबाबत करार घडून आल्यास मध्यप्रांत आणि वऱ्हाड यांचा राज्यकारभार, सदर करार अमलांत असेपर्यंत, सदर कायद्याप्रमाणें एक गव्हर्नराचा प्रांत म्हणून केला जाईल;

आणि ज्या अर्थी वऱ्हाड म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रदेशाचा राज्यकारभार, सदर कायद्याच्या तरतुदीनुसार मध्यप्रांत म्हणून प्रसिद्ध असलेल्या ब्रिटिश राजेसाहेबांच्या प्रदेशाबरोबरच केला जावा आणि त्या प्रदेशांबरोबरच सदर कायद्यान्वयें स्थापित व्हावयाच्या फेडरेशनचा वऱ्हाड हा एक घटक व्हावा अशी हिज एक्झॉल्टेड हायनेसची इच्छा आहे आणि या हेतूस्तव ५ नोव्हेंबर १९०२ च्या कराराच्या ऐवजीं नवीन करार करावा हें बरें असें दिसून आलें आहे;

म्हणून आतां पुढीलप्रमाणें करार ठरविण्यांत येत आहे:—

कलम १—या करारान्वयें हिज एक्झॉल्टेड हायनेसचें वऱ्हाडवरील आधिपत्य ब्रिटिश राजेसाहेबांकडून मान्य करण्यांत येत आहे व पुन: पक्कें जाहीर करण्यांत येत आहे;

कलम २—हिज एक्झॉल्टेड हायनेस या करारान्वयें आपल्या स्वत:तर्फे व आपले वंशज व वारस यांचेतर्फे जाहीर करीत आहेत कीं, प्रस्तुत करारांतील तरतुदींच्या मर्यादेंत व तरतुदीअन्वयें ते वऱ्हाड म्हणून प्रसिद्ध असलेल्या व यांत तसा उल्लेख आलेल्या प्रदेशापुरते १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टखालीं स्थापन झालेल्या हिंदी फेडरेशनमध्यें सामील होत आहेत आणि ब्रिटिश राजेसाहेब त्या सामील होण्याला या करारान्वयें मान्यता दर्शवीत आहेत.

कलम ३—हिज एक्झॉल्टेड हायनेस या करारान्वयें आपल्या स्वत:-तर्फे व आपले वंशज व वारस यांचेतर्फे वऱ्हाडला लागू होणाऱ्या या कायद्यांतील तरतुदींचा स्वीकार करीत असल्याचें जाहीर करीत आहेत; अशा हेतूनें कीं, प्रस्तुत कराराच्या तरतुदींच्या मर्यादेंत व तरतुदीअन्वयें आणि वऱ्हाडवरील हिज एक्झॉल्टेड हायनेसचें आधिपत्य चालू राहिलें

तरी वऱ्हाडचा आणि मध्यप्रांत म्हणून प्रसिद्ध असलेल्या ब्रिटिश राजेसाहेबांच्या प्रदेशांचा, जणूं तो एकच प्रांत आहे असें समजून मध्यप्रांत आणि वऱ्हाड या नांवानें, राज्यकारभार चालविण्यांत यावा; आणि राजेसाहेब आणि सर्व फीडरल, मध्यवर्ती आणि प्रांतिक अधिकारी मध्यप्रांत आणि वऱ्हाड या प्रांताबाबतचीं, या कायद्यानें त्यांच्यावर सोपविलेलीं, सर्व कामें पाहतील.

कलम ४—मध्यप्रांत आणि वऱ्हाड या प्रांताचा गव्हर्नर, हिज एक्झॉल्टेड हायनेसबरोबर सल्लामसलत केल्यानंतर, राजेसाहेबाकडून नेमला जाईल आणि गव्हर्नरनें राजेसाहेबांतर्फे अगर त्यांचा प्रतिनिधी म्हणून जीं कामें करावयाचीं आहेत तीं वऱ्हाडपुरती, हिज एक्झॉल्टेड हायनेसनें या करारास संमति दिली एतदर्थेच, केलीं जातील.

कलम ५—हिज एक्झॉल्टेड हायनेसचें निशाण, ब्रिटिश निशाणाबरोबरच तें ज्या ज्या वेळीं व ज्या ज्या ठिकाणीं, मध्यप्रांत आणि वऱ्हाडच्या गव्हर्नरच्या हुकमानें, वऱ्हाडमध्यें लाविलें जाईल त्या त्या वेळीं आणि त्या त्या ठिकाणीं लाविलें जाईल.

कलम ६—हिंदी संस्थानांबाबतचीं राजेसाहेबाचीं कामें करणाऱ्या राजेसाहेबाच्या प्रतिनिधीच्या पूर्वसंमतीच्या मर्यादेंत हिज एक्झॉल्टेड हायनेसचा, वऱ्हाडी लोकांना हैदराबादी मानाच्या पदव्या अर्पण करण्याचा, अधिकार या करारान्वयें मान्य करण्यांत येत आहे.

कलम ७—राजेसाहेबांच्या सदर प्रतिनिधीचें प्रत्येक खेपेला ऐकमत्य असल्यास हिज एक्झॉल्टेड हायनेसचा वऱ्हाडांत दरबार भरविण्याचा हक्क राजेसाहेब मान्य करीत आहेत.

कलम ८—राजेसाहेबांच्या सदर प्रतिनिधीचें ऐकमत्य असल्यास योग्य प्रसंगीं मध्यप्रांत आणि वऱ्हाडच्या गव्हर्नराला हैदराबादेस दरबारी भेटी देण्याबाबत आमंत्रण करण्याची हिज एक्झॉल्टेड हायनेसला मोकळीक देण्यांत येत आहे.

कलम ९—हिज एक्झॉल्टेड हायनेसच्या नांवानें वऱ्हाडांतील कोणत्याही मशिदींत खुतबा पढण्याच्या कामीं राजेसाहेब कोणतीही हरकत उपस्थित करणार नाहींत.

कलम १०—५ नोव्हेंबर १९०२ चा करार नष्ट झाला असला तरीही, वऱ्हाडच्या बाबत आजपर्यंत दिली जात असलेली पंचवीस लाख रुपयांची वार्षिक रक्कम हिज एक्झॉल्टेड हायनेसना राजेसाहेब देत राहतील.

कलम ११—मध्यप्रांत आणि वऱ्हाड व हैदराबाद या दोघांच्या समान हिताची अथवा हैदराबादच्या हितसंबंधांना प्रत्यक्ष धक्का देणारी एखादी बाब असल्यास तिच्यासंबंधानें आपल्या सरकारची बाजू मांडण्या-करितां मध्यप्रांत आणि वऱ्हाड या प्रांताच्या राजधानीच्या ठिकाणीं एक वकील [ एजंट ] ठेवण्याचा हिज एक्झॉल्टेड हायनेसना अधिकार राहील; परंतु वर सांगितलेल्या गोष्टीखेरीज मध्यप्रांत आणि वऱ्हाडच्या अन्तर्गत कारभाराशीं त्या वकिलाचा कांहींही संबंध असणार नाहीं.

कलम १२—एखाद्या हिंदी संस्थानाच्या हक्कसंरक्षणाची जादा जबाबदारी पार पाडण्याचे कामीं मध्यप्रांत आणि वऱ्हाडचा गव्हर्नर, वऱ्हाडचा राज्यकारभार पाहत असतांना, हैदराबाद संस्थानच्या व्यापारी आणि आर्थिक हितसंबंधांकडे योग्य लक्ष पुरवील.

कलम १३—वऱ्हाडला लागू होणाऱ्या, वऱ्हाड व मध्यप्रांत कायदेमंडळानें मंजूर केलेल्या कोणत्याही बिलास— जर तें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेविलेलें असेल तर— राजेसाहेबांच्या नांवानें संमति दिल्याचें जाहीर करितांना गव्हर्नर जनरल असें स्पष्ट करील कीं, वऱ्हाडला लागू होणाऱ्या बिलाला त्यानें दिलेली संमति ही, हिज एक्झॉल्टेड हायनेसनीं या कराराला दिलेल्या संमतीअन्वयें, दिली जात आहे.

कलम १४—वऱ्हाडला लागू होणाऱ्या, वऱ्हाड व मध्यप्रांत कायदेमंडळानें मंजूर केलेल्या कोणत्याही बिलास राजेसाहेबांच्या नांवानें संमति दिल्याचें जाहीर करितांना अथवा राजेसाहेबांच्या शिक्कामोर्तबी-करितां राखून ठेवलेल्या अशा कोणत्याही बिलास राजेसाहेबांची संमति प्रदर्शित करतांना गव्हर्नर असें स्पष्ट करील कीं, वऱ्हाडला लागू होणाऱ्या बिलाला दिलेली संमति ही, हिज एक्झॉल्टेड हायनेसनीं या कराराला दिलेल्या संमतीअन्वयें, दिली जात आहे.

कलम १५—सध्यां चालू असलेल्या कोणत्याही तहान्वयें अथवा करारान्वयें हिज एक्झॉल्टेड हायनेस उपभोगीत असलेल्या लष्करी

संरक्षणाच्या हमीस प्रस्तुत करारांतील कोणत्याही गोष्टींनें, कोणत्याही प्रकारें धक्का पोंचणार नाहीं किंवा त्यांत कमतरता पडणार नाहीं आणि हैदराबाद कॉंटिंजंट म्हणून प्रसिद्ध असलेल्या अथवा तत्तुल्य आधुनिक सैन्याच्या खर्चाकरितां, सध्यां नसलेला कोणताही भार हिज एक्झॉल्टेड हायनेसच्या अंगावर पडेल असा प्रस्तुत करारांतील कोणत्याही बाबीचा अर्थ केला जाणार नाहीं.

कलम १६—मध्यप्रांत आणि वऱ्हाड कायदेमंडळाच्या निवडणुकी-संबंधांत आणि फेडरेशनची स्थापना झाल्यावर, कौन्सिल ऑफ स्टेटच्या निवडणुकीसंबंधांत पुढील तरतुदी अमलांत येतील:—

( क ) परीक्षा उत्तीर्ण होण्यावर मतदाराची लायकी जिथपर्यंत अवलंबून आहे तिथपर्यंत वऱ्हाडांतलि मतदारसंघांबाबत हैदराबादेंतील तत्तुल्य परीक्षा उत्तीर्ण होणें हें मध्यप्रांत आणि वऱ्हाडमधील समान परीक्षा उत्तीर्ण होण्याइतकेंच आणि म्हणून मतदानाची लायकी संपादन करण्याइतकेंच प्रभावी ठरेल.

( ख ) स्वतःच्या अथवा दुसऱ्याच्या लष्करांतील अथवा पोलिसां-तील नोकरीवर मतदाराची लायकी जिथपर्यंत अवलंबून आहे तिथपर्यंत हिज एक्झॉल्टेड हायनेसच्या लष्करांतील शिपाई अथवा हैदराबाद स्टेट पोलीसमधील पोलीस असणें हें वऱ्हाडांतील मतदारसंघांबाबत राजे-साहेबांच्या लष्करांतील सैनिक अथवा ब्रिटिश हिंदुस्थानांतील पोलीस शिपाई असण्याइतकेंच समान दर्जाचें मानलें जाईल.

कलम १७—या करारांतील १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाला उद्देशून असलेले उल्लेख, दुरुस्त झालेल्या त्याच ॲक्टाला अथवा मागून केलेल्या कोणत्याही कायद्याला उद्देशून आहेत असा अर्थ करण्यांत येईल, परंतु जर या करारांतील कोणत्याही तरतुदींना विसंगत असणारी अथवा या कराराला जोडलेल्या शेड्यूलमध्यें निर्दिष्ट केलेल्या या कायद्यांतील कोणत्याही तरतुदींत बदल करणारी जर एखादी दुरुस्ती असेल— या ठिकाणीं ज्या दुरुस्त्या वऱ्हाडला लागू करण्याबाबत हिज एक्झॉल्टेड हायनेसनीं मान्यता दिलेली असेल त्यांचा अथवा ज्या दुरुस्त्या वऱ्हाडखेरीज फक्त इतर प्रदेशांना लागू होणाऱ्या

आहेत त्यांचा विचार कर्तव्य नाहीं— तर दुरुस्ती झाल्यापासून सहा महिन्यांच्या आंत केव्हांही तशी आगाऊ सूचना देऊन हिज एक्झॉल्टेड हायनेसनीं सदर करार संपुष्टांत आणावा.

कलम १८— ५ नोव्हेंबर १९०२ च्या कराराच्या ऐवजीं हा करार अमलांत येईल, उभयपक्षांच्या संमतीखेरीज त्यांत बदल होणार नाही किंवा दुरुस्त्या होणार नाहीत अथवा लगतच्या मागील कलमांतील तरतुदींना बाध न आणतां, जोंपर्यंत एकाला मिळालेले हक्क दुसऱ्याकडून इमानेंइतबारें पाळले जात आहेत तोंपर्यंत कोणत्याही पक्षाकडून संपुष्टांत आणिला जाणार नाहीं आणि तो करार १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया अक्टाच्या तिसऱ्या खंडाच्या सुरुवातीच्या तारखेला अमलांत येईल; परंतु असें असलें तरी त्या तारखेपूर्वींसुद्धां सदर कायदा, वऱ्हाड आणि मध्यप्रांतांत आणि त्यासंबंधांत, अमलांत आणण्याकरितां या कायद्यान्वयें अगर त्याखालील ऑर्डर-इन्-कौन्सिलअन्वयें वऱ्हाडांत ज्या गोष्टी आगाऊ कराव्या लागतील त्या करण्यांत याव्यात.

कलम १९—१९३५च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया अॅक्टाच्या ६ व्या कलमांतील तरतुदी या कराराला लागू होणार नाहींत अथवा या करारा-खालीं उत्पन्न होणारे तंटे फीडरल कोर्टाच्या अधिकारक्षेत्रांत येणार नाहींत.

कलम २०— या करारांतील कोणत्याही गोष्टीनें हिज एक्झॉल्टेड हायनेसच्या वऱ्हाडखेरीज इतर प्रदेशाबाबतच्या हक्कांना बाध येणार नाहीं आणि या करारान्वयें असें जाहीर करण्यांत येत आहे कीं, १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया अॅक्टाच्या दुसऱ्या खंडाच्या कलमांतून वर्णिलेल्या हिंदी फेडरेशनमध्यें सामील होण्याकरितां हिज एक्झॉल्टेड हायनेसनी सामिलनामा लिहून दिला अगर नाहीं आणि राजेसाहेबांनीं तो स्वीकारला अगर नाहीं तरीसुद्धां हा करार अमलांत राहील.

हा करार पक्का करण्याकरितां हिज एक्सलन्सी दि मोस्ट ऑनरेबल दि मार्क्विस ऑफ **लिनलिथगौ**, पी. सी., के. टी., जी. एम्. एस्. आय्.; जी. एम्. आय. ई., ओ. बी. ई., डी. एल्., टी. डी., हिज मॅजेस्टीज व्हाइसरॉय आणि गव्हर्नर जनरल ऑफ इंडिया यांनीं राजे-

साहेबांच्यातर्फे सही केली आहे आणि लेफ्टेनंट जनरल हिज एक्झॉल्टेड हायनेस असफ झा मुझफर-उल्-मुल्क वल मामलिक, निजाम-उल्-मुल्क निजाम-उद्-दौला, नबाब सर **मीर उस्मान अली खान**, बहादुर, फत्तेजंग, ब्रिटिश सरकारचे विश्वासूक दोस्त, जी. सी. एस्. आय., जी. बी. ई., हैदराबाद ( दक्षिण ) चे निजाम, यांनीं सही केली आहे.

---

## शेड्यूल ( १७ व्या कलमांतील )

( या शेड्यूलमधील प्रांत आणि गव्हर्नर यांना उद्देशून असणारे उल्लेख मध्यप्रांत आणि वऱ्हाड व त्याचा गव्हर्नर यांना उद्देशून आहेत. )

ॲक्टाच्या १ ल्या खंडांतील राजेसाहेब, गव्हर्नर जनरल आणि हिंदी संस्थानांसंबंधीं राजेसाहेबांचीं कामें करणारा राजप्रतिनिधी यांच्या-संबंधींचा तेवढा भाग.

दुसऱ्या आणि तिसऱ्या खंडांतील पुढील कलमें:—

सातव्या कलमांतील ( १ ) व ( २ ) हीं पोटकलमें.

नवव्या कलमांतील ( ३ ) पोटकलम.

बाराव्या कलमांतील ( २ ) पोटकलम.

चौदाव्या कलमांतील ( १ ) पोटकलम.

बत्तिसावें, त्रेचाळिसावें, चव्वेचाळिसावें, आणि एकुणपन्नासावें हीं कलमें.

पन्नासाव्या कलमांतील ( ३ ) पोटकलम.

बावन्नाव्या कलमांतील ( ३ ) पोटकलम.

चोपन्नावें, पंचाहत्तरावें, शाहत्तरावें, सत्याहत्तरावें, एकुणनव्वदावें आणि नव्वदावें हीं कलमें.

( प्रांतांमध्यें फेडरेशनची अम्मलबजावणीची सत्ता चालविणें, गव्हर्नर जनरल अथवा गव्हर्नर यांनीं आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें टाकलेलें पाऊल, स्टेट सेक्रेटरीकडून केलेलें गव्हर्नर जनरलचें नियंत्रण व गव्हर्नर जनरलनें केलेलें गव्हर्नरचें नियंत्रण, गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांनीं आपल्या मर्जीप्रमाणें काढलेले वटहुकूम आणि

गव्हर्नर जनरल व गव्हर्नर यांनीं केलेले कायदे या गोष्टींसंबंधीं वरील कलमें आहेत. )

गव्हर्नर जनरलला संरक्षण खात्याबाबत आपल्या मर्जीप्रमाणें वागणें भाग आहे तेवढ्यापुरतें अकराव्या कलमांतील ( १ ) पोटकलम.

बाराव्या कलमाच्या ( १ ) पोटकलमांतील ( क ) आणि ( छ ) सदरांत सांगितलेल्या जादा जबाबदाऱ्या गव्हर्नर जनरलवर, आणि बावन्नाव्या कलमाच्या ( १ ) पोटकलमांतील ( क ), ( च ) आणि ( छ ) या सदरांत सांगितलेल्या जादा जबाबदाऱ्या आणि बावन्नाव्या कलमाच्या ( २ ) पोटकलमांत सांगितलेली वऱ्हाडाबाबतची जादा जबाबदारी या गव्हर्नरांवर लादल्या आहेत तेवढ्यापुरतीं बारा आणि बावन्न हीं कलमें.

पुढील गोष्टींसंबंधीं आपल्या मर्जीप्रमाणें नियम करणें गव्हर्नर जनरलला किंवा गव्हर्नरला भाग आहे तेवढ्यापुरता ३८ व्या कलमाच्या ( १ ) पोटकलमांतील मर्यादात्मक भाग ( प्रोव्हिजो ) आणि ८४ व्या कलमाच्या ( १ ) पोटकलमांतील मर्यादात्मक भागः—

( क ) वर वर्णिलेल्या जादा जबाबदाऱ्या पार पाडण्याच्या संबंधांत फीडरल अगर प्रांतिक कायदेमंडळांतील कामकाजाच्या पद्धतीचें व कामकाज चालविण्याचें नियंत्रण करणें; आणि

( ख ) प्रोव्हिजोंत सांगितलेल्या मर्यादेपर्यंत हिंदी संस्थानांशीं संबंध असलेल्या गोष्टी अथवा कोणत्याही हिंदी संस्थानाचा अधिपति अगर त्यांतील राजघराण्यांतील कोणीही, यांच्या वैयक्तिक वर्तनाबाबत चर्चा करणें अगर प्रश्न विचारणें या दोहोंनाही बंदी करणें;

आणि संरक्षण खात्याबाबत फीडरल कायदेमंडळांत कामकाजाच्या पद्धतीचें व कामकाज चालविण्याचें नियंत्रण करणें, आणि प्रोव्हिजोंत सांगितलेल्या मर्यादेपर्यंत गव्हर्नर जनरलनें प्रांतांच्या राज्यकारभाराबाबत आपल्या मर्जीप्रमाणें केलेल्या उपाययोजनेबद्दल चर्चा करणें अगर प्रश्न विचारणें या गोष्टींना बंदी करणें, याबाबत गव्हर्नर जनरलला आपल्या मर्जीप्रमाणें नियम करणें भाग आहे तेवढ्यापुरता ३८ व्या कलमाच्या सदर ( १ ) पोटकलमांतील प्रोव्हिजोचा भाग.

४० व्या कलमांतील ( २ ) पोटकलम आणि ८६ व्या कलमांतील

( २ ) पोटकलम. ( या पोटकलमांच्या आधारें गव्हर्नर जनरलला किंवा गव्हर्नरला फीडरल अगर प्रांतिक कायदेमंडळांतील, बाराव्या कलमाच्या ( १ ) पोटकलमांतील ( क ) सदरांत आणि बावन्नाव्या कलमाच्या ( १ ) पोटकलमांतील ( क ) सदरांत सांगितलेल्या जादा जबाबदाऱ्या पार पाडण्याच्या कामास उपसर्ग पोंचविणारी चर्चा नियंत्रित करितां येते.

४७ वें कलम ( वऱ्हाडासंबंधींचें ).

गव्हर्नर जनरल अथवा गव्हर्नर यांचे कायदे, किंवा गव्हर्नर जनरल अथवा गव्हर्नर यांनीं आपल्या मर्जीप्रमाणें काढलेले वटहुकूम रद्द करणारीं, त्यांत दुरुस्त्या करणारीं अथवा त्यांना विरोधी असणारीं किंवा संरक्षण खात्याशीं संबंध असणाऱ्या गोष्टींना उपसर्ग पोंचविणारीं बिलें अथवा उपसूचना प्रविष्ट करण्यास अगर मांडण्यास गव्हर्नर जनरलची अथवा गव्हर्नरची आपापल्या मर्जीप्रमाणें आगाऊ संमति असणें भाग आहे तेवढ्यापुरतें १०८ वें कलम.

ब्रिटिश नॅशनॅलिटीचा कायदा, आर्मी ॲक्ट, विमानदळाचा कायदा, आरमारी शिस्तीचा कायदा, प्राइझ ( युद्धांत पकडलेलें जहाज ) किंवा प्राइझ कोर्टाबाबतचा कायदा, जादा परवानगीनें प्रिव्ही कौन्सिलकडे केलेलीं अपिलें यांना उपसर्ग पोंचविणारे कायदे करण्याचा संबंध आहे त्याखेरीज ११० वें कलम.

नवव्या खंडांतील पहिला भाग ( हा फीडरल कोर्टासंबंधीं आहे ), त्यांतील २०६ व्या कलमाखेरीज.

२४ आणि ६७ हीं कलमें, २२० कलमाचें ( ४ ) पोटकलम, ३११ कलमाचें ( ७ ) पोटकलम आणि ब्रिटिश प्रजाजन नसणाऱ्या इसमांनीं घ्यावयाच्या शपथेचा अगर करावयाच्या प्रतिज्ञेचा संबंध जेवढ्यापुरता आहे तेवढ्यापुरतें चौथें शेड्यूल.

( सही ) **मीर उस्मान अली खान**

माझ्या समक्ष

( सही ) डी. जी. मॅकेंझी,

( सही ) **लिनलिथगौ** हैदराबाद येथील रेसिडंट.

२४ आक्टोबर १९३६.

लेफ्टेनंट जनरल हिज एक्झॉल्टेड हायनेस असफ झा मुजफर-उल्-मुल्क वल मामलिक, निजाम-उल्-मुल्क निजाम उद्-दौला, नबाब सर **मीर उस्मान अली खान,** बहादुर, फत्तेजंग, ब्रिटिश सरकारचे विश्वासूक दोस्त, जी. सी. एस्. आय., जी. बी. ई. हैदराबाद (दक्षिण) चे निजाम यांसी—

माननीय मित्रवर्या,

२४ आक्टोबर १९३६ रोजीं वऱ्हाडच्या भावी राज्यव्यवस्थेसंबंधीं जो नवा करार करण्यांत आला त्याबाबत स्पष्ट खुलासा करावा आणि भावी काळांत गैरसमज उत्पन्न होऊं न देण्याबद्दल खबरदारी घेण्यांत यावी एतद्विषयीं आपणांस पत्र लिहिण्याची मला राजेसाहेबांकडून आज्ञा झाली आहे.

हा करार नष्ट होण्याचा संभव अगर त्याचा परिणाम म्हणून पुढें वऱ्हाडची वाट काय याचा विचार सदर करारांत करण्यास राजेसाहेब अत्यंत नाखूष आहेत. तथापि संशयाला बिलकुल जागा राहूं नये म्हणून राजेसाहेबांना हें स्पष्ट करणें बरोबर वाटतें कीं, जर दुर्दैवानें हा करार नष्ट होण्याचा प्रसंगच ओढवला, तर दुसऱ्या कराराच्या अभावीं अगर दुसरा करार होईपर्यंत, १८५३ व १८६० या सालच्या तहांतून तद्विरुद्ध कांहींही असलें तरी, राजेसाहेबांना योग्य वाटेल ती, वऱ्हाडच्या राज्यकारभाराबाबत, नवी व्यवस्था राजेसाहेब करतील आणि त्या प्रांतांत आपला संपूर्ण आणि एकमेव अधिकार आणि सत्ता चालवितील. अर्थात् मला हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, त्यामुळें आपल्या वऱ्हाडवरील प्रभुत्वाच्या मान्यतेला बिलकुल धक्का पोंचणार नाहीं; तसेंच दरसाल पंचवीस लाख रुपये आपणाकडे न चुकतां पाठविण्यांत येतील आणि सध्यांच्या तहाप्रमाणें आपल्या संरक्षणाची घेतलेली हमी पुढें चालविण्यांत येईल; त्याचप्रमाणें आपल्या संमतीखेरीज वऱ्हाडच्या राज्यव्यवस्थेंत सध्यांच्यापेक्षां अगदीं निराळा फरक केला जाणार नाहीं. आपल्याबद्दल मला वाटणारा निरतिशय आदर मी प्रकट करूं इच्छितों.

नवी दिल्ली; आपला सच्चा मित्र,

२६ आक्टोबर १९३६ (सही) लिनलिथगौ,

हिंदुस्थानचा व्हाइसरॉय आणि गव्हर्नर जनरल.

## फर्मान

१२ शाबान १३५२ हिजरी या तारखेला माझ्या राज्यांतून लॉर्ड विलिंग्डन निघून जाण्यापूर्वी काढलेल्या फर्मानांत ब्रिटिश सरकारशीं, नवीन घटना सुरू झाल्यावर माझ्या वऱ्हाडच्या राज्यकारभाराबाबत ज्या वाटाघाटी झाल्या व त्यांतून जी फलनिष्पत्ति झाली त्याबाबत मीं समाधान व्यक्त केलें होतें. परंतु सविस्तर योजना लौकर जाहीर होणें अत्यंत आवश्यक होतें. जरी माझ्या वऱ्हाडचा कारभार मध्यप्रांताच्या कारभाराबरोबर एकाच गव्हर्नरचा प्रांत म्हणून व्हावयाचा असला तरी वऱ्हाडवरील माझें प्रभुत्व स्पष्टपणें व निःसंदिग्धपणें निदर्शनास यावयास पाहिजे होतें. तसेंच ब्रिटिश हिंदुस्थानांत नवी घटना चालू लागण्यापूर्वी आमचा परस्परांतील करार जाहीर व्हावा अशी माझी इच्छा होती. अल्लाच्या मोहबतीनें सदर करार ७ शाबान १३५५ हिजरी या दिवशीं यशस्वी रीतीनें पुरा होऊन त्याच्यावर माझी सही झाली व म्हणून तो करार व्हाइसरॉयांच्या पत्रासह मी लोकांच्या माहितीकरितां प्रसिद्ध करीत आहे. ज्या सलोख्यानें हा करार करण्यांत आला आणि १९०२ चा करार संपुष्टांत आणला तो सलोखा मनांत आणून, मला अतिशय समाधान वाटत आहे; आणि या संस्मरणीय प्रसंगीं त्या समाधानांत मी माझ्या हैदराबादी आणि वऱ्हाडी प्रजेला अंशभागी करितों.

निजामसाहेबांची सही.

२७ शाबान १३५५ हिजरी.

*  *  *

वऱ्हाडाबाबतचा हा करार ज्या गॅझेटमध्यें प्रसिद्ध झाला त्यांतच ब्रिटिश राजेसाहेबांनीं निजामाला 'हैदराबाद आणि वऱ्हाडचे निजाम' ही वंशपरंपरा चालणारी पदवी दिली आणि हैदराबादच्या गादीच्या वारसाला 'हिज हायनेस वऱ्हाडचा राजपुत्र' ही पदवी देण्यांत आली. या पदव्यांच्या योगानें निजामाचें वऱ्हाडवरील स्वामित्व ढळढळीतपणें लोकांच्या निदर्शनास आणण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे. तसेंच 'प्रिन्स

ऑफ बेरार' ही पदवी वडील राजपुत्राला देण्यांत 'प्रिन्स ऑफ वेल्स' या पदवीची नक्कल करण्यांत आली आहे. तथापि वरून कितीही स्वामित्वाच्या खुणा दाखविण्यांत अल्या, तरी सुसरीनें गिळलेलें माणिक कांहीं मिळूं शकलें नाहीं, ही गोष्ट कांहीं लपून राहत नाहीं.

(आ) या ४७ कलमांतील (१) (ख) पोटकलमांत राजनिष्ठेच्या शपथेबाबत जो भाग आला आहे त्याबाबतची व्यवस्था या कायद्याच्या ४ थ्या शेडयूलमधील शपथेच्या ३ ऱ्या नमुन्यानें करून ठेविली आहे. तो नमुना पुढीलप्रमाणें:—

" अमुक कौन्सिलचा ( असेंब्लीचा ) मला सभासद निवडण्यांत ( नेमण्यांत ) आल्यामुळें मी गंभीरपणानें शपथ घेतों ( प्रतिज्ञा करतों ) कीं, **माझ्या संस्थानिकाशीं किंवा त्यांच्या वारसांशीं माझी राजनिष्ठा व सेवकभाव कायम राखून** कौन्सिलचा (असेंब्लीचा) सभासद या नात्यानें मी हिंदुस्थानचे बादशहा व त्यांचे वारस यांच्याशीं राजनिष्ठ राहीन व माझ्यावर येणारीं कर्तव्यें मी नेकीनें पार पाडीन." ही शपथ हिंदी संस्थानिकाच्या प्रजाजनानें घ्यावयाची आहे. ती वरील करारान्वयें वऱ्हाडतर्फे निवडल्या जाणाऱ्या सभासदांना लागू पडते.

(इ) त्याचप्रमाणें ४७ कलमांतील (१) (ग) या पोटकलमांत मतदारांच्या पात्रतेबाबत करारान्वयें जी व्यवस्था ठरेल असें म्हटलें आहे त्यासंबंधीं असें म्हणतां येईल कीं, मध्यप्रांत व वऱ्हाड या दोन्ही भागांतील मतदारांच्या पात्रतेबद्दल कांहींही फरक करण्यांत आलेला नाहीं. वऱ्हाडांतील जनतेला कांहीं जादा अधिकार दिलेले आहेत असें दिसून येईल. ६ व्या शेडयूलमधील ८ व्या भागांतील कलम ४ मधील शेवटचा भाग व कलम ५ मधील ( २ ) भाग याप्रमाणें हैदराबादमधील शिक्षणविषयक समान पात्रता, तसेंच हैदराबाद लष्कर अगर पोलीस खात्यांतील पेन्शनदारी ही जादा पात्रता मानण्यांत आली आहे. वऱ्हाड राजकीय परिषदेचें उद्घाटन करतांना यासंबंधीं बंगालचे कॉंग्रेस पुढारी बाबू शरच्चंद्र बोस यांनीं आक्षेप घेतला होता; परंतु तो कसा निर्मूल व निराधार आहे हें मध्यप्रांत-वऱ्हाड सरकारनें सप्रमाण दाखवून दिलें आहे.

# भाग २ रा

# प्रांतिक सरकार

## गव्हर्नर

गव्हर्नराची नेमणूक

४८--(१) स्वदस्तुरच्या हुकमान्वयें (कमिशनने) राजेसाहेबांकडून प्रांताच्या गव्हर्नराची नेमणूक केली जाते.

(२) गव्हर्नराचा पगार आणि भत्ता, त्याचप्रमाणें त्याला आपला अधिकार सोइस्कर तऱ्हेनें व रुबाबानें चालवितां यावा एवढ्याकरितां करण्यांत यावयाच्या तरतुदी यासंबंधीं तिसऱ्या शेड्यूलमध्यें करण्यांत आलेली योजना अमलांत येईल.

(अ) गव्हर्नर याचा मूळ अर्थ, (जहाज) योग्य तऱ्हेनें व योग्य दिशेनें वल्हविणारा कर्णधार अथवा सुकाणूवाला; नियंत्रण करणारा. अलीकडे मोटारीला सुद्धां गव्हर्नर लावलेले आपण पाहतों. राज्यशास्त्रामध्यें त्याचा अर्थ राज्यनौका योग्य तऱ्हेनें हाकणारा. ब्रिटिश साम्राज्यांत सर्वत्र म्हणजे स्वायत्त वसाहतींत, हिंदुस्थानांत, इतर वसाहतींत गव्हर्नर किंवा सरगव्हर्नरांची नेमणूक ब्रिटिश राजाकडून होते. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत अध्यक्षाप्रमाणेंच गव्हर्नरांचीही लोकांकडून निवडणूक होते. स्वायत्त वसाहतींतून गव्हर्नरांची नेमणूक तेथील अधिकारारूढ असलेल्या प्रधानमंडळांच्या शिफारशीवरून राजा करतो, असा अलीकडे प्रघात पडला आहे. आयर्लंडमध्यें डी व्हॅलेरानें गव्हर्नर जनरलची जागाच रद्द करून टाकली आहे. हिंदुस्थानचा राज्यकारभार अद्याप ब्रिटिश पार्लमेंटच्या हातांत असल्यामुळें ब्रिटिश मुख्य प्रधान सुचवील त्या गृहस्थाची नेमणूक राजेसाहेब करतात. वरील देखावा, मानमरातब इत्यादि सर्व थेट राजापासून प्राप्त झालेला. जणूं गव्हर्नर, गव्हर्नर जनरल हे राजाचे हिंदुस्थानांतील प्रतिनिधी. परंतु वास्तविक ते भारतमंत्र्याचे जरा मोठे व रुबाबानें वागणारे नोकर. कारण भारतमंत्र्याचे हुकूम यांना कायद्याप्रमाणें प्रत्यहीं अमलांत आणावे लागतात. बादशहा जर ब्रिटिश प्रधानमंडळाच्या हातांतील बाहुलें बनून राहिला आहे तर त्याच्या येथल्या प्रतिनिधींना कोण विचारतो? तसेंच गव्हर्नर जर राजेसाहेबांचा **प्रतिनिधी** (कलम

६० [ १ ] ) तर एकदां राजाचा **नोकर** असलेला ( सिव्हिल सर्व्हिस-मधील ) मनुष्य एकदम नोकरीचें कवच टाकून त्याचा **प्रतिनिधी** कसा होऊं शकतो हें समजणें कठीण आहे. ३०४ कलमानें अशी सोय मात्र करण्यास हरकत नाहीं असें व्यक्त केलें आहे.

'कमिशन'नें नेमणूक करणें किंवा 'वॉरंटा'नें नेमणूक करणें ह्यांत विशेष असा फरक नाहीं. परंतु स्वायत्त वसाहतींचें अनुकरण याबाबत या कायद्यांत केलें आहे.

गव्हर्नरला चीफ जस्टिसपुढें अधिकार धारण करण्यापूर्वी शपथ घ्यावी लागते. तींत बादशहाबद्दल राजनिष्ठा व्यक्त करणें व सर्वांशीं समानतेनें वागणें या गोष्टी अन्तर्भूत असतात. हिंदुस्थानच्या किनाऱ्यापासून तीन मैलांपलीकडे जुना गव्हर्नर गेला म्हणजे नवीन गव्हर्नरानें अधिकाराचीं सूत्रें धारण करावयाचीं असा प्रघात आहे. या समारंभाचे वेळीं मानाचा क्रम मुख्य न्यायाधीश, प्रधानमंडळ, मुख्य लष्करी अम्मलदार, कौन्सिलचा अध्यक्ष, असेंब्लीचा स्पीकर याप्रमाणें असतो.

गव्हर्नरांना दिलेल्या आज्ञापत्रांतील तिसऱ्या कलमाप्रमाणें १ एप्रिल १९३७ ला १९३५ चा नवीन कायदा सुरू करण्याच्या वेळीं प्रत्येक गव्हर्नरनें शपथ घ्यावयास पाहिजे होती. १० प्रांतांतील जुन्याच गव्हर्नरांनीं सदर शपथ घेतली; परंतु बंगालच्या गव्हर्नरनें घेतली नाहीं. हा प्रकार कदाचित् चुकून झाला असावा. एप्रिलच्या प्रारंभीं बंगाल गव्हर्नरनें प्रधानमंडळाची नेमणूक केली; व त्यानें कायदेमंडळाचा तात्पुरता अध्यक्ष नेमला. कायदेशीरपणें मतमोजणी होऊन स्पीकर, डेप्युटी स्पीकर यांच्या निवडणुकी झाल्या. या बैठकीचे वेळीं काँग्रेसपक्षातर्फे 'गव्हर्नरची रीतसर नेमणूक झालेली नाहीं; तेव्हां त्यानें कायदेमंडळाची बैठक बोलावली, तात्पुरता अध्यक्ष नेमला वगैरे पुढील सर्व घडामोडी बेकायदेशीर आहेत' याबाबत हरकतीचा मुद्दा उपस्थित करण्यांत आला; परंतु स्पीकरनें ३२१ कलमाच्या प्रोव्हिजोंतील ( ख ) सदराच्या आधारें ( १९३५च्या कायद्याच्या दुसऱ्या कोणत्याही तरतुदींना बाध न आणतां....१९१९ चा कायदा जरी रद्द झाला तरी त्या कायद्यान्वयें केलेल्या कोणत्याही नेमणुकीला बाध येणार नाहीं आणि अशी कोणतीही नेमणूक जणूं काय ती १९३५

च्या कायद्यान्वयें तिच्याशीं जुळणाऱ्या भूमिकेच्या ( करेस्पाँडिंग ) हुद्द्यावर झाली आहे असें मानण्यांत येईल ) आणि ५३ (२) कलमाच्या आधारें ( गव्हर्नरनें केलेलें कोणतेंही कृत्य तें आज्ञापत्रांतील सूचनांशीं विसंगत झालें या सबबीवर कोर्टापुढें नेतां येणार नाहीं ) हरकतीचा मुद्दा फेटाळून लावला आणि बंगाल असेंब्लीची बैठक कायदेशीर रीत्या भरली असा निर्णय दिला. सदर प्रकरण झाल्यानंतर कलकत्ता हायकोर्टकडे काँग्रेसपक्षाचे उपनेते श्री. तुळशीचरण गोस्वामी यांनीं स्पीकर अझीझ-उल्-हक्क यांच्या विरुद्ध दावा दाखल केला.

वादीचें म्हणणें असें कीं, " प्रतिवादीची योग्य आणि कायदेशीर निवडणूक झालेली नाहीं; म्हणून प्रतिवादी हा बंगाल असेंब्लीचा स्पीकर नव्हता आणि नाहीं; तसेंच स्पीकर म्हणून काम करण्याचा त्याला अधिकार नव्हता आणि नाहीं: यास्तव हायकोर्टानें, 'प्रतिवादीनें स्पीकर म्हणून काम करूं नये आणि स्पीकरच्या जागेचा पगारही घेऊं नये', असा निर्बंध ( इंजंक्शन ) करावा." जास्त खुलासा:— " सध्यां बंगालच्या गव्हर्नरच्या जागेवर कोणीही इसम नाहीं; कारण सर जॉन अँडरसन हे ता. १।४।३७ ( नवीन कायदा सुरू झाल्याच्या दिवशीं ) ला गव्हर्नर राहिले नाहींत आणि त्यांची योग्य तऱ्हेनें बंगालच्या गव्हर्नरीवर नेमणूक झालेली नाहीं. ४६ कलमाप्रमाणें प्रांतिक गव्हर्नरांची नेमणूक करण्याची तरतूद करून ठेविली आहे. त्यांत, अर्थात्, बंगाल प्रांतही येतो. ४८ कलमांत गव्हर्नरची नेमणूक राजेसाहेबांकडून कमिशननें करण्यांत येते असें म्हटलें आहे. आणि ४९ व्या कलमांत राजेसाहेबांच्यातर्फे प्रांताचा कारभार गव्हर्नर पाहील असें म्हटलें आहे. प्रतिवादीनें पुढील गोष्टी कबूल केल्या आहेत:—( १ ) १९३५ च्या कायद्यानें बंगालच्या गव्हर्नराची जागा निर्माण करणारीं 'लेटर्स पेटंट' ( हक्क, पदवी, हुद्दा इ० बहाल करणारें, राजानें पाठविलेलें अनावृत पत्र ) निघालीं आहेत. ( २ ) सर जॉन अँडरसन यांना बंगालच्या गव्हर्नरच्या जागेवर नेमणारें कमिशन ( कलम ४६ प्रमाणें ) राजेसाहेबांनीं काढलेलें नाहीं. ( ३ ) ८ मार्च १९३७ रोजीं गव्हर्नरांना 'आज्ञापत्र' आलें आहे, त्यांत म्हटलें आहे कीं, 'गव्हर्नरनें सर न्यायाधीशासमक्ष सदर कमिशन वाचवून घ्यावें.' परंतु

तसें तें वाचण्यांत आलेलें नाहीं व गव्हर्नरनें आपल्या अधिकाराची शपथही घेतली नाहीं.

" ६० व्या कलमाप्रमाणें, राजेसाहेबांचा प्रतिनिधी म्हणून गव्हर्नर आणि असेंब्ली, किंवा गव्हर्नर, असेंब्ली आणि कौन्सिल मिळून प्रांतिक कायदेमंडळ बनतें; यावरून स्पष्ट दिसून येतें कीं, नव्या कायद्यानें जुन्या कायद्यापेक्षां गव्हर्नरची भूमिका निराळी कल्पिली आहे; कारण नव्या कायद्यान्वयें गव्हर्नर हा कायदेमंडळाचा एक घटक आहे, परंतु जुन्या कायद्याच्या ७२ ( क ) कलमांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, गव्हर्नर हा कायदेमंडळाचा सभासद असणार नाहीं. ६२ व्या कलमाच्या आधारें सर जॉन अँडरसननें बंगाल असेंब्लीचें अधिवेशन ७ एप्रिल १९३७ ला बोलाविलें. ६५ ( १ ) कलमाप्रमाणें स्पीकर व डे० स्पीकरची निवडणूक करावयाची असते. त्या कलमांतीलच तिसऱ्या पोटकलमाप्रमाणें गव्हर्नरनें तात्पुरता अध्यक्ष नेमावयाचा असतो. अँडरसननें एरिक स्टड या युरोपियन सभासदाची अध्यक्षाच्या जागेवर तात्पुरती नेमणूक केली. तेव्हां मुद्दा असा कीं, वरीलपैकीं एकही कृत्य कायदेशीर नाहीं; कारण सर जॉन अँडरसन वरील सर्व कामें करतांना १९३५ च्या कायद्यान्वयें घालून दिलेल्या पद्धतीअनुसार बंगालच्या गव्हर्नरच्या जागेवर नेमला गेला नव्हता." यावर प्रतिवादीतर्फे ५३ ( २ ) व ८७ ( १ ) व ( २ ) या कलमांच्या आधारें, झालेल्या कृत्याचें समर्थन करण्यांत आलें. सदर दाव्याचा निकाल कलकत्ता हायकोर्टाचे जस्टिस लॉर्ट विलयम्स यांनीं पुढीलप्रमाणें दिला:—" वादीतर्फे मांडण्यांत आलेल्या हरकतींना ३२१ कलमांतच उत्तर दिलें गेलें आहे. या कलमाची भाषा जशी असावयास पाहिजे तशी नाहीं हें मला मान्य आहे, परंतु त्या कलमांतील उद्देश स्वच्छ आहे. तो हा कीं, 'अशी कोणतीही नेमणूक जणूं काय ती १९३५ च्या कायद्यान्वयें करेस्पाँडिंग जागेवर झाली आहे असें मानण्यांत येईल.' वादीचें पुढें असें म्हणणें दिसतें कीं, '१९३५ च्या कायद्यानें निर्माण केलेली गव्हर्नरची जागा ही १९१९ च्या कायद्याखालच्या गव्हर्नरच्या—मग तो एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या अगर प्रधानांच्या सल्ल्यानें वागो—जागेशीं जुळती ( करेस्पाँडिंग ) जागा नव्हे.' मला हें पटत नाहीं. 'करेस्पाँडिंग'

या शब्दाऐवजीं 'सिमिलर' किंवा 'सेम' ('सारखी' किंवा 'तीच') हे शब्द जर कायद्यांत असते तर वादीच्या म्हणण्यांत कांहीं तथ्य होतें; परंतु 'करेस्पाँडिंग' हा शब्द वापरला असल्यामुळें पार्लमेंटाला अनुमानानें हें दर्शवावयाचें होतें कीं, जुन्या कायद्यांतलि गव्हर्नरची जागा हीच नव्या कायद्याप्रमाणेंही विवक्षित आहे.

आतां प्रतिवादींनीं आपला भर ५३ व ८७ या दोन कलमांवर दिलेला आहे. परंतु मुख्य मुद्द्यावरच माझा निश्चय झाला असल्यामुळें या अवांतर गोष्टींकडे लक्ष पुरविण्याची मला गरज वाटत नाहीं. म्हणून खर्चासह मी हा दावा फेटाळून लावतों.''

याप्रमाणें गव्हर्नरच्या नेमणुकीच्या कामीं झालेल्या चुकीचा कांहींही परिणाम पुढील सर्व कृत्यांवर झाला नाहीं व बंगाल-गव्हर्नरची नेमणूक व त्याची पुढील वागणूक ही पूर्णपणें कायदेशीर होती असा निकाल जस्टिस लॉर्ट विल्यम्स यांनीं २९ एप्रिल १९३७ रोजीं दिला. कोशांत पाहिलें असतां 'करेस्पाँडिंग' या शब्दाचा 'सिमिलर' असाही अर्थ आढळतो. तेव्हां न्यायमूर्तींनीं जो बारकावा काढला, त्यांत कांहीं विशेष अर्थ दिसत नाहीं. शिवाय मागील कायद्यांतलि व नवीन कायद्यांतील गव्हर्नरच्या भूमिका सदृश आहेत असें म्हणणें म्हणजे नवीन प्रांतिक स्वराज्याच्या मनूची न कळत थट्टा करण्यासारखेंच आहे.

हंगामी गव्हर्नर नेमण्याचा अधिकार राजेसाहेबांचाच आहे. या कायद्याच्या ३०४ कलमाप्रमाणें हंगामी गव्हर्नरांना मूळ गव्हर्नरांचे सर्व अधिकार, हक्क व सोयी प्राप्त होतात. प्रत्येक गव्हर्नराला स्वतंत्र सेक्रेटरी, त्याचीं खास कामें व जबाबदाऱ्या पाहण्याकरितां, देण्यांत आला आहे. ४८ व ३०४ या दोन्ही कलमांत 'हिज मॅजेस्टी' असे शब्द आहेत; त्याच्यापुढें 'आपल्या मर्जीप्रमाणें' हे शब्द, हिंदुस्थानांतील गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांच्याप्रमाणें, नाहींत; तेव्हां त्यांचा अर्थ ब्रिटिश मुख्य प्रधान. ३०४ कलमांत हंगामी गव्हर्नराच्या नेमणुकीची तरतूद केलेली आहे. त्यांतील 'तो इसम जर दुसऱ्या अधिकाराच्या जागेवर असेल तर' या शब्दयोजनेवरून आय्. सी. एस्. मधील गव्हर्नर नेमण्यास या कलमानें सवड करून ठेवली आहे.

(आ) १९३५ च्या कायद्यान्वयें हिंदुस्थानांत एकंदर ११ प्रांतिक गव्हर्नर आहेत; परंतु त्यांपैकीं एकही इसम हिंदी नाहीं ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. १९१९ च्या सुधारणांचे वेळीं लॉर्ड सिंह या एका हिंदी इसमाची तरी गव्हर्नर म्हणून नेमणूक झाली होती. तें पद त्यांना फार काळ टिकूं देण्यांत आलें नाहीं हा भाग वेगळा. त्यानंतर हंगामी गव्हर्नर सर शिकंदर, छत्तारीचे नबाब, तांबे, राव, रेड्डी हे झाले. परंतु गव्हर्नरच्या जागेवर मूळ नेमणूक अशी कोणाही हिंदी इसमाची झालेली नाहीं. यावरून ब्रिटिश राज्यकर्त्यांचा हिंदी लोकांबद्दल विश्वास वर्षानुवर्ष कसा नाहींसा होत चालला आहे हें दिसून येतें. शिवाय आतां प्रांतिक कारभारांतून ब्रिटिश लोकांचें, ब्रिटिश व्यापाऱ्यांचें, ब्रिटिश कारखानदारांचें व ब्रिटिश सनदी नोकरांचें हित पाहण्याला हिंदी मनुष्य नेमून कसें भागणार ? तेथें अस्सल ब्रिटिश मनुष्यच नेमला जाणार हें साम्राज्यशाहीच्या नीतीला धरूनच आहे.

या दृष्टीनें ओरिसा प्रांतांतील हंगामी गव्हर्नराची नेमणूक मोठी बोधप्रद व मनोरंजक आहे. जो डेन (रेव्हिन्यू कमिशनर) मुख्य प्रधान ना. विश्वनाथ दास यांच्या आज्ञेप्रमाणें आतांपर्यंत कामें पाहत होता तो आतां गव्हर्नर हबॅकच्या जागीं बसणार व मंत्रिमंडळाच्या हुकमावर त्याच्या सह्या घेण्याची पाळी येणार ! अशी परिस्थिति डेनसाहेबांच्या नेमणुकीनें निर्माण होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं.

या हंगामी गव्हर्नरांच्या नेमणुकीच्याबाबत आपल्यांतील कित्येक लोक अद्याप जुन्या काळांतच वावरतांना दिसतात. मध्यप्रांत असेंब्लींत हंगामी गव्हर्नरच्या जागीं मुख्य प्रधान डॉ. खरे यांची नेमणूक कां केली नाहीं याबद्दल मजूरप्रतिनिधी रा. पागे यांनीं तहकुबीची सूचना आणली. असल्या नोकऱ्या कॉंग्रेसनें स्वीकारावयाच्या नाहींत असें कॉंग्रेसचें धोरण असल्याचें डॉ. खरे यांनीं सांगितलें. अध्यक्षांनीं ही बाब प्रांतिक सरकारच्या अखत्यारींत येत नाहीं या मुद्द्यावर सूचनेस परवानगी दिली नाहीं. परंतु प्रश्न विचारणाऱ्याच्या डोक्यांत तांबे, राव यांची नोकरीची स्थिति व खऱ्यांचें प्रधानपद हीं एकच होत हें पाहून त्याच्या बुद्धीची कींव करावीशी वाटते. ओरिसा असेंब्लींत

फेडरेशनविरोधी ठरावावर झालेल्या वादविवादास उत्तर देतांना मुख्य प्रधान श्री. विश्वनाथदास म्हणाले, "प्रधानाच्या हाताखालील आजचा नोकर (पोलादी चौकटीचा एक अवयव म्हणजे आय्. सी. एस्.) हा ज्या प्रांतिक स्वराज्यांत उद्यां गव्हर्नर होऊं शकतो त्या स्वराज्यास कुचकामीच म्हटलें पाहिजे."

या हंगामी गव्हर्नरांच्या नेमणुकीबाबत गांधीजींचें देलांग (ओरिसा) येथें मत विचारलें असतां ते म्हणाले, "या हंगामी नेमणुका केव्हांही प्रांतिक नोकरांमधून करतां कामा नयेत. आजचा हाताखालचा इसम एकदम गव्हर्नर होतो हें प्रधानांना बिलकुल रुचणार नाहीं. ज्याला नोकर म्हणून वागविलें त्याच्याचकडे मार्गदर्शक म्हणून कसें जावयाचें किंवा त्याच्याच अध्यक्षतेखालीं प्रधानमंडळाची बैठक कशी भरवावयाची? अशा गव्हर्नराला अलिप्तपणें वागतां येणार नाहीं किंवा प्रधानांच्या मनांत त्याला आपल्याविषयीं आदर आणि विश्वास निर्माण करितां येणार नाहीं. वरीलसारख्या नेमणुका करण्यापूर्वी व्हाइसरॉय आणि भारतमंत्री यांनीं खूप विचार करून काय तें ठरविलें पाहिजे, असें मला वाटतें. अशा नेमणुकींचा निषेध करणें हा प्रधानांचा केवळ हक्कच नव्हे तर तें त्यांचें कर्तव्यकर्म आहे. सदर नेमणूक काँग्रेस व सरकार यांच्यामध्यें लढा उत्पन्न करण्यास पुरेसें कारण व्हावें अगर होऊं नये हें मला आतांच सांगतां येत नाहीं. वसाहतींतील याबाबत प्रघात असा आहे कीं, वरिष्ठ कोर्टाच्या सरन्यायाधीशानें रजेच्या मुदतींत गव्हर्नरचें काम पाहावें."

यानंतर कलकत्त्यास काँग्रेस वर्किंग कमिटी एप्रिल १९३८ च्या पहिल्या आठवड्यांत भरली असतां ओरिसागव्हर्नरप्रकरणाबाबत तिनें पुढील ठराव मंजूर केला:—

"प्रधानांच्या हाताखालीं काम करणाऱ्या एका अधिकाऱ्याला गव्हर्नरच्या रजेच्या मुदतींत हंगामी गव्हर्नर म्हणून नेमण्यांत आलें आहे हें ऐकून कमिटीला अत्यंत आश्चर्य वाटलें. अशा प्रकारची नेमणूक ही अत्यंत अनिष्ट असून इतर देशांतील प्रघातांना विरुद्ध अशी आहे. जे पूर्वी आपले नोकर होते व म्हणून ज्यांच्यावर आपली इतराजी झाली असण्याचा संभव आहे अशा इसमांचे प्रधान होऊन काम करणें हें

प्रधानांना कठीण जाईल. ओरिसा प्रधानांनीं या नेमणुकीस तीव्र नापसंती दर्शविली असून त्याबद्दल त्यांनीं आपला निषेध कळविला असल्याचें कमिटीला समजतें. गव्हर्नर जनरल किंवा भारतमंत्री यांनीं ही नेमणूक बदलून टाकावी असें त्यांना कमिटीचें सांगणें आहे. सरन्यायाधीशांना हंगामी गव्हर्नर नेमण्याची रूढ प्रथा अमलांत आणावी अशी कमिटीची सूचना आहे." अशा तऱ्हेनें काँग्रेसचा अधिकृत निषेध प्रकट झाला तरी व अँग्लो-इंडियन पत्रकारांसुद्धां सर्व वृत्तपत्रकारांनीं एकमुखानें या नेमणुकीबाबत तीव्र नापसंती प्रकट केली असतांना सुद्धां सरकारी हत्ती कुत्र्यांच्या भुंकण्याला न जुमानतां बेगुमानपणें पुढेंच चालला होता. कांहीं लोक सल्ला देऊं लागले:— " झाला निषेध एवढा बस्स झाला. यापुढें असली नेमणूक होणार नाहीं. मंत्र्यांनीं राजीनामा देण्याचें कांहींच कारण नाहीं. अमका गव्हर्नर असला काय आणि तमका असला काय, जोंपर्यंत लोककल्याण करण्याची संधि व अवकाश मंत्र्यांना दिला जात आहे तोंपर्यंत मतदारांनीं सोपविलेल्या जबाबदारींतून मंत्र्यांना मुक्त होतां येणार नाहीं."

१५ एप्रिलच्या सुमारास व्हाइसरॉय व गांधी यांची दिल्लीस मुलाखत झाली; तींत या विषयाबाबत अर्थात्च चर्चा झाली असली पाहिजे. तथापि त्या वेळीं कोणत्याही प्रकारचें आश्वासन गांधींना मिळालें नाहीं. अशी एक तोड सुचविण्यांत आली कीं, मि. डेन यांनीं हंगामी गव्हर्नरी संपल्या-बरोबर रजेवर निघून जावें व परत नोकरीवर येऊं नये. या व्यवस्थेनें मि. डेन यांचा प्रश्न सुटणार होता, पण काँग्रेसमंत्र्यांची अडचण बिलकुल निवारली जाणार नव्हती. ५ मे तारीख जसजशी जवळ येत चालली तसतशीं सरकारी व काँग्रेसचीं चक्रें गरगर फिरूं लागलीं. डेनसाहेबानें गव्हर्नरीचीं सूत्रें घेण्याच्या अगोदरच हबॅकसाहेबांकडे आपले राजीनामे सादर करण्याचें विश्वनाथदासप्रभृति मंत्र्यांनीं ठरविलें. हंगामी गव्हर्नरा-प्रमाणें चार महिन्यांपर्यंत, पूर्वीच्या दुष्ट दाखल्याला अनुसरून, हंगामी मंत्रिमंडळ नेमून या आपत्तींतून रस्ता काढावा अशी शक्कल निघाली व त्याकरितां गव्हर्नरनें खलीकोटच्या राजाची भेटही घेतली. उत्कल प्रांतिक काँग्रेस कमिटीनें कायदेमंडळ बरखास्त करून फेरनिवडणूक करा व या

प्रश्नाबाबत मतदारांचा कौल घ्या असें आव्हान दिलें. परंतु आश्वासन-मागणीच्या पेचप्रसंगाच्या वेळेप्रमाणें ब्रिटिश सरकार या सरळ मार्गाचा थोडाच आश्रय करणार होतें! अशा परिस्थितींत गांधींनीं सरकारला भावी झगड्याचा इशारा देणारें एक खणखणीत पत्रक काढलें. त्या पत्रकांत गांधी म्हणतात, "डेनच्या गव्हर्नरीवरील नेमणुकीवरून अव्वल दर्जाचा पेचप्रसंग निर्माण होणार. दिसण्यांत गोष्ट किरकोळ दिसते. डेन, गव्हर्नरीची मुदत संपल्याबरोबर निवृत्त होणार, यामुळें झालेला अन्याय बिलकुल दुरुस्त होत नाहीं. माझ्या मतें डेनला पुनः कमिशनरीवर कां नेमूं नये हें समजत नाहीं. प्रधानांना जर उट्टेंच काढावयाचें असेल, तर ते मागून आपला बदला घेतील. सर्व खटकतें आहे तें हें कीं, खालचा नोकर उद्यां गव्हर्नर म्हणून उरावर बसणार; त्याच्याकडे रोज सह्याला कागद न्यावे लागणार व तो अध्यक्ष असतांना प्रधानमंडळाच्या बैठकींना प्रधानांना हजर राहावें लागणार.

हा सगळा प्रकार इतका चमत्कारिक आहे कीं, त्यामुळें प्रांतिक स्वायत्ततेची थट्टा होत आहे. देण्यांत आलेली स्वायत्तता खरीखुरी असेल तर त्या बीजांतून स्वराज्याचा वृक्ष निपजण्याबद्दल वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं अतिशय दक्षता बाळगली पाहिजे. पूर्वीच्या जुनाट पद्धतीनें कांहींही करितां कामा नये. प्रत्येक गोष्ट सर्वमान्य नियमान्वयें अगर उत्कृष्ट प्रघातान्वयेंच घडली पाहिजे. गव्हर्नर जनरलच्या किंवा स्टेटसेक्रेटरीच्या लहरीखातर कोणतीही गोष्ट होतां कामा नये. सुलतानशाहीची प्रतिष्ठा खुषीच्या किंवा नाखुषीच्या आज्ञापालनावर अवलंबून असते; परंतु ज्या सरकारनें खुषीनें आपले अधिकार सोडून प्रांतिक स्वराज्य देण्याचें ठरविलें त्या सरकारची प्रतिष्ठा बहुमतवाल्या पक्षाला नेहमीं आपल्याबरोबर राखण्यांत असते हें सरकारनें विसरूं नये. प्रांतिक स्वराज्याची वाढ होण्याला व चकमकी टाळण्याला माझ्या मतें याच्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

व्हाइसरॉय आणि गव्हर्नर यांनीं प्रधानांची राज्यकारभारनैपुण्या-बद्दल वेळोवेळीं पाठ थोपटली आहे. कायद्यानें दिलेल्या भरमसाट जादा अधिकारांचा गव्हर्नरांना उपयोग करण्याची सवड मंत्र्यांनीं कधींही दिलेली नाहीं. बहुमतवाल्या पक्षानें नेहमीं लोकहिताचे दृष्टीनें डोळ्यांत तेल

घालून वरिष्ठ सरकारचें प्रत्येक कृत्य तपासलें पाहिजे. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे सदर नेमणूक काँग्रेस मुकाट्यानें करूं देईल असें मला वाटत नाहीं.

मि. डेन गव्हर्नराच्या खुर्चीवर बसले कीं, ओरिसा मंत्री राजीनामा देणार आहेत असें मीं ऐकलें आहे. हंगामी मंत्रिमंडळ नेमून सरकार राज्यकारभार चालविणार असेंही मीं ऐकलें आहे. यांत असा हेतु दिसतो कीं, हंगामी गव्हर्नराबरोबर हंगामी मंत्रिमंडळाची कारकीर्द कशी तरी संपवावी आणि कायम गव्हर्नराबरोबर पूर्वींचें मंत्रिमंडळ परत आपल्या जागेवर आणावें, असा जर डाव असेल तर तो सरळपणाचा नाहीं. वरीलसारखी व्यवस्था काँग्रेसनें चालू दिल्यास तिच्या पदरीं मूर्खपणा येऊन तिची सर्वत्र नाचक्की झाल्याशिवाय राहणार नाहीं. प्रांताचा कारभार पाहणें हा कांहीं पोरखेळ नव्हे. हें काम किती जोखमीचें व भलेपणा न देणारें आहे हें दिवसेंदिवस काँग्रेसच्या प्रत्ययास येत आहे. जो खरा मंत्री आहे, ज्याच्या पाठीमागें कायदेमंडळांतील खऱ्या बहुमताचें सामर्थ्य आहे, असा कोणीही मंत्री 'गव्हर्नरनें आपल्या इच्छेला येईल त्याला मंत्री करावा व या नव्या बेजबाबदार माणसाच्या हातांत प्रांताचा कारभार जावा' हें दृश्य स्वस्थपणानें पाहूं शकणार नाहीं. उशीर झाला नाहीं तोंच चुकीची दुरुस्ती होईल अशी मला आशा आहे. मार्ग पुष्कळ आहेत; परंतु तशी इच्छा असली पाहिजे. तशी इच्छा असावी अशी मी आशा करितों."

या निर्वाणीच्या पत्रकानें सरकारी गोटांत खळबळ उडून गेली. मि. डेन व गव्हर्नर, गव्हर्नर व मंत्री अशीं खलबतें झालीं. तथापि पुढें काय होणार याची कुणालाच कल्पना नव्हती. ना. विश्वनाथदास ४ मे १९३८ ला गव्हर्नराकडे राजीनामा देण्यास निघणार इतक्यांत त्यांना न येण्याबद्दल गव्हर्नरकडून निरोप आला; व लागलीच गव्हर्नरच्या सेक्रेटरीनें गव्हर्नरानें रजा घेण्याचें रहीत केल्याबद्दल पुढील पत्रक काढलें: --

" गव्हर्नराच्या रजेच्या काळांत काम पाहणाऱ्या गव्हर्नराला अनिश्चित व खळबळीच्या राजकीय परिस्थितीचा वारसा ठेवूं नये म्हणून गव्हर्नरनें आपल्या पूर्वींच्या बेतांत फरक केला आहे आणि

प्रांताच्या हिताच्या दृष्टीनें आपणास देण्यांत आलेली रजा रद्द करण्याखेरीज आपणास दुसरा मार्ग नाहीं असें गव्हर्नरनें ठरवून त्याप्रमाणें स्टेटसेक्रेटरीला रजा रद्द करण्याची विनंति केली. स्टेटसेक्रेटरीनें गव्हर्नर जनरलच्या संमतीनें सदर विनंति मान्य केली आहे." अशा तऱ्हेनें, उद्‌भवणाऱ्या पेचप्रसंगाचें, वेळींच निवारण झालें. या घडलेल्या प्रकारावर पुष्कळ चर्चा झाली. विजय कोणाचा झाला, सरकार कां नमलें, आय्. सी. एस्. मधील नोकरांना गव्हर्नर कां नेमूं नये, हिंदी बिनसरकारी मुत्सद्द्यांना या नव्या राजवटींत कायम किंवा हंगामी गव्हर्नर कां नेमलें नाहीं वगैरे प्रश्नांबद्दल खूप वाद माजून राहिला आहे. 'सुंभ जळला, तरी पीळ जळत नाहीं' या न्यायानें उपभारतमंत्री लॉर्ड स्टॅनले यांनीं पार्लमेंटांत जाहीर केलें कीं, " विशिष्ट परिस्थितींत प्रांतिक सरकारच्या अडचणी बरोबर होत्या याची आम्हांला पूर्ण जाणीव आहे. आणि यापुढें नेमणुकी करितांना योग्य ती खबरदारी घेतली जाईल. परंतु याचा अर्थ, आय्. सी. एस्. मधील योग्य लोकांना गव्हर्नर नेमावयाचें नाहीं, असा बिलकुल नाहीं. त्याबाबत ठरलेल्या सरकारी धोरणांत बिलकुल फरक पडलेला नाहीं. गेल्या १४ महिन्यांत आय्. सी. एस्. मधील ९ लोकांना तात्पुरत्या अगर कायम गव्हर्नऱ्या दिल्या आहेत यावरून सरकारी धोरण स्पष्ट होईल." या चकमकींत बिचाऱ्या डेननें ताबडतोब रजा घेऊन आपल्या देशाचा मार्ग सुधारला, व या प्रकरणावर तूर्त पडदा पडला.

संयुक्त प्रांतांत सर हॅरी हेग यांच्या रजेच्या मुदतींत नामदार सर जगदीश प्रसाद या हिंदी गृहस्थांची नेमणूक होणार अशी बोलवा होती, परंतु ती खरी झाली नाहीं. चार प्रांतांत तरी हंगामी नेमणुकीचा प्रसंग आला असतां वरिष्ठ युरोपियन नोकरांचीच वर्णी लागली. आपल्याकडे अनुभवी, मुत्सद्दी, राजकारणी असे किती तरी लोक आहेत, कीं ज्यांची नेमणूक वास्तविक गव्हर्नर म्हणून व्हावयास पाहिजे. प्रधानांनीं गव्हर्नरचें नांव सुचवावयाचें हा काळ येण्यापेक्षां स्वराज्यांत प्रांताच्या मुख्याची निवडणूक अमेरिकेंतल्याप्रमाणें होणें हें जास्त संभाव्य व इष्ट आहे. न्यू जर्सी या अमेरिकन संस्थानांत गव्हर्नरच्या निवडणुकीकरितां मुंबईचे एक पारशी गृहस्थ ( बरेच दिवस अमेरिकेंत घालविलेले ) श्री. दिनशा पेस्तनजी

फ्रामजी घडिआळी हे उभे असल्याचें वृत्त मागें आलें होतें. हिंदी माणसाला अमेरिकेंत जें स्थान पटकावणें शक्य आहे तें स्थान हिंदुस्थानांत अप्राप्य आहे, हा राजकीय गुलामगिरीचा परिणाम होय !

( इ ) गव्हर्नरांच्या पगाराबाबत ११ प्रांतांची वाटणी चार तऱ्हेनें केली आहे. मद्रास, मुंबई, बंगाल, संयुक्तप्रांत या चार गव्हर्नरांना सालींना १ लाख २० हजार रुपये पगार मिळतो. पंजाब, बिहार या गव्हर्नरांना सालीना १ लाख रुपये, मध्यप्रांत व वऱ्हाडच्या गव्हर्नराला ७२ हजार रुपये व आसाम, सरहद्द, ओरिसा, सिंध येथील गव्हर्नरांना ६६००० रुपये सालीना मिळतात. म्हणजे दरमहा रु. ५५०० पासून दरमहा रु. १०००० पर्यंत गव्हर्नरांचा पगार आहे. पगाराच्या दृष्टीनें कॉंग्रेस प्रांतांपुरताच विचार केला तर पुढील कोष्टक उद्बोधक ठरल्यावांचून राहणार नाहीं:—

| | प्रांत | गव्हर्नर दरमहा रु० | (संख्या) | प्रधान दरमहा रु० | (संख्या) |
|---|---|---|---|---|---|
| १ | मद्रास | १०००० | (१) | ५००० | (१०) |
| २ | मुंबई | १०००० | (१) | ३५०० | (७) |
| ३ | संयुक्तप्रांत | १०००० | (१) | ३००० | (६) |
| ४ | बिहार | ८३३३ | (१) | २००० | (४) |
| ५ | मध्यप्रांत व वऱ्हाड | ६००० | (१) | ३५०० | (७) |
| ६ | सरहद्दप्रांत | ५५०० | (१) | २००० | (४) |
| ७ | ओरिसा | ५५०० | (१) | १५०० | (३) |
| | एकूण | ५५३३३ | (७) | २०५०० | (४१) |

प्रांतांतून सध्यां स्वायत्ततेची सुरुवात झालेली असल्यामुळें राज्यकारभाराची दगदग, जबाबदारी ही सर्व प्रधानमंडळावर सोपविलेली आहे. गव्हर्नर हा केवळ नामधारी, इंग्लंडच्या राजासारखा सनदशीर झाला आहे, असें सांगण्यांत येतें. असें असून प्रांतिक तिजोरींतून या सात गव्हर्नरांकरितां दरमहा ५५३३३ रु. खर्च पडतात; व या रकमेच्या

निम्यापेक्षां कमी रकमेंत म्हणजे रु. २०५०० त काँग्रेसचे ४१ प्रधान सर्व राज्यकारभाराचा गाडा बिनबोभाट हाकतात. कोणाही सज्जन माणसाला या परिस्थितीची लाजच वाटली पाहिजे.

तसेंच गव्हर्नरच्या सेक्रेटरीला दोन-तीन हजार रुपये पगार, तर प्रधानांच्या पार्लमेंटरी सेक्रेटरींना दोन-तीनशें रुपये पगार. मुंबई प्रांता-पुरताच, गव्हर्नरांच्या पगाराखेरिज त्याच्याकरितां इतर खर्चाचा विचार केल्यास दरसाल तो सात लाखांपर्यंत जातो. हा अवाढव्य खर्च अजीबात नाहींसा झाला पाहिजे. या खर्चावर कायदेमंडळांत चर्चाही करण्याचा अधिकार ठेवलेला नाहीं.

मुंबई व बिहार या प्रांतांच्या गव्हर्नरांच्या पगारांत ऐन कपात करण्याबाबत एक महत्त्वाचा मुद्दा लक्षांत घेण्यासारखा आहे. मुंबई व सिंध मिळून एक प्रांत असतांना गव्हर्नराला जो पगार होता तोच, सिंध वेगळा केला असून सुद्धां, मुंबई गव्हर्नराला मिळतो; त्यांत प्रमाणशीर कपात तरी व्हावयास पाहिजे होती. तीच गोष्ट ओरिसा वेगळा केल्यानंतर बिहार प्रांताच्या गव्हर्नराबाबत व्हावयास पाहिजे होती. परंतु तशी ती करण्यांत आलेली नाहीं. त्याचप्रमाणें कोणत्याही प्रकारें जबाबदारी अथवा प्रदेशाचा विस्तार वाढला नसतांना संयुक्तप्रांताच्या गव्हर्नराच्या पगारांत वाढ करून त्याला मुंबई, मद्रास, बंगालच्या पंक्तीला आणून बसविलें आहे हीही गोष्ट कोणत्याही दृष्टीनें समर्थनीय ठरत नाहीं.

( ई ) प्रांतिक स्वराज्याच्या सुरुवातीपासून म्हणजे १ एप्रिल १९३७ पासून आतांपर्यंत ११ प्रांतांतून पुढीलप्रमाणें गव्हर्नर काम पहात आहेतः—

१ मद्रासः—लॉर्ड अर्स्किन ( वय ४३ ).
( १५ नोव्हेंबर १९३४ पासून )

२ मुंबईः—( १ ) लॉर्ड ब्रॅबोर्न ( वय ४३ ).
( डिसेंबर १९३३ ते सप्टेंबर १९३७ ).
( २ ) सर रॉजर लम्ली.
( सप्टेंबर १९३७ पासून )

३ बंगालः—( १ ) सर जॉन अँडरसन ( वय ५६ ).
( १९३२ ते नोव्हेंबर १९३७ ).

( २ ) लॉर्ड ब्रॅबोर्न.
( नोव्हेंबर १९३७ पासून ).

४ संयुक्तप्रांतः—सर हॅरी हेग, आय्. सी. एस्. (वय ५७).
( डिसेंबर १९३४ पासून ).

५ पंजाब—हर हर्बर्ट इमर्सन; आय्. सी. एस्. (वय ५७).
( एप्रिल १९३३ पासून ).

६ बिहारः—सर मॉरिस हॅलेट, आय्. सी. एस्. ( वय ५५ ).
( मार्च १९३७ पासून ).

७ मध्यप्रांत व वऱ्हाडः—( १ ) सर हाइड गोवान,
आय्. सी. एस्. ( वय ६० )
( सप्टेंबर १९३३ ते फेब्रुवारी १९३८ ).
( २ ) सर फ्रॅन्सिस वायली.
( मे १९३८ पासून ).

८ आसामः—सर रॉबर्ट रीड, आय्. सी. एस्. ( वय ५५ ).
( मार्च १९३७ पासून ).

९ वायव्य सरहद्दप्रांतः—सर जॉर्ज कनिंगहॅम,
आय्. सी. एस्. ( वय ५० )
( मार्च १९३७ पासून )

१० ओरिसाः—सर जॉन हबॅक, आय्. सी. एस्. ( वय ६० ).
( १ एप्रिल १९३६ पासून ).

११ सिंधः—सर लॅन्सलॉट ग्रॅहम, आय्. सी. एस्. ( वय ५८ ).
( १ एप्रिल १९३६ पासून ).

( उ ) तुलनेच्या दृष्टीनें निरनिराळ्या देशांतील कांहीं महत्त्वाच्या जागेचे पगार पुढें दिले आहेत. ( हरिजन, २१ ऑगस्ट १९३७ ):—

| | | |
|---|---|---|
| १ | ब्रिटिश मुख्य प्रधान. | ८००० पौंड ( दरसाल ). |
| २ | ,, कॅबिनेट प्रधान. | ५००० ,, ,, |
| ३ | उत्तर-आयर्लंडचा गव्हर्नर. | ७२०० ,, ,, |

( पैकीं आयर्लंड १८०० पौंड देते. )

| | | |
|---|---|---|
| ४ | उत्तर आयर्लंड मुख्य प्रधान | २७०० पौंड ( दरसाल ). |
| ५ | ,, ,, प्रधान | १७०० ,, ,, |
| ६ | गव्हर्नर जनरल, आयरिश फ्री स्टेट | १०००० ,, ,, ( ही जागा रद्द करण्यांत आली आहे ). |
| ७ | मुख्य प्रधान ,, | १५०० पौंड दरसाल. |
| ८ | प्रधान. | १००० ,, ,, |
| ९ | डेल एरीनचा स्पीकर | १००० ,, ,, |
| १० | ,, ,, डेप्युटी स्पीकर | ७५० ,, ,, |
| ११ | ,, ,, सभासद | ३६० ,, ,, ( + पहिल्या वर्गाचें प्रवासभाडें ). |
| १२ | ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद | ६०० पौंड दरसाल. |
| १३ | जिब्राल्टरचा गव्हर्नर | ५००० पौंड + १००० पौंड (अलावन्स). |
| १४ | सिलोनचा गव्हर्नर | ८००० पौंड दरसाल. |
| १५ | सायप्रसचा ,, | ३००० ,, ,, |
| १६ | हाँग-काँगचा ,, | ५००० + २००० (अलावन्स). |
| १७ | हिंदुस्थानांतील प्रांतिक गव्हर्नर | ५००० ते १०००० पौंड + ( अलावन्स ). सर्वांची मिळून ४० ते ५० हजार पौंडांपर्यंत बेरीज होते. |
| १८ | हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल | २०००० पौंड + ( अलावन्स ). सर्व मिळून दरसाल १,३०,००० पौंड होतात. |
| १९ | हिंदी एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर | ६००० पौंड दरसाल |
| २० | ,, डिपार्टमेंटल् सेक्रेटरी | ४००० ,, ,, |
| २१ | इंग्लंडचा लॉर्ड चीफ जस्टिस | ८००० ,, ,, |
| २२ | लॉर्ड हाय चान्सलर | १०००० ,, ,, |
| २३ | हिंदुस्थानचा चीफ जस्टिस | ६३०० ,, ,, |
| २४ | बँक ऑफ इंग्लंडचा गव्हर्नर | २००० ,, ,, |

| | | |
|---|---|---|
| २५ | रिझर्व बँक ऑफ इंडियाचा गव्हर्नर | ९००० पौंड दरसाल |
| २६ | दक्षिण ऱ्होडेशिया गव्हर्नर आणि सरसेनापति (प्रत्येकीं) | ४००० + २००० पौंड (अलावन्स) |
| २७ | दक्षिण आफ्रिकेचा गव्हर्नर जनरल | १०००० पौंड दरसाल |
| २८ | न्यू फौंडलंडचा गव्हर्नर व सरसेनापति | ३००० ,, ,, |
| २९ | कानडाचा गव्हर्नर जनरल | १०००० ,, ,, |
| ३० | ऑस्ट्रेलियाचा ,, | ८००० ,, ,, |
| ३१ | न्यू झीलंडचा गव्हर्नर | ५००० + २५०० पौंड (अलावन्स) |
| ३२ | अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा अध्यक्ष | १५००० + ३००० पौंड (प्रवास-खर्च) |
| ३३ | ,, ,, उपाध्यक्ष | ३००० |
| ३४ | ,, ,, प्रधान | ३००० |
| ३५ | ,, प्रतिनिधी सभागृहाचा स्पीकर | ३००० |
| ३६ | ,, सीनेट अथवा हौसचा सभासद | २००० |
| ३७ | ,, संस्थानांचे गव्हर्नर दरसाल | १००० ते ५००० पौं. पर्यंत |
| ३८ | फ्रान्सचा अध्यक्ष | २८००० पौंड दरसाल |
| ३९ | फ्रेंच चेंबरचे व सीनेटचे सभासद | ५०० ,, ,, |
| ४० | इटलीचा मुख्य प्रधान | ८०० पौंड दरसाल + राहतें घर |

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील वर दिलेल्या अधिकाऱ्यांच्या पगारांत शेंकडा १५ काटकसर कपात केलेली आहे. १ पौंडाची किंमत सध्यांच्या दरानें १३ रु. ५ आ. ४ पै आहे. ही तुलना करितांना प्रत्येक देशांतील माणशी उत्पन्नही लक्षांत घेतलें पाहिजे; त्याशिवाय तुलना पुरी होणार नाहीं.

(ऊ) ४८ (२) कलमांत उल्लेख आलेल्या तिसऱ्या शेड्यूल-मधील प्रांतांच्या गव्हर्नरांबाबत ज्या तरतुदी दिलेल्या आहेत त्या येथें उतरून घेणें योग्य ठरेल. शेड्यूलला कायद्याच्या कलमाइतकेंच महत्त्व

असल्यानें निदान त्यांतील महत्त्वाचा व कायद्याचें कलम समजण्यास उपयुक्त असा भाग दिल्याशिवाय विषयाची पूर्ति होणार नाहीं:—

१ प्रांतिक गव्हर्नरांना पुढीलप्रमाणें वार्षिक पगार दिले जातील:—

| | |
|---|---|
| मद्रास, मुंबई, बंगाल व संयुक्तप्रांत या प्रांतांचे गव्हर्नर | १,२०,००० रु. |
| पंजाब आणि बिहार या प्रांतांचे गव्हर्नर | १,००,००० रु. |
| मध्यप्रांत आणि वऱ्हाडचा गव्हर्नर | ७२००० रु. |
| आसाम, वायव्यसरहद्दप्रांत, ओरिसा आणि सिंध या प्रांतांचे गव्हर्नर | ६६,००० रु. |

२. प्रांतिक गव्हर्नरांना नेमणूक झाल्याबरोबर तयारी आणि प्रवास याबाबत खर्च करण्याकरितां आणि त्यांच्या नोकरीच्या मुदतींत, राजेसाहेब कौन्सिलाच्या संमतीनें वेळोवेळीं ठरवितील ते अलावन्स मिळतील आणि गव्हर्नरांनीं आपलें काम रुबाबानें आणि सुलभ रीतीनें करावें एवढ्याकरितां योग्य ती तरतूद राजेसाहेबांच्याकडून कौन्सिलच्या संमतीनें केली जाईल.

३. ज्या वेळीं गव्हर्नर रजेवर असेल त्या वेळीं त्याला पगाराच्या ऐवजीं राजेसाहेब कौन्सिलच्या संमतीनें ठरवितील ते रजेचे अलावन्स मिळतील.

४. प्रत्येक प्रांतिक गव्हर्नराला त्याच्याबाबत आर्डर इन् कौन्सिलनें निर्दिष्ट केलेले जकातींबद्दलचे विशेष हक्क व सवलती दिल्या जातील.

५. राजेसाहेबांनीं नेमलेला एखादा हंगामी गव्हर्नर जोंपर्यंत गव्हर्नरचें काम पहात आहे, तोंपर्यंत त्याला गव्हर्नराचाच पगार मिळत राहील आणि राजेसाहेबांनीं कौन्सिलच्या संमतीनें दुसरी कांहीं व्यवस्था केली असेल तर ती वगळून, गव्हर्नरचेच अलावन्स व विशेष हक्क त्याला मिळतील.

६. या शेड्यूलमधील तरतुदींचा अम्मल करण्याकरितां लागणाऱ्या

रकमा प्रांतिक उत्पन्नांतून दिल्या जातील व त्या 'चार्ज्ड' समजल्या जातील म्हणजे त्यांना प्रांतिक असेंब्ल्यांची मंजुरी लागणार नाहीं.

यापूर्वींच गव्हर्नरांच्या मासिक पगाराची व मंत्रिमंडळाच्या मासिक पगाराची तुलना केली आहे. कलम २, ३, ४ व ५ यांत सांगितलेल्या गोष्टींची तरतूद 'गव्हमेंट ऑफ इंडिया (गव्हर्नरांचे भत्ते आणि हक्क) ऑर्डर, १९३६ या १८ डिसेंबर १९३६ रोजीं निघालेल्या ऑर्डर इन् कौन्सिमध्यें करण्यांत आली आहे. त्यांतील आवश्यक भाग योग्य त्या ठिकाणीं पुढें दिला आहे. ६ व्या कलमांत सांगितलें आहे कीं, हा सर्व खर्च 'चार्ज्ड' मानला जाईल. पुढें ७८ कलमावरील चर्चेंत या गोष्टीचा जास्त विस्तारानें विचार केला आहे.

प्रांतांतील सरकार

४९.—(१) प्रांतांतील अम्मलबजावणीचा अधिकार ब्रिटिश राजेसाहेबांच्या तर्फे त्यांनीं नेमलेल्या गव्हर्नरानें चालवावयाचा आहे, मग तो आपण स्वतः चालवो अथवा हाताखालीं नेमलेल्या अधिकाऱ्यांमार्फत चालवो; परंतु या कलमाच्या आधारानें त्याला आपल्या हाताखालील अधिकाऱ्यांवर कामें सोपविण्याची फीडरल अथवा प्रांतिक कायदेमंडळांना बंदी करतां येणार नाहीं, किंवा सध्यांच्या कोणत्याही हिंदी कायद्यानें कोणत्याही कोर्टाकडे, न्यायाधीशाकडे अथवा कोणत्याही अधिकाऱ्याकडे अगर स्थानिक संस्थेकडे सोपविलेलीं कोणतींही कामें गव्हर्नरकडे या कलमानें सोपविण्यांत आलीं आहेत असें मानण्याचें कारण नाहीं.

(२) या कायद्यांतील व्यवस्थेला बाध न आणतां, प्रत्येक प्रांतांतील राज्यकारभाराची सत्ता, ज्याबाबत प्रांतिक कायदेमंडळाला कायदे करण्याची सत्ता आहे, अशा सर्व बाबींबद्दल राहील.

(अ) पहिल्या पोटकलमांत राजसत्तेचा उगम ब्रिटिश राजापासून झाला आहे हें गृहीत धरलें आहे. आमचें म्हणणें हिंदी राजसत्तेचा उगम हिंदी लोकांपासून झाला आहे; हा मूलग्राही फरक आहे.

(आ) 'हाताखालच्या अधिकाऱ्यां'त कायम नोकरशाहीप्रमाणें प्रधानमंडळाचाही समावेश होतो. प्रधान हे गव्हर्नराच्या हाताखालील अधिकारी आहेत किंवा नाहींत याबद्दल संशय येणें हें साहजिक आहे.

परंतु पुढील कलमांतील शब्दयोजनेवरून ते 'हाताखालील अधिकारी' असले पाहिजेत या पक्षाला बळकटी येते. ५१ ( १ ) " गव्हर्नरची **मर्जी असे-पर्यंत** प्रधान अधिकाराबर राहतील"; ५१ ( ५ ) "प्रधानांना **बडतर्फ करणें** इ० कामें गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणें करील "; ६९ ( ४ ) " एखादा इसम प्रधान आहे एवढ्याच कारणास्तव तो **सरकारी पगारी नोकर** आहे असें मानलें जाणार नाहीं"; ३०७ ( क ) "प्रांतांतील प्रधान म्हणून **सरकारी पगारी नोकर** असला तरी पहिल्या निवडणुकींत कोणीही इसम उमेदवार होण्यास नालायक ठरणार नाहीं."

( इ ) प्रांतिक स्वराज्य अमलांत आल्यानंतर पहिल्या तीन महिन्यांत काँग्रेस व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें जो आश्वासनमागणीबद्दल झगडा चालू होता त्या वेळीं भारतमंत्री लॉर्ड झेटलंड यांनीं कबूल केलें होतें कीं, वरील कलमांत उल्लेखिलेली गव्हर्नरची सर्वंकष सत्ता ही 'बाह्य देखाव्या-पुरतीच, असून 'खरी' सत्ता मंत्र्यांचीच आहे. त्यामुळें पहिल्या कलमांतील शब्दयोजनेला बिचकून जाण्याचें कारण नाहीं. ब्रिटिश राज्यघटनेची ही तऱ्हाच आहे कीं, वाटेल त्या वाक्यांतून वाटेल तितका व्यापक अर्थ, अंगीं व पाठीमागें असेल त्या सामर्थ्याच्या प्रमाणांत, त्या त्या वेळीं करून घेतां येतो.

'शक्तीनें मिळतीं राज्यें । युक्तीनें सर्व होतसे ।
शक्ति युक्ति जये ठायीं । तेथें श्रीमंत नांदती ॥'

( ई ) वरील ( २ ) पोटकलमांत म्हटलें आहे कीं, ज्या बाबी-संबंधीं प्रांतिक कायदेमंडळांना कायदे करण्याचा अधिकार आहे त्या बाबी-संबंधींच अम्मलबजावणीचा अधिकार प्रांतिक सरकारला आहे. हें योग्यच आहे. १९३५ च्या कायद्याच्या १०० व्या कलमांतील (३) पोटकलमा-न्वयें प्रांतिक कायदेमंडळाला ७ व्या शेड्यूलमधील २ ऱ्या यादींतील ( प्रांतिक कायदेविषय यादी ) बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार मिळाला आहे. तसेंच त्याच कलमांतील (२) पोटकलमान्वयें त्याच शेड्यूलमधील ३ ऱ्या यादींतील ( उभय कायदेविषय यादी ) बाबींसंबंधीं फीडरल व प्रांतिक अशा दोघांही कायदेमंडळांना कायदे करितां येतील. यासंबंधीं परस्परांना कांहीं बंधनें असणें अपरिहार्य आहे; कायदे

करण्याच्या 'शिलकी अधिकारा'चाही निर्णय १०४ कलमानें करून ठेविला आहे; त्याअन्वयें तिन्ही याद्यांच्या तडाक्यांतून सुटलेल्या बाबीं-संबंधीं काय करावें हें ठरविण्यांत आलें आहे. हा सर्व विषय कायदे-पंडितांनीं कीस काढण्याचा आहे. तथापि स्थूळ मानानें त्याचा आपणास विचार कर्तव्य आहे म्हणून या ठिकाणींच २ री व ३ री यादी उतरून घेतों; त्यावरून प्रांतिक अधिकाराचें क्षेत्र व त्याची मर्यादा काय आहे हें प्रारंभींच ध्यानांत येईल.

## दुसरी यादी

### प्रांतिक कायद्यांच्या विषयांची यादी

१ सार्वजनिक शांतता ( यांत मुलकी सत्तेच्या मदतीला आरमार लष्कर किंवा विमानदळ यांच्या उपयोगाचा अन्तर्भाव करावयाचा नाहीं); न्यायदान; फीडरल कोर्टाशिवाय बाकीच्या सर्व कोर्टांची रचना व संघटना; कोर्टांतून घेण्याची फी; सार्वजनिक शांततासंरक्षणासाठीं आगाऊ योजावयाचे अटकेसारखे उपाय, वरील तऱ्हेनें अटकेंत ठेवलेलीं माणसें.

२ या यादींतील सर्व बाबींसंबंधीं फीडरल कोर्टाखेरीज इतर सर्व कोर्टांचे अधिकार व अधिकारक्षेत्र, दिवाणी व मुलकी कोर्टांतील कामाची पद्धत.

३ पोलिस, रेल्वे व गांवपोलिस धरून. ( पोलिस ही बाब प्रांतिक सरकारची; परंतु रेल्वे फीडरल सरकारच्या. तेव्हां याबाबत तंटा येऊं नये म्हणून इतर पोलिसांप्रमाणें रेल्वे पोलिसही प्रांतिक सरकारकडे सोपविलें आहे; परंतु या कामाकरितां फीडरल सरकार रेल्वे खात्यांतून योग्य तो खर्च प्रांतिक सरकारांना देणार ).

४ तुरुंग, सुधारणागृहें ( रेफर्मेटरी ), बोर्स्टल संस्था, ( इंग्लंडमध्यें केंट परगण्यांत बोर्स्टल येथें १९०२ सालीं तरुण गुन्हेगारांकरितां निघालेली संस्था, मुंबई प्रांतांत धारवाड येथें अशी संस्था आहे.) अशाच तऱ्हेच्या अन्य संस्था व त्यांतून अडकवून ठेविलेलीं माणसें; तुरुंग व इतर वरील संस्था यांच्या उपयोगाबाबत इतर प्रांत व संस्थानें यांच्याशीं करावयाच्या तरतुदी.

५ प्रांताचें सरकारी कर्ज.

६ प्रांतिक सरकारी नोकऱ्या आणि प्रांतिक सरकारी नोकर कमिशन.

७ प्रांतिक पेन्शनें म्हणजे प्रांतानें किंवा प्रांतिक वसुलांतून द्यावयाचीं पेन्शनें.

८ प्रांताच्या उपयोगाकरितां सरकारच्या मालकीची अगर सरकारच्या ताब्यांत असलेली मालमत्ता—कारखाने, जमिनी, इमारती.

९ ( सार्वजनिक उपयोगाकरितां ) लोकांच्या जमिनी सक्तीनें काढून घेणें.

१० ग्रंथसंग्रह, पदार्थसंग्रहालयें व अशाच तऱ्हेच्या संस्था—प्रांताच्या हुकमतीखालील अथवा प्रांतिक तिजोरींतून ज्यांचा खर्च चालू आहे अशा.

११ प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकी—हा कायदा किंवा त्या-अन्वयें काढण्यांत आलेली कोणतीही ऑर्डर इन् कौन्सिलमध्यें सांगितलेल्या व्यवस्थेला धरून. (ऑर्डर इन् कौन्सिल म्हणजे राजाच्या खास अधिकारान्वयें अगर पार्लमेंटच्या कायद्यान्वयें इंग्लंडांतील प्रिव्ही कौन्सिलनें काढलेली ऑर्डर. अधिकारमर्यादा उल्लंघिल्याबद्दल कोर्टांत वरील ऑर्डरीसंबंधीं तंटा उपस्थित करतां येतो, तसा पार्लमेंटच्या कायद्याबाबत करितां येत नाहीं. तथापि कायद्याइतकीच या ऑर्डरची अम्मलबजावणी करितां येते; बहुतेक महत्त्वाचे सरकारी निर्णय जाहीर करण्याचें हें एक सनदशीर साधन मानलें गेलें आहे. १९३५ च्या कायद्याखालीं १९३६ मध्यें अशा २० आर्डरी प्रसिद्ध झाल्या आहेत व १ एप्रिल १९३७ पर्यंत आणखी १० झाल्या आहेत. वरील ११ क्रमांकाला लागू असणाऱ्या ४|५ ऑर्डरी १९३६ सालांत करण्यांत आल्या आहेत. )

१२ प्रांतिक मंत्री, लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा स्पीकर व डेप्युटी स्पीकर आणि लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असल्यास, त्याचा अध्यक्ष व उपाध्यक्ष यांचे पगार; प्रांतिक कायदेमंडळांतील सभासदांचे पगार, भत्ते व हक्क; या कायद्याच्या तिसऱ्या खंडांत स्पष्टपणें अधिकार दिलेल्या मर्यादे-पर्यंत, प्रांतिक कायदेमंडळांच्या कमिट्यांपुढें पुरावा देणें अगर लेख हजर करणें या गोष्टी नाकारणाऱ्या माणसांना द्यावयाची शिक्षा. ( याबाबत

कायद्यांतील कलम ७१ पोटकलम ४ पहावें. या कलमान्वयें वरील शिक्षे-बाबत प्रांतिक कायदेमंडळांना कायदा करण्याचा अधिकार दिलेला आहे. मध्यप्रांतांत अशा प्रकारचा कायदा करण्यांत आलेला आहे. )

१३ स्थानिक स्वराज्य म्हणजे म्युनिसिपल कॉर्पोरेशन, इम्प्रूव्हमेंट ट्रस्ट, डिस्ट्रिक्ट अथवा जिल्हा बोर्डे, मायनिंग सेंटूल्मेंट ( खाणवसाहत ), ॲथॉरिटी, किंवा इतर स्थानिक संस्था व ग्रामपंचायती या सर्वांच्या घटना व त्यांचे अधिकार.

१४ सार्वजनिक आरोग्य आणि स्वच्छता; रुग्णालयें व दवाखाने; जननमरणाची नोंद.

१५ हिंदुस्थानाबाहेरील यात्रांखेरीज इतर यात्रा किंवा जत्रा.

१६ (प्रेतांचें ) दफन व दफनभूमि.

१७ शिक्षण. ( अर्थात् यांत युनिव्हर्सिट्यांचा अन्तर्भाव होतो हें सांगावयास नकोच. ऑक्टोबर १९३७ मध्यें मध्यवर्ती असेंब्लींत सर गिरिजाशंकर वाजपेयी यांनीं पाटणा युनिव्हर्सिटी बिल आणलें होतें; बिलाचा उद्देश पाटणा विद्यापीठाचें अधिकारक्षेत्र सर्व ओरिसा प्रांतभर वाढविण्याचा असून आन्ध्र प्रांतांतील जो भाग नवीन ओरिसा प्रांताकडे गेला आहे तो आन्ध्र विद्यापीठाच्या कक्षेंतून काढून घेण्याचा होता. परंतु सत्यमूर्ति, भुलाभाई-प्रभृति सभासदांनीं हा प्रांतिक कायदेमंडळाचा प्रश्न असून मध्यवर्ती असेंब्लींत उपस्थित करितां येणार नाहीं अशी वरील कलमाअन्वयें घटनात्मक व कायदेशीर हरकत काढल्यामुळें सरकारनें हें बिल मागें घेतलें. )

१८ दळणवळणाचीं साधनें म्हणजे रस्ते, पूल, नावा आणि पहिल्या ( फीडरल ) यादींत न आलेलीं इतर वाहतुकीचीं साधनें; फीडरल यादींतील रेल्वेसंबंधींच्या कलमाला बाध न आणतां, इतर किरकोळ रेल्वे; म्युनिसिपल ट्रामवे; रोपवे ( दोराला धरून पलीकडे जाण्याचे मार्ग ); नदी व कालवा यांतून जाण्याचे जलमार्ग आणि त्यांतील वाहतूक तिसऱ्या यादींतील यासंबंधींच्या व्यवस्थेला बाध न आणतां; बंदरें—पहिल्या यादींतील प्रमुख बंदरांबाबतची व्यवस्था वगळून; यंत्रशक्तीनें चालविलेल्या वाहनांशिवाय इतर वाहनें.

१९ पाणी म्हणजे पाणीपुरवठा, पाटबंधारे, कालवे, ड्रेनेज ( पाण्याचा निकाल ), बांध, पाणी साठविणें आणि जलशक्ति ( यामध्यें विजेचा– पाण्यावर तयार झालेल्या विजेचा– अन्तर्भाव होणें शक्य आहे. 'विजे'चा अंतर्भाव 'उभय यादीं'त म्हणजे तिसऱ्या यादींत केला आहे. )

२० शेती, शेतीशिक्षण व संशोधन, झाडांचे रोग व टोळधाड इत्यादींपासून संरक्षण; गुरांची वांशिक सुधारणा व जनावरांना रोग होऊं न देण्यांची खबरदारी; पशुवैद्यक-शिक्षण आणि प्रत्यक्ष व्यवहार; कोंडवाडे, आणि गुरें दुसऱ्याच्या हद्दींत न जातील याबद्दल खबरदारी.

२१ जमीन—जमिनीबाबत अथवा जमिनीवर असलेले हक्क, जमीन-लागवड-पद्धति-—कुळें व जमीनदार यांच्या परस्परसंबंधांसह, खंड-वसुली; शेतीच्या जमिनीची फिरवाफिरव, मालकी बदलणें किंवा वारसा-हक्कानें दुसरीकडे जाणें; जमिनीची सुधारणा आणि शेतीविषयक कर्जे, नवीन वसाहती स्थापणें; अज्ञानपालक कोर्टें; बोजा असलेल्या व जप्त केलेल्या इस्टेटी; भूमिस्थ ठेवा.

२२ जंगलें.

२३ खाणी व तेलाच्या खाणी यांचें नियंत्रण आणि खनिज संपत्तीची वाढ—फीडरल ताब्यांतील या बाबींचें नियंत्रण व वाढ या-संबंधींच्या १ ल्या यादींतिल व्यवस्थांचें बंधन संभाळून.

२४ मासेमारीचा धंदा.

२५ रानटी पक्षी व प्राणी यांचें संरक्षण.

२६ गॅस व गॅसचे कारखाने.

२७ प्रांतांतील व्यापार व व्यवहार; बाजार आणि जत्रा; सावकारी आणि सावकार.

२८ खाणावळी आणि खाणावळवाले.

२९ मालाची निपज, पुरवठा आणि वाटणी; उद्योगधंद्यांची वाढ—याला अपवाद, फीडरल नियंत्रणाखालील कांहीं धंद्यांच्या वाढीबाबत पहिल्या यादींतिल व्यवस्था.

३० अन्नद्रव्यें व इतर माल याबाबतची भेसळ; वजनें आणि मापें.

३१ मादक दारू आणि गुंगी आणणारीं द्रव्यें:—मादक दारू,

अफू आणि इतर गुंगी आणणारीं औषधें यांची उत्पत्ति, कारखान्यांतील निपज, जवळ बाळगणें, इकडून तिकडे नेणें, खरेदी आणि विक्री—अफूबाबत पहिल्या यादींतील व्यवस्थेचें बंधन व विषें आणि विनाशक औषधी याबाबत तिसऱ्या यादींतील व्यवस्थेचें बंधन संभाळून.

३२ गरिबांना निर्वाहाची सोय; बेकारी.

३३ पहिल्या यादींत निर्दिष्ट केलेल्या कॉर्पोरेशनखेरीज बाकीच्या कॉर्पोरेशन (भागीदार मंडळ्या) अस्तित्वांत आणणें, त्यांचें नियंत्रण करणें व त्या संपुष्टांत आणणें, कायद्याप्रमाणें स्थापन न झालेल्या व्यापारी, वाङ्मयीन, शास्त्रीय, धार्मिक आणि इतर संस्था व मंडळें; सहकारी मंडळ्या.

३४ धर्मादाय व तत्संबंधींच्या संस्था; धर्मादाय निधि व धार्मिक देणग्यांचे निधि.

३५ नाटकगृहें, नाटकें व सिनेमा, परंतु यांत दाखवावयाच्या सिनेमा फिल्म्सना मंजुरी देण्याचा विषय अंतर्भूत नाहीं.

३६ (घोड्याच्या) शर्यती आणि जुगार.

३७ या यादींतील बाबींसंबंधींच्या कायद्याविरुद्ध घडणारे गुन्हे.

३८ या यादींतील कोणत्याही एका बाबीकरितां करावयाची चौकशी व आंकडेवार माहिती.

३९ जमीनमहसूल—महसुलाची आकारणी करणें व तो गोळा करणें, जमिनीच्या नोंदी (रेकार्ड) ठेवणें, महसूलबाबीकरितां मोजणी व हक्कनोंदणी, साऱ्याचा दुसऱ्या कार्याकरितां उपयोग करणें.

४० प्रांतांत निर्माण झालेल्या खालील मालावर अथवा हिंदुस्थानांत इतरत्र त्याच जातीच्या निर्माण झालेल्या मालावर एक्साइज (निपज) जकात:—

(अ) माणसांनीं पिण्याची मादक दारू;

(आ) अफू, गांजा व इतर गुंगी आणणारीं औषधें व द्रव्यें; गुंगी न आणणाऱ्या औषधी;

(इ) मद्य अगर वरील (आ) मधील द्रव्यें ज्यांत आहेत अशीं तयार केलेलीं औषधें व इतर सुगंधी द्रव्यें.

४१ शेतीच्या उत्पन्नावर कर.

४२ जमिनी व इमारती, स्वयंपाकघरें व खिडक्या यांवरील कर.

४३ शेतजमिनीच्या वारसदारीबद्दल कर.

४४ खनिज हक्कांवर कर– खनिज पदार्थांच्या वाढीबाबत फीडरल कायदेमंडळाच्या कायद्यान्वयें येणारीं बंधनें संभाळून.

४५ डोईपट्टी.

४६ ( डॉक्टर, वकील इ० ) धंदे, व्यापार, उद्योग व नोकऱ्या यांवरील कर.

४७ पशु आणि नावा यावरील कर.

४८ मालाची विक्री व जाहिराती यांवरील कर.

४९ एकाद्या स्थानिक संस्थेच्या टापूंत वापर, विक्री, उपयोग याकरितां येणाऱ्या मालावर जकाती अथवा पट्ट्या.

५० चैनीच्या पदार्थांवर कर– यांत करमणुकी, मौजेच्या गोष्टी, शर्यती व जुगार यांवरील करांचा अंतर्भाव होतो.

५१ पहिल्या यादींतील ५७ व्या कलमांत सांगितलेल्याखेरीज इतर दस्तैवजाबाबत स्टँपड्यूटीचे दर.

५२ नदी इ० अंतर्गत जलमार्गानें नेल्या जाणाऱ्या उतारूंवर व मालावर आकारण्यांत येणारी फी अगर टोल.

५३ टोल अथवा जकात.

५४ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत घेतली जाणारी फी– पण त्यांत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा समावेश होत नाहीं.

## तिसरी यादी

उभय म्ह० फीडरल आणि प्रांतिक कायद्यांच्या विषयांची यादी.

## भाग १ ला

१ फौजदारी कायदा– हा कायदा ( १९३५ ) मंजूर होण्याच्या वेळीं इंडियन पीनल कोडांत असलेल्या सर्व बाबी धरून, परंतु पहिल्या किंवा दुसऱ्या यादींत स्पष्टपणें निर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बाबीबाबतच्या कायद्याविरुद्ध केलेल्या गुन्ह्यांना वगळून; त्याचप्रमाणें मुलकीसत्तेला मदत म्हणून केला जाणारा, लष्कर आरमार अगर विमानदळ यांचा उपयोग खेरीजकरून.

२ क्रिमिनल प्रोसीजर, यांत हा कायदा मंजूर होण्याच्या तारखेला क्रिमिनल प्रोसीजर कोडांत अंतर्भूत होणाऱ्या सर्व बाबी समाविष्ट धरावयाच्या.

३ एका प्रांतांतून अथवा संस्थानांतून दुसऱ्या प्रांतांत अगर संस्थानांत कैद्यांना अथवा आरोपींना नेणें.

४ सिव्हिल प्रोसीजर, मुदतीचा कायदा व हा कायदा मंजूर होण्याच्या तारखेला सिव्हिल प्रोसीजर कोडांत असलेल्या सर्व बाबी धरून; दुसऱ्या प्रांतांत उत्पन्न होणाऱ्या, कर आणि इतर सार्वजनिक मागण्या या-बाबतच्या हक्कांची ( यांत जमीनमहसुलाच्या बाक्या व बाक्या म्हणून वसूल होण्याला योग्य अशा इतर रकमा यांचा अन्तर्भाव होतो ) गव्हर्नर किंवा चीफ कमिशनर यांच्या प्रांतांत वसुली करणें.

५ पुरावा आणि शपथा, कायदे, सार्वजनिक ॲक्ट, रिकार्ड ( नोंदवह्या ), न्यायदानाचें कामकाज यांना मान्यता.

६ विवाह आणि घटस्फोट; अर्भकें आणि अज्ञान; दत्तक प्रकरण.

७ मृत्युपत्रें, मृत्युपत्रराहित्य, शेतजमिनीशिवाय इतर गोष्टींचा वारसा.

८ शेतजमिनीशिवाय इतर इस्टेटीची अदलाबदल; करार आणि दस्तऐवज यांची नोंदणी.

९ ट्रस्ट आणि ट्रस्टी.

१० करारमदार-यांत भागीदारी, एजन्सी, नेणावळणीसंबंधींचे करार आणि इतर विशिष्ट प्रकारचे करार, परंतु यांत शेतजमिनीबाबत करार येत नाहींत.

११ आर्बिट्रेशन म्हणजे लवादपद्धति.

१२ दिवाळखोरी व दिवाळें काढणें; ॲडमिनिस्ट्रेटर जनरल आणि ऑफीशिअल ट्रस्टी.

१३ ज्युडिशिअल स्टांपाबाबत जमा होणाऱ्या फीशिवाय इतर स्टांपड्यूटी; यांत स्टांपड्यूटीच्या दरांचा अन्तर्भाव होत नाहीं.

१४ खटला करतां येण्यासारख्या इजा अथवा हानि; यादी नं. १

अथवा नं. २ यांत स्पष्टपणें निर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बाबीसंबंधींच्या कायद्यांतून ज्यांचा अन्तर्भाव झाला आहे अशा वगळून.

१५ या यादींतील कोणत्याही बाबीसंबंधीं, फीडरल कोर्टाखेरीज इतर सर्व कोर्टीचें अधिकारक्षेत्र आणि त्यांचे अधिकार.

१६ कायदा, वैद्यक आणि इतर, असले धंदे.

१७ वर्तमानपत्रें, पुस्तकें आणि छापखाने.

१८ वेडेपण आणि मानसिक दुबळेपणा अगर कमतरता– यांत वरील गोष्टींबाबत उपचार होतात अशीं ठिकाणें.

१९ विषें आणि मारक औषधी.

२० यांत्रिक शक्तीनें चालणारीं वाहनें.

२१ बॉयलर.

२२ प्राण्यांना क्रूरतेनें वागविण्याची बंदी.

२३ भटक्ये व उनाड युरोपियन; गुन्हेगार जाती.

२४ या यादीच्या ह्या भागांतील कोणत्याही बाबीकरितां करावयाची चौकशी आणि गोळा करावयाची आंकडेवार माहिती.

२५ या यादीच्या या भागांतील कोणत्याही बाबीबाबत घेतली जाणारी फी; यांत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अन्तर्भाव होत नाहीं.

## भाग २ रा

२६ फॅक्टरी अथवा कारखाने.

२७ मजुरांची सुखसोय, मजुरी करण्याबाबतची परिस्थिति, प्रॉव्हिडंट फंड, मालकांची जबाबदारी व कामकऱ्यांना मिळणारी नुकसानभरपाई; आरोग्यविमा ( यांत इन्व्हॅलिड पेन्शन येतें ), वृद्धापकाळ पेन्शन.

२८ बेकार विमा.

२९ मजूरसंघ; औद्योगिक व मजूर तंटे.

३० एका प्रांतांतून अगर संस्थानांतून दुसऱ्या प्रांतांत अगर संस्थानांत माणसांच्या, जनावरांच्या अगर वनस्पतींच्या सांसर्गिक अगर सांस्पर्शिक रोगांना अगर सांथींना वाढूं न देणें.

३१ विद्युत्‌शक्ति.

३२ अन्तर्गत जलमार्गांवरील यांत्रिक जहाजांची वाहतूक; आणि जलमार्गांवरील रस्त्यांचा कायदा अथवा नियम; वरील जलमार्गांवरील उतारू व माल यांची वाहतूक.

३३ ( सिनेमा फिल्म्सना किंवा चित्रपटांना ) दाखविण्याकरितां मंजुरी देणें.

३४ फीडरल हुकमान्वयें स्थानबद्ध करून ठेवलेले बंदी.

३५ ह्या यादीच्या ह्या भागांतील कोणत्याही बाबीबाबत करावयाची चौकशी आणि गोळा करावयाची आंकडेवार माहिती.

३६ ह्या यादीच्या ह्या भागांतील कोणत्याही बाबीबाबत घेतली जाणारी फी; यांत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अन्तर्भाव होत नाहीं.

वर दिलेल्या 'प्रांतिक' व 'उभय' कायद्याच्या विषयांच्या यादीबद्दल या ठिकाणींच कांहीं विचार मांडणें जरूर आहे. वास्तविक त्यांचा सविस्तर ऊहापोह १००, १०४ व १२६ या कलमांखालीं व्हावयास पाहिजे; परंतु त्यांचा पुढें तांत्रिक उल्लेख येणार असल्यामुळें या ठिकाणींच यादींतील विषयांसंबंधीं थोडा प्रपंच करतों. १०४ कलम हें ४९ व्या कलमाला पुरवणीदाखल आहे, कारण त्यांत म्हटलें आहे कीं, " सातव्या शेड्यूलमधील कोणत्याही यादींत न आलेल्या एखाद्या बाबीसंबंधीं कायदे करण्याचा गव्हर्नर जनरलनें फीडरल अगर प्रांतिक कायदेमंडळास अधिकार द्यावा. या कायद्यांत, वरील कोणत्याही यादींत नसलेला कर बसविण्याचा कायदाही अन्तर्भूत धरावा; आणि गव्हर्नर जनरलनें तद्विरुद्ध हुकूम दिला असल्याखेरीज अशा तऱ्हेनें केलेल्या कायद्याच्या अंमलबजावणीचा अधिकार फीडरल अगर प्रांतिक सरकारला राहील." तूर्त आपणास या १०४ कलमांतील फीडरल कायदेमंडळ अगर फीडरल सरकार यांच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. कितीही कांटेकोर विभागणी केली तरी कांहीं गोष्टी मागाहून उपस्थित होतात; त्या धड तिन्हींपैकीं कोणत्याही यादींत बसूं शकत नाहींत; अशा 'अवशिष्ट सत्ते'-बाबतची तरतूद या कलमान्वयें गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाची आहे. 'उभय' यादींतील दुसऱ्या भागांतील विषयासंबंधींच्या फीडरल कायद्याची अंमलबजावणी करण्यास प्रांतिक सरकारांना हुकूम

देण्याचा अधिकार फीडरल सरकारला सदर कायद्यानें दिलेला असावा लागतो व तसा तो दिला असल्यासच तो अधिकार त्याला वापरतां येईल असें १२६ ( २ ) या कलमांत सांगितलें आहे.

आतां प्रथम प्रांतिक यादीविषयीं विचार करूं—

१ सार्वजनिक शांतता—दंग्याचा बींमोड करण्याच्या दृष्टीनें मुंबईच्या पोलिस कमिशनरला जादा अधिकार देण्याचा कायदा नुकताच मुंबई कायदेमंडळानें केला आहे.

५ प्रांताचें सार्वजनिक अगर सरकारी कर्ज—कर्ज काढणें हें वास्तविक अम्मलबजावणी खात्याचें काम आहे; त्यांत कायदा करण्याचा कांहीं संबंध नाहीं. तथापि दोन्ही सत्तांची मर्यादा समान असल्यामुळें ( कलम ४९ ) कायद्याच्या विषयांच्या यादींत ही 'कर्ज उभारण्या'ची बाब समाविष्ट केलेली दिसते.

१२ सर्व प्रांतांतून स्पीकर, डेप्युटी स्पीकर, ( प्रेसिडेंट व डेप्युटी प्रेसिडेंट—ले० कौन्सिलें असलेल्या प्रांतांतून ) प्रांतिक प्रधान, कायदे-मंडळाचे सभासद यांच्या पगाराबाबत व भत्त्याबाबत कायदे करण्यांत आलेले आहेत. सभासदांच्या विशेष हक्काबाबत ( प्रिव्हिलेजिस ) मात्र अद्याप कोठेंच कायदा करण्यांत आलेला नाहीं. एकट्या मध्यप्रांत व वऱ्हाड कायदेमंडळाखेरीज ७१ ( ४ ) कलमांत दिलेल्या अधिकारान्वयें 'प्रांतिक कायदेमंडळांच्या कमिट्यांपुढें साक्ष देण्याचे अगर कागदपत्र हजर करण्याचें नाकारणाऱ्या इसमाला शिक्षा करण्या'बाबत कोठेंही कायदा झालेला नाहीं.

१३ ग्रामपंचायती, स्थानिक स्वराज्य संस्था ( लोकल बोर्ड व म्युनिसिपालिट्या ) यांच्या रचनेबाबत व अधिकाराबाबत कायदेमंडळांनीं ( प्रांतिक ) कायदे केलेले आहेत.

१७ शिक्षण—यासंबंधीं प्राथमिक शिक्षणाचा कायदा मुंबई कायदेमंडळानें केला आहे. युनिव्हर्सिटी शिक्षणाबद्दल अद्याप कोठेंच कायदा झालेला नाहीं. याबाबत सर्वस्वी सत्ता प्रांतिक कायदेमंडळांना देण्यांत आलेली नाहीं. याचें कारण, कांहीं युनिव्हर्सिट्या दोन प्रांतांच्याकरितां अगर जवळ असलेल्या संस्थानांकरितांही उपयोगांत येत असल्यामुळें त्यांची

शेंडी फीडरल सरकारच्या हातीं ठेवली आहे. या युनिव्हर्सिट्या फीडरल यादींतील ३३ व्या " एकाच घटकाशीं ज्यांचे उद्देश संबद्ध नाहींत अशा इतर ( व्यापारी मंडळ्यांखेरीज ) कॉर्पोरेशन्स " अनुक्रमांकांत बसतात. अशा युनिव्हर्सिट्या पुढील होत:—

१ कलकत्ता युनिव्हर्सिटी ( हिच्या अधिकारक्षेत्रांत 'आसाम' प्रांत व 'अंदमान-निकोबार बेटें' येतात )

२ पंजाब युनिव्हर्सिटी ( हिच्या अधिकारक्षेत्रांत 'सरहद्दप्रांत' येतो )

३ पाटणा युनिव्हर्सिटी ( हिच्या अधिकारक्षेत्रांत 'ओरिसा' प्रांत येतो )

४ मद्रास युनिव्हर्सिटी ( हैदराबाद संस्थानांतील एक कॉलेज या युनिव्हर्सिटीला जोडण्यांत आलें आहे )

५ आंध्र युनिव्हर्सिटी ( हिला ओरिसापैकीं गंजम जिल्ह्यांतील कॉलेज जोडलें आहे )

६ मुंबई युनिव्हर्सिटी ( हिच्या अधिकारक्षेत्रांत 'सिंध' प्रांत येतो )

७ आग्रा युनिव्हर्सिटी ( राजपुताना आणि मध्यहिंदुस्थान यांतील संस्थानी कॉलेजें हिला जोडण्यांत आलीं आहेत )

तात्पर्य, वरील युनिव्हर्सिटचा वगळून बाकीच्या म्हणजे अलाहाबाद, लखनौ, डाक्का, अन्नमलाई ( मद्रास ), नागपूर या युनिव्हर्सिट्यांबाबत त्या त्या प्रांतिक कायदेमंडळांना फीडरलसरकारनिरपेक्ष कायदे करितां येतील. अलीगड, बनारस व दिल्ली या युनिव्हर्सिट्या फीडरल क्षेत्रांतील असल्यामुळें त्यांचा येथें प्रश्न उद्भवत नाहीं.

१९ 'जलशक्ति' हा प्रांतिक विषय आहे; परंतु हीच जलशक्ति 'विजें'त रूपांतर पावली कीं, तो विषय 'उभय'यादींत जातो. या बाबतींत पार्लमेंटमध्यें १९३५ च्या कायद्याच्या कलमांत दुरुस्ती करण्याचें ठरल्याचें जाहीर झालें आहे.

२१ 'जमिनींत अथवा जमिनीवर हक्क'—

मध्यवर्ती लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत 'मिलिटरी मॅनूव्हर्स बिला'च्या विचाराचे वेळीं कॉंग्रेस पक्षातर्फे 'सदर बिलानें प्रांतिक कायदेमंडळाच्या

अधिकारक्षेत्राचें अतिक्रमण होत आहे' असा हरकतीचा मुद्दा मांडण्यांत आला. त्यावर निकाल देतांना अध्यक्ष अबदुर रहिम म्हणाले, " या बिलानें जमीन अक्कायर करण्याचा प्रश्न उपस्थित होत नाहीं; जमिनींतील किंवा जमिनीवरील हक्कांनाही त्यानें बाध येत नाहीं. अर्थात् 'लष्करी हालचाली' होण्यामुळें जमिनीला जातां जातां कांहीं उपद्रव होईल एवढें खरें. परंतु तेवढ्यानें प्रांतिक क्षेत्राचें अतिक्रमण होतें असें मी मानावयास तयार नाहीं; म्हणून मी हा हरकतीचा मुद्दा फेटाळून लावतों."

२७ सावकारी आणि सावकार— मुंबई सरकारनें याबाबत बिल आणलें असून मद्रास कायदेमंडळानें 'शेतकरी कर्जनिवारण कायदा' मंजूर केला आहे. बिहारमध्येंही बिल मांडलें गेलें आहे. त्यांत व्याजाचा जास्तींत जास्त दर मुक्रर करणें, तडजोडीनें सावकार आणि कर्जदार यांमधील तंटे मिटविण्याची व्यवस्था यांबाबत कलमें आहेत. या शेवटच्या बाबीसंबंधीं कलमें 'उभय' यादींतील '१२ दिवाळखोरी आणि नादारी' या सदरांत पडतील कीं काय अशी एक शंका निघण्यासारखी आहे.

३० वजनें आणि मापें:— मुंबई कायदेमंडळानें याबाबत नुकताच कायदा केला आहे.

३१ मादक द्रव्यें:—कायद्यानें मद्यपानबंदी करण्याचें धोरण सर्व कॉंग्रेस मंत्रिमंडळांनीं जाहीर केलें आहे. मद्रास, बिहार या प्रातांत 'प्रोहिबिशन' (बंदी) कायदा झालेला आहे. मध्यप्रांतांत बिल आलेलें आहे. मुंबई प्रांतांत अमदाबाद शहर व कांहीं खेडेगांवांतील टापू 'कोरडा' (मद्यदुकानविरहित) करण्याचें जाहीर झालें आहे.

३६ जुगार:—मुंबई कायदेमंडळानें घोड्याच्या शर्यतीबाबत वेस्टर्न इंडिया टर्फ क्लबवर नियंत्रण घालण्याचा कायदा नुकताच मंजूर केला आहे.

४१ शेतीच्या उत्पन्नावरील कर:— यासंबंधीं बिहारमध्यें कायदा मंजूर झाला आहे. त्याअन्वयें जवळजवळ ३० ते ४० लाख रुपये बिहार प्रांताला उत्पन्न मिळणार आहे; हा कर कॉंग्रेस आणि जमीनदार यांच्यामध्यें झालेल्या तडजोडीअन्वयें बसविण्यांत आला आहे. 'कायम धाराबंदी'ला हा कर विघातक आहे अशा मुद्द्यावर हरकती उपस्थित

करण्यांत आल्या; तसेंच मुस्लीम वकूफ इस्टेटीवर हा कर बसविला जाऊं नये अशा तऱ्हेची सूचना पुढें आली; या सर्वांचा विचार होऊन सर्वांना संमत असें कायद्याचें स्वरूप या बिलाला प्राप्त झालें आहे. इनामांना हा कर बसवितां येईल कीं नाहीं हा जरा गुंतागुंतीचा प्रश्न आहे; कारण इनामदारांना पूर्वींच्या काळीं ब्रिटिश सरकारनें दिलेल्या अगर कायम केलेल्या सनदांची अडचण या कामीं येत आहे.

४३ शेतीच्या जमिनीच्या वारसासंबंधीं कराचा प्रश्न कोणी उपस्थित केला नाहीं. कारण तसा कर बसल्यास तो श्रीमंतांप्रमाणें गरीबांनाही बसणार व शेतीचे वारसदार गरीबच पुष्कळ. या करानें 'आधींच दुष्काळ, त्यांत धोंडा महिना' अशी स्थिति व्हावयाची.

४४ खाणीवरच्या हक्कावरील कर—बिहार प्रांतांत हा कर बसविण्याबद्दल वाटाघाट चालू आहे. 'सिंगभूम' ह्या जिल्ह्याला 'हिंदुस्थानचा उत्तर ओंटारिओ' असें म्हणतात. 'ओंटारिओ' हा उत्तर अमेरिका खंडांतील कानडा डुमिनीयनमध्यें एक प्रांत आहे. त्यांत सोनें, चांदी, निकेल, तांबें, पेट्रोलियम यांच्या खाणी आहेत.

४६ धंद्यावरील कर— हा मध्यप्रांत व वऱ्हाड कायदेमंडळानें बसविला आहे. तूर्त या कराची व्याप्ति इन्कमटॅक्स देणाऱ्या धंदेवाल्यांपुरती ठेवली आहे. चार हप्त्यांनीं कर दिला तरी चालतो. हा इन्कमटॅक्सचाच एक प्रकार आहे या मुद्द्यावर हरकती घेण्यांत आल्या, परंतु त्या सर्व फेटाळून लावण्यांत आल्या.

४८ मालाच्या विक्रीवरील कर— मध्यप्रांत व वऱ्हाड कायदेमंडळानें पेट्रोल व वंगण यांच्या विक्रीवर कर लादला आहे. धंद्यावरील कराप्रमाणेंच याही कराला हरकती घेतल्या गेल्या; कारण 'पेट्रोलियम' हा विषय फीडरल यादींतला आहे. परंतु ही हरकत फेटाळली गेली. हा तंटा निकालाकरितां फीडरल कोर्टापुढें गेला आहे. संयुक्तप्रांत व बिहार येथील ऊसविक्रीवरील कर फीडरल एक्साइज कराच्या सदरांत पडतो याबद्दल तक्रार उपस्थित करण्यांत आली आहे. मद्रास कायदेमंडळानें हातमागाच्या कापडाला संरक्षण व उत्तेजन देण्याकरितां गिरणीच्या कापडाच्या विक्रीवर साक्षात् कर बसविला नसला तरी त्या

दुकानांमागें परवानाफी लावली आहे या गोष्टीचा या प्रसंगीं उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं.

५० करमणुकीवरील कर व जुगारावरील कर— मुंबई प्रांतांतील हे दोन्ही कर जुनेच आहेत. बिहार प्रांतांत करमणुकीवर व संयुक्तप्रांतांत शर्यतीवर कर लादले गेले आहेत व जात आहेत. 'गँबलिंग' व 'स्पेक्युलेशन' यांमधील अंतर स्पष्ट करणें कठीण आहे. थोडक्यांत असा भेद दाखवितां येईल कीं, ज्या सौद्यांत दोन किंमतींच्या मधला फरक गिळंकृत करावयाचा उद्देश असतो त्याला 'गँबलिंग' या सदरांत घालतां येईल व ज्या व्यवहारांत माल हवालीं करण्याचा उद्देश असतो त्याला 'स्पेक्युलेशन' या सदरांत घालितां येईल. ( ना. लठ्ठे यांचें ग्रीव्हस यांच्या प्रश्नाला मुंबई असेंब्लींत दिलेलें उत्तर. )

५१ स्टांपड्यूटी:-बिहारमध्यें ही स्टांपड्यूटी वाढविण्यांत आली आहे.

'उभय' यादीसंबंधीं एक दोन गोष्टी पुढीलप्रमाणें:—

## भाग १ ला

९ ट्रस्ट आणि ट्रस्टी. हरिजनांना देवालयप्रवेशाबाबतच्या अडचणी, हायकोर्टानें जुन्या रूढी मान्य केल्यामुळें, उत्पन्न होतात. देवालयें हरिजनांना खुलीं करण्याबाबतच्या देवालयट्रस्टींच्या मार्गांतील अडचणी मुंबई कायदेमंडळानें याबाबत कायदा करून नाहींशा केल्या आहेत.

## भाग २ रा

३१ वीज. मागें उल्लेख आल्याप्रमाणें सदर बाब ही 'उभय' यादींतून काढली जाऊन प्रांतिक यादींत समाविष्ट करण्याबाबत पार्लमेंटमध्यें दुरुस्ती बिल लौकरच येईल असें उपभारतमंत्र्यांनीं जाहीर केलें आहे.

## प्रांतिक राज्यकारभार

५०.—( १ ) या कायद्यान्वयें गव्हर्नरास ज्या कामाबाबत आपल्या मर्जीप्रमाणें निर्णय करणें भाग आहे तेवढीं कामें वगळून बाकीचा राज्यकारभार चालविण्यास गव्हर्नराला मदत व सल्ला देण्याकरितां एक प्रधानमंडळ असेल. मात्र, जेणेंकरून या कायद्यांतील कलमांत सांगितल्याप्रमाणें गव्हर्नराला आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें अधिकार चालविण्यास बंदी करितां येईल, असा या पोटकलमांतील कोणत्याही गोष्टीचा अर्थ केला जाणार नाहीं.

प्रधानमंडळ

(२) प्रधानमंडळाच्या सभांचें अध्यक्षस्थान गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें स्वीकारावें.

(३) एखादी बाब या कायद्यान्वयें गव्हर्नरच्या मर्जींतली अथवा त्यानें आपलें वैयक्तिक मत प्रभावी करण्यासारखी आहे किंवा नाहीं यासंबंधींचा वाद उपस्थित झाल्यास गव्हर्नरनें स्वतःच्या मर्जीप्रमाणें दिलेला निर्णय अखेरचा मानला जाईल आणि गव्हर्नरनें एखादी गोष्ट आपल्या स्वतःच्या मर्जीप्रमाणें अथवा वैयक्तिक मताप्रमाणें करावयास पाहिजे होती अथवा करावयास नको होती या सबबीवर गव्हर्नरनें केलेल्या कोणत्याही गोष्टीच्या प्रामाण्याबद्दल प्रश्न उपस्थित करतां येणार नाहीं.

(अ) वरील पोटकलम (१) मध्यें प्रधानमंडळाला 'कौन्सिल ऑफ मिनिस्टर्स' असें म्हटलें आहे. येथून तेथून सर्व कायद्यांत कोठेंही 'कॅबिनेट' हा इंग्रजी पार्लमेंटरी पद्धतींत रूढ असलेला शब्द आलेला नाहीं. कायदेशीर भाषेच्या रिवाजाप्रमाणें तो घातलेला नसो, किंवा त्या शब्दाबरोबर येणाऱ्या रूढ अर्थाचा किंवा ध्वनीचा संपर्क हिंदुस्थानांतील 'स्वायत्तते'ला लागूं नये, असा उद्देश असो! वरील शब्द 'केबिन' म्हणजे 'छोटी खाजगी खोली' यावरून अल्पार्थी निघाला आहे; जसें 'हरिण' पासून 'हरिणक' (छोटें हरिण); राजकारणांतील याचा अर्थ, मुख्य मुख्य मंत्र्यांना एकत्र जमून मसलत करण्याची खोली. आणि यावरून पुढें लक्षणेनें, सामुदायिक रीत्या प्रधानमंडळ.

प्रांतिक स्वराज्याच्या प्रारंभापासून आतांपर्यंत ११ प्रांतांतून पुढीलप्रमाणें मंत्रिमंडळें होतीं व आहेत:—

## मद्रास

पहिलें (तात्पुरतें) मंत्रिमंडळ, (एप्रिल ते जुलै १९३७)

१ कूर्म वेंकट रेड्डी, मुख्य प्रधान, (राजकीय, जमीन-महसूल, कायदा)

२ ए. टी. पन्नीरसेलवम् (गृहखातें, जमाखर्चखातें)

३ एम्. सी. राजा (सुधारणाखातें)

४ कुमार मुथिया चेट्टियर (स्थानिक स्वराज्य)

५ आर. एम्. पलत (शिक्षण, सार्वजनिक आरोग्य)

६ पी. खलिफुल्ला (इमारती, रस्ते, पूल इ. खातें)

दुसरें मंत्रिमंडळ ( कॉंग्रेस ) ( जुलै १९३७ पासून पुढें )
१ चक्रवर्ती राजगोपालाचार्य, मुख्य प्रधान, (गृहमंत्री व अर्थमंत्री)
२ टी. प्रकाशम् ( जमीनमहसूल )
३ टी. एस्. एस्. राजन् ( सार्वजनिक आरोग्य )
४ पी. सुब्बरॉयन् ( शिक्षण, कायदा )
५ याकूब हसन ( इमारती, रस्ते, पूल इ. खातें )
६ मुनुस्वामी पिल्ले ( शेतकी, ग्रामसुधारणा )
७ रामनाथन् ( सार्वजनिक प्रसिद्धि खातें )
८ व्ही. व्ही. गिरी ( उद्योगधंदे, मजूर )
९ रामन् मेनन ( कोर्टें, तुरुंग )
१० गोपाळ रेड्डी ( स्थानिक स्वराज्य )
(पन्नीरसेल्वम्, **ख्रिस्ती;** राजा, **हरिजन;** खालिफुल्ला, **मुसलमान;** याकूब हसन, **मुसलमान;** मुनुस्वामी पिल्ले, **हरिजन.**)

## मुंबई

पहिलें ( तात्पुरतें ) मंत्रिमंडळ ( एप्रिल ते जुलै १९३७ )
१ धनजीशहा कूपर, मुख्य प्रधान ( गृह आणि सर्वसाधारण )
२ जमनादास मेथा ( जमीनमहसूल आणि अर्थमंत्री )
३ सिद्दाप्पा कंबळी ( शिक्षण, अबकारी, शेतकी )
४ हुसेनअली रहिमतुल्ला ( स्थानिक स्वराज्य )

दुसरें मंत्रिमंडळ ( कॉंग्रेस ) ( जुलै १९३७ पासून पुढें )
१ बाळ गंगाधर खेर, मुख्य प्रधान ( शिक्षण, मजूर, राजकीय )
२ आण्णा बाबाजी लठ्ठे ( अर्थमंत्री )
३ एम्. डी. डी. गिल्डर ( अबकारी, सार्वजनिक आरोग्य )
४ कन्हय्यालाल मुनशी ( गृहमंत्री, कायदा )
५ मुरारजी देसाई ( जमीनमहसूल, ग्रामसुधारणा, शेतकी )
६ महमद यासीन नुरी ( इमारती, रस्ते इ० खातें )
७ लक्ष्मणराव पाटील ( स्थानिक स्वराज्य, उद्योगधंदे, इ० )
( कूपर, **पारशी;** कंबळी, **लिंगायत;** रहिमतुल्ला, **मुसलमान;** गिल्डर, **पारशी;** नुरी, **मुसलमान.**)

## बंगाल

संयुक्त प्रधानमंडळ ( एप्रिल १९३७ पासून पुढें )

१ फजलल हक्क, मुख्य प्रधान ( शिक्षण )
२ नलिनीरंजन सरकार ( अर्थमंत्री )
३ ख्वाजा नाजीमुद्दिन ( गृहमंत्री, कायदा )
४ बिजयसिंग रॉय ( जमीनमहसूल )
५ डाक्क्याचे नबाब हबीबुल्ला ( शेतकी, उद्योगधंदे )
६ महाराजा श्रीशचंद्र नंदी (दळणवळणाचीं साधनें,इमारती इ०)
७ सुऱ्हावर्दी ( व्यापार, मजूर )
८ मुश्रफ हुसेन ( न्याय, कायदेमंडळ )
९ सय्यद नौशेरअली ( सार्वजनिक आरोग्य, स्थानिक स्वराज्य )
१० पी. डी. रायकूत ( जंगल, अबकारी )
११ मुकुंद बिहारी मलिक ( सहकारी पतपेढ्या, खेड्यांतील कर्जबाजारीपणा )

(६ मुसलमान, ५ हिंदु— पैकीं रायकूत व मालिक **हरिजन**)

## संयुक्तप्रांत

पहिलें ( तात्पुरतें ) मांत्रिमंडळ ( एप्रिल ते जुलै १९३७ )

१ छत्तारीचे नबाब, मुख्य प्रधान ( गृहमंत्री )
२ महमद यूसफ ( स्थानिक स्वराज्य, आरोग्य )
३ जे. पी. श्रीवास्तव ( अर्थमंत्री )
४ सालिमपूरचे राजे ( शिक्षण )
५ विजयानगरम्‌चे महाराजकुमार ( न्याय )
६ तिर्व्यांचे राजे ( उद्योगधंदे, वाहतुकीचीं साधनें )
७ राजा महेश्वर दयाळ शेठ ( जमीनमहसूल, शेतकी )

दुसरें मंत्रिमंडळ ( कॉंग्रेस ) ( जुलै १९३७ पासून पुढें )

१ पंडित गोविंद वल्लभ पंत, मुख्य प्रधान (अर्थमंत्री, जंगल, पोलिस)
२ रफी अहमद किडवाई ( जमीनमहसूल, शेतकी, प्रसिद्धि, तुरुंग )
३ कैलासनाथ कटजू ( न्याय, उद्योगधंदे, सहकारी पतपेढ्या )
४ सौ० विजयालक्ष्मी पंडित ( स्थानिक स्वराज्य )

५ { प्यारेलाल शर्मा (शिक्षण) (जुलै १९३७ ते फेब्रुवारी १९३८)
बाबू संपूर्णानंद ( ,, ) (मार्च १९३८ पासून) }
६ महमद इब्राहिम (वाहतुकीचीं साधनें)
(छत्तारीचे नबाब, महमद युसफ, सालिमपुरचे राजे, **मुसलमान;** बाकीचे चार हिंदु.)
(रफी अहमद किडवाई, महमद इब्राहिम, **मुसलमान;** सौ० विजयालक्ष्मी पंडित, **स्त्री.**)

## पंजाब

संयुक्त प्रधानमंडळ (एप्रिल १९३७ पासून पुढें)
१ शिकंदर हयात खान, मुख्य प्रधान (कायदा व सुव्यवस्था)
२ सुंदरसिंग मजीथिया (जमीनमहसूल)
३ चौधरी छोटूराम (सुधारणाखातें)
४ मनोहरलाल (अर्थमंत्री)
५ खिजर हयातखान तिवाना (इमारती खातें)
६ अबदुल हाये (शिक्षण)
(मनोहरलाल, छोटूराम, **हिंदु;** सुंदरसिंग मजीथिया, **शीख;** बाकीचे तिघे मुसलमान.)

## बिहार

पहिलें (तात्पुरतें) मंत्रिमंडळ (एप्रिल १९३७ ते जुलै १९३७)
१ महमद यूनस, मुख्य प्रधान (गृहमंत्री, शिक्षण)
२ अजित प्रसादसिंग देव (स्थानिक स्वराज्य)
३ अबदुल वहाबखान (अर्थमंत्री, व्यापार)
४ गुरसहाय लाल (जमीनमहसूल, सुधारणा)
दुसरें मंत्रिमंडळ (काँग्रेस) (जुलै १९३७ पासून पुढें)
१ श्रीकृष्ण सिंह, मुख्य प्रधान (गृह, जमीनमहसूल, तुरुंग इ०)
२ अनुग्रहनारायण सिंह (अर्थमंत्री, इ०)
३ सय्यद महमूद (शिक्षण, सुधारणा)

४ जागलाल चौधरी ( अबकारी, सार्वजनिक आरोग्य )
( महमद यूनस, अबदुल वहाबखान, **मुसलमान**; बाकीचे दोघे हिंदु; सय्यद महमूद, **मुसलमान**; जागलाल चौधरी, **हरिजन**.)

**मध्यप्रांत आणि वऱ्हाड**

पहिलें (तात्पुरतें) मंत्रिमंडळ (एप्रिल १९३७ ते जुलै १९३७)

१ राघवेन्द्र राव, मुख्य प्रधान ( गृहमंत्री )
२ रिझवी ( अर्थमंत्री, स्थानिक स्वराज्य, इमारती इ. खातें )
३ बा. ग. खापर्डे ( जमीनमहसूल, शिक्षण )
४ धर्माजीराव भुजंगराव ( शेतकी )

दुसरें मंत्रिमंडळ ( काँग्रेस ) ( जुलै १९३७ पासून पुढें )

१ नारायण भास्कर खरे, मुख्य प्रधान ( गृहमंत्री )
२ पी. बी. गोळे ( जमीनमहसूल, अबकारी )
३ दुर्गाशंकर मेहता ( अर्थमंत्री )
४ रविशंकर शुक्ल ( शिक्षण )
५ एम्. वाय्. शरीफ ( कायदा, न्याय ) ( मे १९३८ मध्यें राजीनामा दिला )
६ रामराव देशमुख ( इमारती, रस्ते, पूल, इ० )
७ द्वारकाप्रसाद मिश्र ( स्थानिक स्वराज्य )
(रिझवी, **मुसलमान;** शरीफ, **मुसलमान;** खापर्डे, **वऱ्हाड;** गोळे, देशमुख, **वऱ्हाड.**)

**आसाम**

पहिलें मंत्रिमंडळ (संयुक्त) (एप्रिल १९३७ ते फेब्रुवारी १९३८)

१ महमद सादुल्ला, मुख्य प्रधान ( गृह, अर्थ, इमारती. इ० )
२ अबु नस्त्र महमद वहिद ( शिक्षण )
३ निकोल्स रॉय ( स्थानिक स्वराज्य, अबकारी )
४ रोहिणी कुमार चौधरी ( जमीनमहसूल, न्याय )
५ अली हैदरखान ( शेतकी, उद्योगधंदे )

दुसरें मंत्रिमंडळ ( संयुक्त ) ( १९३८ पासून पुढें )

१ महमद सादुल्ला, मुख्य प्रधान ( अर्थमंत्री, गृहमंत्री, इमारती, )

२ निकोल्स रॉय ( स्थानिक स्वराज्य )
३ रोहिणी कुमार चौधरी ( जमीनमहसूल, जंगल )
४ मुनावर अली ( शिक्षण, अबकारी )
५ अबदुल मातीन चौधरी ( शेतकी, उद्योगधंदे, सहकारी पतपेढ्या व न्याय )
६ अक्षय कुमार दास ( नोंदणी व सर्वसाधारण )

(सादुल्ला, वहीद, हैदरखान, **मुसलमान;** रोहिणीकुमार चौधरी, **हिंदु;** निकोल्स रॉय, **डोंगराळ मागसलेल्या जाती.** )

( सादुल्ला, मुनावरअली, अबदुल मातिन, **मुसलमान;** रोहिणी-कुमार, अक्षयकुमारदास, **हिंदु;** निकोल्स रॉय, **युरोपियन मिशनरी** [ डोंगराळ मागसलेल्या जातींतर्फे ].)

## वायव्य सरहद्दप्रांत

पहिलें मंत्रिमंडळ ( संयुक्त ) ( एप्रिल १९३७ ते सप्टेंबर १९३७ )
१ अबदुल कैयूमखान, मुख्य प्रधान ( गृहखातें )
२ मेहरचंद खन्ना ( अर्थमंत्री )
३ सादुल्ला खान ( शेतकी )

दुसरें मंत्रिमंडळ ( कॉंग्रेस ) ( सप्टेंबर १९३७ पासून पुढें )
१ खानसाहेब, मुख्य प्रधान ( राजकीय, गृह व इमारती वगैरे )
२ भंजुराम गांधी ( अर्थमंत्री, कायदा )
३ काझी अताउल्ला ( शिक्षण, जमीनमहसूल, शेतकी )
४ महमद अब्बास खान ( उद्योगधंदे )

( मेहरचंद खन्ना, **हिंदु;** गांधी, **हिंदु;** बाकीचे मुसलमान. )

## ओरिसा

पहिलें ( तात्पुरतें ) मंत्रिमंडळ (एप्रिल १९३७ ते जुलै १९३७)
१ पार्लेकिमडीचे राजे, मुख्य प्रधान, ( कायदा, व्यापार, अर्थमंत्री )
२ एम्. जी. पटनाईक ( शिक्षण, जमीनमहसूल )
३ लतिफुर रहमान ( आरोग्य, स्थानिक स्वराज्य, इमारती वगैरे )

दुसरें मंत्रिमंडळ ( कॉंग्रेस ) ( जुलै १९३७ पासून पुढें )
१ विश्वनाथदास, मुख्यप्रधान ( गृह, अर्थ, शिक्षण, सुधारणा )

२ नित्यानंद कानुगो ( जमीनमहसूल, इमारती वगैरे )
३ बोधराम डुबे ( कायदा, व्यापार, सार्वजनिक आरोग्य, स्थानिक स्वराज्य )
( लतिफुर रहमान, **मुसलमान;** बाकीचे हिंदु. )

## सिंध

पहिलें मंत्रिमंडळ संयुक्त ( एप्रिल १९३७ ते मार्च १९३८ )
१ गुलामहुसेन हिदायतुल्ला, मुख्य प्रधान ( अर्थ, गृह, साधारण, राजकीय व किरकोळ खातीं )
२ { गोविंदराम प्रीतमदास ( इमारती वगैरे )
हेमनदास वढवाणी ( सार्वजनिक आरोग्य ) }
३ बंदेअलीखान तालपूर ( जमीनमहसूल )
दुसरें मांत्रिमंडळ ( राष्ट्रीय ) ( मार्च १९३८ पासून पुढें )
१ अल्लाबक्ष, मुख्य प्रधान ( गृह, अर्थ इ० )
२ पीर इलाहीबक्ष ( इमारती वगैरे )
३ निचलदास वझिराणी ( सार्वजनिक आरोग्य )
( प्रीतमदास, वढवाणी, **हिंदु;** वझिराणी, **हिंदु;** बाकीचे मुसलमान. )

पुढील कोष्टकावरून शेंकडा ३४$\frac{1}{3}$ इतक्या प्रधानमंडळांतील जागा मुसलमानांना मिळाल्या आहेत; शेंकडा ६ हरिजनांना मिळाल्या आहेत व सवर्ण हिंदूंना शेंकडा ५६ मिळाल्या आहेत. बाकीच्या शेंकडा ४ जागा शीख व ख्रिस्ती मिळून.

आतां मुख्यतः पक्षाच्या दृष्टीनें विचार केल्यास एकंदर ६७ जागांपैकीं ४१ जागा कॉंग्रेसला मिळाल्या असून कॉंग्रेसेतर मंडळी २६ आहेत असें दिसून येईल. कॉंग्रेसच्या ४१ जागांपैकीं ९ जागा मुसलमानांना असून २ जागा हरिजनांना दिल्या आहेत. उभ्या हिंदुस्थानांत एकच स्त्रीमंत्री असून ती कॉंग्रेस प्रधानांपैकीं आहे ही विशेष उल्लेख करण्यासारखी गोष्ट आहे.

आतां मांत्रिमंडळें कितीदां, कशीं व कोठें कोठें बदललीं याचा थोडा विचार करूं.

## ११ प्रांतांतील मंत्र्यांची जातवार मोजदादः—

| | सवर्ण हिंदु | मुसलमान | हरिजन | शीख | ख्रिस्ती | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| १ मद्रास | ८ | १ | १ | .. | .. | १० |
| २ मुंबई | ६ | १ | .. | .. | .. | ७ |
| ३ बंगाल | ३ | ६ | २ | .. | .. | ११ |
| ४ संयुक्तप्रांत | ४ | २ | .. | .. | .. | ६ |
| ५ पंजाब | २ | ३ | .. | १ | .. | ६ |
| ६ बिहार | २ | १ | १ | .. | .. | ४ |
| ७ मध्यप्रांत वऱ्हाड | ६ | १ | .. | .. | .. | ७ |
| ८ आसाम | २ | ३ | .. | .. | १ | ६ |
| ९ वायव्य सरहद्द | १ | ३ | .. | .. | .. | ४ |
| १० ओरिसा | ३ | .. | .. | .. | .. | ३ |
| ११ सिंध | १ | २ | .. | .. | .. | ३ |
| | ३८ | २३ | ४ | १ | १ | ६७ |

मद्रास, मुंबई, संयुक्तप्रांत, बिहार, मध्यप्रांत व ओरिसा या सहा प्रांतांतून जवळ जवळ पहिले साडेतीन महिने तात्पुरतीं बिनपक्षीय मंत्रिमंडळें होतीं; त्यानंतर त्या प्रांतांतून कॉंग्रेस मंत्रिमंडळेंच अधिकारारूढ आहेत. मध्यंतरीं १५ दिवस बिहार व संयुक्तप्रांत येथें कॉंग्रेस मंत्रिमंडळांनीं राजबंदीमुक्ततेच्या प्रश्नावर मतभेद (गव्हर्नर-बरोबर) झाल्यामुळें राजीनामे दिले होते, परंतु समेट झाल्यामुळें त्यांनीं फिरून अधिकारपदाचा स्वीकार केला. कॉंग्रेस-मंत्र्यांपैकीं संयुक्तप्रांतांतील प्यारेलाल शर्मा यांनीं खासगी कारणाकरितां राजीनामा दिल्यामुळें त्यांच्या जागीं संपूर्णानंदांची नेमणूक झाली. सरहद्दप्रांतांत पहिल्या मंत्रिमंडळावर अविश्वासाचा ठराव मंजूर झाल्यामुळें कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें. सिंधमध्यें तोच प्रकार होऊन कॉंग्रेसच्या मदतीनें नवीन राष्ट्रीय मंत्रिमंडळ स्थापन झालें आहे. आसाममध्येंही दुसरें मंत्रिमंडळ आलें असून दोन मुसलमान सभासद बदलले व १ जागा हिंदूंना जास्त दिली. फक्त बंगाल, पंजाब येथील मांत्रिमंडळें आजतागायत अभेद्य आहेत.

(आ) पहिल्या पोटकलमांतील 'मदत' व 'सल्ला' या शब्दांचाही खरा अर्थ काय आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. 'सल्ला' आणि 'मदत' या शब्दांसंबंधीं मद्रास हायकोर्टचे न्यायाधीश हॉरविल यांनीं बाटलीवाला खटल्यांत ऊहापोह केला आहे. ते म्हणतात—

"५९ (५) कलमाखेरीज गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला घेतलाच पाहिजे असें त्याच्याबर कायद्यानें बंधन घातल्याचा उल्लेख १९३५ च्या कायद्यांत मला कोठेंही आढळला नाहीं. ५९ (२) व (३) या कलमांत बिशिष्ट नियम करण्याचा व हुकमावर व कागदपत्रावर सही, शिक्कामोर्तब करण्याबाबतच्या नियमासंबंधींचा उल्लेख आला असून ५९ (५) कलमांत गव्हर्नरानें प्रधानांचा सल्ला घेऊन वरील पोटकलमांतील आपलीं कामें करावींत असें स्पष्ट म्हटलें आहे. राज्यकारभारांतील कोणतेंही कृत्य करण्यापूर्वीं गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला घेतलाच पाहिजे अशी तरतूद कायद्यांत कोठेंही नाहीं. आज्ञापत्रानें ध्वनित केलें आहे कीं, गव्हर्नरानें मंत्र्यांचा सल्ला घ्यावा; कारण त्यांचा सल्ला मागितल्याशिवाय गव्हर्नर त्यांच्या सल्ल्याप्रमाणें चालण्यास समर्थ होणार नाहीं, परंतु

कायद्यान्वयें सल्ला घेतलाच पाहिजे अशी त्याच्यावर सक्ती नाहीं. गव्हर्नरनें जर गैरसनदशीर कृत्य केलेंच तर त्याला उपाय म्हणजे मंत्र्यांना सदर कृत्य फार महत्त्वाचें व गंभीर स्वरूपाचें वाटलें तर त्यांनीं राजीनामा देणें व गव्हर्नराला परत बोलवावें अशी विनंति करणें हा होय.'' १९१९ च्या द्विदळ राज्यपद्धतीच्या घटनेंतही मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें गव्हर्नरनें चाल्लेंच पाहिजे असा स्पष्ट उल्लेख होता; परंतु १९३५ च्या कायद्यांत तो काढून टाकला असल्यामुळें वरीलप्रमाणें उद्गार काढणें न्यायमूर्ति हॉरविलसाहेबांना शक्य झालें. त्यांनीं सुचविलेल्या उपायाचें आचरण ओरिसा प्रकरणीं नुकतेंच यशस्वी रीतीनें घडलेलें आहे. वास्तविक स्थिति अशी आहे कीं, प्रधानमंडळानेंच सर्व कारभार पहावयाचा व गव्हर्नरनें त्यांना लागेल ती 'मदत व सल्ला' द्यावयाचा. ब्रिटनमध्येंही सर्व कारभार 'हिज मॅजेस्टी'च्या म्हणजे 'राजेसाहेबां'च्या नांवावर प्रधानमंडळ पाहतें, त्याचप्रमाणें येथील प्रांतांतही सर्व कारभार 'गव्हर्नर'च्या (हिज मॅजेस्टीच्या प्रतिनिधीच्या) नांवावर लोकप्रतिनिधींनीं पहावयाचा; मात्र विलायतेंतील प्रधानमंडळ व पार्लमेंट म्हणजे लोकप्रतिनिधिसभा यांच्या हातीं 'कर्तमकर्तुमन्यथा कर्तुं'ची संपूर्ण सत्ता आहे व हिंदी प्रधानमंडळें व कायदेमंडळें यांची सत्ता १९३५ च्या पार्लमेंटच्या या कायद्यानें मर्यादित केलेली आहे. म्हणून वरील कलमांत गव्हर्नरनें आपण स्वतः ''मर्जीप्रमाणें'' करावयाच्या बाबी आणि प्रधानमंडळाचें कांहींही म्हणणें असलें तरी आपलें 'वैयक्तिक मत' प्रभावी करावयाच्या गोष्टी यांचा उल्लेख आला आहे. अर्थात् या गोष्टींबद्दल गव्हर्नर हिंदी कायदेमंडळांना जबाबदार नसला तरी ब्रिटिश राज्यघटनेप्रमाणें तो कोणाला तरी जबाबदार असला पाहिजे; प्रस्तुत प्रकरणीं तो गव्हर्नर जनरल, भारतमंत्री, पार्लमेंट, ब्रिटिश मतदार अशा परंपरेनें आपली जबाबदारी पार पाडतो. हा भाग पुढें ५४ व्या कलमांत अधिक येणार आहे. तसेंच ५३ व्या कलमांत उल्लेखिलेल्या गव्हर्नरला दिलेल्या 'आज्ञापत्रां'त गव्हर्नरनें त्याच्यावर सोपविलेल्या गोष्टींच्या संबंधांत कसें वागावें याचें विस्तृत विवरण दिलेलें आहे. प्रस्तुत पोटकलमाबाबत त्या 'आज्ञापत्रां'तील आठव्या परिच्छेदाकडे लक्ष दिल्यास असें आढळून येईल कीं,

कांहीं बाबी सर्वस्वीं गव्हर्नराच्या अखत्यारींतील आहेत; त्यांसंबंधीं गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें निर्णय करावयाचा आहे; प्रधान-मंडळाचें मत आगाऊ घेतलें पाहिजे असें कायद्याच्या कलमाचें बंधन नाहीं. अर्थात् प्रत्यक्ष व्यवहारांत असें करून भागणार नाहीं ही गोष्ट वेगळी. या सर्व बाबी उदाहरणादाखल पुढीलप्रमाणें देतां येतील:—

५० ( २ ) प्रधानमंडळाच्या सभांचें अध्यक्षस्थान स्वीकारणें.

५० ( ३ ) कोणत्या बाबी स्वतःच्या "मर्जीप्रमाणें" करावयाच्या आहेत अथवा प्रधानमंडळाचें मत घेऊन नंतर आपलें 'वैयक्तिक मत' प्रभावी करण्याच्या आहेत असा संशय निर्माण झाल्यास त्याबाबत निर्णय करणें.

५१ ( ५ ) प्रधानमंडळ निवडणें, त्यांना अधिकारसूत्रें घेण्यास पाचारण करणें, त्यांना कामावरून काढून टाकणें, तसेंच त्यांचा पगार ठरविणें ( कायदेमंडळानें त्यांच्या पगाराबाबत कायदा करीपर्यंत ).

५७ ( १ ) व ( २ ) सरकार उलथून टाकण्याचा उद्देश असलेले अत्याचाराचे गुन्हे होऊं न देण्याची खबरदारी घेणें; अशा प्रसंगीं प्रधानांच्या हातून अम्मलबजावणीची सत्ता आपल्या हातीं घेणें; याबाबत आपलें धोरण बोलून दाखविण्याकरितां कायदेमंडळावर एखाद्या अधिकाऱ्याची नेमणूक करणें.

५८ विशिष्ट माहिती कोठून मिळाली हें गुप्त राखण्याकरितां नियम करणें.

५९ ( २ ), ( ३ ) व ( ४ ) सरकारी कामकाज कसें चालावें यासंबंधीं नियम करणें. ( या बाबींचा प्रधानमंडळाशीं साक्षात् संबंध असल्यामुळें 'त्यांच्यांशीं वाटाघाट केल्यावर' असे शब्द मुद्दाम योजिले आहेत. )

६२ ( २ ) कायदेमंडळाचें अधिवेशन बोलावणें, समाप्त करणें किंवा असेंब्ली बरखास्त करणें.

६३ ( १ ) व ( २ ) कायदेमंडळापुढें भाषण करणें व कायदे-मंडळाला संदेश पाठविणें.

६५ ( ३ ) जागा रिकामी पडली असल्यास असेंब्ली किंवा कौन्सिलचा चेअरमन नेमणें.

६५ ( ४ ) स्पीकर, डेप्युटी स्पीकर, प्रेसिडेंट, डेप्युटी प्रेसिडेंट यांचे पगार मुक्रर करणें ( कायदेमंडळ याबाबत कायदा करीपर्यंत ).

६७ सभासदांनीं ज्याच्यापुढें शपथ घ्यावयाची त्याची नेमणूक करणें.

६९( १ ) (ङ) शिक्षा झालेल्या माणसांची, कायदेमंडळाकरितां उमेदवार म्हणून उभे राहिलेले असतांना, नालायकी दूर करणें.

( च ) निवडणुकीच्या खर्चाचें पत्रक योग्य पद्धतींत सादर करावयास एकादा सभासद चुकल्यास जी अपात्रता येते ती नाहींशी करणें.

७४ ( २ ) कायदेमंडळाची ( असेंब्ली व कौन्सिल ) जोडसभा बोलावणें.

७५ बिलांना मंजुरी देणें किंवा न देणें; किंवा मंजुरीकरितां गव्हर्नर जनरलकडे पाठविणें किंवा कायदेमंडळाकडे फेरविचाराकरितां परत करणें.

७८ ( ४ ) कोणत्या खर्चास कायदेमंडळाची मंजुरी हवी व कोणत्या खर्चास नको याबद्दलच्या वर्गीकरणासंबंधीं संशय असल्यास निर्णय करणें.

८४ ( १ ) कांहीं विशिष्ट बाबींसंबंधींचे नियम ( कायदेमंडळाच्या कामकाजाच्या पद्धतीबद्दलच्या नियमांपैकीं ) स्वतःच्या मर्जीप्रमाणें ठरविणें ( यासंबंधीं 'स्पीकर' अथवा 'प्रेसिडेंट' यांच्याशीं आगाऊ वाटाघाट केल्यानंतर ).

८४ ( २ ) कायदेमंडळाच्या जोडसभेकरितां नियम तयार करणें.

८४ ( ३ ) कायदेमंडळानें स्वतः नियम तयार करीपर्यंत तात्पुरते नियम तयार करणें.

८६ ( २ ) एकाद्या बिलासंबंधींची चर्चा आपल्या 'खास जबाबदारी'च्या क्षेत्राला बाधक होणारी आहे असें सर्टिफिकेट देणें; व कायदेमंडळाचें कामकाज थांबविण्याबद्दल हुकूम देणें.

८९ ऑर्डिनन्स लागू किंवा जारी करणें.

९० स्वतः कायदे बनविणें.

९२ (३) प्रांतांतील 'वगळलेल्या टापूं'चा राज्यकारभार चालविणें.

९३ मामुली घटनेप्रमाणें राज्यकारभार बंद पडल्यास आपल्या हातीं सर्व अगर अंशतः सत्ता धारण करणें.

( यानंतर प्रस्तुत तिसऱ्या खंडाखेरीज इतर खंडांतील कलमांतून गव्हर्नरनें 'आपल्या मर्जीप्रमाणें' करावयाच्या गोष्टी यापुढें दिल्या आहेत.)

१०८ ( २ ) गव्हर्नरानें केलेले कायदे अगर काढलेले वटहुकूम ( ऑर्डिनन्स ), तसेंच पोलिसासंबंधींचा कोणताही कायदा रद्द करणारें अगर दुरुस्त करणारें अथवा तद्विरुद्ध असणारें कोणतेंही बिल अगर दुरुस्ती कायदेमंडळापुढें येण्यास परवानगी देणें.

१११ ( ३ ) हिंदुस्थानांत प्रवेश करण्याबाबत अथवा येथें येऊन राहणें, व्यापारधंदा करणें इ० बाबत कोणत्याही ब्रिटिश प्रजाजनाला या कलमांतील पोटकलम ( १ ) प्रमाणें जी बंदी नाहीं ती अंशतः अथवा संपूर्णपणें रद्द करणें ( प्रांतांतील शांततेस धोका पोंचत असल्यास अथवा सरकार उलथून टाकण्याच्या उद्योगास प्रतिकार करावयाचा असल्यास ).

११९ ( १ ) धंद्याबाबतच्या पात्रतेसंबंधीं कोणत्याही कायद्याच्या मसुद्यास अगर दुरुस्तीस परवानगी देणें.

१२३ ( १ ) व ( २ ) सरहद्दीवरील टोळ्यांचा प्रदेश, लष्कर, परराष्ट्रसंबंध, ख्रिस्ती भिक्षुक खातें याबाबत गव्हर्नर जनरलचा मुनीम ( एजंट ) म्हणून काम करणें.

१७५ गव्हर्नरच्या राहत्या घरांची अगर तत्संबंधीं जमिनीची विक्री करणें अथवा त्यांत बदल करणें ( उ० मुंबई प्रांतः—तीन ठिकाणें १ वाळकेश्वर, २ गणेशखिंड, ३ महाबळेश्वर ).

२२६ ( १ ) व ( २ ) कायदेमंडळानें योग्य तो कायदा केल्याशिवाय जमीनमहसूल अगर तो गोळा करणें याबाबत हायकोर्टाला अस्सल दावा घेण्याचा अधिकार नाहीं; असा अधिकार देणाऱ्या बिलास कायदेमंडळापुढें येऊं देण्यास मंजुरी देणें.

२४२ (४) पब्लिक सर्व्हिस कमिशनची संमति घेतल्याखेरीज

कोर्टातील कोणाही नोकरास दुसरें काम करूं न देण्याबद्दल हायकोर्टास हुकूम करणें.

२६५ ( १ ) व ( २ ) पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या अध्यक्षाची व इतर सभासदांची नेमणूक करणें व त्यांच्या नोकरीबाबतचे व तत्संबंधीं इतर नियम तयार करणें.

२६६ ( ३ ) प्रांतांतील नोकरीच्या जागांसंबंधीं नियम तयार करणें; पब्लिक सर्व्हिस कमिशनकडे सल्लामसलतीकरितां कांहीं कामें सोपविणें.

२६७ पब्लिक सर्व्हिस कमिशनचीं कामें वाढविण्याबद्दल कायदे-मंडळाला कायदा करण्याचा अधिकार आहे; परंतु अशा कायद्याच्या मसुद्यास अगर दुरुस्तीस परवानगी देणें.

२७० प्रांतांतील कोणाही नोकरांविरुद्ध कोर्टात दिवाणी अगर फौजदारी काम चालविण्यास परवानगी देणें.

२७१ ( १ ) नोकरांना असलेलें संरक्षण नाहींसें करणाऱ्या अगर कमी करणाऱ्या कायद्याच्या मसुद्यास अगर दुरुस्तीला कायदेमंडळापुढें येऊं देण्यास परवानगी देणें.

२९९ ( ३ ) एखादी जमीन सार्वजनिक मालकीची करणें अगर तत्संबंधीं हक्क नाहींसे करणें अगर त्यांत दुरुस्ती करणें याबाबतच्या कायद्याच्या मसुद्यास अगर दुरुस्तीस कायदेमंडळांत येऊं देण्यास अनुज्ञा देणें.

३०५ ( १ ) व ( २ ) गव्हर्नरनें आपला चिटणीस व इतर कारकून, शिपाई वगैरे नेमणें व त्यांचे पगार, भत्ते वगैरे मुक्रर करणें.

३०८ ( १ ) अल्पसंख्याक जमातीबाबत व इतर कांहीं गोष्टीं-बाबत कायदेमंडळाला दुरुस्त्या ( घटना कायद्यांत ) सुचविण्याचा जो अधिकार आहे त्याप्रमाणें मंजूर होणारे ठराव व त्यासंबंधीं आपलें स्वतःचें मत भारतमंत्र्याकडे पाठविणें.

शेड्यूल ५ वें ( ६१ व्या कलमांत उल्लेखिलेलें ) कलम १४ ( ई ) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांतील सभासदांचा जो या शेड्यूलच्या शेवटीं तक्ता दिला आहे त्यांतील ८ व्या रकान्यांत गव्हर्नरनें ज्या जागा

भरावयाच्या आहेत त्या गव्हर्नरनें ‘आपल्या मर्जीप्रमाणें’ भरावयाच्या आहेत.

शेड्यूल ५ वें (६१ व्या कलमांत उल्लेखिलेलें) कलम १८ प्रांतांतील वरिष्ठ कायदेमंडळांतील सभासदांची मुदत ठरविणें (कांहींची म्हणजे $\frac{1}{3}$ सभासदांची ३ वर्षें, दुसऱ्या $\frac{1}{3}$ सभासदांची ६ वर्षें व बाकीच्या $\frac{1}{3}$ सभासदांची ९ वर्षें).

गव्हर्मेंट ऑफ इंडिया (सुरवात आणि तात्पुरती व्यवस्था) ऑर्डर १९३६:—

कलम ५ (१) १ एप्रिल १९३७ पासून कायदेमंडळ अंदाजपत्रक मंजूर करीपर्यंत अथवा ज्यास्तींत ज्यास्त सहा महिनेपर्यंत प्रांतांतील खर्चास मंजुरी देणें.

कलम ५ (३) सदरप्रमाणें जादा खर्चास मंजुरी देणें.

कलम ६ कायदेमंडळाच्या, कर बसविणें अगर कमी करणें याबाबतच्या अधिकारास बाध न आणतां १ एप्रिल १९३७ पासून १२ महिनेपर्यंत कर चालू ठेवणें.

(इ) आतां ज्या बाबीबाबत मंत्रिमंडळाचा सल्ला घेऊन सुद्धां शेवटीं निर्णय गव्हर्नरानें आपल्या ‘वैयक्तिक मता’वर ठरवावयाचा असतो अशा बाबी पुढीलप्रमाणें आहेत:—

५२ (१) पुढील गोष्टींसंबंधीं गव्हर्नराच्या खास जबाबदाऱ्या:—

(क) प्रांताच्या शांततेस गंभीर धोका उत्पन्न होऊं न देणें;

(ख) अल्पसंख्याक जमातींच्या न्याय्य हितसंबंधाचें संरक्षण;

(ग) सरकारी नोकरांच्या हक्कांचें व न्याय्य हितसंबंधाचें संरक्षण;

(घ) हिंदी ब्रिटिश व्यापार इ० बाबत कायद्याच्या अम्मलबजावणीबाबत भेदाभेद होऊं न देणें, (खंड ५ भाग ३);

(ङ) या खंडांतील कलमांप्रमाणें “अंशतः वगळलेल्या” प्रदेशांत शांतता व सुव्यवस्था राखणें;

(च) हिंदी संस्थानांचें हक्कसंरक्षण आणि संस्थानिकांचा इतमाम संभाळणें;

( छ ) सहाव्या खंडांतील योजनेप्रमाणें गव्हर्नर जनरलनें कायदेशीर रीत्या काढलेल्या हुकमांची अम्मलबजावणी करणें.

( २ ) ( i ) वऱ्हाडच्या हिताकरितां वसुलापैकीं योग्य तो हिस्सा मध्यप्रांत वऱ्हाड गव्हर्नरनें काढून ठेवणें ( ii ) 'बगळलेल्या' प्रदेशाबाबतची गव्हर्नरवर असलेली जबाबदारी प्रधानमंडळाच्या कोणत्याही कृत्यानें बाधित होणार नाहीं अशी खबरदारी घेणें; ( iii ) तसेंच गव्हर्नर-जनरलनें गव्हर्नरदर आपला मुनीम म्हणून सोपिवलेल्या गोष्टींबाबत वरील-प्रमाणें खबरदारी घेणें; ( iv ) सक्कर येथील लॉइड धरणाबाबत योग्य व्यवस्था होत आहे अगर नाहीं हें पाहणें.

५५ ( ४ ) ॲडव्होकेट जनरलची नेमणूक, त्याला कामावरून काढून टाकणें, आणि त्याचा पगार ठरविणें.

५६ पोलिसांची संघटना व शिस्त याबाबतचे नियम.

६८ ( १ ) प्रांताच्या दोन्ही कायदेमंडळांवर एकच मनुष्य सभासद म्हणून निवडून आल्यास त्यानें त्यांपैकीं एक जागा रिकामी करणें याबाबत नियम करणें.

( २ ) एकच इसम फीडरल व प्रांतिक कायदेमंडळावर निवडून आल्यास त्यानें त्यांपैकीं एका जागेचा राजीनामा देणें याबाबत नियम करणें.

७१ ( ४ ) नोकरांनीं कायदेमंडळाच्या कमिट्यांना हजर राहणें व गुप्त माहिती फुटूं न देणें याबाबत नियम करणें.

८८ ( १ ) कायदेमंडळांचें अधिवेशन चालू नसतांना विशिष्ट बिलांच्या धर्तीवर आर्डिनन्स पुकारणें अथवा जारी करणें.

९१ व ९२ 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांचा राज्यकारभार पाहणें [ पहा कलम ५२ ( १ ) ( ङ ) ].

( यानंतर प्रस्तुत तिसऱ्या खंडाखेरीज इतर खंडांतील कलमांतून गव्हर्नरनें आपल्या 'वैयक्तिक मता'प्रमाणें करावयाच्या बाबी पुढें दिल्या आहेत. )

११९ ( ३ ) धंद्यांच्या (विशिष्ट) पात्रतेबाबत प्रांतिक कायद्याखालीं केलेले नियम रद्द करणें.

११९ ( ४ ) वरीलप्रमाणेंच—'प्रांतिक' ऐवजीं प्रस्तुतच्या 'हिंदी' कायद्याखालीं केलेले नियम रद्द करणें.

१५१ ( १ ) सार्वजनिक पैशाच्या ताब्यासंबंधींची व्यवस्था.

२२८ ( २ ) अंदाजपत्रकांत हायकोर्टाला लागणाऱ्या खर्चाच्या रकमेची तजवीज करणें.

२४६ ( २ ) ( ख ) राखीव जागांवर नेमणुका, बदल्या वगैरे करणें.

२४७ ( २ ) नोकरांचें प्रमोशन, तीन महिन्यांपेक्षां अधिक रजा, नोकरींतून तात्पुरतें कमी करणें.

२४७ ( ३ ) सस्पेंड असलेल्या मुदतींत नोकराचा पगार कमी करणें.

२४८ (२) नोकरांना शिक्षा करणारा अगर त्यावर ठपका ठेवणारा अथवा त्यांच्या पेन्शन वगैरे हक्कांना बाध आणणारा कोणताही हुकूम काढणें.

२५४ ( १ ) डिस्ट्रिक्ट जजांच्या नेमणुकी, बदल्या, प्रमोशनें इ० करणें व ठरविणें.

२५८ ( १ ) ( ख ) व ( २ ) ( ख ) कोणतीही मुलकी जागा रद्द करणें अगर न करणें. तसेंच सदर जागेचा पगार, भत्ता, पेन्शन वगैरेंना बाध आणणारा कोणताही हुकूम काढणें अगर नियम करणें.

२६२ ( ५ ) ब्रिटिश प्रजाजन नाहींत ( यांत संस्थानी प्रजा येते) अशा इसमांची नोकरीबाबत पात्रापात्रता ठरविणें.

२७१ ( २ ) क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या १९७ व्या कलमाखालीं स्थानिक सरकारला नोकरांवर खटला करण्यास मंजुरी देणें व कोर्ट ठरविणें याबाबत दिलेले अधिकार चालविणें.

२७१ ( ३ ) सिव्हिल प्रोसीजर कोडाप्रमाणें एखाद्या सरकारी नोकरावर दिवाणी दावा चालू असल्यास त्याबाबत आलेला खर्च प्रांताच्या तिजोरींतून अंशतः अथवा सर्व देणें वा न देणें.

२९६ ( २ ) जमीनमहसुलाच्या खटल्याबाबत अपिलें चालविण्याकरितां किंवा निर्णयाचा फेरविचार करण्याकरितां ट्रिब्यूनल ( पंचमंडळ ) बनविणें.

२९६ ( ३ ) वरील पंचांचा अथवा न्यायाधीशांचा पगार व भत्ता ठरविणें.

३०० ( १ ) व ( २ ) दयार्द्र बुद्धीनें प्रेरित होऊन अगर राजकीय हेतूस्तव दिलेले हक्क, अधिकार अथवा पेन्शनें इ०चें संरक्षण करणें.

३०३ ( ३ ) कलकत्त्याच्या शेरिफाची नेमणूक, त्याचा पगार व त्याला कामावरून काढून टाकणें. ( अर्थात् बंगालच्या गव्हर्नरावर ही जबाबदारी आहे हें सांगावयास नकोच. )

५ वें शेड्यूल ( कलम २० ):—पांचव्या व सहाव्या शेड्यूलमधील योजना अमलांत आणण्याकरितां, तसेंच कायदेमंडळ योग्य तऱ्हेनें निवडून आणणेकरितां—( १ ) उमेदवारांनीं निवडणुकीकरितां नांवें देणें; ( २ ) निवडणुकीची व्यवस्था करणें; ( ३ ) लाचलुचपत वगैरे प्रकारांना आळा घालणें इ० गोष्टींसंबंधीं नियम तयार करणें.

६ वें शेड्यूल ( खंड १ कलम २ ):—विशिष्ट तारखेला उद्देशून प्रादेशिक मतदारसंघांतील मतदारांच्या याद्या तयार केल्या जावयाच्या ही तारीख गव्हर्नरनें 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' ठरविणेची आहे.

गव्हर्मेंट ऑफ इंडिया (हिशेब आणि हिशेबतपासणी) ऑर्डर, १९३६:—

कलम ११ ( ५ ) हिशेबाच्या कोणत्या सदराखालीं एखादा विशिष्ट व्यवहार अथवा खर्च घालावयाचा यासंबंधीं विशिष्ट अथवा सर्वसामान्य हुकूम हिशेबतपासनिसाला देणें. ( अर्थात् यापूर्वी याबाबत ऑडिटर जनरलशीं सल्लामसलत केल्यानंतर. )

गव्हर्मेंट ऑफ इंडिया ( हरिजन जाती ) ऑर्डर १९३६:—

कलम ( ३ ) व ( ४ ) बंगालमध्यें बुद्धधर्मीय किंवा वन्य जातीय धर्म पाळणाऱ्या कोणाही इसमास 'हरिजन जातीं'त समाविष्ट केलें जाणार नाहीं. याबाबत कांहीं वादग्रस्त प्रश्न निघाल्यास " नियमानें घालून दिलेल्या पद्धतीनें " विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें पाहून वरीलबाबत निकाल करण्यांत येईल. सदरहू नियम बंगालच्या गव्हर्नरनें आपल्या 'वैयक्तिक मताप्रमाणें' तयार करणें.

गव्हमेंट ऑफ इंडिया (गव्हर्नरांचा भत्ता व हक्क) ऑर्डर १९३६:—

कलम ७ (२) गव्हर्नराचे भत्ते, विशेष सवलती यासंबंधींच्या खर्चाबाबत अंदाजपत्रकांत योग्य ती तजवीज करणें.

गव्हमेंट ऑफ इंडिया (हायकोर्ट न्यायाधीश) ऑर्डर १९३६:—

कलम १५ न्यायाधीशांना रजा देणें, ती नाकारणें, ती कमी करणें किंवा रद्द करणें (अर्थात् याबाबत सरन्यायाधीशाची सल्लामसलत घेतल्यानंतर).

कलम २४ न्यायाधीशांना पेन्शनींत काढणें.

कलम २५ न्यायाधीशांचा प्रवासभत्ता आणि प्रवासाच्या इतर सोयी ठरविणें.

मुंबई कायदेमंडळ कमिट्यांसंबंधीं (अधिकाऱ्यांच्या साक्षी) १९३७ चे नियम:—

नियम ७ वरील साही नियमांखालीं गव्हर्नरनें करावयाच्या गोष्टी त्यानें आपल्या 'वैयक्तिक मताप्रमाणें' करावयाच्या.

(ई) आतां प्रधानमंडळाच्या सभांना गव्हर्नरनें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचा प्रश्न. त्यानें वाटेल तर सभांना हजर राहून अध्यक्ष व्हावें अगर सभांना हजर राहूं नये. ही त्याच्या मर्जीवर सोपविलेली गोष्ट आहे. याबाबत सर्व प्रांतिक गव्हर्नरांचें वर्तन पाहिल्यास ते सर्व सभांना हजर राहून अध्यक्ष होतात हा नियम मानतां येईल. क्वचित्प्रसंगीं कोठें बाहेरगांवीं दौऱ्यावर असल्यास ते हा अधिकार बजावूं शकत नाहींत. प्रधानमंडळाची बैठक कोठें व केव्हां भरवावयाची हीही गोष्ट अध्यक्षाच्या म्हणजे गव्हर्नराच्या मर्जींतली आहे. गव्हर्नर हा हवेच्या ठिकाणीं जाऊन राहिला असल्यास त्याच्या एकट्याच्या सोयीकरितां प्रधान व खात्यांचे सेक्रेटरी या सर्वांना गव्हर्नर असेल त्या ठिकाणीं जावें लागणार; परंतु सोयीच्या दृष्टीनें एक तर गव्हर्नरनें डोंगरावरून खालीं यावें किंवा आपण हजर नसतांना प्रधानमंडळाची बैठक भरविण्यास त्यानें संमति द्यावी. नाथियागलीहून सरहद्दप्रांताचा गव्हर्नर बैठकीकरितां पेशावरास आल्याचें नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे तें वरील दृष्टीनें युक्तच आहे. सभेचा अध्यक्ष असण्याबाबत आपला हक्क सोडावयास गव्हर्नर तयार नाहींत असें दिसतें.

इंग्लंडमध्यें राजा प्रधानमंडळाच्या सभेला इ. स. १७१४ मध्यें उपस्थित असल्याचा शेवटचा प्रसंग. तेव्हांपासून गेल्या सव्वादोनशें वर्षांत राजा प्रधानमंडळाच्या बैठकीला कधींही हजर राहिलेला नाहीं. इतकेंच नव्हे तर तसा तो हजर राहिला तर तें बेसनदशीर कृत्य मानलें जाईल व तें कोणतेंही प्रधानमंडळ करूं देणार नाहीं. प्रधान-मंडळांत काय चालतें हें राजापासून संपूर्णपणें गुप्त राखण्यांत येतें. व्यक्तिशः कोणताही प्रधान राजाची भेट घेतो व त्याला आपल्या खात्यासंबंधीं माहिती देतो; मुख्यतः हें काम मुख्य प्रधानाला करावें लागतें. स्वायत्त वसाहतींतून सुद्धां गव्हर्नर जनरल हा केव्हांही प्रधानमंडळाच्या सभांना हजर राहात नाहीं; त्याला फक्त निर्णय कळविण्यांत येतात; या-बाबत वसाहतींत ब्रिटिश रिवाजाचेंच अनुकरण करण्यांत आलें आहे. पण हिंदुस्थानांतील प्रांतांत व मध्यवर्ती सत्तेच्या केन्द्रीं सर्वच स्थिति उलटी आहे. गव्हर्नरांना व गव्हर्नर जनरलला भरमसाट जादा अधिकार व जबाब-दाऱ्या दिल्या आहेत त्यामुळें त्यांना बारीक सारीक बाबीपासून तों थेट महत्त्वाच्या राजकीय धोरणाच्या प्रश्नासंबंधीं जातीनें लक्ष घालणें कायद्यानें भाग पाडलें आहे. बरें, याबाबत कायद्याचें बंधन वसाहतीच्या व ब्रिटन-च्या धर्तीवर नवीन प्रघात पाडून शिथिल व खऱ्या लोकसत्तेच्या स्थापने-ला उपकारक करण्याचें गव्हर्नर मनांत आणीत नाहींत; इतकेंच नव्हे तर नवीन कायद्याच्या सबबीवर गव्हर्नर जनरलनें लष्कर व परराष्ट्रसंबंध या खात्यांसंबंधींच्या किरकोळ खर्चाच्या मागण्यांवर मध्यवर्ती असेंब्लीचें मत घेण्याचें नाकारिलें आहे. असो. गव्हर्नरच्या अभावीं अर्थातच मुख्य प्रधान प्रधानमंडळाच्या सभेचा अध्यक्ष होतो. या सभांना निर-निराळ्या खात्यांचे सेक्रेटरी अथवा चिटणीस हजर राहतात. ही पद्धत ब्रिटनमध्यें नाहीं. तज्ज्ञ म्हणून कोणाही अमलदारानें आपल्या खात्या-पुरतें हजर राहणें निराळें. नवीन नेमल्या गेलेल्या पार्लमेंटरी सेक्रेटरींना या प्रधानमंडळाच्या सभांना हजर राहण्याचा हक्क नाहीं. या दृष्टीनें कायम नोकर असलेल्या डिपार्टमेंटल सेक्रेटरीचा दर्जा पार्लमेंटरी सेक्रेटरीपेक्षां वरचढ ठरतो. डिपार्टमेंटल सेक्रेटरींचा स्पष्ट उल्लेख या काय-द्याच्या ५९ (४) कलमांत आला आहे; पण पार्लमेंटरी सेक्रेटरींचा कायद्यांत

उल्लेखच नाहीं. १९१९ च्या कायद्यांत प्रधानांना व कार्यकारी मंत्र्यांना मदत करण्याकरितां कौन्सिल सेक्रेटरी नेमण्याचा गव्हर्नरांना अधिकार देण्यांत आला होता; पण त्याचा उपयोग त्या वेळीं कोणाही गव्हर्नरानें केलेला आढळून येत नाहीं. गोरी नोकरशाही व तिचा पाठी-राखा व म्होरक्या गव्हर्नर यांची 'पोलादी चौकट' या नव्या कायद्यांत प्रधानमंडळाच्या गळ्याभोंवतीं चांगलीच आवळलेली आहे; नाहींपेक्षां मद्रास हायकोर्टचे जस्टिस हॉरविल यांनीं बाटलीवाला खटल्यांत 'सरकार हें प्रधानमंडळापेक्षां अधिक व्यापक असून ( अस्ति बाव ततो भूयः ) त्यांत प्रधानांच्या हाताखालील सर्व सरकारी यंत्राचा अंतर्भाव होतो' असे उद्गार काढले नसते.

या प्रधानमंडळाच्या बैठकींच्या महत्त्वाच्या प्रश्नाबाबत एक तोडगा निघण्याचा संभव आहे. ज्या प्रांतांतून काँग्रेससारखें एकजिनसी व समानधोरणी व संयुक्त जबाबदारी वाहणारें प्रधानमंडळ स्थापन झालें असेल तेथें केवळ प्रधानांनीं आपली खास अनौपचारिक सभा भरवावयाची ( यांत पार्लमेंटरी सेक्रेटरींनाही विश्वासांत घेण्यास हरकत नाहीं ) व महत्त्वा-च्या धोरणाची चर्चा करावयाची व निर्णय करावयाचे; व ते पुढें ज्या त्या प्रधानानें औपचारिकपणें गव्हर्नरच्या अध्यक्षतेखालील सभांतून मांडावयाचे; गव्हर्नर किंवा सेक्रेटरी यांजपुढें केव्हांही आपल्यांतील मतभेदांचें प्रदर्शन म्हणून करावयाचें नाहीं. गव्हर्नरांची साहजिकच अपेक्षा असणार कीं, 'आपल्यापुढें निरनिराळ्या प्रधानांनीं उलटसुलट मतें प्रतिपादावीं; कडाक्याचें भांडण व्हावें व आपण त्या भांडणाचा निकाल सामोपचारानें व युक्तिवादानें केल्याचें श्रेय घ्यावें व असें करून आपल्या महत्त्वपूर्ण अस्तित्वाचें समर्थन करावें.' परंतु ही गोष्ट फार काळ चालणार नाहीं; काँग्रेस प्रांतांतून तर वरील अपेक्षेला फाटा मिळालाच आहे; तथापि सध्यांचा कायदा बदलला नाहीं तोंपर्यंत गव्हर्नर प्रधानमंडळाच्या बैठकांना हजर राहणारच. याबाबत ओरिसा प्रांतांत एका काँग्रेस सभा-सदानें असेंब्लींत ' किती प्रधानमंडळाच्या सभांना गव्हर्नर हजर राहिला नाहीं?' असा प्रश्न विचारला. ही गोष्ट गुप्त असते या सबबीवर मुख्य प्रधानांनीं उत्तर देण्याचें नाकारलें व फक्त कलम ५० ( २ ) कडे

बोट दाखविलें. याचें कारण प्रधानांना घ्यावी लागणारी जी गुप्ततेची शपथ त्यांतील पुढील भाग हें असावें:—

"........गव्हर्नरानें ज्या गोष्टी केवळ **आपल्या मर्जीप्रमाणें** करावयाच्या असतात त्यासंबंधीं कोणत्याही गोष्टीबाबत गव्हर्नरानें खास परवानगी दिल्याशिवाय मी गुपित बाहेर सांगणार नाहीं." शिवाय कायदे-मंडळांतील कामकाजासंबंधीं जे नियम करावयाचे असतात त्याबाबत कायद्यांतील ८४ ( १ ) ( क ) कलमांत स्पष्ट म्हटलें आहे कीं, "गव्हर्नरनें **आपल्या मर्जीप्रमाणें** किंवा **वैयक्तिक मताप्रमाणें** जे अधिकार चालवा-वयाचे असतात त्यासंबंधींच्या कामकाजाचे नियम स्पीकर किंवा प्रेसिडेंट यांचा सल्ला घेतल्यानंतर परंतु **आपल्या मर्जीप्रमाणें** मुक्रर करावयाचे आहेत." असा हा मर्जीचा व लहरीचा व स्वतंत्र अद्वैती शहाणपणाचा मामला आहे! काँग्रेसेतर प्रांतांत ज्या ठिकाणीं एकजिनसी व जोरकस प्रधानमंडळ नाहीं, तेथील मासला पाहण्यासारखा आहे. मावळत्या अंडरसन गव्हर्नरबद्दल मुख्य प्रधान फजलुल हक्क म्हणाले, "आम्ही प्रधानमंडळी ही एक क्रिकेट किंवा इतर खेळ खेळणारी इलेव्हन (११ जणांची टीम ) आहोंत व अंडरसनसाहेब आमचे 'ट्रेनर' ( शिक्षक ) आहेत, व त्यांच्या मार्गदर्शित्वाखालीं आम्ही चांगली कामगिरी बजावूं."

( उ ) ३ ऱ्या पोटकलमांत अशी तरतूद केली आहे कीं, एखादी गोष्ट गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें करावयाची अगर नाहीं याबाबत संशय उत्पन्न झाल्यास त्याचा निकाल गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचा व तो अखेरचा निकाल समजण्यांत येईल आणि गव्हर्नरनें केलेलें कृत्य, तें त्यानें आपल्या मर्जी-प्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें करावयास पाहिजे होतें अगर नको होतें या सबबीवर, कोर्टापुढें खेचतां येणार नाहीं. मद्रास हायकोर्टापुढें चाललेल्या प्रसिद्ध बाटलीवाला खटल्यांत आरोपीतर्फे असा मुद्दा मांडण्यांत आला कीं, ५० व्या कलमांतील शेवटचा भाग पहिल्या भागाला धरून लावला पाहिजे आणि तो शेवटचा भाग अमुक एक बाब गव्हर्नरच्या मर्जीतली अगर वैयक्तिक मतांतली आहे अगर नाहीं याबाबत उद्भव-णाऱ्या संशयापुरतीच मर्यादित धरली पाहिजे. तात्पर्य, ज्या बाबीसंबंधांत

गव्हर्नरनें मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें चाललेंच पाहिजे अशा बाबींसंबंधीं गव्हर्नराच्या कृत्याची चौकशी हायकोर्टाकडून होण्यास कांहींच हरकत नसली पाहिजे. याचा अर्थ, राजद्रोहाच्या खटल्याला परवानगी देणें ही मंत्र्यांच्या अधिकारांतली बाब आहे असें असतां गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला न घेतां खटला भरण्यास मंजुरी दिली म्हणून हें गव्हर्नरचें कृत्य कायदेशीर आहे अगर बेकायदेशीर आहे याची हायकोर्टानें चौकशी करणें न्याय्य आहे, असा होतो.

या मुद्द्यासंबंधीं न्यायमूर्ति हॉरविल म्हणाले, " या पोटकलमांतील शेवटच्या भागाचा एवढाच मर्यादित अर्थ असता तर वर सांगितलेल्या इतक्या सर्व शब्दांची आवश्यकताच भासली नसती." ह्या महत्त्वाच्या प्रश्नावर फीडरल कोर्टाकडून अधिकृत निर्णय करून घेण्यासारखा होता. परंतु मद्रास सरकारनें बाटलीवाल्यांची ताबडतोब सुटका केल्यानें हा प्रश्न फीडरल कोर्टापुढें जाणें अशक्य झालें.

( ऊ ) मद्रास सरकारनें नुकताच एक हुकूम काढला आहे त्या-अन्वयें " प्रधानांना दिवाणी कोर्टांत स्वतः हजर राहण्याची माफी देण्यांत आली आहे." ब्रिटिश प्रधानांना १९३२ सालच्या एका नियमान्वयें पोटनिवडणुकींत आपल्या पक्षातर्फे भाषणें करण्याची वगैरे बंदी केली होती; ती नुकतीच काढून घेण्यांत आली आहे. तथापि मुख्य प्रधान, अर्थमंत्री व परराष्ट्रमंत्री हे जुन्या नियमालाच अनुसरून आपलें या पोटनिवडणुकीबाबतचें वर्तन ठेवणार आहेत असें जाहीर करण्यांत आलें आहे. या परिच्छेदांत प्रधानांना मिळणाऱ्या सवलतींचा जातां जातां उल्लेख केला आहे.

प्रधानांसंबंधीं इतर व्यवस्था.

**५१—( १ )** प्रधान निवडणें, त्यांना अधिकारसूत्रें घेण्यास निमंत्रण करणें व प्रधानमंडळाच्या सभासदत्वाची त्यांच्याकडून शपथ घेवविणें हीं कामें गव्हर्नरनें करावयाचीं आहेत; गव्हर्नरचीं खुषी असेल तोंपर्यंत ते अधिकारावर राहतील.

**( २ )** जो प्रधान ओळीनें सहा महिनेपर्यंत प्रांतिक कायदेमंडळाचा सभासद असणार नाहीं तो तेवढी मुदत संपतांक्षणीं प्रधानपदावर राहूं शकणार नाहीं.

(३) प्रधानांचे पगार प्रांतिक कायदेमंडळ वेळोवेळीं कायद्याने ठरवील ते राहतील; आणि प्रांतिक कायदेमंडळ वरीलप्रमाणें पगार ठरवीपर्यंत गव्हर्नर ते मुक्रर करील.

अट एवढीच कीं, मंत्री प्रधानपदावर असेपर्यंत त्याच्या पगारांत फेरबदल होणार नाहीं.

(४) एखाद्या प्रकरणाबद्दल मंत्र्यांनीं गव्हर्नराला सल्ला दिला अगर नाहीं अथवा दिला असल्यास काय सल्ला दिला याबाबत कोणत्याही कोर्टांत चौकशी केली जाणार नाहीं.

(५) मंत्री पसंत करणें, त्यांना निमंत्रण करणें आणि त्यांना कामावरून काढून टाकणें यासंबंधींचे, तसेंच त्यांचे पगार ठरविण्याबाबतचे अधिकार गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणें चालवील.

(अ) गव्हर्नरनें आपलें प्रधानमंडळ कसें पसंत करावयाचें यासंबंधानें गव्हर्नराला दिलेल्या 'आज्ञापत्रांत' स्पष्ट सूचना दिल्या आहेत:— (आज्ञापत्र, क. ७) "कायदेमंडळांत स्थिर (डळमळीत नव्हे) बहुमत मिळवूं शकेल अशा इसमाच्या विचारानें गव्हर्नरानें आपले प्रधान निवडावे (त्यांत शक्य तों प्रमुख अल्पसंख्याक जमातींचे सभासद असावेत); हे प्रधान सामुदायिकपणें कायदेमंडळाच्या विश्वासास पात्र असावेत. असें करण्यांत प्रधानांच्या संयुक्त जबाबदारीचें तत्त्व वाढीला लावण्याचीं गरज त्यानें नेहमीं नजरेपुढें ठेवावी." याचा सरळ अर्थ कायदेमंडळांतील बहुमतवाल्या पक्षाच्या पुढाऱ्याला बोलावून आणून त्याला आपलें प्रधानमंडळ बनविण्यास सांगणें हा होय. वरील आज्ञापत्रांत उल्लेखिलेला इसम म्हणजेच 'मुख्य प्रधान' होय. ग्रेटब्रिटनमध्यें मुख्य प्रधानानें प्रधानांची दिलेली यादीच राजानें मान्य करावयास पाहिजे असा आज कित्येक वर्षें चालत आलेला प्रघात आहे; तसा कायदा कोठेंच नाहीं. १९३५ च्या कायद्यांतही याबद्दल कोठेंच उल्लेख नाहीं. हा प्रघात पाडण्यास गव्हर्नरनें सुरुवात करावी असें 'आज्ञापत्रा'नें स्पष्ट सांगितलें आहे. हिंदुस्थानांत अल्पसंख्याकांच्या हक्करक्षणाचा ब्रिटिशांकडून नेहमींच बागुलबोवा उभा करण्यांत आल्यामुळें व आमच्यांतील लोकांनीं तोच धास्ती खाल्ल्यामुळें पावलोंपावलीं गव्हर्नरावर त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी सोपविलेली दिसते. म्हणूनच वरील आज्ञापत्रांतील कलमांत अल्पसंख्याकांपैकीं

'सभासद' प्रधानमंडळांत निवडण्याबद्दल गव्हर्नरला सांगितलें आहे. त्यांत अल्पसंख्याकांचा 'प्रतिनिधि' असें म्हटलेलें नाहीं. याबाबत निरनिराळ्या कॉंग्रेस प्रांतांत विशेषतः मुंबई व मध्यप्रांतांत मुस्लिम लीगच्या सभासदांची तक्रार आहे कीं, प्रधानमंडळांतील मुसलमान मंत्र्यावर आपला विश्वास नाहीं व तो आपला प्रतिनिधी नाहीं. याबाबत जिनासारख्या कायदेपंडितांनीं 'गव्हर्नरनीं याबाबत १९३५ च्या कायद्यास मूठमाती दिली' असा आरोप करावा याचें आश्चर्य वाटतें व जातीय भावनेच्या भरांत मनुष्य आपल्या विवेकाला कसा फाटा देतो याची चांगली कल्पना येते. याबाबत मुंबई प्रांतांतील मुसलमानांनीं गव्हर्नरकडे शिष्टमंडळ नेलें असतां त्यानें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—" तुमचें म्हणणें बरोबर नाहीं. एखाद्या छोट्या जमातीचा प्रधान हा त्या जमातीनें निवडून द्यावयाचा असें कायद्यांत किंवा आज्ञापत्रांत कोठेंच सांगितलेलें नाहीं. अल्पसंख्याक जमातीपैकीं सभासद प्रधानमंडळांत घेतला पाहिजे असें मी प्रधानमंडळास सांगून तसें त्यांना करावयास लावीन; परंतु मुसलमान सभासदांनीं निवडून दिलेला प्रधान घेतला पाहिजे असें मला केव्हांही म्हणतां येणार नाहीं. मी तसें करीन तर मंत्रिमंडळाच्या संयुक्त जबाबदारीच्या तत्त्वास माझ्याकडून हरताळ फासला जाईल व नापसंत असलेल्या माणसाबरोबर काम करणें मंत्रिमंडळालाही शक्य होणार नाहीं."

बहुमतवाल्या पक्षाचें मंत्रिमंडळ बनवावयाचें यावरून पुढील अनुमान ओघानेंच निघतें; तें असें कीं, ज्या वेळीं त्या पक्षाचें बहुमत एखाद्या गोष्टीसंबंधीं नाहींसें होतें त्या वेळीं त्या पक्षानें मंत्रिपदांचा राजीनामा द्यावयास पाहिजे. याबद्दलही ग्रेटब्रिटनमध्यें किंवा हिंदुस्थानांतही कायदा नाहीं, पण योग्य असा प्रघात आहे. हा प्रकार नुकताच आपणास सिंधमध्यें पहावयास मिळाला. हिदायतुल्ला प्रधानमंडळाचा एका महत्त्वाच्या कपातसूचनेवर एका मतानें पराभव झाल्याबरोबर त्या मंत्रिमंडळास राजीनामा देणें भाग पडलें व दुसऱ्या स्थिर बहुमत असलेल्या पक्षास अधिकारसूत्रें मिळालीं.

या सर्व विवेचनावरून अल्पसंख्याक पक्षाचें मंत्रिमंडळ पदारूढ करणें गव्हर्नराच्या अखत्यारींतील नाहीं हें कोणाही समंजस माणसास कळून

येणार आहे. परंतु अशी चमत्कारिक परिस्थिति १ एप्रिल १९३७ च्या सुमारास कॉंग्रेस सभासदांचें बहुमत असलेल्या सहा प्रांतांतून निर्माण झाली. दिल्लीच्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ठरावाप्रमाणें "सनदशीर बाबी-संबंधांत गव्हर्नर आपले ढवळाढवळ करण्याचे जादा अधिकार वापरणार नाहीं अथवा प्रधानांनीं दिलेला सल्ला बाजूला सारणार नाहीं अशा प्रकारचें आश्वासन मिळाल्यास बहुमतवाल्या कॉंग्रेस पक्षास अधिकार-सूत्रें धारण करण्यास परवानगी" देण्यांत आली. त्याप्रमाणें कॉंग्रेस पक्षाच्या पुढाऱ्यांनीं मागितलेल्या आश्वासनास गव्हर्नरांनीं नकार दिल्यामुळें बहुमतवाल्या पक्षाचें मंत्रिमंडळ स्थापण्याबद्दल 'आज्ञापत्रां'त दिलेल्या 'आज्ञे'चा गव्हर्नरांनीं भंग केला असें म्हणण्यास मुळींच प्रत्यवाय नाहीं. तथापि कायद्यांतील मोघम कलमाचा पोचट आधार घेऊन गव्हर्नरांनीं सहा प्रांतांतून बहुमताचा बिलकुल पाठिंबा नसलेलीं प्रधानांचीं बाहुलीं उभीं केलीं व तीनचार महिनेपर्यंत त्यांच्या-करवीं राज्यकारभाराचा गाडा हाकिला. या गव्हर्नरांच्या कृत्याच्या कायदे-शीरपणाबद्दल अस्तिनास्तिपक्षीं खूप चर्चा झाली. हिंदुस्थानांतील प्रसिद्ध कायदेपंडित व राजकारणशास्त्रपटु सर तेज बहादुर सप्रू यांनीं प्रांतिक गव्हर्नरांनीं कॉंग्रेस पुढाऱ्यांना अधिकारसूत्रें घेण्याविषयीं आमंत्रण करण्या-पूर्वीं लिहिलेल्या, परंतु १ एप्रिल १९३७ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया' च्या विशेष अंकांत प्रसिद्ध झालेल्या आपल्या लेखांत असें म्हटलें आहे कीं, 'कॉंग्रेसनें अधिकारस्वीकार करण्याचें नाकारल्यास गव्हर्नरांना ९३ कलमान्वयें घटना तहकूब केल्याचें जाहीर करण्यावांचून गत्यंतर नाहीं.' परंतु पुढें अल्पसंख्याक पक्षाचीं मंत्रिमंडळें नेमल्याचें जाहीर झाल्याबरो-बर त्यांनीं पुढें येऊन सरकारच्या सदर बेसनदशीर कृत्याला पाठिंबा दिला. कांहीं लोकांना सरकारच्या कोणत्याही कृत्याला पाठिंबा देण्यासाठीं आपली बुद्धि खर्च करण्याची जी खोड लागून राहिली आहे त्याचें सर सप्रू हे उत्तम उदाहरण होत. घटना तहकूब न करितां परंतु अल्पसंख्याक पक्षाचीं मंत्रिमंडळेंही न नेमतां ३१० व्या कलमाप्रमाणें 'सत्तासंक्रमणाच्या काळांत अभावितपणें कांहीं अडचणी उत्पन्न झाल्यास त्यांची व्यवस्था व निरास' करण्याचा अधिकार ब्रिटिश राजेसाहेबांना जो

दिला आहे त्याचा उपयोग करावयास पाहिजे होता असें पंडित नेहरू यांनीं आपलें मत दिलें आहे. या प्रश्नाबाबत प्रो. कीथ म्हणतात: " घटनाभंग झाला हें लपविण्याकरितां जबाबदार राज्यपद्धतीच्या बाह्य सोंगाचा असा भलता उपयोग करूं नका. अल्पसंख्याक मंत्रिमंडळें म्हणजे जबाबदार राज्यपद्धतीचा अपलाप आहे असें माझें स्वच्छ मत आहे." इतकें झालें तरी सत्तेपुढें शहाणपण फुकट आहे या न्यायानें सदर चर्चेचा कांहींच उपयोग झाला नाहीं. पार्लमेंटांत मुख्य प्रधान चेंबरलेन यांनीं दडपून सांगितलें कीं, तात्पुरतीं प्रधानमंडळें हीं पूर्णपणें कायद्याला धरून आहेत. शेवटीं ब्रिटिश सरकार व कॉंग्रेस यांच्या दरम्यान खूपच खुलासे व प्रतिखुलासे होऊन तात्पुरत्या मंत्रिमंडळांनीं राजीनामे दिले व लोकशाहीच्या सर्वमान्य तत्त्वाला धरून असलेलीं कॉंग्रेस मंत्रिमंडळें सहाही प्रांतांतून स्थापन झालीं. तात्पुरत्या मंत्रिमंडळांचा उपयोग ९३ व्या कलमाप्रमाणें घटना तहकूब न करण्यांत झाला असें सांगण्यांत येतें; परंतु सूक्ष्म विचार केल्यास त्यांत कांहीं अर्थ नाहीं असें दिसून येईल. 'तात्पुरत्या' लोकांनीं कॉंग्रेसच्या राजकारणास हातभार न लावतां ब्रिटिश धोरणास मदत केली एवढेंच म्हणतां येईल. जी गोष्ट तीनचार महिने भिजत पडली त्याचा चारदोन दिवसांत तडकाफडकी निकाल लागला असता व उभय-पक्षांना आपापला रस्ता चोखाळण्यास ताबडतोब मोकळीक मिळाली असती. नसत्या लोकांनीं 'बीच में' पडण्याची कांहींच जरूरी नव्हती. याचें प्रत्यंतर संयुक्तप्रांत व बिहार येथील, गव्हर्नर जनरल व मंत्रिमंडळें यांच्या पेचप्रसंगामुळें चांगल्याच तऱ्हेनें निदर्शनास आलें आहे. राज-बंदींच्या मुक्ततेबाबत मतभेद झाल्यामुळें मंत्रिमंडळानें राजीनामा दिला, गव्हर्नरांनीं विरोधीपक्षाच्या पुढाऱ्यांना पाचारण करून भेटण्याचा देखावा केला, विरोधीपक्षाच्या पुढाऱ्यांनीं मंत्रिमंडळें बनविण्याचें नाकारल्यामुळें गव्हर्नरांनीं मंत्रिमंडळांना राजीनामा परत घेण्यास सांगितलें व अशा तऱ्हेनें राजीनामा दिल्यापासून १०|१२ दिवसांच्या आंत या प्रकरणाचा योग्य निकाल तडकाफडकी लागला. ओरिसा हंगामी गव्हर्नर प्रकरणीं फिरून एकदां असाच अनुभव आला. या वेळीं राजीनाम्याच्या नुसत्या धाकानेंच काम भागलें. अशा प्रकारें सामोपचारानें व सलोख्यानें तंटा

न मिटल्यास, त्यापासून उद्‌भवणाऱ्या अनर्थास तोंड देण्याची ताकत व हिंमत युद्धयमान दोन पक्षांना असते व तेच एकमेकांचें बलाबल पूर्णपणें जोखूं शकतात; इतरांना त्याची कल्पना येणार नाहीं. त्यांनीं जबरदस्तांच्या भांडणांत मध्यें न पडणें हेंच बरें.

( आ ) प्रधान नेमते वेळीं त्यानें कायदेमंडळाचा सभासद असलेंच पाहिजे असें नाहीं. नेमल्यापासून सहा महिन्यांच्या आंत त्यानें कोठल्या तरी मतदारसंघातर्फे निवडून मात्र आलें पाहिजे. तसें न केल्यास त्याला प्रधानपदाचा राजीनामा दिला पाहिजे. मुंबईप्रांतांत तात्पुरत्या मंत्रिमंडळांत अशा तऱ्हेनें हुसेन-अली रहिमतुल्ला यांची नेमणूक करण्यांत आली होती. दोन्हींपैकीं कोठल्याही कायदेमंडळाचे ते सभासद नव्हते. असेंब्लीच्या निवडणुकींत त्यांचा पराभव झाला होता. अशा तऱ्हेनें मतदारांनीं झिडकारून दिलेल्या सभासदास (!) मंत्री बनविणें म्हणजे लोकशाहीच्या प्राणभूत तत्त्वाची पायमल्ली करणें होय. गव्हर्नराला कौन्सिलचे सभासद म्हणून आपल्या अधिकारांत त्यांना नेमतां आलें असतें; परंतु पुढच्या द्वारानें येण्यास एखाद्याला मज्जाव झाला असतां, त्यालाच पाठीमागच्या चोरदरवाजानें आंत घेणें हें राज्यघटना-शास्त्रान्तर्गत रूढ प्रघातांना विसंगत असें आहे. तो प्रकार मुंबई प्रांतांत पुढें सर्वच परिस्थिति बदलल्यामुळें गव्हर्नराला करावा लागला नाहीं हा भाग वेगळा. नाहीं तर जें सरकार बेकायदेशीरपणें तात्पुरतीं मंत्रिमंडळें बनवितें व आपलें काम झालें म्हणजे त्यांना हाकलून लावितें त्यांना एखाद्या पराभूत माणसाला नेमणुकीच्या सत्तेच्या द्वारा पुनः जिवंत करतां येतें ही काय चीज होय !

जुना ब्रिटिश प्रघात असा होता कीं, हाउस ऑफ कॉमन्समधील ज्या सभासदांना प्रधानपदावर नेमण्यांत येई त्या प्रत्येकानें आपली सभा-सदत्वाची जागा खाली करावयाची व मतदारांचा आपल्या प्रधानाच्या नेमणुकीबद्दल पाठिंबा आहे किंवा नाहीं हें अजमावून पाहण्याकरितां फेरनिवडणुकीस पुनः उभे राहावयाचें; परंतु हा प्रघात आतां संपूर्णपणें मागें पडला आहे.

या दुसऱ्या पोटकलमांत जी सहा महिन्यांची मुदत आहे त्या

ऐवजीं कॉमनवेल्थ ऑफ ऑस्ट्रेलिया व यूनियन ऑफ साउथ आफ्रिका या दोन स्वायत्त वसाहतींत ३ महिने मुदत ठेवण्यांत आली आहे.

या पोटकलमाचा विचार करितांना दुसऱ्या एका मुद्दयाचा विचार करणें आवश्यक आहे. एखादा सभासद एका पक्षातर्फे निवडून आला व त्यानें निवडून आल्यानंतर पक्षांतर केलें व या नवीन पक्षानें अधिकारसूत्रें धारण केलीं व त्यांत या पक्षांतरित माणसाला प्रधानपद देण्यांत आलें तर मतदारांच्या अंतिम हक्काच्या दृष्टीनें व प्रधानानें त्यांना अंतिम दृष्ट्या जबाबदार राहण्याच्या दृष्टीनें आपल्या सभासदत्वाच्या जागेचा राजीनामा देणें व पुनः त्याच मतदारसंघांतून निवडून येऊन आपण नव्या परिस्थितींत मतदारांच्या विश्वासास पात्र आहोंत हें दाखवून देणें सदर प्रधानाचें कर्तव्य ठरतें. या दृष्टीनें संयुक्त प्रांतांतील प्रधान हाफिझ महमद इब्राहिम यांचें उदाहरण लक्षांत ठेवण्याजोगें आहे.

( इ ) गव्हर्नरांनीं प्रधानांचे पगार ठरविण्याचा प्रसंग हा नवीन राज्यघटनेच्या प्रारंभींच येऊन गेला; कारण त्यानंतर त्याबाबत कायदे-मंडळानें आपल्या अधिकारांत कायदे केले आहेत. पूर्वीच्या वहिवाटीनुसार दरमहा दोन हजार ते चार हजार रुपये असे पगार गव्हर्नरांनीं ठरविले; परंतु काँग्रेस प्रांतांत कराची काँग्रेसच्या ठरावाप्रमाणें दरमहा रु. ५०० प्रमाणें कायद्यानें पगार ठरविण्यांत आला, इतरत्र पूर्वींची पद्धतच थोड्या-फार फरकानें चालू आहे. नुकतीच सिंध प्रांतांत प्रधानमंडळांची पालट झाली असून नवीन प्रधानमंडळ काँग्रेसपक्षाच्या पाठिंब्यानें अस्तित्वांत आलें असल्यामुळें त्यानें काँग्रेस प्रांतांतील प्रधानांप्रमाणें दर-महा रु. ५०० च पगार घेण्याचें ठरविलें आहे. या कृत्यानें कराचीचा ठराव खुद्द कराचींत जो आजपर्यंत अमलांत आला नव्हता तो अमलांत आल्यासारखें होणार आहे. या दृष्टीनें सिंध-प्रधान-पगार-कायद्यांत दुरुस्ती सुचविणारा नवीन कायदा सिंध असेंब्लीनें केला आहे. मुंबई प्रांतांत या प्रधान-पगार-कायद्यास ( १९३७ चा ४ था कायदा ) गव्हर्नरनें २१ आक्टोबर रोजीं संमति दिली. या कलमांत जरी केवळ 'पगारा'चाच निर्देश आहे, तथापि त्यांत घरभाडें, गाडीभाडें यांचाही अंतर्भाव कर-ण्यास हरकत नाहीं. याच कायद्याच्या ७८ ( ३ ) (ग) या पोटकलमांत

“**प्रधानांचे पगार व भत्ते**” ‘चार्ज्ड’ स्वरूपाच्या खर्चांत समाविष्ट करण्यांत आले असून, त्याच्यावर दरवर्षी असेंब्लीला मत देतां येणार नाहीं. त्यांत प्रधानांच्या ‘पगारा’बरोबर त्यांच्या ‘भत्त्यां’चाही स्पष्ट उल्लेख करण्यांत आला आहे. कायद्यानेंच निश्चित पगार ठरविले असल्यामुळें एकाच प्रधानाला त्याच्या अधिकाराच्या मुदतींत एकदां एक व एकदां दुसरा असा पगार देणें बरोबर नाहीं हें ओघानेंच प्राप्त झालें.

( ई ) पांचव्या पोटकलमांत ‘प्रधानांना कामावरून काढून टाकण्या’चा जो उल्लेख आहे त्यासंबंधीं जास्त विस्तारानें विचार करावयास हवा. कारण ब्रिटिश सरकार व कॉंग्रेस यांच्यामध्यें प्रांतिक स्वराज्याच्या सुरवातीस जो वादविवाद व चर्चा झाली त्यांत ‘राजीनामा’ का ‘बडतर्फी’ या मुद्द्याला बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें. गव्हर्नर व मंत्री यांचा मतभेद झाल्यास गव्हर्नरनें सदरहू पोटकलमांत दिलेल्या अधिकारान्वयें ‘मंत्र्यांना **बडतर्फ करावें**’ किंवा ‘त्यांच्याकडून राजीनाम्याची मागणी करावी’ असें कॉंग्रेसचें म्हणणें होतें; उलटपक्षीं सरकारचें म्हणणें होतें कीं, गंभीर स्वरूपाचा मतभेद झाल्यासच प्रधानांनीं आपण होऊन राजीनामे द्यावेत; ती जबाबदारी गव्हर्नरवर टाकूं नये. कॉंग्रेसच्या म्हणण्याचा आशय असा कीं, “प्रांतिक स्वराज्य दिलें आहे असा तुमचा बहाणा ! हें मान्य करून आम्ही आमच्या तंत्राप्रमाणें राज्यकारभार चालविणार; तुम्हांस पसंत होत नसल्यास आम्हांला कामावरून काढून टाका व निर्माण होणाऱ्या परिणामास तुम्ही संपूर्णपणें जबाबदार राहा.” व्हाइसरॉयसाहेबांनीं याबाबत खुलासा केला कीं, “ज्या गोष्टींची अंतिम जबाबदारी गव्हर्नरवर म्हणजे पर्यायानें पार्लमेंटवर आहे त्या गोष्टींबाबत गव्हर्नरला तुमचें म्हणणें पटलें नाहीं, तर तसें लोकांत उघडपणें सांगा, म्हणजे तुमच्यावरील दोष जाईल. इतकेंही करून तुमच्या दर्जाला व स्वाभिमानाला लोकांत धक्का बसेल असें तुम्हांला वाटलें, तर नाइलाज म्हणून अधिकारपदाचा राजीनामा द्या. बडतर्फी, राज्यघटनातहकुबी ( ९३ कलम ) इ० उपाय हे जालीम स्वरूपाचे व नेहमीं वापरण्यांत न आणले जाणारे असे आहेत.” या खुलाशानंतर कॉंग्रेसनें आपलें म्हणणें मागें घेतल्यासारखें केलें. कॉंग्रेस अधिकारारूढ झाली त्या वेळींही

तात्पुरत्या प्रधानांनीं आपण होऊन राजीनामे दिले; मात्र मुंबई प्रांतांतील **राजीनाम्याची मागणी** ऊर्फ बडतर्फी सिमल्याहून करवावी लागली अशी बोलवा होती. बिहार संयुक्तप्रांतांतील राजबंदीमुक्ततेबाबतच्या पेचप्रसंगाचे वेळींही कॉंग्रेस मंत्रिमंडळांनीं राजीनामेच दिले. त्या वेळीं मंत्र्यांनीं राजीनामे देऊं नयेत, गव्हर्नरांनीं बडतर्फ केलें तरीही आपली जागा न सोडतां राज्य चालवावें व अशा तऱ्हेनें इंग्लंडांतल्याप्रमाणें राजा व लोक यांमधील सत्तेच्या आक्रमणाबाबतचा झगडा तीव्र स्वरूपांत चालवावा असें पंडित जबाहरलाल नेहरू यांचें वैयक्तिक मत प्रसिद्ध झालें होतें. परंतु या गोष्टी घडून येण्यास लोकांची जोरदार तयारी, नोकरवर्गाचा मंत्रिमंडळास संपूर्ण पाठिंबा, पोलिस व लष्कर यांचें मंत्रिमंडळास आनुकूल्य व शांततेनें राज्यक्रांति यशस्वी होण्याची व सत्तेचें संक्रमण होण्याची शक्यता या सर्व गोष्टींची सिद्धता असली पाहिजे.

प्रसिद्ध राज्यघटनाशास्त्रपंडित प्रो. कीथ यांनीं या राजीनामा-बडतर्फी प्रकरणीं असा अभिप्राय दिला होता कीं, 'मंत्र्यांनीं अपुरी व असमाधान-कारक घटना जाणूनबुजून जर राबवावयास घेतली असली तर नसलेल्या सत्तेबद्दल मागून कुरकूर कां करावी ? त्यांनीं फार तर गव्हर्नराविरुद्ध गव्हर्नर जनरलकडे व त्या दोघांविरुद्ध भारतमंत्र्याकडे खालचें कोर्ट वरचें कोर्ट या न्यायानें 'अपील' करावें.' परंतु राजकीय झगडे हे 'अपील' करून चालत नसतात हें प्रोफेसरमहाशय विसरले असें दिसतें. शिवाय या मतभेदांच्या बाबत ज्या गव्हर्नर जनरल व भारतमंत्री यांच्या देखरेखी-खालीं व सल्ल्यानें गव्हर्नर वागणार, त्यांच्याचकडे त्याच्याविरुद्ध 'अपील' घेऊन जावयाचें हा खासा न्याय ! म्हणजे पोलिसाकडे दुसऱ्या पोलिसाविरुद्ध तक्रार घेऊन जाण्यासारखेंच हें आहे. तिऱ्हाईत पंचायतमंडळाकडे असले तंटे नेण्यास ब्रिटिश सरकार तयार नाहीं. कारण त्यांना समान राष्ट्रांची भूमिका अद्याप मान्य नाहीं. ज्या ज्या वेळीं सरकार व कॉंग्रेस यांच्यामध्यें वादाचे मुद्दे निघाले त्या त्या वेळीं कॉंग्रेसतर्फे लवादाची मागणी नेहमींच करण्यांत आली आहे. उदाहरणार्थ, कराची कॉंग्रेसच्या ( १९३१ मार्च ) तात्पुरत्या तहाच्या ठरावांत 'निःपक्षपाती लवादाकडून ब्रिटिश सरकारच्या हिंदुस्थानांतील आर्थिक उलाढालींसंबंधीं

चौकशी करून त्यांतील कोणत्या हिश्शाची ( कर्जाची वगैरे ) जबाबदारी इंग्लंडनें घ्यावी व कोणत्या हिश्शाचा बोजा हिंदुस्थानानें उचलावा' हें ठरविण्याचें कलम होतें; अद्याप तें तसेंच पडून राहिलें आहे. तसेंच, दिल्ली-करारानंतर त्या तहांतील अटींच्या अम्मलबजावणीबाबत कॉंग्रेस व सरकार यांच्यांत कटकटी उत्पन्न झाल्या त्या मिटविण्याकरितां व तहांतील कलमांचा अर्थ ठरविण्याकरितां कॉंग्रेसनें केलेली मागणीही सरकारनें अमान्य केली. तसेंच गतवर्षी 'गव्हर्नरांना कॉंग्रेसनें अधिकार-स्वीकाराबाबत मागितलेलीं आश्वासनें कायद्याप्रमाणें देतां येतात किंवा नाहीं' आणि 'गव्हर्नरांनीं नेमलेलीं तात्पुरतीं मंत्रिमंडळें हीं कायदेशीर रीत्या नेमलेलीं आहेत अगर कसें' या दोन्ही गोष्टींच्या निवाड्याकरितां कॉंग्रेसतर्फे एक, ब्रिटिश सरकारतर्फे एक व या दोघांनीं निवडलेला तिसरा अशा तिघांच्या मंडळाकडे काम सोपविण्यांत यावें अशी गांधींनीं केलेली मागणीहि फेटाळून लावण्यांत आली.

याबाबत 'जेथें इच्छा आहे तेथें मार्ग निघतो' हीच म्हण खरी आहे आणि 'इच्छा' तरी केव्हां निर्माण होते तर ज्या वेळीं मनुष्य अगर राष्ट्र प्रतिपक्षीयाशीं 'तुल्यबल' होतें, त्या वेळेला. पाठीमागें शक्ति नसलेल्यांनीं जुने दाखले कितीही दाखविले तरी त्याचा कांहीं एक उपयोग होत नाहीं. तेव्हां कीथसाहेबांनीं सुचविलेल्या 'अपिलां'चा काय पाड ?

आतां या बडतर्फीच्या अधिकाराचा उपयोग इंग्लंडांत राजानें १७८४ नंतर कधींही केलेला नाहीं. **तेथें आतां** ( १९३६ ) मुख्य प्रधानाच्या सल्ल्यानें राजा स्वतःला राज्यपदावरून खालीं ओढतो ! पार्लमेंटांत एखाद्या प्रधानमंडळास बहुमत असलें परंतु सर्वसाधारण मतदारांत आपल्या कोणत्याही कृत्यानें लोकक्षोभ होऊन जर तें अप्रिय झालें असलें तर या बडतर्फीच्या मार्गाचा अवलंब केला तर चालतो. याबाबत ऑस्ट्रेलियांतील मजूरपक्षाचा पुढारी जॉन थॉमस लँग याचें उदाहरण देतां येईल. न्यू साउथवेल्स या संस्थानाचा तो १९२५ ते १९२७ व १९३० ते १९३२ पर्यंत मुख्य प्रधान व खजिनदार होता. त्यानें परदेशीय सरकारी कर्जावरील व्याज देण्याचें नाकारलें; त्याबरोबर गव्हर्नरनें त्याला कामावरून काढून टाकलें; त्यानंतर झालेल्या सार्वत्रिक

निवडणुकींत त्याचा पराभव झाला व गव्हर्नरानें केलेली बडतर्फी मतदारांच्या दृष्टीनें समर्थनीय ठरली. परंतु ज्या पक्षाचें कायदेमंडळांतही बहुमत आहे व पुनः सार्वत्रिक निवडणूक झाल्यास जो पक्ष पुनः बहुमतानें निवडून येईल अशा पक्षाच्या प्रधानमंडळास त्याच्या मागण्या झिडकारून बडतर्फ करणें म्हणजे युद्धास एक प्रकारचें आव्हानच होय! मग नित्याची घटना तहकूब होते व सोटेशाहीचा अम्मल सुरू होतो. या झगड्यांत विजयी होणाऱ्यास राज्यश्री माळ घालते!!

( उ ) मुंबई प्रांतांतील गव्हर्नरनें आपल्या पहिल्या प्रधानमंडळाच्या नेमणुकीचा हुकूम पुढीलप्रमाणें काढला होताः—

नोटिफिकेशन

गव्हर्नराच्या सेक्रेटरीची कचेरी,
गव्हमेंट हौस
मुंबई, १ एप्रिल १९३७.

गव्हर्नरसाहेबांनीं खालील लोकांना आपल्या प्रधानमंडळाचे सभासद नेमलें आहेः—

१ सर धनजीशहा कूपर,
२ सर सिद्दप्पा कंबळी,
३ मि० जमनादास मेथा,
४ मि० हुसेनअली रहिमतुल्ला.

गव्हर्नरसाहेबांच्या आज्ञेवरून
सी. एच्. ब्रिस्टो,
गव्हर्नरचा सेक्रेटरी.

पहिल्या प्रधानमंडळाचा राजीनामा पुढीलप्रमाणें स्वीकारण्यांत आलाः—

गणेशखिंड,
१९ जुलै १९३७

गव्हर्नरसाहेबांनीं आपल्या प्रधानमंडळांतील खालील सभासदांचे राजीनामे स्वीकारले आहेतः—

१ सर धनजीशहा कूपर,



लठ्ठे पाटील खेर ब्रॅबोर्न मुनशी देसाई गिल्डर

१९ जुलै १९३७ रोजीं कॉंग्रेसनें मंत्रिपदें घेतली त्या वेळचें छायाचित्र. **नुरी** यांची नेमणूक दुसऱ्या दिवशीं झाल्यामुळे ते वरील चित्रांत नाहींत. (पृ० ८५)

२ सर सिद्दप्पा कंबळी,
३ मि० जमनादास मेथा,
४ मि० हुसेनअली रहिमतुल्ला.

गव्हर्नरसाहेबांच्या आज्ञेवरून
सी. एच्. ब्रिस्टौ,
गव्हर्नरचा सेक्रेटरी.

दुसरें प्रधानमंडळ नेमल्याचा हुकूम पुढीलप्रमाणें आहे:—

गणेशखिंड, १९ जुलै १९३७

गव्हर्नरसाहेबांनीं खालील लोकांना आपल्या प्रधानमंडळाचे सभासद नेमलें आहे:—

१ मि० बाळ गंगाधर खेर,
२ मि० अण्णा बाबाजी लठ्ठे,
३ मि० कन्हयालाल मुनशी,
४ मि० एम्. डी. डी. गिल्डर,
५ मि० मुरारजी देसाई,
६ मि० लक्ष्मण माधव पाटील.

मुंबईच्या गव्हर्नरच्या आज्ञेवरून
सी. एच्. ब्रिस्टौ,
गव्हर्नरचा सेक्रेटरी.

मुसलमान प्रधान दुसरे दिवशीं नेमला त्याच्याबद्दलचा गव्हर्नरचा हुकूम पुढीलप्रमाणें आहे:—

गणेशखिंड, २० जुलै १९३७

गव्हर्नरसाहेबांनीं मि० महमद यासीन नुरी यांची आपल्या प्रधानमंडळावर सभासद म्हणून नेमणूक केली आहे.

मुंबईच्या गव्हर्नराच्या आज्ञेवरून
सी. एच्. ब्रिस्टौ,
गव्हर्नराचा सेक्रेटरी.

(ऊ) 'नामदार' (ऑनरेबल) हें उपपद कोणापाठीमागें लावावें याला कांहीं नियम आहेत. कौन्सिलांतील अथवा असेंब्लींतील

सभासद एकमेकांचा उल्लेख आणि निर्देश करतांना, अगर प्रेसिडेंट किंवा स्पीकर सभासदांना उद्देशून बोलतांना 'ऑनरेबल मेंबर' असें म्हणत असतात. परंतु त्याला तसें म्हणण्याच्या वहिवाटीपलीकडे सरकारी हुकमाचा काडीमात्र आधार नाहीं. शिवाय 'पदव्या बंद करण्याच्या' काँग्रेसच्या धोरणाच्या दृष्टीनें 'ऑनरेबल' ही पदवी तरी कां लावून घ्यावी हा प्रश्नच आहे. मागील सर्व हुकूम रद्द करून हिंदुस्थान सरकारनें १ सप्टेंबर १९३७ रोजीं हुकूम काढून खालील लोकांना 'ऑनरेबल' हें लावण्यास परवानगी दिली आहे:—

( १ ) गव्हर्नर जनरलच्या कार्यकारी मंडळाचे सभासद,
( २ ) कौन्सिल ऑफ स्टेटचा प्रेसिडेंट,
( ३ ) ( हिंदी ) लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा प्रेसिडेंट,
( ४ ) फीडरल कोर्टाचा सरन्यायाधीश व इतर न्यायाधीश,
( ५ ) हायकोर्टाचे सरन्यायाधीश व इतर न्यायाधीश,
( ६ ) प्रांतांतील गव्हर्नरांचे प्रधान,
( ७ ) पहिल्या वर्गाचे रेसिडेंट,
( ८ ) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांचे प्रेसिडेंट,
( ९ ) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्यांचे स्पीकर,
( १० ) औधच्या चीफ कोर्टाचा चीफ जज व इतर जज,
( ११ ) सिंध, वायव्य सरहद्दप्रांत येथील कोर्टाचे ज्युडीशियल कमिशनर,
( १२ ) कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद.

वरील यादीपैकीं ( ५ ) ( ६ ) ( ८ ) ( ९ ) ( १२ ) हीं सदरें मुंबई प्रांताला लागू आहेत. ( ४ ) ह्या सदरांत ना. जयकर येतील. या यादींत कायदे करणाऱ्या, न्याय देणाऱ्या व अम्मलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांचा कांहीं कांहीं प्रमाणांत व पोलिटिकल अधिकाऱ्यांचा समावेश केलेला दिसून येईल.

गव्हर्नरच्या खास जबाबदाऱ्या

५२—( १ ) आपलें राज्यकारभाराचें काम चालवीत असतांना गव्हर्नरावर पुढील खास जबाबदाऱ्या राहतील:—

( क ) प्रांताच्या किंवा त्याच्या कोणत्याही टापूच्या शांततेस अगर स्वस्थतेस गंभीर स्वरूपाचा धोका येऊं न देणें;

(ख) अल्पसंख्याक जातींच्या न्याय्य हितसंबंधांचें संरक्षण करणें;

(ग) सरकारी नोकरींतील जुन्या व नव्या गृहस्थांना व त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या त्यांच्या कुटुंबीयांना या कायद्यान्वयें मिळालेले अथवा रक्षण केलेले हक्क मिळवून देणें, आणि त्यांच्या न्याय्य हितसंबंधांचें संरक्षण करणें;

(घ) कायदे करण्याच्याबाबत खंड ५ भाग ३ मधील कलमांची ज्या हेतूंबद्दल योजना करण्यांत आली आहे त्या हेतूंचें उद्दिष्ट कायद्याची अम्मलबजावणी करितांना साधून देणें;

(ङ) ह्या कायद्याच्या प्रस्तुत खंडांतील कलमांप्रमाणें जाहीर झालेल्या 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांना शांतता आणि सुराज्य मिळवून देणें;

(च) एखाद्या हिंदी संस्थानाचे हक्क, आणि संस्थानिकाचे हक्क आणि प्रतिष्ठा यांचें संरक्षण करणें;

(छ) या कायद्याच्या सहाव्या खंडान्वयें गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें कायदेशीर रीत्या काढलेल्या हुकमांची किंवा सूचनांची अम्मलबजावणी करवून घेणें.

(२) प्रांतांतील उत्पन्नाचा योग्य वाटा वऱ्हाडांत आणि वऱ्हाडच्या हिताकरितां खर्च होत आहे अगर नाहीं हें पाहण्याची आणखी एक जादा जबाबदारी मध्यप्रांत आणि वऱ्हाडच्या गव्हर्नरवर राहील; 'वगळलेल्या प्रदेशां'च्या बाबतींतील आपलें कर्तव्य पार पाडण्याच्या आड दुसऱ्या एखाद्या बाबतींतील योजलेलें धोरण येणार नाहीं अथवा त्या कर्तव्याला धक्का बसणार नाहीं हें पाहण्याची जादा जबाबदारी ज्या प्रांतांतून वरील 'वगळलेले प्रदेश' आहेत त्या प्रांतांच्या गव्हर्नरांवर राहील; त्याचप्रमाणें गव्हर्नर जनरलचा मुनीम (एजंट) म्हणून गव्हर्नराला जीं कर्तव्यें पार पाडावयाचीं असतात त्यांच्याही बाबत दुसऱ्या कोणत्याही बाबतींतील योजलेलें धोरण आड येणार नाहीं अथवा त्यांना धोका येणार नाहीं हें पाहण्याची जादा जबाबदारी प्रत्येक गव्हर्नरावर राहील; आणि लॉइड धरण आणि कालव्यांची योजना याबाबत योग्य कारभार चालला आहे अगर नाहीं हें पाहण्याची जादा जबाबदारी सिंधच्या गव्हर्नरवर राहील.

(३) ज्या कोणत्याही कर्तव्यांत जर आणि जितक्या प्रमाणांत गव्हर्नराच्या जादा जबाबदारीचा संबंध येईल तेवढ्याबाबत काय धोरणानें चालावें यासंबंधीं गव्हर्नर आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें निर्णय ठरवील.

(अ) पहिली जादा जबाबदारी प्रांताच्या शांततेबाबतची आहे. वास्तविक यांत ब्रिटिश सरकार व कॉंग्रेस यांचें एकमत असावयास कांहींच हरकत नाहीं. **पॅक्स ब्रिटानिका** म्हणजे ब्रिटनची जबरदस्तीनें जित राष्ट्रावर शांतता लादण्याची हौस प्रसिद्धच आहे. कॉंग्रेसला फक्त ही

श्मशानशांतता नको आहे. तिला शस्त्रास्त्रानें ब्रिटनबरोबर लढावयाचें नाहीं; त्याचबरोबर पारतंत्र्यापुढें मानही लववावयाची नाहीं; तर शांततेनें आपल्या स्वातंत्र्यार्थ झगडा करावयाचा आहे. ह्या शांतिसंग्रामांत सनदशीर चळवळीच्या अन्तर्गत असलेल्या अधिकारस्वीकाराच्या धोरणापासून ते तहत सत्याग्रह, कायदेभंग व करबंदी, ब्रिटिश मालावर बहिष्कार इ० तारतम्यानें उग्र साधनांचा समावेश होतो. अत्याचारी चळवळीविरुद्ध उपाययोजना करितां यावी एवढ्याकरितां गव्हर्नरला जादा अधिकार दिले आहेत असें सरकारचें म्हणणें; परंतु राजकीय, जातीय अथवा वर्गीय भांडणें अत्याचाराच्या भूमिकेवर न चालवितां अनत्याचाराच्या मार्गानें चालविण्याची कॉंग्रेसची शिकवण जितक्या प्रमाणांत जनता अमलांत आणून कॉंग्रेस सरकारचे हात मजबूत करील तितक्या प्रमाणांत गव्हर्नराची ही सत्ता असून नसल्यासारखी होणार आहे. मात्र कोणत्याही अन्यायाच्या मूळ कारणांचा शोध करून त्यांचा नायनाट अधिक अधिक प्रमाणांत दिवसेंदिवस व्हावयास पाहिजे म्हणजे सार्वजनिक धोका येण्याचें कांहींही कारण नाहीं. शिवाय ( १ ) ( क ) पोटकलमांतील 'गंभीर स्वरूपाचा' या विशेषणाकडे लक्ष दिलें पाहिजे. किरकोळ स्वरूपाच्या धामधुमीबाबत गव्हर्नरनें बिलकुल ढवळाढवळ करावयाची नाहीं. गव्हर्नरांना दिलेल्या 'आज्ञापत्रां'तून इतर खास किंवा जादा जबाबदारींबाबत सविस्तर सूचना केल्या आहेत; पण या विशिष्ट जबाबदारीसंबंधीं अम्मलबजावणी करण्याच्या दृष्टीनें कोणतेंही स्पष्टीकरण किंवा खुलासा केलेला नाहीं. फक्त वरील जबाबदारी पार पाडतांना, प्रांतिक कायदेमंडळांतील एखाद्या बिलावर अथवा उपसूचनेवर अथवा कलमावर चर्चा चालू असतांना केवळ त्यामुळेंच शांततेस जबरदस्त धोका पोंचत असेल तरच त्या चर्चेला बंदी करावयाचा जादा अधिकार गव्हर्नराला दिलेला आहे, एरवीं नाहीं. या दृष्टीनें राजकीय हेतूनें ज्यांनीं अत्याचारी गुन्हे केले व ज्यांना शिक्षा झाल्या अशा राजबंदींच्या मुक्ततेचा प्रश्न महत्त्वाचा आहे. वास्तविक त्यांच्या सुटकेनंतरच्या वर्तनाची हमी जर प्रधानमंडळ घेण्यास तयार असेल व या सुटकेमुळें अत्याचाराला अनुकूल असें वातावरण वाढीला लागत नसेल तर गव्हर्नरनें या राजबंदींच्या

मुक्ततेच्या आड येण्याचें कारण नाहीं, हें संयुक्तप्रांत व बिहार येथील पेचप्रसंगांच्या अनुभवावरून कोणाच्याही लक्षांत येईल. परंतु अद्यापिही बंगालमध्यें या प्रश्नाबद्दल खळखळ चालू आहे.

बंगाल्यांतील काँग्रेसेतर प्रधानांना आतां काँग्रेसप्रांतांकडे बोट दाखवितां येणार नाहीं. यापूर्वी बंधमुक्त झालेल्या स्थानबद्धांकडून वा राजबंद्यांकडून एकही अत्याचार झालेला नाहीं; त्याबद्दलची हमी घेण्यास महात्मा गांधींसारखा शांततावादी पुढारी तयार आहे; आतां बंगाल प्रधानमंडळ काय किंवा गव्हर्नर काय यांना कोणतीही सबब राहिलेली नाहीं. यांत कोणाकडे किती अंशानें जबाबदारी विभागलेली आहे हें अद्याप गुलदस्तांत आहे. जर कदाचित् प्रस्तुत प्रधानमंडळ कोलमडून काँग्रेसप्रणीत प्रधानमंडळ अधिकारावर आलें तर गव्हर्नर आपल्या जादा अधिकाराचा कितपत उपयोग करीत आहे हें स्वच्छ निदर्शनाला येईल व पुढील लढ्याला उघड उघड तोंड लागेल. अशा परिस्थितींत, बिहार-संयुक्तप्रांताप्रमाणें ब्रिटिश सरकारला लोकमतापुढें व बंगालच्या भावी काँग्रेस प्रधानमंडळापुढें नमावें लागेल यांत शंका नाहीं. सिंध प्रांतांत काँग्रेसचें :विशेष सामर्थ्य नसतां नवीन प्रधानमंडळानें 'वायरलेस' (हंसराज) याची मुक्तता केली आहे. आसाम प्रांतांतील प्रख्यात राजबंदी नागकन्या गिडालो हिच्याही सुटकेचा प्रश्न काँग्रेसनें तेथें अधिकारग्रहण केल्याशिवाय धसाला लागणार नाहीं. इतकेंच नव्हे तर बंगाल पंजाबमध्यें १२४ अ ( राजद्रोह ) कलमाखालीं जे खटले होत आहेत तेही थांबणार नाहींत. जुने कैदी सोडण्याची तर अनिच्छाच, परंतु दिवसेंदिवस नवीन लोकांना बंदींत घालण्यांत येत आहे.

( आ ) जादा अधिकाराची दुसरी बाब म्हणजे अल्पसंख्याकांच्या न्याय्य हक्कांचें संरक्षण. गव्हर्नरला दिलेल्या 'आज्ञापत्रां'तील नवव्या कलमांत सदर अल्पसंख्याकांमध्यें कोणकोणाचा समावेश होईल तें स्पष्ट केलें आहे. ज्या वांशिक अगर धार्मिक जमातींना कायदेमंडळांत स्वतंत्र प्रतिनिधी दिले आहेत त्यांच्या व जे मागसलेपणामुळें आपापलें संरक्षण करण्यास दुर्बल आहेत त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी गव्हर्नरवर सोपवली आहे. अशा रीतीनें 'कम्युनल अवार्ड' अगर 'जातीय निर्णया'चें विष

सर्व राज्यकारभारांत फैलावण्याचें या कलमानें श्रेय मिळविलें आहे. छोट्या जमातींचा आपल्याच देशबांधवांवरील अविश्वास व परकीय राजसत्तेच्या प्रतिनिधीवर विश्वास हें दृश्य पारतंत्र्याशिवाय कोठेंही दिसणार नाहीं.

समाजसुधारणेबाबत एखादें मत जर अल्प लोकांना मान्य असलें तर त्याच्या संरक्षणाची जबाबदारी गव्हर्नरवर नाहीं ही गोष्ट वरील 'आज्ञा-पत्रां'तील कलमानें स्पष्ट केली आहे, ही मोठी खैर झाली म्हणावयाची ! नाहींपेक्षां 'हरिजनां'वर होत असलेले जुलूम धर्माच्या नांवाखालीं व सनातनींचें सरंक्षण करण्याच्या जबाबदारीच्या मिषानें चालू राहून सर्व सामाजिक सुधारणा खुंटण्याची आपत्ति यावयाची.

मद्रासचे मुसलमान मंत्री जनाब याकूब हसन यांनीं आपल्या धर्म-बांधवांना दिलेला इशारा या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. ते म्हणतात, "मुसलमान प्रांत व बिगर-मुसलमान प्रांत असा दुष्ट भेद पाडण्याचा मि. जिना यांचा प्रयत्न अत्यन्त अश्लाघ्य आहे. त्याचप्रमाणें कॉंग्रेस मंत्रि-मंडळानें मुसलमानांचें संरक्षण (हितसंबंधाचें) केलें नाहीं व त्याबाबत गव्ह-र्नरनें आपली जबाबदारी पाळली नाहीं म्हणून गव्हर्नरांवर टीका करणें हें मूर्खपणाचें आहे. कारण हिंदुस्थानांतील प्रांतांतून आतां ब्रिटिशांकडून लोकप्रतिनिधींच्या हातांत सत्ता जात चालली आहे हें त्यांच्या लक्षांत येत नाहीं. आतां गव्हर्नरकडे जाऊन उपयोग नाहीं; बहुमतवाल्या पक्षांत अल्पसंख्याक जमातींनीं शिरून तेथें आपल्या मागण्या त्यांनीं मान्य करून घ्याव्यात."

मुंबई प्रांतांत नुकतेंच लोकल बोर्ड कायद्याच्या दुरुस्तीचें बिल मंजूर झालें. एखाद्या मतदारसंघांतील मुसलमान मतदारांच्या बहुसंख्येनें आपणास स्वतंत्र मतदारसंघ नको असून सर्वसाधारण मतदारसंघांत आपणांस समाविष्ट करून घेण्याबद्दल जर स्पष्टपणें दर्शविलें तर त्यांना तशी मोकळीक देणारें एक कलम सदर बिलांत होतें. परंतु मुस्लीम लीगच्या सभासदांनीं या गोष्टीस कसून विरोध केला व कोणत्याही स्वरूपाची तडजोड त्यांनीं मान्य केली नाहीं. या कायद्यानें जर कोणती गोष्ट झाली असेल तर सर्वांचें अंतिम ध्येय जें 'संयुक्त किंवा समान मतदारसंघाची सर्व लोकनियुक्त संस्थांमधून स्थापना' त्याच्या वाढीस

व अम्मलबजावणीस थोडी तरी जागा अथवा अवकाश उत्पन्न करून द्यावा, ही होय. ज्याप्रमाणें हरिजन—मंदिर-प्रवेश-कायद्यानें ट्रस्टींना मंदिरें अस्पृश्यांना खुलीं करण्याची मोकळीक करून दिली आहे त्याचप्रमाणें संयुक्त मतदारसंघाच्या तत्त्वाच्या पुरस्कर्त्यांना आपल्या मताचा प्रचार करून मुसलमानांत या राष्ट्रीय तत्त्वाचा परिपोष करण्यास सदर कायद्यानें सवड करून दिली आहे. यांत अल्पसंख्याकांना अनर्थावह असें कांहींच नाहीं. असें असूनसुद्धां मुस्लीम लीगसारख्या आपणास राष्ट्रीय म्हणविणाऱ्या संस्थेनें गव्हर्नरकडे याबाबत शिष्टमंडळ न्यावें ही लांच्छनास्पद गोष्ट होय ! गव्हर्नरनें सदरहू विषय आहे या परिस्थितींत आपल्या खास जबाबदारीच्या क्षेत्रांत येत नाहीं असें सांगितलें, यांत मुसल्मानांनीं काय साधिलें हें त्यांचें त्यांनाच माहीत !

या पोटकलमांतील 'खास जबाबदारीं'त अल्पसंख्याकांना ठरीव प्रमाणांत सरकारी नोकऱ्या राखून ठेवण्याचा समावेश होतो. यासंबंधीं निरनिराळ्या प्रांतांतून नियम केले आहेत व परिस्थिति बदलल्यास त्या नियमांत फरक करण्याचा अधिकार गव्हर्नरकडे देण्यांत आला आहे. हिंदुस्थान सरकारनें मागेंच याबद्दल पत्रक प्रसिद्ध केलें आहे. त्याअन्वयें नोकरींत शेंकडा २५ हें प्रमाण मुसलमानांना दिलें आहे व बाकीच्या छोट्या जमातींना ८$\frac{१}{३}$ इतकें प्रमाण दिलें आहे. बाकीच्या ६६$\frac{२}{३}$ जागा हिंदूंना आहेत असें धरून चालण्यास हरकत नाहीं. याचा अर्थ प्रत्येक ३ जागांपैकीं २ जागा हिंदूंना व प्रत्येक ४ जागांपैकीं १ जागा मुसल्मानांना, किंवा निराळ्या तऱ्हेनें बोलावयाचें झाल्यास १२ जागांपैकीं ८ हिंदूंना, ३ मुसलमानांना व १ या दोघांखेरीज इतरांना. या नोकरीच्या प्रमाणाबाबत मद्रासचें उदाहरण लक्षांत घेण्यासारखें आहे. मुनसफांच्या जागा भरण्याचें काम आजपर्यंत हायकोर्ट करीत असे; परंतु आतां तें पब्लिक सर्व्हिस कमिशनकडे गेलें आहे. आतांपर्यंत या नोकऱ्यांबाबत नसलेलें जातीय तत्त्व कमिशननें लागू केलें आहे. त्याअन्वयें मुनसफांपैकीं प्रत्येक सातवी जागा ब्राह्मण जातीच्या इसमाला मिळावयाची आहे.

बंगाल सरकारनें नुकतेंच सदरहू नोकऱ्यांचें प्रमाण आपल्या नव्या परिस्थितीला अनुरूप ठरविलें असून त्याचा अम्मल न्यायखातें, सहकारी पत-

पेढ्या इत्यादि सर्व खात्यांतून चालू करण्यांत आला आहे. ४५ मुसलमानांना १० हरिजनांना व बाकीच्या ४५ सवर्ण हिंदु, ख्रिस्ती, अँग्लो-इंडियन इत्यादि सर्वांना असें प्रमाण ठरविण्यांत आलें आहे. लोकल बोर्डें व म्युनिसिपालिट्या यांमधूनही आपणास नोकऱ्या ठरीव प्रमाणांत हव्यात या मुसलमानांच्या मागणीला मुंबई गव्हर्नरनें असें उत्तर दिलें कीं, याबाबत या संस्थांवर सरकारचा ताबा नसल्यामुळें सरकारला त्यांची मागणी कबूल करतां येत नाहीं.

( इ ) आतां तिसरी बाब नोकरांचे हितसंबंध रक्षिणें. याबाबत ब्रिटिश नोकरशाहीचा पुष्कळ संबंध येत असल्यामुळें खुद्द कायद्यानेंच खंड १० त ( कलमें २३२ ते २७७ ) त्यांचें भरमसाट रक्षण केलें आहे. यांतूनही एखादी बाब चुकून वगळली गेली असें दिसून आल्यास त्याबाबतही तरतूद या खास जबाबदारीनें करून ठेविली आहे. त्या अन्वयें नोकरांना कसलीही बाब अन्यायाची व बरोबर नसलेली अशी आढळून आली कीं, तेथें गव्हर्नरनें धावून गेलें पाहिजे, अशी व्यवस्था करण्यांत आली आहे. याचा परिणाम काय झाला पहा. कॉंग्रेस-मंत्र्यांनीं आपणांस पांचशें रुपये पगार घेतला; पण त्यांच्या हाताखालील सनदी नोकरांना तीन तीन हजार रुपये पगार. या पगाराबाबत कायदेमंडळांकडे सत्ता नाहीं. प्रधानांचा कित्ता गिरवला जाईल अशी अद्याप आशा उत्पन्न झालेली नाहीं. एतावता, राज्यकारभाराचा खर्च नोकरांच्या पगारांत कपात करून कमी करण्याचा प्रश्न तूर्त विचारांत घेतां येत नाहीं अशी परिस्थिति आहे. येऊन जाऊन नवीन नेमले जाणारे नोकर कमी पगारावर नेमण्यास सुरुवात करितां येईल. केवळ हिंदी नोकरांच्या पगारांत कपात करण्यानें ढळढळीत पक्षपात केल्यासारखें होईल व आपल्याच लोकांना गव्हर्नरकडे कॉंग्रेस-मंत्र्यांपासून रक्षण मागावयास जाण्यास भाग पाडल्यासारखें होईल. शिवाय कमी पगार असलेल्या लोकांच्या पगारांत वाढ करणें हेंही काम 'आ' पसरून बसलें आहे. दोघांच्या पगारांतील अंतर कापावयाचें झाल्यास खालच्यांना वर नेलें पाहिजे व वरच्यांना खालीं आणून बसविलें पाहिजे. या प्रश्नाबरोबर नोकरी व्यतिरिक्त खाजगी, बरकत असलेल्या धंद्यांतील ( वैद्य, वकील, कंत्राटदार, व्यापारी, कारखानदार इ० ) वैयक्तिक

उत्पन्नालाही आळा घालण्याची योजना झाल्याशिवाय हा पगारकपातीचा प्रश्न चांगल्या व कायम रीतीनें सुटावयाचा नाहीं. तोंपर्यंत भत्ते इत्यादीबाबत किरकोळ काटकसरीवरच भागवून घेतलें पाहिजे. परिस्थिति पाहून मागें इंग्लंडच्या राजानें आपण होऊन स्वखुषीनें जशी आपल्या वर्षासनांत कपात करून घेतली त्याप्रमाणें गव्हर्नर जनरलापासून तों खालपर्यंत सर्व बड्या पगारदारांनीं वर्तन करावयास हवें. लोकशक्ति व लोकमत प्रभावी झाल्याशिवाय या गोष्टी आपोआप होतील अशी आशा बाळगणें व्यर्थ आहे. तथापि त्या दिशेनें प्रयत्न चालू पाहिजेत. परंतु आपल्यांतलेच नामदार शास्त्र्यांसारखे शहाणेसुरते लोक काँग्रेस-मंत्र्यांना नोकरांचे पगार कमी करूं नका नाहीं तर भयंकर धोका निर्माण होईल असा इशारा देतांना पाहिले म्हणजे त्यांची कींव करावीशी वाटते.

नुकतेच प्रांतिक व कनिष्ठ दर्जाच्या नोकरांबाबतचे २४१ ( ३ ) अन्वयें भारतमंत्र्याला असलेले अधिकार प्रांतिक गव्हर्नरांना त्यांनें दिले आहेत. त्याबाबत गव्हर्नरांनीं मंत्र्यांचा सल्ला घेऊन मग आपल्या 'वैयक्तिक मता'प्रमाणें वागावयाचें आहे. यामुळें थोडीफार काटकसर करण्यास मंत्र्यांना सवड मिळेल असें वाटतें.

या सरकारी नोकरांच्या न्याय्य हितसंबंधांचें संरक्षण करण्याबाबत मध्यप्रांत वऱ्हाडांत प्रधानमंडळ आणि गव्हर्नराधिष्ठित नोकरशाही यांच्यामध्यें खटका उडण्याचा प्रसंग निर्माण झाला होता. त्याची हकीकत अशी:—१९३७ च्या सार्वत्रिक निवडणुकींत मध्यप्रांतांतील बिलासपूर ग्रामीण मतदार संघातर्फे त्या वेळचे मध्यप्रांत सरकाराचे गृहमंत्री डॉ. राघवेंद्र राव हे, काँग्रेस उमेदवार श्री. अग्निहोत्री यांचा पराभव करून निवडून आल्याचें जाहीर झालें. या निकालाबाबत मतमोजणींत, निवडणुकीच्या व्यवस्थेंत कांहीं तरी गोंधळ झाला असला पाहिजे व सरकारी अधिकाऱ्यांनीं यांत ढवळाढवळ केली असली पाहिजे अशी काँग्रेसतर्फे तक्रार उत्पन्न करण्यांत आली. परंतु मध्यंतरीं डॉ. रावांचेंच तात्पुरतें मंत्रिमंडळ असल्यामुळें ही तक्रार तशीच राहून गेली. पुढें काँग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ झाल्यानंतर मध्यप्रांत वऱ्हाड असेंब्लींत याबाबत तहकुबीची सूचना आणण्यांत आली. त्याला उत्तर देतांना मुख्य

प्रधान डॉ. खरे यांनीं या प्रकरणाची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमण्याचें आश्वासन दिलें. नुकत्याच मंजूर झालेल्या 'मध्यप्रांत वऱ्हाड चौकशी कमिटी (पुरावा) कायद्या'च्या आधारें जस्टिस व्हिव्हियन बोस, एम्. एन्. क्लार्क, आय्. सी. एस्. व जी. एस्. ब्रह्मराक्षस, अॅडव्होकेट या तिघांची एक चौकशी-कमिटी मध्यप्रांत वऱ्हाड सरकारनें नेमली. या कमिटीनें पुढील मुद्द्यांची चौकशी करावयाची आहे:— (१) मतें मोजण्यापूर्वीं मतदानपेट्यांत कांहीं उघडाउघडी व घालमेल झाली होती काय? (२) एका उमेदवाराच्या वतीनें सरकारी नोकरांनीं मतदारांना मतयाचना करून गळ घातली काय? (३) कांहीं ऑनररी मॅजिस्ट्रेटांनीं एका उमेदवारास पाठिंबा देण्याचें नाकारल्यावरून त्यांची मॅजिस्ट्रेटी काढून घेतली काय? व एकाला, त्यानें पाठिंबा दिला म्हणून, ऑनररी मॅजिस्ट्रेट नेमला काय? (४) मतदानकेंद्राचे ठिकाणीं अधिकारी नेमले त्यांत कांहीं दोष होते काय?

कमिटीच्या कामास सुरुवात होण्यापूर्वीं कमिटींत, 'क्लार्क' या सभासदाऐवजीं 'कुंजविहारीलाल शेठ' यांची नेमणूक करण्यांत आली. कमिटीपुढें ज्या सरकारी नोकरांची चौकशी व्हावयाची त्यांचा ज्या वकिलावर विश्वास होता व ज्याची बिलासपूरच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें नेमणूक केली होती त्या वकिलाला काम चालविण्यास परवानगी देण्याचें मंत्रिमंडळानें नाकारलें. या कृत्याविरुद्ध 'इंडियन पोलीस अॅसोसिएशन'च्या मध्यप्रांत शाखेनें गव्हर्नरकडे तक्रार केली असून 'नोकरवर्गाच्या न्याय्य हक्कसंरक्षणाबाबत' ५२ कलमानें गव्हर्नरवर सोपविलेली जबाबदारी पार पाडण्याची त्याला विनंति केली आहे. चौकशी कमिटीनें बहुमतानें सरकारच्या या कृत्याचा निषेध केला असून 'ज्यांच्या वर्तनाबद्दल चौकशी करावयाची त्यांच्या पसंतीचा व विश्वासाचा वकील त्यांचा बचाव करण्यास सरकारनें दिला पाहिजे' असें आपलें मत सरकारकडे पाठवून दिलें आहे. सरकारनें या तक्रारीचा न्याय्यपणा लक्षांत घेऊन आपला हुकूम परत घेतला असून रायपूरच्या भादुरी आणि नलगुंदवार या दोन वकिलांची नेमणूक केली आहे. याही वकिलांवर विश्वास नसल्याबद्दल बारा सरकारी नोकरांनीं कमिटीकडे अर्ज केला आहे. तसेंच, चौकशी कमिटी-

चे एक बिनसरकारी सभासद श्री. ब्रह्मराक्षस यांनीं आपल्या भिन्न मतांत केलेल्या सरकारी नोकरांबाबतच्या टीकेनें खवळून जाऊन श्री. पागे, एम्. एल्. ए. यांनीं 'सदर कमिटींतून श्री. ब्रह्मराक्षस यांना आपल्या जादा अधिकारांत गव्हर्नरनें काढून टाकावें' असा गव्हर्नरकडे अर्ज केला आहे. श्री. पागे यांना सरकारी नोकरांचा इतका पान्हा कां फुटला हें समजणें कठिण आहे.

( ई ) या पोटकलमान्वयें ब्रिटिश व्यापारी व कारखानदार वगैरें-ना संरक्षण दिलें आहे. याबाबत 'आज्ञापत्र कलम ११' मधील खुलासा अतिशय व्यापक व सर्वंकष असा आहे:—"मंत्र्यांचा सल्ला कायद्यांतील कोणत्याही कलमाला विसंगत व विरोधी नसला तरी त्यामुळें ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या हिताला बाध येत असेल तर गव्हर्नरनें आपल्या जादा अधिकाराचा उपयोग करावयाचा आहे" असा त्याचा तात्पर्यार्थ आहे. याविषयीं ६।११।१९३३ रोजीं जॉइंट पार्लेमेंटरी कमिटीपुढें भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनीं दिलेल्या साक्षींतील पुढील प्रश्नोत्तरात्मक उतारा मनोरंजक व मननीय आहे:—

**मार्किस ऑफ झेटलंड** ( सध्यांचे भारतमंत्री ):—समजा, प्रांतिक सरकारनें पब्लिक वर्क्स खात्याकरितां ( रस्ता करणें, इमारत बांधणें इ० ) टेंडरें मागविलीं; समजा, त्या टेंडरांपैकीं एखादें ब्रिटिश टेंडर गुणानें श्रेष्ठ ठरलें; असें असून सुद्धां प्रांतिक सरकारनें तें न स्वीकारतां शुद्ध स्वदेशी हिंदी टेंडर स्वीकारलें, तर माझ्या मतें या प्रसंगीं भेदभाव दाखविला असें होईल. अशा स्थितींत सर्व टेंडरें आपणांकडे तपासणीसाठीं मागवून ब्रिटिश टेंडर प्रांतिक सरकारास स्वीकारावयास भाग पाडणें हें या कलमान्वयें गव्हर्नरास करितां येईल काय ?

**सर सॅम्युएल होअर:**— अलबत करितां येईल; मात्र सदरहू बाब महत्त्वाची व गंभीर स्वरूपाची असली पाहिजे.

**सर ऑस्टिन चेंबर्लेन:**— समजा, गव्हर्नरला असें आढळून आलें कीं, हिंदी फर्मचें टेंडर किंमतीकडे न पाहतां स्वीकारलें गेलें तर तो भेद-भाव झाला व म्हणून गव्हर्नरनें त्यांत हात घातला पाहिजे असें आपणांस वाटत नाहीं काय ?

**सर सॅम्युएल होअरः**— अलबत ढवळाढवळ केली पाहिजे असें माझें मत आहे. अशा बाबतींत गव्हर्नर प्रथम चौकशी करण्याची मागणी करील; आणि भेदभाव व पक्षपात झाला असल्याबद्दल आपली खात्री करून घेईल आणि नंतरच म्हणजे अशी खात्री झाल्यावर तो मध्यें पडून हा भेदभाव थांबवील.

**सर ऑस्टिन चेंबर्लेनः**— आतां पुढील उदाहरण घेऊं. सरकारनें जाहीर रीत्या टेंडरांची मागणी केलेली नाहीं; आणि हिंदी व ब्रिटिश अशा दोन्ही कंपन्या टेंडरें भरण्यास समर्थ असतांना फक्त हिंदी कंपन्यांकडूनच टेंडरें मागविलीं असा आरोप सरकारवर केला गेला तर अशा वेळीं गव्हर्नर मध्यें पडेल काय ?

**सर सॅम्युएल होअरः**— गव्हर्नर खात्रीनें चौकशी करील व भेद-भाव झाला आहे अगर नाहीं याबद्दल स्वतःची खात्री करून घेईल.

**सर ऑस्टिन चेंबर्लेनः**— चौकशीअंतीं त्याला भेदभाव झाला असें आढळून आलें तर जुनें दिलेलें कंत्राट रद्द करण्याची गव्हर्नरला सत्ता आहे काय ?

**सर सॅम्युएल होअरः**— गव्हर्नरची सत्ता अमर्यादित व अव्याख्यात अशी आहे.

**सर ऑस्टिन चेंबर्लेनः**— चौकशी संपेपर्यंत त्याला कंत्राट देण्याचें बंद पाडतां येईल काय ?

**सर सॅम्युएल होअरः**—बंद पाडतां येईल.

( झहूर अहंमदकृत 'हिंदुस्थानांतील ब्रिटिश राजवटीचें आर्थिक स्वरूप' पृ० ६३–६४ ).

( उ ) 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांतून शांतता व सुव्यवस्था राखणें ही जादा जबाबदारी गव्हर्नरवर सोपविली आहे. याबाबत 'आज्ञापत्रां'-तील १५ व्या कलमान्वयें, जरूर वाटल्यास एखादा अमलदार नेमण्याचा अधिकार गव्हर्नरास दिला आहे. त्यानें सदर प्रदेशांतील जनतेच्या गरजा आणि त्यांच्या कल्याणाचे उपाय यांसंबंधीं गव्हर्नराला सल्ला द्यावयाचा आहे. याच खंडांतील ९१।९२ कलमांत या प्रश्नाचा सविस्तर ऊहापोह व्हावयाचा असल्यामुळें या प्रदेशांच्या राज्यकारभाराबद्दल या स्थळीं

जास्त लिहीत नाहीं. वरील 'आज्ञापत्रां'तील सूचनेचा आधार घेऊन मुंबई गव्हर्नरनें मुंबई प्रांतांतील 'अंशतः वगळलेल्या' टापूंतील भिल्ल वगैरे रानटी जातींच्या स्थितीसंबंधीं चौकशी करून अहवाल करण्याकरितां सिमिंग्टन या आय्. सी. एस्. मधील अधिकाऱ्याची स्पेशल ऑफिसर म्हणून १।११।३७ पासून चार महिनेपावेतों नेमणूक केली होती. दारूबंदीच्या बाबत भिल्लांसंबंधीं मुंबई सरकारला थोडें निराळें धोरण ठेवावें लागत आहे याचें कारण या प्रश्नाला गव्हर्नरच्या 'खास जबाबदारीं'त घातलें गेलें आहे हें अंशतः असण्याचा संभव आहे; आणि याखेरीज दारूच्या व्यसनाबाबत भिल्ल वगैरे जातींची पिढ्यानूपिढ्या चालत आलेली वृत्ति, हीही वरील गोष्टीला कारणीभूत झालेली आहे.

( ऊ ) संस्थानिकांचे संबंध आतां प्रांतांतील गव्हर्नरांकडून काढून 'राजेसाहेबांच्या प्रतिनिधी'कडे सोपविले असल्यामुळें संस्थानिकांचा मानमरातब राखणें किंवा त्यांच्या किरकोळ हक्कांचें संरक्षण करणें याखेरीज दुसरीं कामें गव्हर्नरकडे नाहींत. प्रांतिक प्रधानांच्या कृत्यानें आसपासच्या संस्थानी मुलखाच्या आर्थिक हितसंबंधास धक्का पोंचूं नये अशी दखलगिरी गव्हर्नरनें घ्यावयाची आहे. वर नमूद केलेल्या हक्कांपैकीं एखादा हक्क वास्तविकपणें मुळांत आहे किंवा नाहीं याबद्दल शंका उत्पन्न झाल्यास त्याबाबत गव्हर्नरनें गव्हर्नर जनरलला विचारलें पाहिजे. तसेंच ८४ ( १ ) ( ग ) कलमान्वयें एखाद्या हिंदी संस्थानिकाच्या संबंधींच्या कोणत्याही गोष्टीबद्दल कायदेमंडळांत प्रश्न विचारणें अगर चर्चा करणें या गोष्टीला गव्हर्नरला बंदी करितां येते.

गतवर्षी मद्रास गव्हर्नरनें मद्रास कायदेमंडळांत 'हरिजन मंदिरप्रवेश' जाहिरनाम्याबद्दल त्रावणकोरच्या महाराजांचें अभिनंदन करणाऱ्या ठरावास परवानगी दिली होती; हेंच जर 'कुडालमणिक्कम्' देवळाच्या व्यवस्थेबाबत कोचीनच्या महाराजांनीं जें वर्तन केलें त्याबाबत निषेधाचा ठराव आला असता तर त्यास खचित बंदी झाली असती. दुसऱ्या शेडचूलमध्यें केलेल्या तरतुदीअन्वयें प्रस्तुत ५२ ( १ ) ( च ) कलमांत हिंदी संस्थानांच्या संमतीशिवाय पार्लमेंटाला बदल करितां येणार नाहीं; कारण त्यामुळें संस्थानिकांनीं दिलेल्या सामिलनाम्याला धक्का बसेल.

( ए ) या कायद्यांतील सहाव्या खंडांत प्रांत, संस्थानें व फेडरेशन यांमधील राज्यव्यवस्थेबाबत संबंध कसे असावेत याबद्दल विवेचन केलें आहे ( कलमें १२२ ते १३५ ); याबाबत घडलेलें ताजें उदाहरण म्हणजे संयुक्त प्रांत व बिहार येथील राजबंदींच्या मुक्ततेबाबतचें देतां येईल. प्रांताच्या शांततेस धोका येईल या सबबीवर क० ५२ ( १ ) (क) प्रमाणें त्या त्या प्रांतांच्या गव्हर्नरांना मंत्रिमंडळाचें मागणें झिडकारून लावतां आलें असतें; परंतु या मुक्ततेमुळें 'गंभीर' स्वरूपाचा धोका कसा उत्पन्न झाला असता हें त्यांना प्रधानांच्या गळीं युक्तिवादानें उतरवितां न आल्यामुळें पंचाईत पडली. शेवटीं गव्हर्नर जनरलनें १२६ ( ५ ) या कलमान्वयें प्रांतिक प्रधानमंडळांच्या कार्यांत ढवळाढवळ करून शेजारच्या प्रांतांच्या शांततेस धोका येईल या जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या रिपोर्टांतील ( परिच्छेद २२२ ) उल्लेखिलेल्या सबबीला पुढें करून राजबंदींना न सोडण्याबद्दल हुकूम दिले व गव्हर्नरांनीं वरील कलमांतील आपल्या 'जबाबदारी'च्या अधिकारांत त्याप्रमाणें प्रधानांना मनाई केली. पुढें प्रधानांच्या राजीनामा-प्रकरणानें गव्हर्नर जनरलला तंटा सलोख्यानें मिटविण्याकरितां पुन: गव्हर्नरांना उलटे हुकूम द्यावे लागले असले पाहिजेत; पण ते सुद्धां वरील कलमांतील निर्देशाप्रमाणें गव्हर्नरांना अमलांत आणावे लागले. मागील ( च ) पोटकलमाप्रमाणेंच ह्याही पोटकलमांत हिंदी संस्थानांच्या संमतीशिवाय पार्लमेंटला बदल करितां येणार नाहीं; कारण त्यामुळें संस्थानिकांनीं लिहून दिलेल्या सामिलनाम्याला धक्का बसण्याचा संभव आहे. कारण या कलमांत उल्लेखिलेल्या सहाव्या खंडांत फेडरेशन व त्यांचे घटक यांच्या परस्पर संबंधाचा भाग आहे; अर्थात् त्यांत हिंदी संस्थानांचा बहुतच संबंध आहे हें उघड आहे.

( ऐ ) दुसऱ्या पोटकलमांत वऱ्हाडाबाबत उत्पन्नाच्या योग्य हिश्शासंबंधीं जें कलम आलें आहे त्याला धरून गव्हर्नरच्या 'आज्ञापत्रां'त मध्यप्रांत वऱ्हाडपुरतें एक जादा कलम ( १२ अ ) घातलें आहे. त्यांत दोन गोष्टी प्रामुख्यानें सुचविल्या आहेत. ( १ ) निजाम व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें झालेल्या कराराप्रमाणें वऱ्हाडच्या राज्यव्यवस्थेसंबंधी-

च्या जबाबदारींत हैदराबाद संस्थानच्या व्यापारी व आर्थिक हितसंबंधाकडे लक्ष पुरविणें या गोष्टीचा समावेश केला आहे. ( २ ) " वऱ्हाडच्या उत्पन्नांतील योग्य हिस्सा " ( हे शब्द जॉ. पा. क. च्या रिपोर्टांत ८३ व्या परिच्छेदांतील आहेत ) वऱ्हाडकरितांच खर्च झाला पाहिजे याकरितां सध्यां जी व्यवस्था ठरविण्यांत आली आहे ती जर कांहीं कारणानें असमाधानकारक वाटली तर तींत फेरबदल करण्याकरितां अनुभवी व निःपक्षपाती गृहस्थांच्या एखाद्या कमिटीचा सल्ला घेण्याची गव्हर्नरला सूचना दिली आहे. मंत्रिमंडळांत वऱ्हाडच्या दोन मंत्र्यांचा समावेश या वऱ्हाडच्या स्वतंत्र हितसंबंधाच्या दृष्टीनें केलेला आहे असें मानलें तर त्यांत चूक नाहीं. सध्यांचा तेथील अर्थमंत्री हा बिनवऱ्हाडी आहे. तो पुढें मागें वऱ्हाडी झाल्यास या तक्रारीला वऱ्हाडी कॉंग्रेस सभासदांच्या गटांत जी वेळोवेळीं वाचा फुटते तिला जागा राहणार नाहीं; वास्तविक मंत्रिमंडळाची संयुक्त जबाबदारी असल्यामुळें या तक्रारीला जागा असूं नये. वऱ्हाडी मंत्र्याला आपलें मागणें मंत्रिमंडळाकडून मान्य करून घेणें कठिण नाहीं. त्यांतही मतभेद झाल्यास कॉंग्रेसकडे शेवटची व निर्णयात्मक दाद मागतां येईल; परंतु गव्हर्नरकडे याकरितां आपले मतभेद घेऊन जाऊन त्याला ढवळाढवळ करण्यास सवड करून देणें सर्व दृष्टींनीं आत्मघातकीपणाचें आहे. राजूरकरासारख्या विरोधी पक्षाच्या पुढाऱ्यानें गव्हर्नरकडे प्रकरण नेण्याचा सल्ला द्यावा हें त्याच्या राजकीय बुद्धीच्या दास्याचें द्योतक आहे. कॉंग्रेसपक्षीय कोल्ह्यांनीं हा प्रश्न समाधानकारक न सुटल्यास वऱ्हाडला मध्यप्रांतापासून वेगळें व्हावें लागेल असा इशारा दिला, इतकें या प्रश्नाचें तीव्र स्वरूप वऱ्हाडांत आहे. हा प्रश्न कॉंग्रेस वर्किंग कमिटीकडे गेला असून तिनें वल्लभभाई पटेल, जयरामदास दौलतराम व भुलाभाई देसाई या तिघांची एक पोटकमिटी नेमिली आहे. या कमिटीनें वऱ्हाडचे प्रतिनिधी म्हणून श्री. माधवराव अणे व रामराव देशमुख आणि मध्यप्रांताचे प्रतिनिधी म्हणून पं. रविशंकर शुक्ल आणि द्वारकाप्रसाद मिश्र यांच्याशीं चर्चा केली. यांतून असा निष्कर्ष निघाला कीं, वर्किंग कमिटीच्याच कोणी तरी सभासदानें मध्यप्रांतांत जाऊन या प्रश्नाची पूर्ण चौकशी करावी, व उत्पन्नाच्या

वाटणीच्या हिशाबाबत योग्य ती व्यवस्था करावी. या कामावर वर्किंग कमिटीनें वल्लभभाई पटेल यांना नेमलें आहे.

सिंधच्या गव्हर्नरावर सक्करधरणाच्या व्यवस्थेबाबत जादा जबाबदारी सोपविली आहे. या धरणावर कोट्यावधि रुपये खर्च झाले आहेत व तें द्रव्य मध्यवर्ती सरकारकडून कर्जद्वारा आलेलें आहे. हें कर्ज माफ करावें, निदान पुष्कळ कमी करावें अशी खटपट चालू आहे. या धरणापासून निघालेल्या कालव्यांवर सिंध प्रांताची आर्थिक भवितव्यता इतकेंच नव्हे तर त्याचें स्वतंत्र प्रांत म्हणून अस्तित्वही अवलंबून आहे. लॉइड कॅनॉल योजना प्रचंड म्हणून बाजूला ठेविली तरी एकंदरींत इरिगेशन ( कालवे ) खात्यांतील नोकरांच्या नेमणुकीबाबत कायद्यांतील २४५ कलमान्वयें भारतमंत्र्याला विशेष अधिकार दिले आहेत, त्याला धरून प्रत्येक गव्हर्नरानें इरिगेशनसंबंधीं माहिती आपल्याजवळ नेहमीं तयार ठेविली पाहिजे व ती जरूर पडल्यास ( आज्ञापत्र, कलम १४ ) त्यानें गव्हर्नर जनरलला कळविली पाहिजे. नद्यांच्या धरणाचा व कालव्याचा हा प्रश्न आंतरप्रांतीय असल्यामुळें तो कायद्याच्या १३० ते १३४ या पांच कलमांप्रमाणें गव्हर्नर जनरलकडे बऱ्याच अंशानें— विशेषतः परस्परांत उद्भवणारे तंटे मिटविण्याच्या दृष्टीनें— सोपविलेला दिसून येतो.

आतां या पोटकलमांतील 'वगळलेल्या' प्रदेशांची व्यवस्था व गव्हर्नर जनरलचा मुनीम ( एजंट ) म्हणून गव्हर्नरवर सोपविलेलीं कामें यांचा विचार करावयाचा. त्यापैकीं पहिला भाग पुढें स्वतंत्र रीत्या यावयाचा आहे. दुसऱ्या भागासंबंधीं 'आज्ञापत्रा'न्वयें वायव्य सरहद्द प्रांताच्या गव्हर्नरवर एजंट म्हणून कायमची जबाबदारी सोपविली आहे ( आज्ञापत्र क. १५ अ); याचें कारण सरहद्द प्रांत व हिंदुस्थान सरकारनें लष्करी सामर्थ्यावर वेळोवेळीं पुढें पुढें सरकिवलेली हिंदुस्थानची अंतिम सीमा यां-मधील प्रदेशांत राहणाऱ्या वझिरी, आफ्रिडी, मोहमंडी इत्यादि टोळ्या यांच्याबाबत हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलचें धोरण अमलांत आणण्याचें काम सरहद्द गव्हर्नरनें करावयाचें आहे. तेव्हां याकरितां प्रांतिक कारभारांत ढवळाढवळ करण्यास मागेंपुढें न पाहण्याचा अधिकार गव्हर्नरला दिला आहे. या टोळ्यांसंबंधींच्या कारभारांत गव्हर्नरला मदत करण्याकरितां एक

रेसिडेंट नेमण्यांत आला असून त्याच्या कचेरीचा खर्च वार्षिक तीन हजार रुपये असून शिवाय रेसिडेंटचा खर्च जवळ जवळ तितकाच दर महिना असणार.

(ओ) या सबंध कायद्यांत 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' गव्हर्नरानें करावयाच्या किती तरी गोष्टी आहेत हें मागेंच सविस्तर दिग्दर्शित केलें आहे. परंतु त्या सर्वांत या ५२ व्या कलमानें गव्हर्नरवर सोपविलेली जबाबदारी पाहिली म्हणजे असें वाटूं लागतें कीं, हिंदी जबाबदार प्रधानांच्या मानेभोंवतीं हा कायमचा दोर लावून ठेवला आहे. ब्रिटिशांच्या हिताविरुद्ध जरा इकडे तिकडे एखादी गोष्ट करण्याचें प्रधानांनीं मनांत आणलें कीं दोर आवळलाच म्हणून समजावें. या कलमांतील अधिकारक्षेत्राची जागा अशी आहे कीं, तिच्यावर प्रधानांनीं व गव्हर्नरांनीं आपापला हक्क सांगावा. ज्याप्रमाणें फेडरेशन व प्रान्त या दोघांमध्यें कायदे करण्याच्या अधिकाराच्या कांहीं बाबी समान आहेत त्याप्रमाणेंच वरील 'जादा जबाबदारी'ची गोष्ट आहे. हौशी, उमद्या, आशापूर्ण नजरेनें पाहिलें म्हणजे सर्व अधिकार मंत्र्यांचा व गव्हर्नर नामधारी असें खऱ्या प्रांतिक स्वराज्याचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें. अशा कल्पनातरंगांत पोहत असतांना एकदम गव्हर्नरांच्या सोटेशाहीचा बडगा पाठींत केव्हां बसेल याचा नेम नाहीं असा विचार उद्भवतांक्षणीं आपल्या पारतंत्र्याचें व दास्याचें खेदजनक चित्र दृष्टीपुढून हालत नाहीं. निदान एवढें तरी खास म्हणतां येईल कीं, या जादा अधिकारांची 'टांगती तलवार' नेहमीं डोक्यावर लटकत राहिल्यामुळें स्वतंत्र योजना तयार करण्याचें व त्या अमलांत आणण्याचें मानसिक स्वास्थ्य मंत्र्यांना लाभणें कठीण आहे. अशा चमत्कारिक परिस्थितींतूनच तडजोडीची भावना व वृत्ति निर्माण होते व अशी साहजिक प्रवृत्ति होते कीं, मतभेदाच्या गोष्टी बाजूला ठेवून द्या व जुळत्या गोष्टी तेवढ्या वेळ आहे तोंपर्यंत करून घ्या. याचा अर्थ असा कीं, वेळीं अवेळीं ब्रिटिश मुत्सद्दी जी हिंदुस्थान व ब्रिटन यांच्यामधील **भागीदारीची** (या भागीदारीवरून 'आमचा कोंडा व तुमचे पोहे हे मिसळून आमच्या अंगणांत पाखडून आपणतुपण मिळून खाऊं' या म्हणीची आठवण होते) कल्पना पुढें मांडतात तिच्या अन्वयें इंग्रजांनीं

हिंदी लोकांना बरोबर घेऊन हिंदुस्थानचा कारभार समाईक भागीदारीच्या तत्त्वावर चालवावयाचा; मात्र हिंदी लोकांचा ब्रिटन किंवा ब्रिटिश साम्राज्य यांच्या कारभारांत बिलकुल हात नसावयाचा. उघडच आहे कीं, जेथें स्वतःच्या घरांत संपूर्ण मालकी नाहीं तेथें इतर ठिकाणीं कोण विचारतो ? या वाईट परिस्थितींतून बाहेर पडण्याचा मार्ग एकच कीं, गव्हर्नराच्या रागालोभाचा विचार न करितां देशाच्या हिताच्या व मतदारांना निवडणूक-जाहिरनाम्यांत दिलेल्या वचनांच्या दृष्टीनें मंत्र्यांना जें करावयाचें आहे तें करावयास ताबडतोब प्रारंभ करणें व त्यांत गव्हर्नर आड आल्यास राजीनाम्याचा धाक घालणें; एवढ्यावर प्रकरण नच भागलें तर दिलेली धमकी अमलांत आणणें व पुढें ओढवणाऱ्या परिणामांची जबाबदारी गव्हर्नरवर टाकणें. मंत्र्यांचा भरंवसा कायदेमंडळांतील बहुमतावर व पर्यायानें बहुसंख्य मतदारांवर व सरतेशेवटीं अखिल जनतेवर ! तिचा विश्वास हेंच मंत्र्यांचें सामर्थ्य ! !

'आज्ञापत्रा'बाबत तरतूद

५३— ( १ ) प्रांताच्या गव्हर्नराला अमुक अमुक 'आज्ञा' ( यांत पूर्वी दिलेल्या 'आज्ञां'मध्यें बदल करणाऱ्या अगर त्या मागें घेणाऱ्या 'आज्ञां'चा अन्तर्भाव होतो ) द्याव्यात अशी राजेसाहेबांना शिफारस करणारा 'आज्ञां'चा मसुदा भारत-मंत्र्यानें पार्लमेंटपुढें ठेवावा; आणि आतां सदर आज्ञा काढाव्यात असा पार्लमेंटच्या दोन्ही सभांनीं ( कॉमन्स व लॉर्ड्स् ) राजेसाहेबांना विनंति-अर्ज केल्याखेरीज वरील आज्ञापत्राबाबत कोणतींही पुढील कामें करण्यांत येऊं नयेत.

( २ ) गव्हर्नराला दिलेल्या आज्ञापत्रांतील आज्ञेप्रमाणें एखादें कृत्य गव्हर्नर-कडून घडलें नाहीं, या सबबीवर त्या कृत्याच्या प्रामाण्याबद्दल हरकत उपस्थित करितां येणार नाहीं.

( अ ) राजेसाहेबांनीं गव्हर्नराला म्हणजे प्रांतांतील आपल्या प्रतिनिधीला द्यावयाचें 'आज्ञापत्र' हें कांहीं नवीन नाहीं; आजपर्यंत सदर वहिवाट चालत आली आहे. हिंदुस्थानांतच नव्हे तर कानडा, ऑस्ट्रेलिया, न्यू झीलंड इत्यादि वसाहती स्वायत्त होण्याच्या मार्गांत असतांना तेथील गव्हर्नरांना वरीलप्रमाणें आज्ञापत्रें राजेसाहेब देत असत. यांच्या द्वारा मूळ कायद्यांत नसलेला लवचिकपणा परिस्थितीप्रमाणें राज्य-

शासनांत आणतां येतो हा मोठा फायदा असतो. तथापि ज्या अर्थानें १९३५ चा कायदा हा घटनेच्या दृष्टीनें महत्त्वाचा लेख अगर कागद आहे त्या अर्थानें 'आज्ञापत्रा'ला तितकें महत्त्व नाहीं हें उघड आहे. परंतु वर सांगितल्याप्रमाणें कायद्यांत तरतूद नसलेल्या कित्येक गोष्टी, कायद्यांतील मूलभूत तत्त्वांना बाध न आणतां, सदर आज्ञापत्रांच्या मार्फत घडवून आणतां येतात. स्वायत्त वसाहतींना प्रस्तुत दर्जा प्राप्त करून देण्याच्या कामीं या आज्ञापत्रांचा पुष्कळच उपयोग झाला आहे. मंत्र्यांचा सल्ला सर्व राज्यकारभारांत मान्य करावा अशी सूचना ब्रिटिश प्रधान-मंडळानें राजेसाहेबांच्या द्वारा निरनिराळ्या गव्हर्नरांना वेळोवेळीं देऊनच जवळ जवळ ब्रिटनच्या राज्यपद्धतीच्या नमुन्याबरहुकूम वसाहतींची राज्य-पद्धति बनत बनत आलेली आहे.

प्रांतिक स्वराज्याची सुरुवात होण्यापूर्वी थोडे दिवस म्हणजे ८ मार्च १९३७ ला राजेसाहेबांनीं गव्हर्नरांना द्यावयाच्या आज्ञापत्रावर शिक्कामोर्तब केलें आहे. एखाद्या कायद्याच्या मसुद्याप्रमाणेंच सदर आज्ञा-पत्रांची रचना आखण्यांत आलेली आहे. सर्व म्हणजे ११ गव्हर्नरांना एकच आज्ञापत्र दिलें आहे; फक्त मध्यप्रांत वऱ्हाडच्या व सरहद्द प्रांताच्या गव्हर्नरांना दिलेल्या आज्ञापत्रांतून त्यांच्या विशेष जबाबदारीच्या दृष्टीनें जादा कलमें समाविष्ट केलीं आहेत [ वऱ्हाड मध्यप्रांत, कलम १२ (अ) व कलम १७ (अ); सरहद्दप्रांत, कलम १५ (अ) ]. सदर आज्ञापत्रांतील बहुतेक कलमांचा विचार ५२ व्या कलमांतील गव्हर्नराच्या जादा जबाब-दाऱ्यांच्या प्रकरणांत विस्तारानें केलाच आहे. त्यांतून उरल्या सुरल्या गोष्टींचा या स्थळीं थोडा ऊहापोह करणें आवश्यक आहे.

आज्ञापत्राच्या ८ व्या कलमांत 'स्वतःच्या मर्जीप्रमाणें' अथवा 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' वागणें ज्या बाबतींत गव्हर्नराला कायद्यानें भाग पाडलें आहे, त्या बाबींखेरीज " इतर सर्व बाबींत मंत्र्यांनीं आपल्या स्वतःच्या पायावर म्हणजे कायदेमंडळांतील बहुमताच्या आधारा-वरच उभें राहिलें पाहिजे; गव्हर्नराच्या तोंडाकडे पाहण्यास गव्हर्नरानें आपल्या कोणत्याही कृत्यानें अवकाश देतां कामा नये." असें न होईल तर कायदेमंडळाला व पर्यायानें मतदारांना मंत्री जबाबदार असतात या

लोकशाहीच्या महान् तत्त्वाला हरताळ फासल्यासारखें होणार आहे. उदाहरणार्थ, नुकतेंच सिंधमध्यें हिदायतुल्ला मंत्रिमंडळ बहुमत न मिळाल्या-मुळें गडगडलें, त्या प्रसंगीं नामंजूर झालेली 'सर्वसाधारण राज्य-कारभारा'च्या खर्चाची मागणी 'जादा जबाबदारी'च्या सबबीवर कायद्यांतील ८० ( १ ) कलमाप्रमाणें गव्हर्नराकडून मंजूर करवून घेणें एवढाच मार्ग हिदायतुल्ला मंत्रिमंडळाला होता; परंतु कोणतेंही स्वाभि-मानी व जबाबदार मंत्रिमंडळ या मार्गाचा अवलंब करणार नाहीं. जर यदा कदाचित् कोणी या भलत्या मार्गाला लागला तर त्या कृत्याबाबत गव्हर्नरनें साफ नकार दिला पाहिजे अशी स्पष्ट आज्ञा गव्हर्नरांना देण्यांत आली आहे.

गव्हर्नर आणि मंत्रिमंडळ या दोघांच्या अधिकारक्षेत्राच्या विभा-गणीच्या दृष्टीनें बाटलीवाला ( राजद्रोह ) खटल्यांत न्यायमूर्ति हॉरविल यांनीं आपल्या निकालपत्रांत उल्लेखिलेल्या एका मुद्द्याकडे लक्ष वेधणें प्राप्त आहे. इंडियन पिनल कोडांतील १२४ (अ) कलमान्वयें राजद्रोहाचा खटला भरण्यास स्थानिक सरकारची ( लोकल गव्हमेंट ) आगाऊ मंजुरी असावी लागते. प्रतिवादीतर्फे असा मुद्दा उपस्थित करण्यांत आला होता कीं, प्रधानमंडळाचा सल्ला न घेतां गव्हर्नरनें खटल्यास मंजुरी दिली असल्यामुळें सदरहू कृत्य हें बेकायदेशीर ठरतें. १९३५ च्या कायद्याच्या ३११ ( २ ) या कलमान्वयें स्थानिक सरकार म्हणजे प्रधानमंडळाच्या सल्ल्यानें चालणारा गव्हर्नर; बरें, या कायद्याप्रमाणें 'आपल्या मर्जीप्रमाणें वागणारा' अथवा 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें चालणारा' या दोन उपाधींनीं विरहित असा 'गव्हर्नर' शब्द कोठेंही आला तरी त्याचा अर्थ 'मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें चालणारा' असाच पारिशेष्यन्यायानें घेतला पाहिजे. तात्पर्य, लोकल गव्हमेंट किंवा गव्हर्नर अशा कोणत्याही शब्दानें उल्लेख आला असला तरी त्याचा अर्थ प्रधानमंडळ असाच होतो. असें असतांना न्यायमूर्ति आपल्या निकालपत्रकांत म्हणतात कीं, "खटल्या-करितां लागणारी सरकारी मंजुरी देण्यांत कांहीं चूक दिसत नाहीं; आणि खटल्यास मंजुरी देण्यापूर्वीं गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला घेतलाच पाहिजे

असें कायदेशीर बंधन गव्हर्नरवर १९३५ च्या कायद्यानें घातलें आहे असें नाहीं अशी माझी खात्री झाली आहे."

या न्यायमूर्तींच्या विधानाची, राजकारणाच्या दृष्टीनें विचार केल्यास, कींव केल्याखेरीज राहवत नाहीं. बाटलीवाला खटल्याची सर्व जबाबदारी राजगोपाळाचार्य मंत्रिमंडळानें आपल्या शिरावर घेतली; मंत्र्यांचें म्हणणें खालच्या कोर्टानें व हायकोर्टानें उचलून धरलें; व हायकोर्टाचा निकाल झाल्याबरोबर सर्व राजकीय परिस्थितीचा विचार करून मंत्रिमंडळानें क्रि. प्रो. को. च्या ४०१ कलमान्वयें झालेली शिक्षा रद्द करून आरोपीस बंधमुक्त केलें; हा सर्व भाग ठीक झाला. परंतु मंत्र्यांच्या सनदशीर अधिकारावर हें जें गव्हर्नरचें अतिक्रमण हायकोर्टाच्या निकालानें पक्कें होऊं पाहत आहे त्याचा मंत्रिमंडळानें वेळींच निषेध करावयास हवा. याशिवाय सदर निकालपत्रकांत 'सरकार म्हणजे केवळ मंत्रिमंडळ नव्हे तर मंत्री ज्याच्या साहाय्यानें राज्य चालवितात तें सर्व राज्ययंत्र सरकार या शब्दांत अंतर्भूत होतें' वगैरे जीं 'अप्रासंगिक विधानें' (ऑबिटर डिक्टा) न्यायमूर्तींनीं केलीं आहेत तींहि चिन्त्य आहेत, एवढाच जातां जातां या ठिकाणीं उल्लेख करतों.

पंजाब असेंब्लीचे सभासद मि० बरकतअली यांच्या शाहीदगंज बिलाबाबत पंजाब मंत्रिमंडळानें गव्हर्नरकडून आपल्या अधिकाराचें अतिक्रमण होऊं दिलें अशी तक्रार पंजाब असेंब्लींतील विरोधी पक्षाचे (काँग्रेस) पुढारी डॉ. गोपीचंद भार्गव यांनीं केली. ते म्हणतात:—"मुख्य प्रधानांनीं गव्हर्नराला त्याचे जादा अधिकार वापरूं दिले हें मला पसंत नाहीं. प्रधान अल्पसंख्याकांचें संरक्षण करीत नाहींत असें जर गव्हर्नरचें मत बनलें असतें तर त्यानें जादा अधिकार वापरण्यास हरकत नव्हती. या प्रकरणांत मुख्य प्रधानांचें म्हणणें असें कीं, गव्हर्नर आणि प्रधानमंडळ यांच्यांत मतभेद नाहीं. माझें असें मत आहे कीं, या बाबतींत आपण स्वतः निर्णय न करण्यांत मुख्य प्रधान एक मोठा हक्क गमावून बसले आहेत." २९९ व्या कलमाकडे दृष्टि फेकल्यास असें दिसून येईल कीं, स्थावर मालमत्तेबाबतचे हक्क बदलणें झाल्यास त्याबाबतच्या बिलांना कायदेमंडळांत प्रविष्ट होण्यास गव्हर्नरची आगाऊ संमति लागते. ती

गव्हर्नरनें दिली नाहीं. शिवाय या प्रश्नांत शीख, मुसलमान हा जाति-विषयक हितसंबंध-रक्षणाचाही भाग होता. तेवढाच प्रश्न असता तर त्याची जबाबदारी, भार्गव म्हणाले त्याप्रमाणें, मंत्रिमंडळानें संपूर्णपणें अंगावर घ्यावयास पाहिजे होती.

बिहार-संयुक्तप्रांत पेचप्रसंगाच्या बाबतींत काँग्रेस मंत्रिमंडळांनीं राज्यकारभाराच्या अननुभवामुळें राजकीय कैद्यांच्या सुटकेबाबत वैयक्तिक तपासणी करण्याचा आपला अधिकार गव्हर्नरांना बळकावूं देण्यांत कशी चूक केली व त्या चुकीचा गैरफायदा व्हाइसरॉयांनीं उलट आपल्या धोरणाच्या समर्थनार्थ कसा करून घेतला हें प्रसिद्धच आहे.

'आज्ञापत्रां'तील आणखी एक गोष्ट म्हटली म्हणजे कायद्याच्या ५९ कलमान्वयें सरकारी कामकाज कसें चालवावें यासंबंधीं गव्हर्नरनें जे नियम करावयाचे आहेत त्यांत पुढील बाबीसंबंधानें स्पष्ट नियम असावा, अशी तरतूद. ती अशी कीं, कोणत्याही मंत्र्यानें मांडलेल्या, प्रांताच्या वसुलाशीं अगर जमा-खर्चाशीं संबंध असणाऱ्या योजनेबाबत अर्थमंत्र्याचा सल्ला घेतलाच पाहिजे, तसेंच अर्थमंत्र्याच्या अनुमतीशिवाय एकाच खात्यांतील रकमेचा विनियोग योजिलेल्याहून अन्य कार्याकरितां करितां कामा नये; याबाबत अर्थमंत्र्याची अनुमति नसेल तर ती खर्चाची बाब सर्व प्रधानांच्या बैठकीपुढें निकाला-करितां मांडली गेली पाहिजे ( आज्ञापत्र, कलम १३ ). सदरहू नियम योग्य असाच आहे. जसा एक धोरण राखण्याच्या दृष्टीनें मुख्य प्रधानाचा सर्व खात्यांशीं संबंध राहणें इष्ट आहे तसा अर्थमंत्र्याचाही सर्वांशीं संबंध असणें आवश्यक आहे. कारण अर्थमंत्री हा सर्वांचें पोट आहे. ज्या ठिकाणीं एकजिनसी प्रधानमंडळ नसेल तेथें वरीलसारख्या नियमाची अधिक जरूरी भासेल हें स्पष्ट आहे. परंतु जेथें संयुक्त जबाबदारीचें प्रधानमंडळ आहे तेथें सुद्धां प्रत्येक मंत्र्याला सवयीनें व आपुलकीच्या दृष्टीनें आपापल्या खात्याचा पक्षपात व अभिमान वाटणें हें मनुष्यस्वभावाला धरून आहे. म्हणून याबाबत मुख्य प्रधान अगर अर्थमंत्री यांची सर्वांवर देखरेख असली पाहिजे. सदर काम 'आज्ञापत्रा'नें गव्हर्नरवर सोपविलें आहे. तसेंच सरकारकडे एखाद्या अल्पसंख्याक जातीकडून कांहीं तक्रार अगर विनंति-अर्ज आल्यास त्याच्याकडे ताबडतोब लक्ष पुरविलें पाहिजे

अशी नियमांत तरतूद करण्याचें काम याच ( आज्ञापत्र १३ ) कलमान्वयें गव्हर्नरवर सोपविलेलें आहे.

सरते शेवटीं, राज्याची सुव्यवस्था राखणें, प्रजेच्या नैतिक, सामाजिक व आर्थिक कल्याणाकरितां सर्व उपाय योजणें, प्रांतांतील सर्व जातींना राज्यकारभारांत योग्य त्या प्रमाणांत भाग घेण्यास संधि देणें, सर्व जमातींत सलोखा व प्रेम व परस्परांबद्दल आदर उत्पन्न होईल अशी खटपट करणें वगैरे गोष्टी घडवून आणण्याबद्दलची जबाबदारी गव्हर्नरवर सोपविली आहे ( आज्ञापत्र कलम २० ).

आतां आपल्यांतीलच कित्येक लोक इतके अडाणी, मूर्ख व परकीयांच्या तोंडाकडे सदा बघणारे आहेत कीं, पूर्वीपासून आंगवळणी पडलेल्या सवयींना अनुसरून ते मंत्र्याविरुद्ध एकदम गव्हर्नरकडे धाव घेतात. याचें उदाहरण म्हणून त्रिचनापल्ली येथें भरलेल्या तिसऱ्या प्रांतिक तामिळ ( भाषा ) परिषदेच्या ठरावाचें देतां येईल. शाळांतून एकराष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें हिंदी भाषेचा अभ्यासक्रम आवश्यक करण्याचें मद्रास प्रांतांतील कॉंग्रेस प्रधानमंडळानें आपलें धोरण ठरविलें आहे. लगेच वरील तामिळाभिमानी सभेनें आपणावर हिंदीची सक्ती होत आहे अशी ओरड करून गव्हर्नरकडे शिष्टमंडळ पाठविलें, त्यास गव्हर्नरनें आपल्या अधिकाराची योग्य मर्यादा ओळखून पुढीलप्रमाणें चोख उत्तर दिलें:--" हिंदी शिक्षणाची योजना आपल्या जादा जबाबदारीच्या क्षेत्रांत येत नसल्यामुळें मला मंत्रिमंडळाच्या धोरणांत ढवळाढवळ करितां येणार नाहीं."

( आ ) 'आज्ञापत्रां'तील आज्ञांविरुद्ध गव्हर्नर वागला अशा सबबीवर त्याच्या कृत्याविरुद्ध कोर्टांत कोणालाही तक्रार करतां येणार नाहीं. याचें पहिलें मुख्य कारण म्हणजे 'आज्ञापत्र' हें कांहीं कायद्याच्या तोलाचें नाहीं; त्यांत भाषेचा लवचिकपणा असतो; कायद्याच्या परिभाषेचा कांटेतोलपणा नसतो. दुसरें असें कीं, गव्हर्नर हा राजप्रतिनिधी मानला असल्यामुळें त्याला कोर्टाच्या दगदगींत घालणें निषिद्ध मानलें आहे.

मद्रास कौन्सिलांत नामदार शास्त्री, कूर्म रेड्डी, महमद उस्मान वगैरे पुढारलेल्या वर्गांतील लोकांची मद्रास गव्हर्नरनें जी नेमणूक केली ती योग्य मानली तरी त्यांत आज्ञापत्रांतील 'मुख्यत्वेंकरून स्त्रिया व हरि-

जन यांच्यांतील प्रतिनिधी नेमावे' या आज्ञेचा परिस्थितीमुळें भंग केल्याचें दिसून येतें. तीच परंपरा निराळ्या राजकीय कारणास्तव, डॉ. राजन् यांच्या नेमणुकीमुळें पुढें चालविली गेली इतकेंच. मुंबई प्रांतांत मात्र मि. गुइडो यांची नेमणूक ख्रिस्ती समाजाला प्रतिनिधित्व देण्याच्या दृष्टीनें केली गेली हें आज्ञापत्रांतील १९ व्या कलमाशीं पूर्ण सुसंगत असें आहे.

'आज्ञापत्रां'तील आज्ञाभंगाचें दुसरें स्पष्ट उदाहरण म्हणजे असेंब्लींत काँग्रेस सभासदांचें बहुमत असलेल्या सहा प्रांतांतून काँग्रेसनें अधिकारसूत्रें धारण करण्याचें नाकारल्यावर जीं तात्पुरतीं मंत्रिमंडळें नेमलीं, हें होय. तीं 'आज्ञापत्रां'तील ७ व्या कलमाचा धडधडीत भंग केल्याविना नेमतांच आलीं नसतीं. परंतु त्याबाबत कोर्टाच्या मार्गानें उपाय योजितां येणें वरील दुसऱ्या पोटकलमानें अशक्य होतें; म्हणून तिऱ्हाईत पंचांकडे सदर प्रश्न सोपवा अशी गांधींनीं तोड काढिली; परंतु ब्रिटिश सरकारनें आपण स्वतःच गव्हर्नरच्या या आज्ञाभंगाला जबाबदार असल्यामुळें, वरील पंच नेमण्याची सूचना अमान्य केली. अर्थात् ब्रिटिश सरकार गव्हर्नराच्या या कृत्याला आज्ञाभंगाचें रूप कधींच देणार नाहीं, कारण तें म्हणणार कीं, सदर कलमान्वयें "गव्हर्नरनें फक्त आटोकाट प्रयत्न करावयाचा आहे" व तो त्यांनीं करून पाहिला (?) परंतु तो यशस्वी झाला नाहीं म्हणून आडरानांत शिरावें लागलें. नुकतेच लंडनमधील 'मुंबई-भोजन' प्रसंगीं भारतमंत्री झेटलंडसाहेब यांनीं कबुली दिली कीं, "अल्पमताचा पाठिंबा असणारीं मंत्रिमंडळें राज्यकारभाराचें काम पाहतांना नेहमीं अस्वस्थचित्त असत; याचें कारण 'कायदेमंडळाशीं गांठ पडतांच आपला क्षणभरही टिकाव लागणार नाहीं' याची त्यांना बालंबाल खात्री होती." परंतु या हंगामी मंत्र्यांना घोड्यावर चढविण्यास आपणच कारणीभूत झालों याचा झेटलंडसाहेबांना आतां विसर पडण्यास कांहीं हरकत नाहीं.

गव्हर्नर जनरलची हुकमत

**५४.**—(१) या कायद्यान्वयें अथवा या कायद्याखालीं प्रांताच्या गव्हर्नराला जेवढ्यापुरते आपल्या मर्जीप्रमाणें वागणें अथवा आपलें वैयक्तिक मत प्रभावी करणें भाग आहे तेवढ्यापुरता तो आपल्या मर्जीप्रमाणें वागणाऱ्या गव्हर्नर जनरलच्या सर्वसाधारण नियंत्रणाखालीं राहील आणि वेळोवेळीं गव्हर्नर जनरलनें दिलेले हुकूम

अमलांत आणील, परंतु या कलमांतील तरतुदीला सोडून गव्हर्नर वागला या सबबीवर त्याने केलेल्या कोणत्याही कृत्याच्या प्रामाण्याबद्दल हरकत उपस्थित करितां येणार नाहीं.

( २ ) राजेसाहेबांनीं गव्हर्नरला दिलेल्या कोणत्याही आज्ञापत्राशीं विसंगत अशा तऱ्हेनें वागण्याची आपल्या हुकमामुळें गव्हर्नरवर पाळी येणार नाहीं, याबद्दल या कलमाखालीं कोणतेही हुकूम काढण्यापूर्वी, गव्हर्नर जनरल स्वतःची खात्री करून घेईल.

( अ ) ज्या बाबी कायद्यान्वयें गव्हर्नरच्या मर्जीवर अथवा वैयक्तिक मतावर सोपविल्या आहेत त्या बाबींसंबंधीं तो प्रांतांतील प्रधानमंडळ, कायदेमंडळ किंवा मतदार यांना जबाबदार नसून गव्हर्नर जनरल, भारतमंत्री, ब्रिटिश प्रधानमंडळ, ब्रिटिश पार्लमेंट. ब्रिटिश मतदार यांना जबाबदार असतो, एवढाच त्याचा अर्थ. नहून त्याला 'हम करे सो कायदा' अशा स्वरूपाचे सुलतानी अधिकार कायद्यानें दिलेले नाहींत. इंग्रजी ग्रंथकार मे यानें आपल्या 'पार्लमेंटरी प्रॅक्टिस' (पृ. २९१) मध्यें इंग्रजी राजाच्या अधिकारासंबंधीं वस्तुस्थितिवाचक पुढील उद्गार काढले आहेत:— " आपल्या जबाबदार सल्लागारांच्या (मंत्र्यांच्या) मताव्यतिरिक्त आपलें म्हणून खासगी मत राजेसाहेबांना असतें असें मानतां येत नाहीं." याप्रमाणें जरी कायद्यानें गव्हर्नर, गव्हर्नर जनरलादि लोकांच्या नियंत्रणाखालीं वागत असला तरी, वस्तुस्थिति मात्र कित्येक वेळां अशी असते कीं, 'जागेवरचा मनुष्य' म्हणून गव्हर्नर जसा वागेल तशी त्याला वरून संमति व पाठिंबा मिळतो. अर्थात् महत्त्वाच्या राजकीय व घटनात्मक प्रश्नाबाबत तो नुसता वरील हुकूम अमलांत आणणारा एक बडा नोकर, एवढाच गव्हर्नरचा अर्थ. कॉंग्रेसनें अधिकारस्वीकार करण्यापूर्वी जी आश्वासनमागणी केली त्याबाबत सर्व गव्हर्नरांचीं एकसारखीं उत्तरें, शब्दयोजना वगैरे पाहिली म्हणजे गव्हर्नर जनरल ( दिल्ली ) व भारतमंत्री ( लंडन ) एथून सूत्रें कशीं हालत होतीं हें दिसून येतें. वरीलसारख्या मोठ्या राजकीय धोरणासंबंधींच्या प्रश्नाबाबतच नव्हे तर ज्याबाबत गव्हर्नरवर कायद्यानें जबाबदाऱ्या सोपविल्या आहेत त्याबाबतही तो पर्यायानें पार्लमेंटला जबाबदार आहे असें वर सांगितलें आहेच. याचा अर्थ, पार्लमेंटमध्यें त्यासंबंधीं प्रश्न विचारणें, खुलासा

मागणें, ठराव मांडणें, तहकुबीची सूचना आणणें, अविश्वासाचा ठराव मांडणें वगैरे सर्व अधिकार पार्लमेंटच्या प्रत्येक सभासदाला आहेत. हाच 'पार्लमेंटची जबाबदारी' याचा अर्थ होय. ज्याप्रमाणें आपल्या इकडल्या कांहीं अडाणी लोकांची मंत्र्यांकडे दाद न मागतां गव्हर्नरकडे जाण्याची खोड जात नाहीं त्याप्रमाणें "आपणच हिंदुस्थानच्या यच्चयावत् राज्यकारभाराला जबाबदार आहोंत तेव्हां मंत्र्यांनीं आपल्या जबाबदारींत केलेल्या गोष्टींबद्दल देखील आपणावरच जबाबदारी आहे" असें आजपर्यंतच्या हाडींमाशीं खिळलेल्या सवयीमुळें समजून पार्लमेंटचे कित्येक सभासद मंत्र्यांच्या कारभाराबद्दल पार्लमेंटांत प्रश्न विचारून नसती ढवळाढवळ करतांना आढळून येतात. राज्यघटनाशास्त्राप्रमाणें सदर लोकांचें कृत्य बेसनदशीर व बेकायदेशीर होय. याचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे मद्रास काँग्रेस मंत्रिमंडळानें नीलसाहेबाचा पुतळा आपल्या जागेवरून हालवून सरकारी म्यूझिअममध्यें नेऊन ठेविला, याबाबत पार्लमेंटांत झालेलीं प्रश्नोत्तरें हें होय. नीलपुतळा जागेवरून हालवून पदार्थसंग्रहालयांत ठेवून देणें ही गोष्ट वरवर पाहतां जरी किरकोळ दिसली तरी त्याचा खोल अर्थ इंग्रजी राज्य, तें अडथळा असल्याकारणानें, याच अनत्याचारी मार्गानें आपल्या प्रगतीच्या मार्गावरून बाजूला सारून ठेवणें व इतिहासकाळांत एक गोष्ट घडली एवढीच त्याची स्मृति राहणें, असा आहे. म्हणून जातां जातां या स्थळीं थोडक्यांत त्यासंबंधीं हकीकत देतों.

मद्रास येथें माउंटरोडवर नीलसाहेबाचा, एका हातांत तरवार घेतलेला व एका हातानें मागच्या बाजूस अंगुलिनिर्देश करणारा असा, एक पुतळा उभारलेला होता. त्या पुतळ्याच्या खालच्या बाजूस पुढील पानावर दिलेला लेख इंग्रजींत कोरलेला आहे. त्या लेखांतील विधानें इंग्रजी इतिहासकारांच्या मतानें सुद्धां असत्यानें भरलेलीं आहेत. याशिवाय हा पुतळा उभारण्यांत पाशवी सामर्थ्याचा टेंभा मिरवून हिंदी लोकांना हिणविण्याचा त्यांत स्पष्ट प्रयत्न आहे. हिंदी लोकांच्या स्वातंत्र्याच्या प्रयत्नाला तो अयशस्वी झाला म्हणून 'बंड' असें संबोधिलें आहे. हिंदी लोकांत स्वराज्यप्राप्तीबद्दल जसजशी तळमळ उत्पन्न होत गेली तसतशी हीं ब्रिटिश राज्याचीं चिन्हें डोळ्यांमध्यें अधिकाधिक खुपूं लागलीं.

"जेम्स जॉर्ज स्मिथ नील
राणीसाहेबांचा ए. डी. सी.*
मद्रास येथील बंदुकवाल्या ब्रिटिश पलटणीचा लेफ्टनंट कर्नल,
हिंदुस्थानांतील ब्रिगेडियर जनरल.
शूर, करारी, स्वावलंबी शिपाई.
बंगालमधील बंडाचा धडाका प्रथम
थोपवून धरणारा म्हणून सर्वमान्य,
लखनौचा वेढा उठविण्याच्या प्रसंगीं
मरून कीर्तिरूपें उरला,
२५ सप्टेंबर १८५७.
वय ४७."

या लेखाच्या पाठीमागच्या बाजूला पुढील लेख आहे:—
"सार्वजनिक वर्गणीनें उभारलेला,
१८६०."

१९२७ सालीं हा पुतळा काढून टाकण्याकरितां सत्याग्रहाच्या मार्गाचा अवलंब करण्यांत आला; परंतु तेव्हां तो प्रयत्न सफळ झाला नाहीं. एकटा नीलचाच पुतळा काय, तर असे हजारों पुतळे, निरनिराळीं स्मारकें, रस्त्यांना, पुलांना, इमारतींना फार काय गांवें, शहरें यांना सुद्धा इंग्रजीं नांवें दिलेलीं आहेत. या सर्वांचें मूळ जें इंग्रजी राज्य तें उखडून काढलें म्हणजे वरच्या शाखोपशाखा आपोआपच गळून पडणाऱ्या आहेत. १९३७ सालीं स्वराज्याचा कांहीं अंश हातीं आल्याबरोबर मद्रास प्रधानमंडळानें वरील नील पुतळा काढून ठेविला. साहजिकच युरोपियन लोकांना या कृत्याचा राग आला; व त्यांनीं पुतळा स्वदेशीं नेण्याची मागणी केली. पार्लमेंटांतही पुढील प्रश्नोत्तरें झालीं:—

लॉर्ड स्टॅनले ( उपभारतमंत्री ):—माझ्या माहितीप्रमाणें हिंदुस्थान सरकार मद्रासहून हलविलेल्या नील पुतळ्याकरितां दुसरी जागा शोधण्याच्या उद्योगांत आहे.

---

* ए. डी. सी. हा आ दे कॅंप या फ्रेंच शब्दाचा संक्षेप आहे. त्याचा अर्थ "सेनापतीचे हुकूम अमलांत आणून त्याला मदत करणारा अधिकारी."

ॲडमिरल टेलर:— प्रख्यात ब्रिटिश सेनापतीच्या स्मारकाला झालेला अपमान बंद पाडणें हें गव्हर्नराच्या आवाक्यांतलें नाहीं काय ?

लॉर्ड स्टॅनले:—आपलें म्हणणें मान्य करतां येत नाहीं; तथापि आपल्याप्रमाणेंच मलाही नीलपुतळा पदार्थसंग्रहालयांत अडगळीच्या ठिकाणीं ठेवल्याबद्दल खेद होत आहे.

मद्रास प्रधानमंत्री श्री. राजगोपाळाचार्य यांनीं खुलासा केला कीं, "त्या कृत्यांत द्वेषभावना बिलकुल नसून हिंदी लोकांच्या भावनेस धक्का बसणारें एक शल्य बाजूस काढून सुरक्षित जागीं नेऊन ठेविलें आहे; तसेंच त्या पुतळ्यावर मालकी मद्रास सरकारची असल्याकारणानें पुतळा विलायतेस नेण्याचा प्रश्न उपस्थित होत नाहीं." या नीलपुतळा-प्रकरणानंतर लाहोर येथील लॉरेन्स पुतळा ( ज्याच्यावर 'तुमच्यावर **लेखणीनें** राज्य चालविलेलें चालेल का **तरवारीनें** राज्य गाजविलेलें चालेल' अशासारखें उद्दामपणाचें द्योतक वाक्य कोरलें आहे ). मलबारांतील हिचकॉक पुतळा, कलकत्ता येथील अंधार कोठडी (ब्लॅक होल) चें स्मारक वगैरे प्रश्न उपस्थित झाले आहेत, त्यांचा विचार करणें या ठिकाणीं योग्य नाहीं. मुख्य विचार याबाबतचा अधिकार कोणाचा हा होय. या गोष्टींत गव्हर्नरला आपला जादा अधिकार वापरण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण त्यामुळें प्रांताच्या शांततेस धोका बिलकुल नाहीं, इतकेंच नव्हे तर अशांततेचें एक जबरदस्त कारण त्यायोगें नाहींसें झालें, याबद्दल प्रधानमंडळाच्या सदर कृत्याचें वास्तविक अभिनंदनच करावयास हवें. सदर गोष्टीबद्दल पार्लमेंटांत प्रश्न विचारणें हें चूक आहे असें राजगोपाळाचार्य यांनीं जाहीर केलें व काँग्रेसनें अधिकारस्वीकार करण्यापूर्वी पार्लमेंटांत मुख्य प्रधान मि० चेंबर्लेन यांनीं मि० चर्चिल यांच्या प्रश्नास दिलेल्या पुढील उत्तराचा हवाला दिला:—" जेथपर्यंत प्रांताच्या राज्यकारभाराबद्दल प्रांतिक मंत्रिमंडळ जबाबदार आहे तेथपर्यंत पार्लमेंटनें मंत्र्यांच्या धोरणाबद्दल व त्यांच्या कृत्यांबद्दल तक्रार करणें अगर त्याच्यावर प्रश्नोत्तरें करून टीका करणें हें सर्वस्वी अनुचित होय. असले प्रश्न विचारूं देतां कामा नयेत; प्रश्न विचारणारानें दाखवून दिलें पाहिजे कीं, सदर कृत्य एक तर गव्हर्नरनें मंत्र्यांना न विचारतां अथवा त्यांच्या सल्ल्याविरुद्ध केलेलें आहे,

किंवा दुसरे पक्षीं गव्हर्नरनें हात घालण्यासारखी बाब असून तो तसें करण्यास चुकला आहे." राजगोपाळाचार्यांच्या खुलाशानंतर मि. वेजवुड बेन ( माजी मजूरपक्षाचे भारतमंत्री ) यांनीं कॉमन्स सभेच्या स्पीकरनें नीलपुतळ्याबाबत प्रश्न कां विचारूं दिला असा प्रश्न केला. त्यावर ही गोष्ट चुकून झाली, पुनः अशी चूक होऊं दिली जाणार नाहीं असें स्पीकरनें आश्वासन दिलें. या सर्व प्रकरणामुळें पुनः एकदां गव्हर्नर व मंत्री यांच्यामधील सत्ताविभागणीचा प्रश्न स्पष्ट स्वरूपांत मांडला गेला.

( आ ) वरील ५४ ( १ ) कलमांत 'गव्हर्नर जनरलनें वेळोवेळीं दिलेले हुकूम अमलांत आणणें हें गव्हर्नरचें काम आहे' असें सांगितलें आहे. ही गव्हर्नरची ताबेदारी सर्वसाधारण आहे. ५२ ( १ ) ( छ ) कलमांतील 'विशेष' किंवा 'खास' जबाबदारी ही सहाव्या खंडांतील कलमान्वयें गव्हर्नर जनरलनें काढलेल्या हुकमांच्या अम्मलबजावणी-संबंधींची आहे. त्याहून प्रस्तुत कलम हें जास्त व्यापक आहे.

( इ ) राजेसाहेबांच्या आज्ञापत्रांशीं विसंगत असे हुकूम गव्हर्नर जनरलनें काढूं नयेत हें म्हणणें योग्यच आहे. विसंगतता असल्यास त्या-पैकीं कोणाचें मानावयाचें हा बुचकळ्यांत टाकणारा प्रश्न उभा राहतो; म्हणून ५४ ( २ ) कलमानें त्या गुंत्याची सोडवणूक केली आहे.

( ई ) ५४ ( १ ) कलमांत गव्हर्नराच्या कृत्याची कोर्टांत चौकशी न होण्याबद्दलचा जो उल्लेख आहे त्याबद्दल वसाहतींच्या गव्हर्नरांना उद्देशून प्रो. कीथ आपल्या ग्रंथांत म्हणतात:—"जोंपर्यंत गव्हर्नर आपल्या अधिकारांत वागत आहे तोंपर्यंत त्यानें आपली विवेचक बुद्धि (डिस्क्रीशन) अमक्या पद्धती-नेंच कां वापरली याबाबत कोणत्याही कोर्टाला विचार करितां येणार नाहीं." कॉंग्रेसच्या आश्वासनमागणींतील हेंच रहस्य होतें कीं, गव्हर्नरनें आपली डिस्क्रीशन कशी वापरावी हें गव्हर्नर जनरलकडे न पाहतां प्रधानमंडळाकडे पाहून त्यांचा सल्ला अमलांत आणण्याच्या दृष्टीनें वापरावी. असें करण्यानें घटनाभंगाचा बिलकुल दोष न येतां शांततेनें सत्तासंक्रमणाचें कार्य हळूहळू पार पाडतां आलें असतें. परंतु हा कायद्याच्या सरळ अर्थाचा किंवा त्यांतून सरळ निघणाऱ्या अनुमानांचा प्रश्न नसून, अव्वल दर्जाच्या राजकीय

धोरणाचा प्रश्न असल्यामुळें गव्हर्नरांना आपली विवेचक बुद्धि (!) वरच्या अधिकाऱ्याकडे गहाण ठेवावी लागत आहे.

(उ) या ५४ व्या कलमांत गव्हर्नर जनरलच्या देखरेखीचा उल्लेख आहे. ही देखरेख गव्हर्नरवर असलेल्या जादा जबाबदारीबाबत (कलम ५२) मुख्यत: आहे. त्यांत संस्थानिकांचा संबंध येत असल्यामुळें सदर ५४ कलमांत संस्थानिकांच्या संमतीशिवाय पार्लमेंटाला फरक करितां येणार नाहीं (दुसरें शेड्यूल पहा).

प्रांतिक ॲडव्होकेट जनरल

**५५.**—(१) हायकोर्टाचा न्यायाधीश म्हणून नेमणूक करून घेण्याची पात्रता असलेल्या एका इसमास प्रत्येक प्रांताचा गव्हर्नर प्रांताकरितां ॲडव्होकेट जनरल म्हणून नेमील.

(२) गव्हर्नरने वेळोवेळीं विचारलेल्या कायद्याच्या प्रश्नासंबंधीं प्रांतिक सरकारास सल्ला देणें व वेळोवेळीं सोपविलेलीं, कायद्याच्या स्वरूपाचीं इतर कामें करणें हें ॲडव्होकेट जनरलचें काम राहील.

(३) गव्हर्नरची खुषी असेल तोंपर्यंत ॲडव्होकेट जनरल आपल्या अधिकारावर राहील आणि गव्हर्नर ठरवील तो पगार त्याला मिळेल.

(४) ॲडव्होकेट जनरलची नेमणूक करणें व त्याला कामावरून काढून टाकणें, तसेच त्याचा पगार ठरविणें, यासंबंधींचे अधिकार वापरतांना गव्हर्नर आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें वागेल.

(अ) १९३५ चा नवीन कायदा अमलांत येण्यापूर्वी मुंबई, मद्रास व बंगाल या तीन इलाख्यांनाच ॲडव्होकेट जनरल (सर वकील) नेमलेला असे. परंतु जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या शिफारशीमुळें प्रत्येक प्रांताला ॲडव्होकेट जनरल नेमण्याची, कायद्याच्या वरील कलमाप्रमाणें, तरतूद केली आहे. राजकीय पक्षांच्या तडाक्यांत वरील नेमणूक राहूं नये म्हणून त्याची नेमणूक, नेमणुकीची मुदत, पगार वगैरे गोष्टींत गव्हर्नरला शेवटचे अधिकार दिले आहेत. दोन प्रांतांना मिळून एक ॲडव्होकेट जनरल असला तरी कायद्याची हरकत नाहीं. आसामची व बंगालची मिळून सध्यां ॲडव्होकेट जनरलची एकच जागा आहे. प्रांतांच्या ॲडव्होकेट जनरलांचीं नांवें पुढीलप्रमाणें:—

१ मुंबई—सेटलवाड
२ मद्रास—कृष्णस्वामी अय्यर
३ संयुक्तप्रांत— नारायणप्रसाद अस्थना
४ बिहार—बलदेव सहाय
५ मध्यप्रांत व वऱ्हाड—पुराणिक
६ ओरिसा—बी. के. रॉय
७ वायव्य सरहद्द—सरदार राजासिंग
८ बंगाल व आसाम—सर अशोक रॉय ( आसामकरितां बंगालच्याच ॲडव्होकेट जनरलची नेमणूक स्वतंत्रपणें आसाम गव्हर्नर करतो. )
९ पंजाब— दिवाण रामलाल
१० सिंध—प्रतापराय पुनवानी

( आ ) पोटकलम ( १ ) मध्यें उल्लेखिलेली हायकोर्ट न्यायाधीशाची पात्रता २२० ( ३ ) कलमांत पुढीलप्रमाणें दिलेली आहे:—

( १ ) तो दहा वर्षे धंदा करणारा इंग्लंडचा किंवा उत्तर आयर्लंडचा बॅरिस्टर असला पाहिजे; किंवा तितक्याच मुदतीचा स्कॉटलंडमधील ॲडव्होकेटांच्या फॅकल्टीचा सभासद असला पाहिजे,

( २ ) तो दहा वर्षे नोकरी केलेला आय. सी. एस्. पाहिजे; मात्र त्यानें कमींत कमी तीन वर्षे डिस्ट्रिक्ट जजाचें काम केलेलें असलें पाहिजे,

( ३ ) कमींत कमी पांच वर्षे तरी त्यानें मुनसफ किंवा स्मॉल कॉज कोर्टाच्या न्यायाधीशाचें काम केलेलें असलें पाहिजे.

( ४ ) हायकोर्टांत निदान दहा वर्षे तरी त्यानें वकील म्हणून काम केलेलें असलें पाहिजे.

( इ ) ॲडव्होकेट जनरलच्या नेमणुकीबाबत गव्हर्नरानें मंत्रिमंडळाचा सल्ला घेतलाच पाहिजे; परंतु तो त्याला पटला नाहीं तर शेवटचा निर्णय करण्याचा अधिकार गव्हर्नरला कायद्यानें दिला आहे; त्याचप्रमाणें ॲडव्होकेट जनरलचा पगार ठरविण्याचें काम मंत्रिमंडळाचेंच आहे परंतु मतभेद झाल्यास गव्हर्नरचा निर्णय शेवटचा मानला जातो. मद्रासच्या ॲडव्होकेट जनरलचा ( कृष्णस्वामी अय्यर ) पगार कॉंग्रेस अधिकारावर येण्यापूर्वी दरमहा रु. १७०० होता; परंतु कराची कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें

मद्रासमंत्रिमंडळानें रु. ५०० दरमहा पगार घेण्याबद्दल विनंति केल्यावरून ॲडव्होकेट जनरलनें तेव्हांपासून आपला पगार रु. ५०० म्हणजे पूर्वीं-पेक्षां दरमहा रु. १२०० कमी पगार घेण्यास सुरुवात केली. स्वार्थ-त्यागानें काम करण्याच्या प्रधानमंडळाच्या या कृत्याचा परिणाम इतर नोकरांवर झाल्याचें हें पहिलेंच उदाहरण होय. अर्थात् ही गोष्ट खुषीनें व संमतीनें झाली असल्यामुळें त्यांत गव्हर्नरला हात घालण्याचें कांहींच कारण नाहीं.

( ई ) संयुक्त प्रांतांत गव्हर्नरनें कॉंग्रेस-मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें डॉ. नारायणप्रसाद अस्थना यांची ॲडव्होकेट जनरलच्या जागेवर नेमणूक केली. सदर अस्थना हे हुशार वकील, परंतु प्रागतिक पक्षांतले व कॉंग्रेसला विरोध करणारे. म्हणून त्यांच्या नेमणुकीनें कॉंग्रेस गटांत खूपच खळबळ झाली. त्यानंतर डॉ. अस्थना व कॉंग्रेस मंत्रिमंडळ यांच्यामध्यें ॲडव्होकेट जनरलच्या कामकाजासंबंधीं व अधिकारासंबंधीं मतभेद उत्पन्न झाले. कायद्याच्या कलमांत अमुकच कामें व अधिकार दिले पाहिजेत असें कोठेंही नमूद केलेलें नाहीं. त्याबाबत जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें आपल्या म्हणून कांहीं शिफारशी केल्या आहेत. त्या मानल्याच पाहिजेत असें सरकारवर बंधन नाहीं. परंतु इतर प्रांतांतल्याप्रमाणेंच आपणाला अंमलबजावणीचे अधिकार असले पाहिजेत असें डॉ. अस्थना यांचें म्हणणें. शेवटीं याबाबत तडजोड होऊन वरील प्रकरण मिटलें.

( उ ) ॲडव्होकेट जनरलचा पगार व इतर गोष्टी याबाबत खटके व मतभेद होण्याचें कारण म्हणजे कॉंग्रेस मंत्रिमंडळें अधिकारावर येण्या-पूर्वीं तात्पुरत्या मंत्रिमंडळांच्या सल्ल्यानें गव्हर्नरनें त्यांच्या केलेल्या नेमणुकी हें असलें पाहिजे. नागपूर, बिहार वगैरे प्रांतांतही यामुळेंच मतभेदाचे प्रसंग उद्भवले. बिहारमध्यें सर सुलतान अहमद यांनीं ॲडव्हो-केट जनरलचा राजीनामा दिल्यामुळें कॉंग्रेसमंत्रिमंडळानें श्री. बलदेव सहाय या बिहार वरिष्ठ कायदेमंडळांत कॉंग्रेसतर्फे निवडून आलेल्या सभासदाची ॲडव्होकेट जनरलच्या जागेवर नेमणूक केली. मंत्रिमंडळें बदललीं कीं, ॲडव्होकेट जनरल बदलला पाहिजे असा जरी नियम करणें योग्य नाहीं तरी ज्या मंत्रिमंडळाबरोबर व ज्याच्यातर्फे ॲडव्होकेट

जनरल्ला बाहेर व कायदेमंडळांत काम करावयाचें असतें त्याच्या विश्वासांतला व पसंतीचाच सदर इसम असणें हें युक्त आहे. मुंबई प्रांतांत परिस्थिति ओळखून जुने ॲडव्होकेट जनरल केनेथ केंप यांनीं राजीनामा दिला व त्या जागीं मंत्रिमंडळाच्या सूचनेवरून सेटलवाड यांची नेमणूक झाली. मात्र त्यांच्या पगाराबाबत मुंबई मंत्रिमंडळ मद्रासच्याप्रमाणें कराची कॉंग्रेसचा एतद्विषयक ठराव अमलांत आणूं शकलें नाहीं, इतकेंच नव्हे तर पूर्वींपेक्षां अॅडव्होकेट जनरलच्या पगारांत वाढ करण्यांत आली ही खेदाची गोष्ट होय !

दिल्लीस मार्च १९३७ मध्यें कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें प्रधान, स्पीकर (प्रेसिडेंटसुद्धां), ॲडव्होकेट जनरल यांच्या पगाराबाबत केलेला ठराव मार्गदर्शक असून तो पुढें दिला आहे:—"सरकारतर्फे राहण्याची व वाहनाची सोय करण्यांत यावी; ही गोष्ट जमेला धरून, कराची कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें प्रधान, स्पीकर व ॲडव्होकेट जनरल यांचे पगार दरमहा पांचशें रुपयांपेक्षां अधिक असतां कामा नयेत." मुंबई प्रांतांतील प्रधान ना. पाटील यांनीं मंत्र्यांखेरीज इतर सरकारी नोकरांच्या पगाराबाबत असें समर्थन केलें कीं, "पगाराबाबत लोकांची मनोरचना एकदम बदलतां येत नाहीं. मंत्र्यांनीं आपला पगार खुषीनें कमी करून घेतला आहे. सरकारी नोकरांवर सक्तीनें पगारकाट लादतां येणार नाहीं. हळूहळू या दिशेनें जातां येईल. मुंबई म्युनिसिपल कमिशनरच्या पगारांत शेंकडा ३३ काट करण्याचें कलम बिलांत घातलेंच आहे." अशाच प्रकारचें समर्थन. बिहारचे मुख्य प्रधान ना. श्रीकृष्ण सिंह यांनीं बेटिया इस्टेट मॅनेजरचा दरमहा रु. १२०० ते १५०० पगार ठरवितांना केलें आहे.

( ऊ ) खालच्या कोर्टांत चालू असलेल्या एखाद्या खटल्यांत प्रांतिक कायद्याच्या प्रामाण्याबाबत जर मुद्दा उपस्थित झाला असेल तर तो खटला हायकोर्टाकडे अर्ज केला असतां हायकोर्टाला आपल्याकडे वर्ग करून घेतां येतो. सदर अर्ज करण्याचें काम ॲडव्होकेट जनरलचें असतें (१९३५ चा कायदा—कलम २२५ ).

( ए ) वरील कलमाच्या २ ऱ्या पोटकलमांत 'गव्हर्नर'चा जो उल्लेख आला आहे त्याच्यापुढें 'आपल्या मर्जीप्रमाणें' किंवा 'आपल्या वैय-

क्तिक मताप्रमाणें' हे प्रांतिक स्वायत्ततेला बाधक होणारे शब्द नसल्यामुळें 'गव्हर्नर' याचा अर्थ 'मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागणारा गव्हर्नर' असाच घेतला पाहिजे. म्हणजे त्याच पोटकलमांत उल्लेखिलेलें 'प्रांतिक सरकार' हाच अर्थ 'गव्हर्नर' या शब्दानें प्रतीत होतो. मानाच्या दृष्टीनें हिंदुस्थानच्या अडव्होकेट जनरलानंतर पुढीलप्रमाणें प्रांतिक अडव्होकेट जनरलचा अनुक्रम लागतो:—

१ बंगाल २ मद्रास ३ मुंबई ४ संयुक्तप्रांत ५ पंजाब ६ बिहार ७ मध्यप्रांत व वऱ्हाड (आसाम. स्वतंत्र अडव्होकेट जनरल नेमल्यास) ८ वायव्यसरहद्द ९ ओरिसा १० सिंध [फीडरल कोर्ट नियम—आर्डर ७ (१२)]

(ओ) नव्या राजवटींतील मुंबई प्रांताचा पहिला अॅडव्होकेट जनरल मुंबईच्या गव्हर्नरनें नेमला त्याबद्दलचा हुकूम पुढीलप्रमाणें आहे:—

मुंबई कॅसल, ३ एप्रिल १९३७

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया अॅक्टाच्या ५५ व्या कलमान्वयें दिलेल्या अधिकारांत मुंबईच्या गव्हर्नरनें मि० केनेथ मॅक् इनटायर केंप, बॅरिस्टर अॅट लॉ. यांची मुंबई प्रांताकरितां अॅडव्होकेट जनरल म्हणून नेमणूक केली आहे.

गव्हर्नरसाहेबांच्या आज्ञेवरून,
सी. डब्ल्यू. ए. टर्नर,
सरकारचा चीफ सेक्रेटरी

दुसऱ्या अडव्होकेट जनरलच्या नेमणुकीचा हुकूम पुढीलप्रमाणें आहे:—

पोलिटिकल आणि रिफॉर्म्स डिपार्टमेंट (लीगल)

११ डिसेंबर १९३७

नं. ६६७९.

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया अॅक्टाच्या ५५ व्या कलमान्वयें दिलेल्या अधिकारांत मुंबईच्या गव्हर्नरसाहेबांनीं, सर केनेथ केंप, बॅरिस्टार अॅट लॉ. यांनीं राजीनामा दिलेल्या जागीं ११ डिसेंबर १९३७ च्या तिसरे प्रहरापासून मि० मोतीलाल चिमणलाल

सेटलवाड, बी. ए., एलएल. बी., ॲडव्होकेट, ओरिजिनल साइड, यांची मुंबई प्रांताकरितां ॲडव्होकेट जनरल म्हणून नेमणूक केली आहे.

मुंबई गव्हर्नराच्या आज्ञेवरून
एच्. एफ्. नाइट,
सरकारचा चीफ सेक्रेटरी.

पोलिस नियमांबाबत तरतूद

५६.—प्रांताच्या गव्हर्नरानें त्याच्यावर कायद्यानें सोपविलेल्या अधिकारान्वयें बिनलष्करी किंवा लष्करी पोलिसफोर्सबाबतचे नियम, रेग्युलेशन, आर्डरी इ० करावे अथवा केलेल्या नियमादिकांत दुरुस्त्या सुचवाव्या, अथवा केलेले किंवा बदललेले नियमादि पसंत करावे. अशासंबंधीची योजना (प्रपोजल) पुढे आल्यास, सदर योजना पोलिसफोर्सची संघटना किंवा शिस्त यांना स्पर्श करणारी असल्यासच, त्या योजनेबाबत गव्हर्नरने आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें अधिकार चालवावा.

'कायदा आणि सुव्यवस्था' खातें म्हणजे बहुतांशीं पोलिस खात्याची जबाबदारी मंत्र्यांवर सोपवावी अगर न सोपवावी यासंबंधीं पार्लमेंटांत बरीच भवति न भवति होऊन शेवटीं अनेक बन्धनें व कुंपणें धालून ती जबाबदारी एकदांची सोपविण्यांत आली. अशा कित्येक बंधनांपैकीं वरील पोलिसफोर्ससंबंधींचे नियम हें एक बंधन होय. याबाबत मंत्र्यांचा सल्ला घेऊनच गव्हर्नरनें नियम करावयाचे आहेत; याचें कारण उघड आहे कीं, ज्यांनीं नियमांची अम्मलबजावणी करावयाची त्यांचा हात ते नियम करण्यांत असलाच पाहिजे: नाहीं तर वारंवार कटकटी उत्पन्न व्हावयाच्या. तथापि शेवटची सत्ता गव्हर्नरकडे, इतर अनेक बाबतींतल्याप्रमाणें, ठेवण्यांत आली आहे, हें इंग्रजांच्या हिंदी लोकांविषयींच्या अविश्वासाचें व हिंदी लोकांना खरी राजकीय सत्ता देण्यास तयार नसल्याचें द्योतक आहे.

सिंध सरकारनें नेमलेल्या पुनर्घटना कमिटीनें पोलिसफोर्सबाबत पुढील शिफारशी केल्या आहेत:—

(१) पोलिस सार्जंट हिंदी नेमावेत

(२) सार्जंटचा पगार कांहीं झालें तरी पोलिस सबइन्स्पेक्टरपेक्षां जास्त असूं नये.

( ३ ) पोलिस खात्यांतील वरच्या जागांवर हिंदी इसम नेमावेत आणि त्यांचे प्रवासभत्ते कमी करावेत.

सरकार उलथून पाडण्याच्या उद्देशानें केलेल्या अत्याचाराच्या गुन्ह्याबाबत तरतूद

५७.—( १ ) ज्या अत्याचारी गुन्ह्यांचा उद्देश, गव्हर्नरच्या मताप्रमाणें, कायद्यानें प्रस्थापित झालेलें सरकार उलथून पाडण्याचा आहे असे गुन्हे करणाऱ्या किंवा त्याबाबत कट करणाऱ्या किंवा गुन्हे करण्याची तयारी किंवा प्रयत्न करणाऱ्या इसमांच्या कृत्यांमुळें प्रांताची शांतता अथवा स्वस्थता धोक्यांत आली आहे असें जर प्रांताच्या गव्हर्नरास आढळून आलें तर गव्हर्नरानें, सदर कृत्यांना तोंड देण्याकरितां स्वतः अधिकार धारण करणें परिस्थितीमुळें भाग आहे असें त्याला वाटल्यास, हुकूम काढावा कीं, हुकमांत निर्दिष्ट केलेल्या मर्यादेपर्यंत गव्हर्नरनें करावयाचीं कृत्यें तो आपल्या मर्जीप्रमाणें करील; आणि पुनः दुसरा हुकूम काढीपर्यंत गव्हर्नरनें सदर कामें तेवढ्या मर्यादेपर्यंत आपल्या मर्जीप्रमाणें चालवावीं.

( २ ) वरील हुकूम अमलांत असेपर्यंत कायदेमंडळांत भाषण करण्याकरितां व इतर तऱ्हेनें कायदेमंडळाच्या कामकाजांत भाग घेण्याकरितां गव्हर्नरनें एखाद्या अधिकाऱ्यास नेमावें; अशा अधिकृत इसमानें कायदेमंडळाच्या ( वरिष्ठ अथवा कनिष्ठ ) सभांतून अथवा जोडसभांतून अथवा गव्हर्नरानें त्याला कायदेमंडळाच्या एखाद्या कमिटीवर सभासद नेमलें असल्यास त्या कमिटींत भाषण करावें व इतर कामकाजांत भाग घ्यावा. मात्र त्याला मत देण्याचा अधिकार असणार नाहीं.

( ३ ) या कलमांतील गव्हर्नरचीं कामें तो आपल्या मर्जीप्रमाणें करील.

( ४ ) प्रांताच्या किंवा प्रांताच्या एखाद्या भागाच्या शांततेस अथवा स्वस्थतेस जबरदस्त धक्का बसूं न देण्याची गव्हर्नरवर जी खास जबाबदारी आहे तिला या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें बाध येणार नाहीं.

( अ ) वास्तविक या कलमांत उल्लेखिलेल्या अत्याचारी गुन्ह्यांचा बंदोबस्त करणें किंवा ते होऊं न देणें हें काम मंत्र्यांचें आहे; परंतु ५२ व्या कलमांतील 'खास जबाबदारी'खेरीज ही आणखी एक जादा जबाबदारी गव्हर्नराच्या शिरावर सोपविलेली आहे. ९३ कलमांतील घटनातहकुबीचे अधिकार हे या सर्वांवर कळस करणारे आहेत. याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं, मंत्र्यांवरील जबाबदारी गव्हर्नरला आपणाकडे केव्हांही घेतां यावी. अशासारख्या सर्व कलमांतून एकसूर निघतो कीं, अत्याचारामुळें प्रांतिक स्वराज्यास धोका येणार व त्याकरितां आधींपासून

कायदेशीर तरतूद करून ठेवावयास पाहिजे. परंतु सनदशीर व अनत्याचाराच्या मार्गानें अत्याचारापेक्षां किती तरी जलद व सर्वंकष क्रांति होणार असल्यामुळें हीं सर्व कलमें राज्यघटनेंत असून सुद्धां तीं निरुपयोगी ठरणार आहेत. बरें, अत्याचारी क्रांति यशस्वी होणारच असली तर हीं कलमें व त्याअन्वयें गव्हर्नरांना प्राप्त होणारे अधिकार हे तिला कसे थोपवून धरणार ?

(आ) वरीलप्रमाणें 'कायदा व सुव्यवस्था' हें खातें कांहीं काळपर्यंत चालविण्याकरितां गव्हर्नरनें काढून घेतलें तर कोणतें तरी स्वाभिमानी, बहुमताचा पाठिंबा असणारें मंत्रिमंडळ आपल्या अधिकारावर राहील काय? तें तसें न राहिल्यावर कायदेमंडळाची सभा भरवून तरी काय उपयोग ? अशी सभा भरली तर मग गव्हर्नर त्या सभेपुढें आपलें म्हणणें मांडण्याकरितां व सभागृहाची खात्री पटविण्याकरितां एखाद्या अधिकाऱ्यांची सभासद म्हणून नेमणूक करणार कीं नाहीं ? मला वाटतें, कोणतेंही लोकनियुक्त कायदेमंडळ सदर अधिकाऱ्याला आपल्या कार्यक्षेत्रांत येऊन ढवळाढवळ करूं देणार नाहीं. तेव्हां हेंही पोटकलम कायद्यांत मृतवत् पडून राहणार.

वरील दृष्टीनें या सर्व कलमांचा विचार केला तर महात्मा गांधी '१९३५ चा कायदा हा कॉंग्रेसच्या अनत्याचाराच्या व्रतास आव्हान आहे' असें जें म्हणतात त्यांतील रहस्य उमगूं लागतें.

विशिष्ट माहिती कोठून मिळाली तें बाहेर न फोडणें

५८.—याच्या मागच्या कलमामध्यें उल्लेखिलेले गुन्हे करणाऱ्या अथवा त्याबाबत कट करणाऱ्या अथवा त्याची तयारी अगर प्रयत्न करणाऱ्या इसमांच्या कृत्याबाबत ज्या ठिकाणाहून माहिती मिळाली आहे अथवा मिळण्याचा संभव आहे त्याबाबत (क) प्रांतांतील पोलिसफोर्सपैकीं एका माणसानें पोलिसफोर्सपैकींच दुसऱ्या माणसाला इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस किंवा कमिशनर ऑफ पोलिस, जी बाब लागू पडत असेल त्याप्रमाणें, यांच्या हुकमाखेरीज, किंवा दुसऱ्या कोणाही इसमाला गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें काढलेल्या हुकमाखेरीज; किंवा (ख) प्रांतांतील सरकारी नोकरांपैकीं कोणीही दुसऱ्या कोणाही इसमाला गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें काढलेल्या हुकुमाखेरीज

कागदपत्र अथवा माहिती बाहेर फोडूं नये अथवा देऊं नये हें साधण्याकरितां गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें नियम करावयाचे आहेत.

( अ ) वरील कलमांत उल्लेखिलेले नियम मुंबई गव्हर्नरनें बनविले असून ते १ एप्रिल १९३७ रोजीं गव्हर्नरच्या सेक्रेटरीच्या सहीनें प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. या नियमांची संख्या एकंदर १५ असून त्यांपैकीं ७ व्या नियमांत वेगवेगळ्या पोलिस अधिकाऱ्यांनीं कोणाकोणाला माहिती द्यावी त्यांची यादी दिली आहे ती येथें उतरून घेतों:—

( १ ) लष्करी मुख्य अधिकारी ( दक्षिण विभाग ) पुणें.

( २ ) लष्करी अधिकारी ( मुंबई जिल्हा ) मुंबई.

( ३ ) आरमारी मुख्य अधिकारी ( मुंबई ).

( ४ ) गव्हर्नरचा सेक्रेटरी, मुंबई.

( ५ ) मुंबई सरकारचा सेक्रेटरी ( गृहखातें ).

( ६ ) सार्वजनिक माहिती खात्याचा मुख्य, ( गृहखातें, हिंदुस्थान सरकार ).

( ७ ) मध्यवर्ती गुप्त पोलिस खात्याचा मुख्य, मुंबई.

( ८ ) इतर प्रांतांतील सी. आय्. डी.चे मुख्य.

( ९ ) सर्व जिल्हा मॅजिस्ट्रेट.

(१०) पोलिस सुपरिंटेंडट, जी. आय्. पी., बी. बी. सी. आय्., व एम्. एस्. एम्. रेलवे.

तसेंच १२ व्या नियमांत पोलिस अधिकाऱ्यांनीं कायद्याच्या बाबत कोणाकोणाचा सल्ला घेण्याकरितां गुप्त माहिती उघड करायला हरकत नाहीं यांची यादी दिली आहे ती अशी:—

( १ ) ॲडव्होकेट जनरल, मुंबई.

( २ ) मुंबई सरकारचा लीगल रिमेम्ब्रन्सर.

( ३ ) मुंबई सरकारचा सॉलिसिटर व पब्लिक प्रॉसिक्यूटर.

( ४ ) हायकोर्टांतील सरकारी वकील व त्याचा मदतनीस.

( ५ ) जिल्ह्यांतील सरकारी वकील आणि पब्लिक प्रॉसिक्यूटर व त्यांचे मदतनीस.

( ६ ) एखादा खटला चालविण्याकरितां मुद्दाम नेमलेले सरकारी वकील, पब्लिक प्रॉसिक्यूटर इ०

पहिल्या यादींत 'कायदा आणि सुव्यवस्था' यांना जबाबदार

असणारा मंत्री कोठेंच दिसत नाहीं यावरून हिंदी लोकांवरचा अविश्वास पुनः एकदां स्पष्टपणें प्रत्ययास येतो; व अत्याचाराचा प्रतिकार करण्याच्या सबबीवर सर्व महत्त्वाची सत्ता आपल्या हातीं केन्द्रीभूत करून ठेवण्याचा हेतु ब्रिटिश राजकर्त्यांच्या ठायीं कोठपर्यंत खोल गेला आहे हें चांगलेंच निदर्शनास येतें. अर्थात् हें कलम व त्या कलमाखालीं केलेले नियम अर्थ-शून्य व निरुपयोगी करून टाकण्याचें सामर्थ्य जागृत झालेल्या हिंदी लोकमतांत निर्माण झालें आहे यांत शंका नाहीं.

५९.—(१) प्रांतिक सरकारचीं सर्व अंमलबजावणीचीं कृत्यें गव्हर्नराच्या नांवाने केल्याचें दाखविलें जाईल.

प्रांतिक सरकाराची कामकाजाची पद्धत

(२) गव्हर्नराच्या नांवावर काढलेले हुकूम आणि इतर कागदपत्र यांवर गव्हर्नरनें केलेल्या नियमांत निर्दिष्ट केलेल्या पद्धतीप्रमाणें शिक्कामोर्तब झालें पाहिजे आणि याप्रमाणें पक्क्या झालेल्या हुकमाच्या अगर कागदपत्राच्या प्रामाण्याबद्दल तो हुकूम अथवा कागदपत्र गव्हर्नरनें काढलेला नाही, अगर केलेला नाहीं या सबबीवर तक्रार करितां येणार नाहीं.

(३) प्रांतिक सरकारचें कामकाज अधिक सोयीस्कर तऱ्हेनें चालावें याबाबतचे आणि गव्हर्नरला या कायद्याप्रमाणें ज्या गोष्टी आपल्या मर्जीप्रमाणें करणें भाग आहे तेवढ्या गोष्टी वगळून बाकीच्या कामकाजाची प्रधानांमध्यें वाटणी करण्याबाबतचे नियम गव्हर्नरानें तयार करावयाचे आहेत.

(४) प्रांतिक सरकारच्या कामकाजासंबंधाची नियमांत निर्दिष्ट केल्याप्रमाणें सर्व प्रकारची माहिती किंवा गव्हर्नर पाठवून देण्यास सांगेल ती सर्व माहिती प्रधानांनीं आणि सरकारी चिटणिसांनीं गव्हर्नरकडे पाठविण्यासंबंधींची तरतूद वरील नियमांन्वयें केली जाईल; आणि त्यांतल्या त्यांत गव्हर्नरच्या जादा जबाबदारीचा ज्याबाबत संबंध येत असेल किंवा येण्याचा संभव वाटत असेल अशा बाबी प्रधानानें गव्हर्नरच्या नजरेस आणण्यासंबंधींचे व योग्य त्या चिटणिसानें त्या त्या खात्याच्या प्रधानाच्या व गव्हर्नरच्या नजरेस आणण्याबाबतचे नियम वरील नियमांत अन्तर्भूत होतील.

(५) वरील (२), (३), (४) या पोटकलमान्वयें करावयाच्या गोष्टी गव्हर्नर आपल्या प्रधानांची सल्लामसलत घेतल्यानंतर आपल्या मर्जीप्रमाणें करील.

(अ) ४९ (१) कलमांत सांगितलें आहे कीं, राजेसाहेबांच्या-तर्फे प्रांतांची अम्मलबजावणीची सत्ता गव्हर्नर चालवील. याला धरूनच वरील कलमांतील पहिलें पोटकलम घातलें आहे. १९१९ च्या कायद्याचे वेळीं

'गव्हर्नर'च्या ऐवजीं 'प्रांतिक सरकार'च्या नांवानें सर्व हुकूम निघण्याची रूढि होती. १९३५ च्या कायद्यानें ही रूढि पार बदलून टाकली आहे. तथापि अद्यापिही कित्येक हुकूम 'प्रांतिक सरकार'च्या नांवानें निघतातः–

होम डिपार्टमेंट ( पोलिटिकल ) १५ नोव्हेंबर १९३७

"१९३२ च्या क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टाच्या १० व्या कलमाच्या ( १ ) पोटकलमान्वयें दिलेल्या अधिकारांत **मुंबई सरकार** अहमदाबाद आणि सोलापूर या शहरांत घडलेला कोणताही गुन्हा कॉग्निझेबल आणि नॉनबेलेबल मानला जाईल असें जाहीर करीत आहे."

सरकारतर्फेच्या प्रत्येक हुकमावर व कागदपत्रावर 'गव्हर्नरच्या आज्ञेवरून' कोणा तरी सरकारच्या सेक्रेटरीची सही असणार, यासंबंधींचे गव्हर्नरनें केलेले नियम अर्थात्च प्रसिद्ध झालेले नाहींत; त्यामुळें त्यांच्याविषयीं कांहींच चर्चा करितां येत नाहीं.

या सर्व सेक्रेटरींची मिळून प्रांताच्या राजधानीच्या ठिकाणीं 'सेक्रेटरिएट' म्हणून एक भली मोठी कचेरी असते. तेथून राज्यकारभाराचीं सर्व सूत्रें हालतात. आय्. सी. एस्.पैकीं हुशार व इरसाल लोक शोधून काढून त्यांची या सेक्रेटरिएटमध्यें योजना केलेली असते. या सेक्रेटरींना उद्देशूनच हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हिससंबंधीं नेमलेल्या इस्लिंग्टन कमिशनचे एक सभासद हर्बर्ट फिशर यांनीं १९१५ त पुढील उद्गार काढले होते:–"हिंदुस्थानांत इंडियन सिव्हिल सर्व्हिस हेंच सरकार आहे." हीच गोष्ट लोकमान्य टिळकांनीं हिंदुस्थान सरकारला "नोकरशाही" हें ठसठशीत व सार्थ नांव देऊन लोकांच्या मनांत बिंबविली होती. नव्या राजवटींत या सेक्रेटरींनीं आपापल्या प्रधानाच्या हुकमतीखालीं राज्यकारभार पहावयाचा आहे. 'सेक्रेटरी' हा शब्द 'सीक्रेट' म्हणजे 'रहस्य' 'गुप्त गोष्ट' या इंग्रजी शब्दापासून निघाला आहे. आपल्याजवळ असल्यामुळें ज्याला आपल्या सर्व गोष्टी कळतात व असें असूनही जो त्या गुप्त गोष्टी बाहेर फोडत नाहीं त्याचें नांव सेक्रेटरी. परंतु अतिदेशानें या शब्दाचा अर्थ अलीकडे किती तरी व्यापक झाला आहे. मुळांतला अर्थ व्यक्त करण्यास आतां 'सेक्रेटरी' शब्दामागें 'प्रायव्हेट' (खाजगी) हा शब्द घालावा लागतो. गव्हर्नरला स्वतंत्र सेक्रेटरी आहे, त्याला असिस्टंट

आहे; शिवाय गव्हर्नरला मिलिटरी सेक्रेटरी दिला आहे; तसेंच ए. डी. सी. ही असतात. मिनिस्टर किंवा प्रधानांना पार्लमेंटरी सेक्रेटरींची नेमणूक करून दिलेली आहे. सेक्रेटरिएट कचेरींतील सेक्रेटरींशीं यांचा घोटाळा करावयाचा नाहीं. त्याचप्रमाणें असेंब्लीचा स्पीकर किंवा कौन्सिलचा प्रेसिडेंट यांच्या हाताखालीं काम करणारे असेंब्ली सेक्रेटरी किंवा कौन्सिल सेक्रेटरी किंवा त्यांचे मदतनीस सेक्रेटरी हेही स्वतंत्रच आहेत.

मुंबई प्रांताचें सेक्रेटरिएट ठोकळ मानानें त्यांच्या पगारासुद्धां पुढीलप्रमाणें देतां येईल:—

### होम डिपार्टमेंट

| | |
|---|---|
| १ सेक्रेटरी | (दरमहा ३००० रु.) |
| १ अंडर सेक्रेटरी | ( ,, ७६६ + १५० रु.) |
| २ असिस्टंट सेक्रेटरी | ( ,, ६०० ते ८०० रु.) |

### पोलिटिकल आणि सर्विसिस् डिपार्टमेंट

| | |
|---|---|
| १ चीफ सेक्रेटरी | (दरमहा ३००० + ७५० रु.) |
| १ डेप्युटी सेक्रेटरी | ( ,, १२५० रु.) |
| १ असिस्टंट सेक्रेटरी | ( ,, ७७७ रु.) |

### फिनान्स डिपार्टमेंट

| | |
|---|---|
| १ सेक्रेटरी | (दरमहा ३००० रु.) |
| २ डेप्युटी सेक्रेटरी | ( ,, १८२५ + २०० रु.)<br>१६०० + २०० रु.) |
| २ असिस्टंट सेक्रेटरी | ( ,, ५०० रु. ते ८०० रु.) |

### रेव्हिन्यू डिपार्टमेंट

| | |
|---|---|
| १ सेक्रेटरी | (दरमहा ३००० रु.) |
| १ डेप्युटी सेक्रेटरी | ( ,, २००० + २०० रु.) |
| २ असिस्टंट सेक्रेटरी | ( ,, ६०० ते ८०० रु.) |

### जनरल आणि एज्युकेशनल डिपार्टमेंट

| | |
|---|---|
| १ सेक्रेटरी | (दरमहा ३००० रु.) |

१ अंडर सेक्रेटरी ( दरमहा ९२५ रु. )
१ असिस्टंट सेक्रेटरी ( ,, ६०० ते ९५० रु. )

## लीगल डिपार्टमेंट

१ सेक्रेटरी व लीगल रिमेंब्रन्सर ( दरमहा ३००० रु. )
१ असिस्टंट लीगल रिमेंब्रन्सर ( ,, १५७५ रु. )
१ डेप्युटी सेक्रेटरी ( ,, २०००+१५० रु. )
२ असिस्टंट सेक्रेटरी ( ,, ६०० ते ९५० रु. )
१ पर्सनल असिस्टंट,
लीगल रिमेंब्रन्सर ( ,, ३०० ते ६५० + १०० रु.)

## पब्लिक वर्क्स डिपार्टमेंट

३ सेक्रेटरी व डेप्युटी सेक्रेटरी ( दरमहा सर्व मिळून ५९५० रु. )
१ असिस्टंट सेक्रेटरी ( ,, ७५० रु. )

या विविध सेक्रेटरींचा दर्जा क्रमानें पुढीलप्रमाणें असतो:—

१ चीफ सेक्रेटरी
२ सेक्रेटरी
३ ॲडिशनल सेक्रेटरी
४ जॉइंट सेक्रेटरी
५ डेप्युटी सेक्रेटरी
६ अंडर सेक्रेटरी
७ असिस्टंट सेक्रेटरी
८ ॲडिशनल असिस्टंट सेक्रेटरी

मुंबई प्रांतांत सध्यां (जून १९३८) वरील साती खात्यांचे सेक्रेटरी पुढीलप्रमाणें आहेत: —

१ वाइल्स ( चीफ सेक्रेटरी, पोलिटिकल व सर्व्हिस खातें )
२ स्लेडन ( गृहखातें )
३ पेरी ( रेव्हिन्यू खातें )
४ भनसाळी ( जनरल व शिक्षणखातें )

५ आय्यंगार (फिनान्स खातें)
६ ऐटकेन (पी. डब्ल्यू. डी. खातें)
७ धुरंधर (लीगल खातें)

वरीलपैकीं भनसाळी, धुरंधर व आय्यंगार हे हिंदी गृहस्थ असून बाकीचे चारी—बाइल्स, स्लेडन, पेरी व ऐटकिन हे युरोपियन आहेत हें लक्षांत येईल.

(आ) या कलमाला धरून गव्हर्नराला दिलेल्या 'आज्ञापत्रां'तील १३ व्या कलमांत "प्रांताच्या उत्पन्नाशीं संबंध असणाऱ्या, प्रधानाच्या कोणत्याही योजनेबाबत अर्थमंत्र्याची सल्लामसलत घेतली पाहिजे व अर्थ-मंत्र्याचें मत विरुद्ध पडल्यास ती बाब प्रधानमंडळापुढें मांडली पाहिजे; एवढ्याकरितां गव्हर्नरनें योग्य ते कामकाजासंबंधीं नियम करावेत" अशी स्पष्ट सूचना दिली आहे. याव्यतिरिक्त सदरहू नियमासंबंधीं त्या आज्ञापत्रांत एकच उल्लेख आहे. तो असा कीं, "अल्पसंख्याक जमातींकडून आलेल्या कोणत्याही तक्रारीबाबत सरकारनें ताबडतोब लक्ष घातलें पाहिजे. या-यासंबंधींची तरतूद गव्हर्नरानें नियमांत करून ठेवावी."

वरील कलमान्वयें सेक्रेटरी, डेप्युटी सेक्रेटरी, अंडर सेक्रेटरी, व असिस्टंट सेक्रेटरी इतक्यांना गव्हर्नरच्या नांवानें हुकमावर अगर सरकारी कागदपत्रावर शिक्कामोर्तब करण्याचा अधिकार दिल्याचें मद्रासच्या गव्हर्नरनें पुढील नियम करून जाहीर केलें आहे (१ एप्रिल १९३७):—

"(१) मद्रास सरकारतर्फे अगर त्याच्या आज्ञेप्रमाणें काढलेले हुकूम अथवा इतर कायदेशीर लेख हे मद्रासच्या गव्हर्नरच्या नांवानें अथवा त्याच्या हुकुमावरून काढले असल्याचें स्पष्ट दिग्दर्शित केलें जाईल.

(२) एखाद्या अधिकाऱ्यास मद्रास सरकारतर्फे एखाद्या लेखावर अगर हुकमावर सही करण्याचा अधिकार दिला असल्यास तेवढी बाब वगळून बाकीच्या प्रत्येक लेखावर अगर हुकमावर सेक्रेटरी, ऑडिशनल सेक्रेटरी, जॉइंट सेक्रेटरी, डेप्युटी सेक्रेटरी, अंडर सेक्रेटरी अथवा असिस्टंट सेक्रेटरी यांपैकीं कोणा तरी एकानें सही केली असली पाहिजे; आणि अशी सही असली म्हणजे त्या लेखावर अगर हुकमावर योग्य शिक्कामोर्तब झालें आहे असें समजण्यांत येईल.

( ३ ) सरकारनें काढलेल्या हुकमांच्या **नकलांवर** सेक्रेटरीएट-मधील निरनिराळ्या खात्यांतील सुपरिंटेंडेंटांनीं सही केल्यास वरीलप्रमाणेंच कार्यभाग झाला असें मानण्यांत येईल, असा गव्हर्नरसाहेबांचा हुकूम आहे."

( फोर्ट सेंट जॉर्ज, गव्हमेंट ऑर्डर नंबर ६३९, १।४।३७ )

( इ ) सर्व हुकमांवर जरी " गव्हर्नरांचे आज्ञेवरून " असें लिहिलें असलें तरी ज्या बाबी गव्हर्नराच्या **मर्जीप्रमाणें** अगर **वैयक्तिक मताप्रमाणें** निर्णिल्या जातील त्यांवर गव्हर्नराच्या हुकमानेंच परंतु गव्हर्नरच्या सेक्रेटरीची सही असावयास पाहिजे व ज्या बाबींचा निर्णय प्रधानमंडळानें आपल्या अधिकारांत केलेला असेल त्यावर गव्हर्नरच्या हुकमान्वयें असें म्हटलें असलें तरी सरकारच्या कोणत्या तरी सेक्रेटरीची सही असावयास पाहिजे; या भेदावरून कोणत्या कृत्यास कोण जबाबदार आहे तें स्पष्टपणें निदर्शनास येण्यासारखें आहे. असा नियम केलेला किंवा अमलांत आलेला दिसत नाहीं. ३०-३०५ कलमान्वयें गव्हर्नरनें आपला सेक्रेटरी 'स्वतःच्या मर्जीप्रमाणें' नेमावयाचा आहे, तो हुकूम त्यानें स्वतः काढला असला तरी 'स्वतःच्या मर्जीप्रमाणें' हे शब्द त्यांत नाहींत. तसेंच ६२ ( २ ) कलमाप्रमाणें गव्हर्नरनें 'आपल्या मर्जीप्रमाणें' कायदेमंडळाचें अधिवेशन बोलवावयाचें असतें. त्याही हुकमांत वरील गव्हर्नरची जबाबदारी स्पष्ट करणारे शब्द घातलेले दिसून येत नाहींत.

वरील ( आ ) मध्यें मद्रास गव्हर्नरनें जे नियम जाहीर केले आहेत त्यासारखेच नियम बहुधा इतर प्रांतांतून केलेले असणार. याबाबत बिहार सरकारच्या चीफ सेक्रेटरीनें ( मि० ब्रेट ) काढलेल्या सरक्युलरकडे साहजिकच लक्ष वेधलें जातें. " प्रधानांनीं आपल्या सहीनें अथवा त्यांच्या वतीनें पार्लमेंटरी अथवा प्रायव्हेट सेक्रेटरीनें जिल्हाधिकाऱ्यांना हुकूम पाठविले असल्याचें ऐकतों. याबाबत कायदेशीर परिस्थिति काय आहे तें तेराव्या नियमाच्या आधारानें मी आपल्या निदर्शनास आणूं इच्छितों. त्याअन्वयें सर्व हुकमांवर सेक्रेटरी, अंडर सेक्रेटरी, अथवा असिस्टंट सेक्रेटरी यांपैकीं कोणाची तरी सही असली पाहिजे. यांखेरीज कोणाच्या सहीचे हुकूम आपण जर पाळलेत तर

त्याची जबाबदारी आपणावरच राहील व त्याचे परिणाम आपणासच भोगावे लागतील." अशा अर्थाचें तें सरक्युलर होतें. त्याचा मतलब असा कीं, सेक्रेटरीची सही असल्याशिवाय प्रधानाचा हुकूम खरा मानतां कामा नये. या सरक्युलराबाबत खुलासा करितांना बिहारचे मुख्य प्रधान बिहार असेंब्लींत म्हणाले, " मि. ब्रेटनें 'आपण तें खाजगी नात्यानें सरक्युलर काढलें होतें व तें सुद्धां जिल्हाधिकाऱ्यांनीं याबाबत विचारणा केल्यावरून,' असा अलीकडे खुलासा केला आहे. प्रधानमंडळाची या सरक्युलरामुळें चमत्कारिक स्थिति झाली याबद्दल मि. ब्रेटनें खेद व्यक्त केला आहे. प्रधानमंडळानें मि. ब्रेटचा खुलासा मान्य केला असून सर्व जिल्हाधिकाऱ्यांना कळविण्यांत आलें आहे कीं, 'मि. ब्रेटनें आपलें खासगी मत त्या सरक्युलरांत कळविलें होतें व तो कांहीं प्रांतिक सरकारचा हुकूम नव्हता, म्हणून तें सरक्युलर आतां परत घेण्यांत आलें आहे.' प्रधानमंडळानें आणखी याबाबत असा हुकूम काढला आहे कीं, सरकारला विचारल्याशिवाय सरकारी हुकमाचें विशदीकरण अथवा त्याच्या अर्थाची फोड करून सांगणें ही कामें कोणत्याही सेक्रेटरीनें खालच्या अधिकाऱ्यांना पत्रें लिहून करतां कामा नयेत. सदर खाजगी पत्रानें उत्पन्न झालेला गैरसमज या हुकमानें दूर होईल असा सरकारला विश्वास वाटतो." वरून गव्हर्नर व खालून सेक्रेटरी हे प्रधानांच्या मार्गांत कशा प्रकारचे अडथळे आणतात व त्यांची सत्ता न जुमानण्यास इतरांना कसे प्रवृत्त करतात याची चांगली कल्पना या ब्रेट-सरक्युलर प्रकरणावरून येते.

( ई ) या ५९ व्या कलमाच्या ( ४ ) पोटकलमांत प्रधानानें गव्हर्नरकडे व सेक्रेटरीनें प्रधान व गव्हर्नर यांचेकडे कामें पाठविण्यासंबंधीं उल्लेख आहे. वास्तविक सेक्रेटरींचें काम प्रधानांकडे जाणें एवढेंच असावयास पाहिजे, परंतु या कलमानें त्यांना साक्षात् गव्हर्नरकडेही कामें परस्पर पाठविण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. हें खऱ्या जबाबदार राज्यपद्धतीच्या दृष्टीनें अत्यंत चुकीचें आहे. परंतु गव्हर्नरकडे ठेवलेले जादा अधिकार ही या नव्या कायद्याची गुरुकिल्ली मानली म्हणजे पुढील सगळा ग्रंथ उलगडतो. प्रधानांच्या डोक्यांवर सेक्रेटरींना मिरे वाटूं देण्यापैकींच वरील प्रकार आहे. हाच प्रकार १९१९ च्या कायद्यां-

तही होता, परंतु तसा स्पष्ट उल्लेख नव्हता. तो या कायद्यांत स्पष्टपणें प्रविष्ट केला आहे. द्विदल राज्यपद्धतीच्या प्रारंभीं या प्रकाराबद्दल पुष्कळच हाकाटी झाली होती ( मुडिमन कमिटी रिपोर्ट ). चालू प्रांतिक स्वराज्याच्या काळांतही या प्रश्नाबाबत ओरिसा प्रांतांत गव्हर्नर व प्रधान यांच्यामध्यें कटकटी उत्पन्न झाल्या होत्या; परंतु त्या सामोपचारानें मिटल्या. वास्तविक, कायदा इतक्या बंधनांनीं व कुंपणांनीं भरून गेला आहे कीं, अशा कटकटी किंवा पेचप्रसंग नित्य न उत्पन्न होतील तरच आश्चर्य !

( उ ) (२), (३), (४) या पोटकलमांतून ज्या नियमांचा उल्लेख आला आहे ते नियम गव्हर्नरानें आपल्या मर्जीप्रमाणें करावे असें ( ५ ) व्या पोटकलमांत सांगितलें आहे. परंतु ते 'प्रधानांचा सल्ला घेऊन करावे' असें स्पष्ट लिहिलें आहे ही मोठी खैरच झाली म्हणावयाची ! नाहीं तर ज्यांनीं राज्यकारभाराचीं कामें चालवावयाचीं त्यांना तीं कशीं चालवावींत यासंबंधींचे नियम करतांना आपलें म्हणणें मांडण्याला कांहींच जागा राहिली नसती. तेव्हां, या ठिकाणीं गव्हर्नरच्या 'मर्जी'ला थोडा लगाम घालण्याचा प्रयत्न केल्याचें आढळून येतें !

मद्रास हायकोर्टाचे न्यायमूर्ति हॉरविल यांनीं बाटलीवाला खटल्यांतलि अपिलाच्या निकालांत म्हटल्याप्रमाणें या एका ५९ व्या कलमाखेरीज १९३५ च्या कायद्यांत कोठेंही 'गव्हर्नराला मंत्र्यांचा सल्ला घेणें भाग असल्याचा' उल्लेख नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

( ऊ ) ५९ (३) पोटकलमांत सांगितल्याप्रमाणें प्रांतिक गव्हर्नरानें निरनिराळ्या प्रधानांत प्रांताच्या राज्यव्यवस्थेबाबतच्या कामांची वाटणी करावयाची असते. प्रधानांमध्यें खात्याची वाटणी कशी केलेली असते व त्या प्रत्येक खात्यांत बारीकसारीक विषयांची किती भरती असते याची योग्य कल्पना येण्याकरितां मुंबई प्रांतांतील यासंबंधींची माहिती यापुढें विस्तारानें देत आहे:—

**१ नामदार खेर, मुख्य प्रधान, यांच्याकडे सोपविलेल्या विषयांची यादी.**

१ प्रांतिक सरकारी नोकरी कमिशन.

२ भारतमंत्र्याकडून ज्या नोकऱ्यांवर व जागांवर नेमणूक केली गेली आहे त्यासंबंधींच्या सर्व गोष्टी.

३ सर्व खात्यांतील नोकरवर्गाचे हक्क व न्याय्य हितसंबंध यांचें संरक्षण.

४ वर्गीकरण आणि ( नोकरींत ) भरती याबाबतचे नियम.

५ सरकारी नोकरींत सर्व जाती आणि जमाती यांचें योग्य प्रमाण राखण्याबद्दलचे उपाय.

६ वागणूक, शिस्त आणि अपील यांसंबंधीं नियम— यांत सरकारी नोकरांच्या वर्तनाबाबतचे नियम अंतर्भूत समजावयाचे.

७ निरनिराळ्या खात्यांतील परीक्षा.

८ फॅमिली पेन्शन फंडाचे नियम—यांत इंडियन सिव्हिल सर्व्हिस फॅमिली पेन्शन फंड आणि सुपीरियर सर्व्हिसिस ( इंडिया ) फॅमिली पेन्शन फंड यांचा समावेश होतो.

९ प्रॉव्हिडंट फंडाचे नियम ( ऑल इंडिया सर्व्हिसिस्‌संबंधींचे धरून ).

१० सरकारी नोकरांच्या संस्था.

११ अखिल भारतीय आणि प्रांतिक नोकऱ्यांमधील अधिकाऱ्यांच्या नेमणुका, कामाच्या जागा, बदल्या, बढत्या; तसेंच त्यांचें वर्तन, रजा देणें इ०

१२ सरकारी सुट्या.

१३ प्रांतिक प्रधानांचे पगार.

१४ सेक्रेटरीएटमधील स्टँडिंग ऑर्डरी; सरकारी रिकार्डें, खलिते, अर्ज, अधिकृत पत्रव्यवहार.

१५ प्रधानमंडळाच्या सभांची व्यवस्था.

१६ मुंबई, पुणें व महाबळेश्वर या ठिकाणीं सरकारचें वास्तव्यार्थ येणें.

१७ बॉयलर.

धुराची कटकट.

१८ फॅक्टरी ( कारखाने ).

कापसांतील सरकी काढणें व त्याचे गठ्ठे करणें.

१९ मजुरांच्या सुखसोयी, मजुरांची हलाखी; प्रॉव्हिडंट फंड, मालकांची जबाबदारी व कामकऱ्यांना नुकसानभरपाई; आरोग्यविमा ( निकामी माणसाला मिळणारें पेन्शन यांत येतें ); म्हातारपणचें पेन्शन.

मजूर कचेरीची देखरेख. मटर्निटी बेनिफिट्स ॲक्ट ( बाळंतपणांतील सुखसोयींबाबत कायदा ).

२० बेकारी विमा.

२१ मजूर-संघ ( ट्रेड यूनियन ), औद्योगिक व मजूरविषयक तंटे ( संप धरून ).

२१ (अ) औद्योगिक गृहयोजनेची व्यवस्था पाहणें.

२२ अन्तर्गत जलमार्गांवर यांत्रिक साहाय्यानें चालणारीं जहाजें व नौकानयन आणि अशा जलमार्गांवरील रथ्यानियम; अन्तर्गत जलमार्गांवरील उतारूंची व मालाची नेआण.

२३ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत चौकशी आणि आंकडेवार माहिती.

२४ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत घेतली जाणारी फी पण तींत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अंतर्भाव होत नाहीं.

२५ दक्षिणेंतील आणि गुजराथेंतील सरदार.

२६ सरंजाम.

२७ तोफखाना.

२८ जमिनींतून उकरून काढलेल्या वस्तु, हरवलेलीं माणसें. मृत इसमांच्या इस्टेटी.

२९ प्रांतिक गॅझीटियर ( वर्णनात्मक पुस्तकें ), अधिकृत रीत्या लिहिलेल्या हकीकती.

३० वयाचे आणि राष्ट्रीयत्वाबद्दलचे दाखले.

३१ सेपरेट ( स्वतंत्र, किरकोळ ) खात्यासंबंधींच्या सर्व बाबी.

३२ जनरल ॲड्मिनिस्ट्रेशन ( एकंदर राज्यकारभाराबाबतचा ) रिपोर्ट.

३३ रशियांतील मालमत्तेबाबतचे हक्कदार.

३४ मुंबई सरकारचा संबंध येणाऱ्या, हिंदी संस्थानांतील कालव्यांच्या योजना आणि रस्ते.

३५ हिंदी संस्थानांचा संबंध येणारे, सीमेबाबतचे तंटे.

३६ हिंदी संस्थानांबरोबर करावयाचे अबकारी करार.

३७ हिंदी संस्थानें— फरारी कैदी योग्य अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करणें, शिक्षा झालेले इसम, वेडीं माणसें, समन्स बजावणें.

३८ पूर्वापर मानाबाबतचें वॉरंट आणि तद्विषयक तक्ता.

३९ परदेशसंबंध; इतर देशांशीं केलेले तह आणि करार अमलांत आणणें, फरारी कैदी स्वाधीन करणें— यांत हिंदुस्थानाबाहेरील राजेसाहेबांच्या प्रदेशांना कैदी आणि आरोपी यांना स्वाधीन करण्याचा अंतर्भाव होतो.

४० भिक्षुक खातें— यांत युरोपियन दफनभूमींचा अंतर्भाव होतो.

४१ पोस्ट आणि तार खातें; यांत टेलिफोन, बिनतारी, रेडिओ आणि इतर संदेशसाधनांचा समावेश होतो; पोस्ट ऑफिस सेव्हिंग्ज बँक.

४२ पुढील कामाकरितां असलेल्या फीडरल (मध्यवर्ती) संस्था व एजन्सी:—

संशोधन, धंदेविषयक अगर औद्योगिक अध्यापन, विशेष अभ्यासांना उत्तेजन.

४३ हिंदुस्थानची प्राणिविषयक पाहणी, फीडरल हवामानशास्त्रविषयक संस्था, वेधशाळा, भूकंप, पूर, ग्रहणें, आगी.

४४ खानेसुमारी.

४५ हिंदुस्थानांत प्रवेश देणें आणि हिंदुस्थानांतून बाहेर जाणें किंवा घालविणें— यांत हिंदुस्थानांत रहिवाशी झालेले ब्रिटिश प्रजाजन नसलेले, फेडरेशनमध्यें सामील झालेल्या संस्थानचे प्रजाजन नसलेले किंवा युनायटेड किंगडममध्यें रहिवाशी झालेले ब्रिटिश प्रजाजन नसलेले, अशा इसमांच्या हिंदुस्थानांतील हालचालींवर नियंत्रण ठेवण्याचा समावेश होतो.

४६ दर्यावर्दी जहाजें आणि नौकानयन— यांत खाड्यांमधील नौकानयनाचाही अंतर्भाव होतो; आरमाराचें अधिकारक्षेत्र.

(क) इंडियन स्टीम व्हेसल्स ॲक्ट आणि

( ख ) इंडियन रेजिस्ट्रेशन ऑफ शिप्स ॲक्ट, १८४१ आणि १८५०.

४७ मोठीं बंदरें--- अशीं बंदरें जाहीर करणें व त्यांच्या मर्यादा ठरविणें, त्यांतील बंदर-अधिकारीमंडळाची रचना व अधिकार.

४८ दीपगृहें--- यांत दीपनौका, खुणेच्या आगी, जहाजें आणि विमानें यांच्या संरक्षणासाठीं योजिलेल्या इतर तरतुदींचा अन्तर्भाव होतो.

४९ प्रकाशनावरील हक्क, शोध, डिझाइन, ट्रेड मार्क आणि मालाची विशिष्ट खूण.

५० हत्यारें; बंदुका; दारूगोळा; ( हिंदुस्थानांतील आणि हिंदुस्थानाबाहेरील परदेशी ठिकाणांना हत्यारें आणि दारूगोळा निर्गत करण्याच्या परवान्यापुरता ).

५१ स्फोटक द्रव्यें.

५२ पेट्रोलियम आणि फीडरल कायद्यानें भयंकर पेट घेणारे म्हणून ठरविण्यांत आलेले पातळ पदार्थ आणि इतर द्रव्यें– तीं जवळ बाळगणें, साठवून ठेवणें व इकडून तिकडे नेणें यापुरतीं.

कॅलशम कारबाइडबाबतचे नियम.

५३ एतद्देशीय होण्याची क्रिया.

५४ गव्हर्नराच्या अगर चीफ कमिशनरच्या प्रांतांतून अगर प्रांतांत रहावयास जाणें.

५५ संरक्षण, परदेशीय संबंध अगर एतद्देशीय संस्थानांशीं संबंध या बाबींसंबंधींच्या राजकीय कारणास्तव ब्रिटिश हिंदुस्थानांत आगाऊ खबरदारी घेण्यासाठीं केलेली अटक.

५६ राजकीय पेन्शनें.

५७ समारंभ– यांत दरबार, राजकीय गणवेष ( युनिफॉर्म ), बादशहांना दिलेलीं मानपत्रें, प्रख्यात लोकांचें स्वागत, दरबारी शोकपालन इ० चा समावेश होतो.

५८ परराष्ट्रांचे वकील ( त्यांच्या नेमणुकी, रजा इ० ).

५९ पासपोर्ट ( परदेश प्रवासपरवाना ).

६० युरोपांतील रहिवाशी असणाऱ्या परदेशस्थांना त्या त्या सर-

कारांच्या हवालीं करणें, पोर्तुगीज हिंदुस्थानांतून ब्रिटिश प्रजानन स्वाधीन करून घेणें आणि याच्या उलट सर्व क्रिया.

६१ ब्रिटिश हिंदुस्थानांत परदेशी लोकांना प्रवेश देणें व त्यांना ब्रिटिश हिंदुस्थानांतून हद्दपार करणें; हिंदुस्थानांतील परदेशी मिशनरी किंवा ख्रिस्ती धर्मप्रचारक.

६२ प्रांताच्या ताब्यांत असलेल्या अगर प्रांतिक तिजोरींतून खर्च चाललेल्या लायब्ररी (पुस्तकसंग्रह), म्यूझियम्स (पदार्थसंग्रहालयें) आणि इतर अशाच संस्था.

पुस्तकसंग्रह नोंदवून घेणें.

६३ शिक्षण (यांत धंदेविषयक शिक्षण व युरोपियन आणि अँग्लो-इंडियन शिक्षण यांचा अंतर्भाव होतो).

६४ हिंदी चित्रपटांच्या निर्मितीला आणि प्रसृतीला उत्तेजन आणि शैक्षणिक, शास्त्रीय व करमणुकीचे चित्रपट दाखविणें आणि त्यांचा उपयोग.

६५ १९३५ च्या गव्हमेंट ऑफ इंडिया ॲक्टान्वयें होणाऱ्या, फीडरल कायदेमंडळाच्या पहिल्या निवडणुकी.

६६ इतर कोणाही प्रधानाकडे न सोपविलेला दुसरा कोणताही विषय.

**२ नामदार लट्ठे; अर्थमंत्री, यांच्याकडे सोपविलेल्या विषयांची यादी.**

१ कर्ज (यांत प्रांताच्या सरकारी कर्जाचा अंतर्भाव होतो) सरकारी आणि इतर कर्जरोखे, ठेवींच्या रकमा व्याजीं लावणें.

२ अर्थोत्पत्तीचीं साधनें.

३ हिशेबतपासणी.

४ फीडरल आणि प्रांतिक कर बसविणें—यांत स्थानिक स्वराज्य-संस्थांनीं बसविलेल्या करांचा समावेश करावयाचा नाहीं.

५ प्रांतिक अंदाजपत्रक तयार करणें. अंदाज आणि खर्चाच्या मागण्या. एन्. एस्. ग्रुप पोर्ट फंडांचीं अंदाजपत्रकें, घोडेस्वार आणि ठाणा फंड, लँडिंग व व्हार्फेज फी फंड, उत्तर सरहद्द घोडेस्वार पलटण घोडा फंड.

६ खर्ची पडलेल्या रकमांसंबंधींचे रिपोर्ट.

७ मर्जीखातर द्यावयाच्या आणि पंचवार्षिक ठराविक देणग्या.

८ हिशेबासंबंधींचे सर्वसाधारण प्रश्न आणि ट्रेझरींतील काम-काजाची पद्धत.

९. अर्थविषयक अधिकार दुसऱ्याला सुपूर्त करणें.

१० मुंबई शहरांतील स्थानिक संस्थांना द्यावयाचीं कर्जें.

११ गव्हर्नरच्या राहत्या घरांबाबत होणारा खर्च.

( यांत इमारती इ० बद्दलचा खर्च वगळायचा )

१२ मुख्य प्रधानांकडे सोपविलेल्या विषयांच्या यादींतील दुसऱ्या आणि तिसऱ्या क्रमांकांतील विषयांना बाध न आणतां, नोकरांचा पगार, भत्ता, पेन्शनें, आणि नोकरींतील अर्थविषयक बाबी आणि काडर ( कायम स्वरूपाचा बीजभूत अधिकारी वर्ग—हा आणीबाणीच्या प्रसंगीं हवा तितका वाढवितां येतो ) बाबत अर्थविषयक गोष्टी.

१३ जमाखर्चविषयक प्रसिद्ध केलेलीं पुस्तकें.

१४ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत केलेली चौकशी आणि गोळा केलेली आंकडेवार माहिती.

१५ मुंबई कर्जरोखा आणि कापूस-बाजार.

१६ चलन, नाणीं आणि कायदेशीर चलन म्ह० लीगल टेंडर ( टांकसाळी ),

१७ फीडरल सरकारनें ठरविलेल्या जकात सरहद्दींवरलि आयात आणि निर्गत.

१८ व्यापार, उदीम आणि व्यापारी संस्था.

१९ पेढ्यांचे व्यवहार ( बँकिंग ).

२० मालविक्रीवरील आणि जाहिरातीवरील कर.

२१ रेल्वेनें अथवा विमानमार्गें नेल्या जाणाऱ्या मालावरील अथवा उतारूंवरील टर्मिनल कर; रेल्वे दर आणि भाडीं यांवरील कर.

२२ इलाख्याच्या महसुलाशीं संबंध असणाऱ्या दुसऱ्या कोणत्याही बाबी.

**३ नामदार मुनशी, गृह ( आणि कायदा) मंत्री, यांच्याकडे सोपविलेले विषय.**

## गृहखातें

१ सार्वजनिक शांतता, यांत खालील गोष्टींचा अंतर्भाव होतो—

( १ ) अंतर्गत सुरक्षितता आणि हिंदुस्थानचें संरक्षण ( आरमारी, लष्करी अगर हवाई ); अंतर्गत स्वास्थ्याशीं संबंध पोंचणाऱ्या गोष्टी ( यांत मुलकी सत्तेच्या मदतीला बादशाही आरमार, लष्कर अगर विमानदल यांतील सैन्याच्या उपयोगाचा समावेश होतो );

( २ ) ऑक्झिलियरी फोर्स ॲक्ट, १९२०;

( ३ ) इंडियन आर्मी राखीव अम्मलदार आणि त्यांची पुनर्घटना;

( ४ ) हिंदी लष्करांतील अधिकाऱ्यांची बढती;

( ५ ) हिंदुस्थान सरकारकडून आणि डिव्हिजनल रिक्रूटिंग हपीसरांकडून सैन्यभरतीबाबत आलेले संदेश;

( ६ ) नैमित्तिक घडामोडी; जातीजातींतील संबंध, दंगे व खळबळी.

जे. पी. ( जस्टिस ऑफ दि पीस ) ची नेमणूक, मॅजिस्ट्रेटचे अधिकार देणें आणि काढून घेणें.

२ न्यायदान, सर्व कोर्टांची रचना, अधिकारक्षेत्र आणि अधिकार, दिवाणी आणि मुलकी कोर्टांतील कामकाजाची पद्धत ( यांत या कायद्याच्या २९६ कलमान्वयें स्थापन झालेल्या रेविन्यू अपील कोर्टांतील कामकाजाची पद्धत वगळावयाची ).

डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट रिलीफ ॲक्ट ( दक्षिणेंतील शेतकऱ्यांच्या मदतीचा कायदा ).

मामलतदार कोर्टांचा कायदा.

३ पोलिस—रेल्वेपोलिस व गांवपोलिस धरून.

४ तुरुंग आणि प्रमाणित शाळा, बोर्स्टल संस्था व अशाच तऱ्हेच्या इतर संस्था आणि त्यांतून अडकवून ठेवलेले इसम; तुरुंग आणि इतर संस्था यांच्या उपयोगाबाबत इतर घटकांबरोबर ( प्रांत अगर संस्थानें ) करण्यांत यावयाच्या तरतुदी.

दरिद्रगृहें.

मुक्तिफौजेचीं गृहें ( सुधारणागृहें )
कैद्यांना मदत करणाऱ्या संस्था.
पूर्वी सैन्यांत असलेल्या अपराध्यांची हद्दपारी.

५ सावकारी आणि सावकार.

६ शर्यती आणि जुगार.

७ या कायद्याच्या सातव्या शेड्यूलमधील दुसऱ्या यादींतील, गृह ( आणि कायदा ) मंत्र्याकडे सोपविलेल्या कोणत्याही बाबीबाबतच्या कायद्याविरुद्ध झालेले गुन्हे.

८ फौजदारी कायदा— यांत हा कायदा मंजूर होण्याच्या तारखेला इंडियन पीनल कोडांत अंतर्भूत असलेल्या सर्व बाबींचा समावेश होतो, परंतु त्यांत, कायद्याच्या सातव्या शेड्यूलमधील पहिल्या अगर दुसऱ्या यादींत निर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बाबीबाबतच्या कायद्याविरुद्ध झालेले गुन्हे, आणि मुलकी सत्तेच्या मदतीकरितां बादशाही आरमार, लष्कर अगर विमानदळ यांचा उपयोग, या दोन्ही गोष्टी धरावयाच्या नाहींत.

९. क्रिमिनल प्रोसीजर— यांत हा कायदा मंजूर होण्याच्या तारखेला क्रिमिनल प्रोसीजर कोडांत अंतर्भूत असलेल्या सर्व बाबींचा समावेश होतो.

१० एका प्रांतांतून अगर राज्यांतून दुसऱ्या प्रांतांत अगर राज्यांत कैदी आणि आरोपी यांना हलविणें.

११ सिव्हिल प्रोसीजर— यांत मुदतीचा कायदा आणि हा कायदा मंजूर होण्याच्या तारखेला सिव्हिल प्रोसीजर कोडांत अंतर्भूत असलेल्या सर्व बाबींचा समावेश होतो; प्रांताच्या बाहेर उपस्थित होणारे, कर आणि इतर सरकार देणें ( यांत जमीन महसुलाच्या बाक्या आणि या बाक्या म्हणून वसूल करण्याजोग्या रकमा यांचा अंतर्भाव करावयाचा) या संबंधींचे हक्क प्रांतांतून वसूल करून देणें.

१२ पुरावा आणि शपथा; कायद्यांना मान्यता देणें; सरकारी ॲक्ट, रिकार्ड आणि न्यायविषयक कामकाज. प्रांतिक लॉ रिपोर्ट ( खटल्यांच्या हकिकती ).

१३ विवाह आणि काडीमोड; अर्भकें आणि अज्ञान; दत्तक; ( विवाहांची नोंदणी याच्याखेरीज ).

१४ मृत्युपत्रें, मृत्युपत्राहित्य आणि वारसा ( शेतजमिनीबाबत वरील गोष्टींखेरीज ).

१५ ट्रस्ट आणि ट्रस्टी.

१६ करारमदार—यांत भागीदारी, एजन्सी, वाहतुकीचे व इतर विशिष्ट करार येतात परंतु शेतजमिनीसंबंधींचे करार येत नाहींत.

१७ आर्बिट्रेशन ( लवादपद्धति ).

१८ दिवाळखोरी आणि नादारी, ॲडमिनिस्ट्रेटर जनरल आणि ऑफीशियल ट्रस्टी.

१९ खटला होण्याजोग्या इजा—या कायद्याच्या सातव्या शेड्यूलमधील पहिल्या अगर दुसऱ्या यादींत निर्दिष्ट केलेल्या कोणत्याही बाबीसंबंधींच्या कायद्यांत अंतर्भूत केल्या असतील तेवढ्या वगळून.

२० विषें आणि मारक औषधी.

२१ प्राण्यांना निर्दयतेनें वागविण्यास बंदी करणें.

२२ युरोपियन भटक्ये; गुन्हेगार जाती.

२३ वाहनें—यांत्रिक साहाय्यानें चालणारीं वाहनें धरून मोटारगाड्या आणि सार्वजनिक वाहनें. मोटारगाड्यांवरील कराच्या कायद्याची अम्मलबजावणी—प्रांतिक रस्तानिधी वगळून.

२४ या यादींतील कोणत्याही बाबीकरितां करावयाची चौकशी आणि गोळा करावयाची आंकडेवार माहिती.

२५ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत द्यावयाची फी, परंतु तींत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अंतर्भाव होत नाहीं.

२६ गुन्हेगार वेडे.

२७ कॉरोनर ( अत्याचारामुळें अगर अपघातानें मेलेल्या माणसांच्या प्रेतांसंबंधीं व प्रेतांवर तपासचौकशी करणारा अधिकारी )

२८ बेकायदेशीरपणें सुटका करणें.

२९ मुंबई शहरांतील गुरांचे कोंडवाडे.

३० खासगी आणि गुप्त कोड ( ठराविक शब्द अगर खूण अगर चिन्ह ).

३१ हत्यारें; बंदुका; दारूगोळा ( हिंदुस्थानांतील आणि हिंदुस्थानाबाहेरील परकीय ठिकाणांना हत्यारें आणि दारूगोळा निर्गत करण्याबाबतच्या परवान्याखेरीज ).

३२ वर्तमानपत्रें, पुस्तकें आणि छापखाने—यांत इंडियन प्रेस ( इमर्जन्सी पॉवर्स ) ॲक्ट १९३१, प्रेस आणि रेजिस्ट्रेशन ऑफ बुक्स ॲक्ट १८६७ आणि छापलेल्या मजकुराबाबत इतर कायदे यांचा अंतर्भाव होतो; भाषांतरकाराचें खातें.

३३ प्रसिद्धि, प्रसिद्धिकचेरी.

३४ नाटकगृहें, नाटकें आणि सिनेमा म्हणजे चित्रपट ( हिंदी चित्रपटांच्या निर्मितीला व प्रसृतीला उत्तेजन, आणि शैक्षणिक, शास्त्रीय आणि करमणुकीचे चित्रपट दाखविणें आणे त्यांचा उपयोग, या गोष्टी खेरीजकरून ).

३५ दाखविण्याकरितां चित्रपटांना मंजुरी देणें.

३६ फीडरल हुकमानें तुरुंगांत अडकवून ठेवलेले इसम.

३७ नियंत्रण ( सेन्सॉरशिप ):—

( १ ) पोस्ट.
( २ ) तार.
( ३ ) छापखाना.
( ४ ) टेलिफोन.
( ५ ) रेडिओ.

} एतद्विषयक.

## कायद्याबाबतचें खातें

३८ प्रांतिक कायदेमंडळाच्या निवडणुकी—या कायद्याच्या व त्याखालीं काढलेल्या कोणत्याही ऑर्डर इन कौन्सिलच्या तरतुदी लक्षांत घेऊन.

३९ लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या स्पीकरचा व डेप्युटी स्पीकरचा, तसेंच लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या प्रेसिडेंटचा व डेप्युटी प्रेसिडेंटचा पगार; प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांचे पगार, भत्ते आणि विशेष हक्क;

आणि या कायद्याच्या तिसऱ्या खंडांत स्पष्टपणें अधिकार दिलेल्या मर्यादे-पर्यंत, प्रांतिक कायदेमंडळाच्या कमिट्यांपुढें पुरावा देण्याचें अगर कागद-पत्र हजर करण्याचें नाकारणाऱ्या इसमांना शिक्षा देणें.

४० 'प्रांतिक' विषयाबाबत आणि 'उभय' विषयाबाबत प्रांतिक कायदेमंडळांत येणाऱ्या बिलांचा मसुदा तयार करणें व तद्विषयक इतर तांत्रिक गोष्टी.

४१ प्रांतिक कायदेमंडळासंबंधींच्या गोष्टी.

४२ पब्लिक प्रॉसिक्यूटरांच्या (सरकारी फौजदारी वकील) नेमणुकी, पगार इ०.

४३ सरकार ज्या दिवाणी दाव्यांत पक्षकार आहे असे दावे चालविण्याची व्यवस्था करणें आणि प्रेसिडेन्सी लॉ ऑफिसर, गव्हमेंट प्लीडर व विशिष्ट नामांकित वकील यांचा पगार अथवा फी.

४४ कायद्याच्या खात्यांतील पुस्तकांची दुरुस्ती करणें आणि कायदे, स्थानिक नियम व ऑर्डरी पुनः छापवून घेणें.

४५ प्रांतिक कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम (कायद्याचें ८४ कलम).

४६ डिक्री मिळाल्यामुळें मिळावयाची रक्कम हिशेबांतून काढून टाकणें.

४७ आरोपी निर्दोषी सुटल्यावर त्याविरुद्ध अपिलें व शिक्षेची मुदत व रक्कम वाढविण्याबाबतचे अर्ज.

४८ फीडरल कायदेमंडळांच्या निवडणुकी (१९३५ च्या गव्ह-मेंट ऑफ इंडिया ॲक्टान्वयें होणाऱ्या पहिल्या निवडणुकीखेरीज), या कायद्याच्या आणि त्याखालील कोणत्याही ऑर्डर इन कौन्सिलच्या तरतुदी लक्षांत घेऊन.

४९ फीडरल कायदेमंडळासंबंधींच्या गोष्टी.

## इतर खातीं

५० कॉर्पोरेशन—यांत साहित्यविषयक, शास्त्रीय, धार्मिक व इतर मंडळें व संस्था यांचा अंतर्भाव होतो; पण सहकारी पतपेढ्यांचा समावेश होत नाहीं.

५१ पुराण हस्तलिखितें; ऐतिहासिक लेख.

५२ धार्मिक देणग्या.

५३ शेतजमिनीखेरीज इतर मालमत्ता दुसऱ्याच्या नांवावर बदलून देणें.

५४ धर्मादाय आणि धर्मादाय संस्था.

धार्मिक ( चॅरिटेबल ) देणग्या.

धर्मादायाबाबतचा कायदा आणि नियम.

५५ रॉयल ह्युमेन सोसायटीचीं पदकें व आल्बर्ट पदकें.

## ४ ना. गिल्डर, आरोग्यमंत्री ( वैद्यक, सार्वजनिक आरोग्य आणि अबकारी ), यांच्याकडे सोपविलेल्या विषयांची यादी.

१ सार्वजनिक आरोग्य आणि स्वच्छता; रुग्णालयें आणि दवाखाने ( वैद्यकशिक्षण धरून ); जनन, मरण आणि विवाह यांची नोंद.

१ (अ) अन्नद्रव्यें व इतर माल यांतील भेसळ.

२ हिंदुस्थानाबाहेरील ठिकाणांच्या यात्रांखेरीज यात्रा.

३ दफन आणि दफनभूमि.

४ खाणावळी आणि खाणावळवाले.

५ वैद्यकीचा धंदा.

६ वेडेपण आणि मानसिक दोष—यांत वेड्याच्या इस्पितळांचा व त्यांच्यावर करण्यांत येणाऱ्या उपचारांचा अंतर्भाव होतो ( गुन्हेगार वेडे वगळून ).

७ माणसांना उपद्रव देणारे सांसर्गिक अगर सांथीचे रोग एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत अगर संस्थानांत पसरूं न देणें.

८ नगर रचना योजना.

९ सल्लागार मोजणीदाराचें ( कन्सल्टिंग सर्वेयर ) खातें.

१० खेड्यांतील पाणीपुरवठा ( कालवे खेरीजकरून ).

११ रानटी जनावरांचा नायनाट.

१२ बंदरांतील क्वारंटाइन; खलाशांकरितां व नाविक रुग्णालयें आणि बंदर क्वारंटाइनसंबंधींचीं रुग्णालयें.

१३ या यादींतील कोणत्याही बाबीसंबंधीं करावयाची चौकशी आणि मिळवावयाची आंकडेवार माहिती.

१४ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत घेण्यांत येणारी फी, परंतु तींत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा समावेश होत नाहीं.

१५ अफूची लागवड, कारखान्यांतील निपज किंवा परदेशीं पाठविण्याकरितां विक्री.

१६ मादक द्रव्यें आणि गुंगी आणणारीं औषधें म्हणजे मादक दारू, अफू आणि इतर गुंगी आणणाऱ्या औषधी यांची पैदास, कारखान्यांत माल बनविणें, जवळ बाळगणें, इकडून तिकडे नेणें, खरेदी करणें आणि विकणें—परंतु अफूबाबत या कायद्याच्या सातव्या शेड्यूलमधील पहिल्या यादींतील तरतुदी, व विषें आणि मारक औषधींबाबत त्याच शेड्यूलमधील तिसऱ्या यादींतील तरतुदी लक्षांत घेऊन.

१७ प्रांतांत निर्माण झालेल्या अथवा बनविलेल्या पुढील मालावरील एक्साइज कर आणि हिंदुस्थानांत इतरत्र निर्माण झालेल्या अथवा बनविलेल्या तसल्याच मालावर त्याच अथवा कमी दरानें सारखेपणा किंवा समतोलपणा आणण्याकरितां बसविलेले कर—

( क ) माणसांनीं पिण्याचीं मद्यें,

( ख ) अफू, भांग, गांजा, व इतर गुंगी आणणारीं द्रव्यें; गुंगी न आणणारीं द्रव्यें,

( ग ) दारू, अफू इ० असणारीं औषधें व सुगंधी द्रव्यें.

१८ गुरें अथवा वनस्पती यांच्या सांसर्गिक अगर सांथीच्या रोगांना एका प्रांतांतून दुसऱ्या प्रांतांत अगर संस्थानांत पसरूं न देणें.

**५ ना. देसाई, महसूल, ग्रामसुधारणा आणि शेती या खात्यांचे मंत्री, यांच्याकडे सोपविण्यांत आलेल्या विषयांची यादी.**

१ कायद्याच्या २९६ कलमान्वयें स्थापन झालेलीं रेव्हिन्यू अपील कोर्टें.

२ जमीन सक्तीनें अक्वायर करणें.

३ मोठ्या बंदरांखेरीज इतर बंदरें.

४ जमीन, म्हणजे, जमिनींतील अथवा जमिनीवरील हक्क, जमीन

लागवडीला आणण्याची तऱ्हा (यांत जमीनदार आणि कुळें यांच्या परस्परसंबंधाचा अंतर्भाव होतो), आणि खंडवसुली; शेतजमिनी दुसऱ्याच्या नांवावर बदलून देणें, इनाम देणें, इ०; जमिनीची सुधारणा आणि शेतीविषयक कर्जें; वसाहत करणें; अज्ञानपालक कोर्टें; बोजा झालेल्या आणि जप्त केलेल्या इस्टेटी; निधिनिक्षेप.

५ दुष्काळनिवारण.

६ जंगलें.

७ खाणी, तेलाच्या विहिरी आणि खनिज वाढ यांचें नियंत्रण—फीडरल ताब्यांत असलेलें एतद्विषयक नियंत्रण व वाढ यासंबंधींच्या, या कायद्यांतील सातव्या शेड्यूलमधील पहिल्या यादींतील, तरतुदी लक्षांत घेऊन.

८ वन्य पशुपक्षी यांचें संरक्षण.

९ जमीनमहसूल-यांत सारा आकारणें व वसूल करणें, जमिनीबाबतचें रेकर्ड ठेवणें, साराआकारणीकरितां करावी लागणारी मोजणी, हक्कांचें रेकर्ड, सारा माफ करणें इ० गोष्टी येतात.

१० खालील करांबाबतची व्यवस्था पाहणें:—

(१) शेतीच्या उत्पन्नावरील कर;

(२) जमिनी व इमारती, तसेंच स्वयंपाकघरें आणि खिडक्या यांवरील कर;

(३) शेतजमिनीच्या वारसदारीबाबतचे कर;

(४) खाणींच्या हक्कांवरील कर—खनिज वाढीबाबत फीडरल कायदेमंडळाच्या एखाद्या कायद्याअन्वयें घातलेल्या मर्यादा लक्षांत घेऊन;

(५) चैनीवरील कर—यांत करमणुकी, मौजेच्या गोष्टी, शर्यती व जुगार यांवरील करांचा समावेश होतो;

(६) स्टांपड्यूटीच्या दराबाबत या कायद्याच्या सातव्या शेड्यूलमधील पहिल्या यादींतील निर्दिष्ट केलेल्याखेरीज इतर दस्तैवजांबाबतचे स्टांपड्यूटीचे दर;

( ७ ) विजेवरील कर;

( ८ ) कोर्टांतील स्टांपांच्या द्वारा जमा केलेल्या ड्यूटी व फी याखेरीज इतर स्टांपड्यूटी, परंतु यांत स्टांप-ड्यूटीचे दर येत नाहींत. कोर्टविषयक व इतर स्टांप आणि त्यांच्या द्वारा वसूल केलेली ड्यूटी;

( ९ ) तंबाकू ड्यूटी;

(१०) आगकाड्या, चकमकी ( यांत्रिक ), साखर व राकेल यांवरील एक्साइज कर.

११ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत करावयाची चौकशी व मिळवावयाची आंकडेवार माहिती.

१२ या यादींतिल कोणत्याही बाबीबाबत घेणेची फी, परंतु तींत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अंतर्भाव होत नाहीं.

१३ पाणी म्हणजे पाणीपुरवठा, काल्वे, पाण्याचा निकाल करणें, बंधारे, पाणी सांठविणें, पाण्यावर निर्माण होणारी शक्ति ( यांत फक्त छोट्या पाटबंधाऱ्यांच्या कामांचा अंतर्भाव करावयाचा ).

१४ म्युनिसिपल हद्दीबाहेरील सुधारणा व वाढ.

१५ प्रादेशिक अदलाबदल.

१६ डोंगरावरील हवेचीं ठिकाणें.

१७ फोटोझिंकोग्राफिक छापखाना.

१७ (अ) दस्तैवज व कागदपत्र यांची नोंदणी.

१८ कलेक्टरांचे दरबार व दरबारनजराणे.

१९ वेठबिगार ( गाड्या वेठीला धरणें ).

२० दरिद्रांकरितां येणारा खर्च.

२१ अंशतः वगळलेल्या प्रदेशांची राज्यव्यवस्था ( कलम ९२ ).

२२ लष्कराच्या हालचाली.

मुंबई सोल्जर बोर्ड आणि इतर किरकोळ लष्करी बाबी.

२३ हिंदुस्थानची पाहणी, हिंदुस्थानची भूगर्भविषयक व वनस्पति-विषयक पाहणी.

२४ फीडरल ताब्यांतील खाणी, तेलाच्या विहिरी यांचें नियंत्रण, फीडरल कायद्यानें सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें शहाणपणाचें आहे असें ठरविलें असेल त्या मर्यादेपर्यंत तद्विषयक नियंत्रण.

२५ मीठ.

२६ फीडरल सरकारच्या जमिनी.

२७ शेती, यांत शेतीचें शिक्षण व संशोधन हीं येतात; झाडांचें रोगापासून संरक्षण; झाडांचे रोग होऊं न देणें; गुराची वांशिक सुधारणा: गुराना रोग होऊं न देणें, पशुवैद्यक शिक्षण आणि त्याचा व्यवहार.

२८ ग्रामसुधारणा, ग्रामसंघटना आणि तद्विषयक प्रचार.

२९ सहकारी मंडळ्या.

## ६ ना० नुरी, पब्लिक वर्क्स खात्याचे मंत्री, यांच्याकडे सोपविलेल्या विषयांची यादी

१ प्रांताच्या उपयोगाकरिता बादशहाच्या मालकीचीं अगर ताब्यात असलेली वर्क्स, जमिनी आणि इमारती.

२ दळणवळणाचीं साधनें म्हणजे रस्ते, पूल, नावा आणि या कायद्याच्या सातव्या शेड्यूलमधील पहिल्या यादींत निर्दिष्ट न केलेलीं इतर दळणवळणाचीं साधनें: किरकोळ रेल्वे— रेल्वेबाबतची सदर शेड्यूलमधील पहिल्या यादीतील तरतूद लक्षांत घेऊन; म्युनिसिपल ट्रामवे, रोपवे (दोराचा मार्ग): अंतर्गत जलमार्ग आणि त्यांवरील जाये— सदरहू जलमार्गाबाबतची. सदर शेड्यूलमधील तिसऱ्या यादींतील तरतूद लक्षात घेऊन.

३ (क) पाणी म्हणजे पाणीपुरवठा, कालवे, धरणें, पाण्याचा निकाल, बांध, पाण्याचा सांठा, आणि पाण्यापासून निर्माण होणारी शक्ति (छोट्या पाटबंधाऱ्यांच्या कामाखेरीज).

(ख) बिगरम्युनिसिपल वॉटर वर्क्स व ड्रेनेज वर्क्स.

(ग) अंबरनाथ आणि साष्टी पाणीपुरवठा.

४ गॅस आणि गॅसचे कारखाने.

५ वीज (विजेवरील कर वगळून). विजेबाबतच्या कायद्याची अंमल-

बजावणी. विजेचीं कामें ( सरकारी इमारतींत वीजपुरवठ्याबाबतची सर्व व्यवस्था ).

६ म्युनिसिपालिटयांच्याकरितां सरकारमार्फत करणें जरूर असेल तेव्हां पाणीपुरवठा, ड्रेनेज व पाण्याकरितां जमीन खोदणें इ० बाबतच्या योजना तयार करणें आणि त्या अमलांत आणणें.

७ अंतर्गत जलमार्गांवरून नेल्या जाणाऱ्या उतारूंवर व मालावर आकारलेली पट्टी.

८ टोल किंवा जकात.

९ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत करावयाची चौकशी व मिळवावयाची आंकडेवार माहिती.

१० या यादींतील कोणत्याही बाबीसंबंधीं घेतली जाणारी फी, परंतु तींत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अंतर्भाव होत नाहीं.

११ प्राचीन आणि ऐतिहासिक लेख, इमारती इ० स्मारकें; पुराण वस्तुसंशोधन खात्याच्या ताब्यांतील जागा व अवशेष.

१२ औद्योगिक व जमीनविषयक योजनांसंबंधींचीं कामें.

१३ फेडरेशनच्या कामाकरितां राजेसाहेबांच्या मालकीचीं अगर ताब्यांत असलेलीं वर्क्स, जमिनी आणि इमारती ( यांत आरमार, लष्कर व विमानदल एतद्विषयक इमारती वगैरेंचा अंतर्भाव होतो ).

१४ फीडरल रेल्वे; सुरक्षितपणा, मालांचे दर व उतारूंचें भाडें याबाबतचे किमान आणि कमाल दर, स्टेशन आणि सर्व्हिस टर्मिनल चार्जिस्, ट्रॅफिकची अदलाबदल, माल आणि उतारू नेणारी यामुळें रेल्वेवर पडणारी जबाबदारी या सर्व बाबींसंबंधांत किरकोळ रेल्वेखेरीज करून इतर सर्व रेल्वेंचें नियंत्रण; सुरक्षितपणा व माल आणि उतारू नेणारी म्हणून किरकोळ रेल्वेवर पडणारी जबाबदारी या बाबींसंबंधांत किरकोळ रेल्वेंचें नियंत्रण.

१५ विमानें आणि विमानप्रवास; विमानगृहें पुरविणें; विमान-वाहतुकीचें व विमानतळांचें नियंत्रण आणि संघटना.

१६ गव्हर्नराच्या राहत्या घरासंबंधींच्या कामाबाबतचा सर्व खर्च.

१७ प्रांतिक रस्तानिधि.

१८ पब्लिक वर्क्स खात्याचीं अंदाजपत्रकें ( ५०, सिव्हिल वर्क्स-मध्यवर्ती आणि ८, मिलिटरी वर्क्स आणि पुराण वस्तूसंबंधीं वर्क्स ) आणि हिशेब.

१९. ५२ आणि ८० या सदरांखालील (मुंबई सुधारणा योजना) अंदाजपत्रकें.

२० पब्लिक वर्क्स खात्याचीं अंदाजपत्रकें आणि हिशेब ( XVII, १८, ६८ कालवे ), ( ५० आणि ८१ सिव्हिल वर्क्स ), ( ३९, सार्वजनिक आरोग्य—या यादींतील ३ ( क ) आणि ३ ( ख ) या सदरांबाबतचीं कामें आणि रिपेरी आणि सार्वजनिक आरोग्य एंजीनियरिंग एस्टॅब्लिशमेंट पुरतें ), ( ७०—पब्लिक वर्क्स खात्याचा संबंध येतो तेवढ्यापुरता सार्वजनिक आरोग्य-सुधारणा-योजनांवरील भांडवली खर्च ).

## ७ ना० पाटील, स्थानिक स्वराज्य ( आणि किरकोळ ) मंत्री, यांच्याकडे सोपविलेल्या विषयांची यादी

१ स्थानिक स्वराज्य, म्हणजे म्युनिसिपल कॉर्पोरेशन, इम्प्रूव्हमेंट ट्रस्ट, जिल्हा बोर्डें, खाणवसाहत संस्था आणि इतर स्थानिक अथवा ग्रामीण स्वराज्यसंस्था.

२ लष्कर टापूंतील स्थानिक स्वराज्यसंस्था ( यांत हिंदी संस्थानी फौजेच्या छावण्यांचा समावेश होत नाहीं ), असल्या टापूंतील घरांच्या सोयीबाबतचें नियंत्रण आणि ब्रिटिश हिंदुस्थानांत असल्या टापूंची मर्यादा ठरविणें; ( यांत लष्करांतील न्यायाधिकाऱ्यांच्या नेमणुकी धरावयाच्या नाहींत ).

३ डोईपट्टी.

४ धंदे, व्यापार, उदीम, नोकऱ्या यांवरील कर.

५ जनावरें आणि नावा यांवरील कर.

६ एखाद्या स्थानिक स्वराज्यसंस्थेच्या टापूंत वापराकरितां, खाण्याकरितां अगर विक्रीकरितां येणाऱ्या मालावरील जकाती.

७ वजनें आणि मापें.

८ बाजार आणि जत्रा.

९ उद्योगधंद्यांची वाढ–प्रांतिक आणि फीडरल.

१० वर्तमानपत्रें, पुस्तकें आणि छापखाने (म्हणजे प्रांतिक सरकारी छापखाने, पुस्तकें आणि प्रासिद्धिकें यांचा पुरवठा).

११ स्टेशनरी (सादिल्वार).

१२ स्टोअर्स.

१३ कपडे, गणवेष (युनिफार्म), कांबळीं व छत्र्या.

१४ मासेमाऱ्या.

१५ गरिबांना मदत; बेकारी.

१६ रेंट ॲक्ट (भाड्याचा कायदा).

१७ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत करावयाची चौकशी व गोळा करावयाची आंकडेवार माहिती.

१८ या यादींतील कोणत्याही बाबीबाबत घेतली जाणारी फी, परंतु तींत कोणत्याही कोर्टांत घेतलेल्या फीचा अंतर्भाव होत नाहीं.

## भाग ३ रा

## प्रांतिक कायदेमंडळ

### सर्वसामान्य

प्रांतिक कायदेमंडळांची रचना

६०.—(१) प्रत्येक प्रांताला एक प्रांतिक कायदेमंडळ राहील; त्यांतील पहिला घटक म्हणजे गव्हर्नर या प्रतिनिधीच्या द्वारा राजेसाहेब आणि बाकीचे घटक म्हणजे—

(क) मद्रास, मुंबई, बंगाल, संयुक्तप्रांत, बिहार आणि आसाम या प्रांतांतून दोन प्रतिनिधिसभा

(ख) इतर प्रांतांतून एक प्रतिनिधिसभा.

(२) ज्या प्रांतांतून प्रांतिक कायदेमंडळाच्या दोन प्रतिनिधिसभा असतील तेथें त्यांना अनुक्रमें लेजिस्लेटिव्ह कौन्सिल व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली असें संबोधिलें जाईल व ज्या ठिकाणीं केवळ एकच प्रतिनिधिसभा असेल तेथें तिला लेजिस्लेटिव्ह असेंब्ली असें म्हटलें जाईल.

( अ ) कोणत्याही देशाला 'संपूर्ण स्वराज्य' असल्याचें पहिलें लक्षण म्हणजे त्या देशाच्या राज्यव्यवस्थेकरितां करावे लागणारे जे कायदे ते करण्याची सत्ता तेथल्याच कायदेमंडळाला असली पाहिजे. या दृष्टीनें विचार केल्यास या कलमांत निर्दिष्ट केलेलीं प्रांतिक कायदेमंडळें हीं संपूर्ण सत्ताधारी ( सॉव्हरिन ) नाहींत. अर्थात् 'प्रांतिक स्वराज्य' ह्याही शब्दसमुच्चयाला कांहीं किंमत राहत नाहीं. संपूर्ण सत्ताधारी कायदे-मंडळाचें मुख्य लक्षण म्हणजे स्वतःची रचना वाटेल तशी बनविण्याचा त्याला अधिकार पाहिजे. परंतु या प्रकारचे कोणतेही अधिकार हिंदुस्थानांतील प्रांतिक कायदेमंडळांना नाहींत. इतकेंच नव्हे तर, तीं कायदेमंडळें स्वतः ब्रिटिश पार्लमेंटच्या १९३५ सालीं मंजूर झालेल्या कायद्यामुळें अस्तित्वांत आलीं आहेत ही एकच गोष्ट या कायदेमंडळांचें निर्बलत्व सिद्ध करण्यास पुरेशी आहे. या १९३५ च्या कायद्याचा गाभा म्हटला म्हणजे फेडरेशनची योजना हा होय. आणि फेडरेशनमध्यें सामील होणारीं राज्यें हीं मुळांत स्वायत्त असलीं पाहिजेत असा आहे सिद्धान्त. परंतु हिंदुस्थानांत 'आधीं कळस मग पाया रे' अशी सर्वच विपरीत परि-स्थिति आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांत म्हणजे मध्यवर्ती सरकारचे केवळ मुनीम आणि संस्थानिक तर केवळ पोलिटिकल खात्याच्या अधि-काऱ्यांच्या हातांतील बाहुलीं. परंतु आतां या दोघांचें फेडरेशन १९३५ च्या कायद्यानें संकल्पिलेलें आहे. संस्थानिक हे स्वतंत्र, सार्वभौम आहेत; त्यांच्याकरितां कायदे करण्याची ब्रिटिश पार्लमेंटला सत्ता नाहीं; त्यांनीं स्वखुषीनें आपले कांहीं अधिकार सामिलनाम्याच्या द्वारें फेडरेशनला देण्याचें कबूल केलें तर ठीक. नाहीं तर त्यांच्यावर सक्ती करितां येणार नाहीं; तसेंच आपल्या राज्यांत जबाबदार राज्यपद्धति सुरू करावी अगर न करावी, केल्यास किती प्रमाणांत व कशा गतीनें करावी, त्याचप्रमाणें फीडरल कायदेमंडळांत संस्थानांनीं पाठवावयाचे प्रतिनिधी हे संस्थानी प्रजेनें निवडणूक करून पाठवावयाचे का संस्थानिकांनीं नेमावयाचे इ० प्रश्नाबाबतही निर्णय करण्यास संस्थानिक स्वतंत्र आहेत असा ब्रिटिश सरकारनें फेडरेशनमध्यें सामील होणाऱ्या एका घटकाबाबत बहाणा चालविला आहे.

या बहाण्यांत थोडाबहुत अर्थ असेल तर तो एवढाच कीं, फेडरेशन अस्तित्वांत येण्याला विशिष्ट प्रमाणांत व संख्येनें संस्थानिकांनीं मान्यता दिली पाहिजे. परंतु ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांतांबाबत तर एवढ्याही मान्यतेची जरूरी १९३५ च्या कायद्यानें ठेवलेली नाहीं. त्यांच्यातर्फे या-बाबत निर्णय ब्रिटिश पार्लमेंटनें ठरविला आहे, ही या कायदेमंडळांची संपूर्ण स्वायत्तता ! बहुतेक सर्व प्रांतिक कायदेमंडळांनीं फेडरेशनच्या योजनेचा तीव्र निषेध केला असला तरी वेळ आल्यावर त्यांच्या गळ्यांत या फीडरल योजनेचें लोढणें अडकविलें जाण्याचा पार्लमेंटचा निर्धार जाहीर झाला आहे. वरून दिसायला, या ६० व्या कलमान्वयें कायदे-मंडळांत राजेसाहेबांचा समावेश करण्यांत आला आहे. त्यांचा प्रतिनिधि म्हणून गव्हर्नरनें त्यांत असावयाचें, या गोष्टीनें कायदेमंडळाच्या सर्व-सत्ताधारित्वाला राज्यघटनाशास्त्राच्या दृष्टीनें चांगलीच पुष्टि मिळते परंतु हे राजेसाहेब आपल्या देशांतच इतके निर्बल आहेत कीं, या देशांत आपल्या कायदेमंडळांतील सभासदत्वानें ते कायदेमंडळांना सर्वसत्ताधारित्व कसें निर्माण करणार ? गव्हर्नर, गव्हर्नर जनरल, स्टेट सेक्रेटरी या परंपरे-नें सर्व सत्ता ब्रिटिश सरकारची व पार्लमेंटची, अर्थात् ब्रिटिश मतदारांची आहे हें मागें विशद करून सांगितलेंच आहे. तेव्हां प्रांत हे स्वायत्त आहेत या म्हणण्याला काडीचाही आधार नाहीं. कायदेमंडळांतीलच एक घटक या नात्यानें गव्हर्नर हा कायदेमंडळांबाबत किंवा कायदे करण्याच्या सत्तेबाबत पुढीलप्रमाणें किती तरी अधिकार चालवितो:—

६२ ( २ ) ( ख ) कायदेमंडळाच्या सभा बोलावणें, तहकूब करणें, कनिष्ठ कायदेमंडळें बरखास्त करणें.

६३ ( १ ) कायदेमंडळांपुढें भाषण करणें; त्यांना संदेश पाठविणें.

६५ ( ३ ) कायदेमंडळांच्या अध्यक्षांची जागा मोकळी असल्यास त्या जागेवर तात्पुरता माणूस नेमणें.

६७ सभासदांना शपथ घ्यावयास लावणें किंवा ज्याच्यापुढें शपथ घ्यावयाची असा माणूस नेमणें.

६८ ( ३ ) सभासदत्वाच्या राजीनाम्याचा स्वीकार करणें; नवीन

सभासद निवडून आणविणें. दोन सभांचा सभासद असल्यास एकीचा राजीनामा द्यावयास लावण्यासंबंधीं नियम करणें.

६९ ( १ ) ( ङ ) व ( च ) निवडणुकीच्या अपात्रतेचीं कारणं दूर करणें.

७१ ( ४ ) कायदेमंडळाच्या कमिटीपुढें गुप्त गोष्टी फुटूं नयेत याची दखलगिरी घेणें.

७४ ( २ ) दोन्ही प्रतिनिधिसभांची जोडसभा बोलावणें.

७५ प्रतिनिधिसभांनीं मंजूर केल्यानंतर त्या बिलांना मंजुरी देणें किंवा न देणें.

७८ ( ३ ) ( क ) स्वतःच्या खर्चाकरितां लागणाऱ्या रकमेवर कायदेमंडळांना नुसती चर्चाही करूं न देणें.

८० मंजूर झालेल्या अंदाजपत्रकावर प्रामाण्याचा शिक्कामोर्तब ठोकणें.

८४ कायदेमंडळाच्या कामकाजाचे नियम ठरविण्याबाबत कांहीं कांहीं गोष्टींसंबंधीं निर्णायक अधिकार असणें.

८८, ८९, ९० ऑर्डिनन्स व कायदे करण्याचा अधिकार असणें.

९३ राज्यघटनायंत्र मोडून पडल्यास सर्व अधिकार ( कायदे करण्याचे सुद्धां ) हातीं घेणें.

तेव्हां वरीलप्रमाणें कायदेमंडळांतील सर्व सत्ताधारी घटक हाच मुळांतून उपटून काढला पाहिजे; म्हणजे साहजिकच प्रतिनिधिसभांना स्वयंशासनाचें कांहीं तरी तेज चढेल. कायदेमंडळांतील बोलल्या जाणाऱ्या भाषेचीच साधी गोष्ट घ्या. कायदेमंडळांतील एका महत्त्वाच्या (?) घटकाची ( राजेसाहेब म्हणजे गव्हर्नर ) जी इंग्रजी भाषा ती इंग्रजी न बोलणाऱ्या हिंदुस्थानांतील सर्व लोकप्रतिनिधींवर लादलेली आहे ( कलम ८५ ). इतका ह्या एका घटकाचा इतर घटकांवर जुलूम प्रस्तुत कायद्यानें चालू ठेवला आहे.

( आ ) प्रस्तुतचा कायदा होण्यापूर्वी १९१९ च्या कायद्यानें ८

प्रांतांत ( वायव्य सरहद्द हा ९ वा प्रांत १९१९ च्या कायद्यान्वयें १९३२ सालीं अस्तित्वांत आणिला गेला, व सिंध आणि ओरिसा हे १९३६ सालीं नवीन कायद्यान्वयें अस्तित्वांत आले ) फक्त एकच कायदेमंडळ ( लेजिस्लेटिव्ह कौन्सिल ) होतें; परंतु त्या कायद्यांतच घटनाकायद्याचा फेरविचार करण्याकरितां ज्या स्टॅटच्यूटरी कमिशनची योजना करण्यांत आली होती, त्या कमिशननें इतर अनेक गोष्टींबरोबर " प्रांतांतून दुहेरी कायदेमंडळें स्थापन करणें इष्ट आहे अगर नाहीं " याही गोष्टीचा विचार करून निर्णय द्यावा असें स्पष्ट नमूद केलेलें होतें. नवीन प्रांतिक स्वराज्याच्या भरधाव सुटणाऱ्या इंजिनाला 'ब्रेक' पाहिजे म्हणून 'वरिष्ठ' सभा असावी असें निश्चित मत सायमन कमिशननें दिलें नाहीं. 'व्हाइट पेपर' योजनेंत बंगाल, बिहार व संयुक्तप्रांत ( जमीनदारांचा बुजबुजाट असलेले प्रांत ) या तीन प्रांतांतच दुसरें कायदेमंडळ असावें अशी सूचना केलेली होती. शिवाय १० वर्षांनंतर हीं कायदेमंडळें असावीं अगर नसावीं याचा निर्णय करण्याचा अधिकार प्रांतिक कायदेमंडळाकडे दिला होता. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें आणखी दोन प्रांतांत ( मुंबई व मद्रास ) दुसरें कायदेमंडळ असावें असें सुचविलें. पुढें बिलामध्यें ही जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची प्रतिगामी योजना समाविष्ट करण्यांत आली. आणि बिलावर कमिटीमध्यें विचार चालू असतांना 'आसाम' प्रांतालाही या द्विदळ कायदेमंडळाच्या योजनेंत गोवून घेतलें असा या प्रकरणाचा इतिहास आहे. यामुळें ११ प्रांतांतून ११ लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्या स्थापन झाल्या असून ६ प्रांतांतून लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें स्थापन झालीं आहेत; मिळून एकंदर १७ प्रांतिक प्रतिनिधिसभा सर्व हिंदुस्थानांत आहेत. आणखी एक छोटें, जबाबदार राज्यपद्धतीचा स्पर्श नसलेलें, कायदेकौन्सिल आहे, तें कुर्ग या चीफ कमिशनराच्या प्रांतांत.

**६१.**—( १ ) प्रांतिक कायदेमंडळाच्या सभेचे अगर सभांचे किती सभासद असावेत हें प्रत्येक प्रांताबाबत या कायद्याच्या पांचव्या शेडयूलमध्यें स्पष्ट नमूद केलें आहे.

प्रांतिक कायदेमंडळांच्या प्रतिनिधिसभांची घटना

( २ ) प्रत्येक प्रांताच्या प्रत्येक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची मुदत असेंब्लीच्या पहिल्या बैठकीकरितां नेमलेल्या दिवसापासून पांच वर्षे

राहील. त्याहून अधिक राहणार नाहीं; मात्र या मुदतीपूर्वी असेंब्ली बरखास्त झाली तर गोष्ट वेगळी; वरील पांच वर्षांची मुदत संपली म्हणजे असेंब्ली आपोआपच बरखास्त झाली असें समजलें जाईल.

(३) प्रत्येक लेजिस्लेटिव्ह कौन्सिल हें कायम मानलें जाईल व कधींही बरखास्त केलें जाणार नाहीं; परंतु त्याच्या सभासदांपैकीं जवळ जवळ एकतृतीयांश सभासद दर तीन वर्षांनीं पांचव्या शेडयूलमध्यें त्या त्या प्रांताबाबत केलेल्या तरतुदी-अन्वयें निवृत्त झाले असें मानण्यांत येईल.

(अ) १९१९ च्या कायद्यांत प्रत्येक प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलची मुदत ३ वर्षे होती; व जरूर पडल्यास आणखी एक वर्षपर्यंत ती वाढविण्याचा अधिकार गव्हर्नरला दिलेला होता. पुढें पार्लमेंटच्या कायद्यानें १ वर्षापेक्षां अधिक काळपर्यंत वरील मुदत वाढविण्यांत आली. याचें उदाहरण म्हणजे १९३० सालीं निवडून आलेलें मुंबई कायदेकौन्सिल हें १९३६ अखेर म्हणजे पूर्ण सहा वर्षे चालू होतें. प्रस्तुत कायद्यानें पांच वर्षांपेक्षां असेंब्लीची मुदत वाढविणें हें गव्हर्नरच्या अखत्यारींतलें नाहीं. पांच वर्षांच्यापूर्वी केव्हांही त्याला असेंब्ली बरखास्त करण्याचा अधिकार आहे; तसेंच ९३ व्या कलमान्वयें सबंध अगर अंशतः प्रांतिक राज्ययंत्र बंद ठेवण्याचा त्याला अधिकार आहे त्याअन्वयें तो प्रधानमंडळाप्रमाणेंच कायदेमंडळही रद्द करूं शकेल. ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सची मुदत पांच वर्षांची आहे (पार्लमेंट ॲक्ट १९११).

(आ) लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमधील $\frac{1}{3}$ सभासदांची दर तीन वर्षांनीं निवडणूक व्हायची याचा अर्थच प्रत्येक सभासदाची मुदत ९ वर्षे, परंतु पहिल्या प्रथम सदर कौन्सिल अस्तित्वांत आल्यावर त्यांतील $\frac{1}{3}$ सभासदांची मुदत ३ वर्षे ठरवावी लागणार, दुसऱ्या $\frac{1}{3}$ सभासदांची मुदत ६ वर्षे ठरवावी लागणार व बाकीच्या $\frac{1}{3}$ सभासदांची मुदत ९ वर्षे असणार हें उघड आहे. कोणकोणत्या सभासदांना केव्हां केव्हां कमी करावयाचें हें गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें मुकर करावयाचें आहे (पांचवें शेडयूल कलम १८). या योजनेंत मंत्रिमंडळाचा सल्ला घेण्याची

जरुरी ठेविलेली नाहीं. याचें कारण, कोणाला जास्त मुदतीपर्यंत ठेवावयाचें व कोणाला लवकर घालवावयाचें हें ठरवितांना राजकीय पक्षाभिनिवेशाला जागा राहूं नये हें असावें असें दिसतें. ही प्रत्येक सभासदाची मुदत एकदां ठरविली म्हणजे या कलमाचें काम कायमचें नाहींसें झालें. आतां ज्या प्रांतांतून ( उ०—मुंबई ) एका मतदारसंघांतून एकापेक्षां अधिक सभासद ( उ०—दोन किंवा चार ) निवडावयाचे असतात तेथें वरील, दर तीन वर्षांनीं $\frac{1}{3}$ सभासद कमी करण्याच्या, योजनेंत सबंध मतदारसंघच धरला पाहिजे; व्यक्तिशः एखादा सभासद कमी करून भागणार नाहीं. असें जर केलें नाहीं तर एका गटांत दोन सभासदांपैकीं एका सभासदाची जागा खाली झाल्यास तो गट दोन सभासद निवडून देण्याचा न राहतां कायमचा एक सभासद निवडून देणारा गट राहील आणि त्या योगें अल्पसंख्य असणाऱ्या पक्षास दोन्हींपैकीं एक जागा काबीज करण्याचा जो संभव असतो तो नाहींसा होऊन मूळ योजना करणाऱ्याचा उद्देश सफल होऊं शकत नाहीं. सदरहू मतांतील युक्तिवादाला मान देण्यांत येऊनच मुंबई गव्हर्नरनें दर तीन वर्षांनीं $\frac{1}{3}$ सभासद कमी करण्याची योजना केली आहे.

लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या सभासदांचीं जीं ३ वर्षें, ६ वर्षें किंवा ९ वर्षें अशी मुदत ठरवावयाची ती पांचव्या शेड्यूलमधील १८ व्या कलमान्वयें गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें त्याला योग्य वाटेल त्या रीतीनें ठरवावयाची आहे. बिहार कौन्सिलच्या सभासदांबाबत ही मुदत चिठ्ठ्या टाकून ठरविण्यांत आली. परंतु त्यांत झालें काय कीं, कौन्सिलचे अध्यक्ष ना. राजीवरंजन प्रसादसिंह यांची मुदत तिन वर्षांची ठरली. परंतु गव्हर्नरनें हजारीबाग-मानभूम सर्वसाधारण मतदारसंघातर्फे निवडून आलेले सभासद श्री. बिशनलाल सिंग ( कॉंग्रेस ) यांची मुदत तीन वर्षांची ठरविली व त्यांची ९ वर्षांची मुदत ना. राजीवरंजन प्रसादसिंग यांना दिली. या गव्हर्नरच्या विसंगत व धरसोडीच्या कृत्याबद्दल मुख्य प्रधान ना. श्रीकृष्ण सिंह यांनीं तीव्र नापसंती व्यक्त केली आहे.

मुंबई प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांतील सभासदांची मुदत गव्हर्नरानें १५ सप्टेंबर १९३७ रोजीं पुढीलप्रमाणें ठरविली आहे:—

### सर्वसाधारण मतदारसंघ ( नागर )

मुंबई शहर आणि मुंबई उपनगर—३ वर्षें

१ प्रो. दावर

२ रतिलाल गांधी

३ बेहराम करंजिया

४ सौ. हंसा मेथा

### सर्वसाधारण मतदारसंघ ( ग्रामीण )

अहमदाबाद—खेडा—६ वर्षें

१ दादूभाई देसाई

२ चिनूभाई मेहता

भडोच—पंचमहाल—सुरत—९ वर्षें

१ मंगळदास पक्वासा

२ शांतिलाल शहा

ठाणें—नाशिक—अहमदनगर—६ वर्षें

१ नारायण दामोदर देवघेकर

२ रामचंद्र गणेश प्रधान

पूर्व आणि पश्चिम खानदेश—३ वर्षें

१ माधवराव भोसले

२ प्रेमराज मारवाडी

पुणें—सातारा—९ वर्षें

१ गणेश सखाराम महाजनी

२ रामचंद्र गणेश सोमण

सोलापूर—बेळगांव—विजापूर—३ वर्षें

१ चंद्राप्पा बसवंतराव देसाई

२ भीमराव पोतदार



मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचें मुंबई येथे जानेवारींत (१९३८) घेतलेलें छायाचित्र
(पृ० १५६–५७)

कुलाबा–रत्नागिरी—६ वर्षे
१ आत्माराम महादेव आटवणे
२ महादेव बजाजी वीरकर
धारवाड–कानडा—९ वर्षे
१ नरसिंगराव देसाई
२ सुबराय रामचंद्र हळदीपूर

## मुसलमान मतदारसंघ ( नागर )

मुंबई शहर आणि मुंबई उपनगर—९ वर्षे
१ करिमभाई इब्राहिम
२ काझी अबदुल हमीद

## मुसलमान मतदारसंघ ( ग्रामीण )

उत्तर विभाग—३ वर्षे
१ महमद इब्राहिम मकान
मध्यविभाग—९ वर्षे
१ अकबर अली खान
दक्षिण विभाग—६ वर्षे
१ महमद अमीन वझीर महमद तांबे

## युरोपियन मतदारसंघ ( इलाखा )

प्रेसिडेन्सी—६ वर्षे
१ फ्रेडरिक स्टोन्स

## गव्हर्नरने नेमलेले सभासद

१ एस्. सी. जोशी ( मजूर ) ९ वर्षे
२ सरदार पाटणकर ( मध्यम वर्ग ) ६ वर्षे
३ डॉक्टर सोळंकी ( हरिजन ) ६ वर्षे
४ टेरेन्स मार्टिन डीसूझा गिडो ( हिंदी ख्रिस्ती ) ३ वर्षे

## जागांचा तक्ता

(इ) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्या

| प्रांत | एकंदर जागा | सर्व साधारण जागा: एकंदर सर्व साधारण जागा | सर्व साधारण जागा: हरिजनांकरितां राखीव सर्वसाधारण जागा | मागसलेल्या जाती व प्रदेश यांच्या प्रतिनिधींच्या जागा | शीख जागा | मुसलमान जागा | अँग्लो इंडियन जागा | युरोपियन जागा | हिंदी ख्रिस्ती जागा | व्यापार, उद्योगधंदे, खाणी व मळे यांच्या प्रतिनिधींकरितां जागा | जमीनदार जागा | विश्वविद्यालय जागा | मजूर प्रतिनिधींच्या जागा | बायकांकरितां जागा: सर्वसाधारण | बायकांकरितां जागा: शीख | बायकांकरितां जागा: मुसलमान | बायकांकरितां जागा: अँग्लोइंडियन | बायकांकरितां जागा: हिंदी, ख्रिस्ती |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ | १७ | १८ | १९ |
| मद्रास | २१५ | १४६ | ३० | १ | ... | २८ | २ | ३ | ८ | ६ | ६ | १ | ६ | ६ | ... | १ | ... | १ |
| मुंबई | १७५ | ११४ | १५ | १ | ... | २९ | २ | ३ | ३ | ७ | २ | १ | ७ | ५ | ... | १ | ... | ... |
| बंगाल | २५० | ७८ | ३० | ... | ... | ११७ | ३ | ११ | २ | १९ | ५ | २ | ८ | २ | ... | २ | १ | ... |
| संयुक्तप्रांत | २२८ | १४० | २० | ... | ... | ६४ | १ | २ | २ | ३ | ६ | १ | ३ | ४ | ... | २ | ... | ... |
| पंजाब | १७५ | ४२ | ८ | ... | ३१ | ८४ | १ | १ | २ | १ | ५ | १ | ३ | १ | १ | २ | ... | ... |

| | | | | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| बिहार | १५२ | ८६ | १५ | ७ | ... | ३९ | १ | २ | १ | ४ | ४ | १ | ३ | ३ | ... | १ | ... | ... |
| मध्यप्रांत आणि वऱ्हाड | ११२ | ८४ | २० | १ | ... | १४ | १ | १ | ... | २ | ३ | १ | २ | ३ | ... | ... | ... | ... |
| आसाम | १०८ | ४७ | ७ | ९ | ... | ३४ | ... | १ | १ | ११ | ... | ... | ४ | १ | ... | ... | ... | ... |
| वायव्य सरहद्दप्रांत | ५० | ९ | ... | ... | ३ | ३६ | ... | ... | ... | ... | २ | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| ओरिसा | ६० | ४४ | ६ | ५ | ... | ४ | ... | ... | १ | १ | २ | ... | १ | २ | ... | ... | ... | ... |
| सिंध | ६० | १८ | ... | ... | ... | ३३ | ... | २ | ... | २ | २ | ... | १ | १ | ... | १ | ... | ... |
| एकूण | १५८५ | ८०८ | १५१ | २४ | ३४ | ४८२ | ११ | २६ | २० | ५६ | ३७ | ८ | ३८ | २८ | १ | १० | १ | १ |

मुंबईत सर्वसाधारण जागांपैकीं सात जागा मराठ्यांकरितां राखून ठेवल्या आहेत.

पंजाबांतील जमीनदारांच्या जागांपैकीं एक जागा तुमानदारांनीं भरावयाची आहे.

आसाम आणि ओरिसामधील बायकांकरितां राखीव जागा सर्व जातींच्या बायकांकरितां आहेत.

प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्यांच्या जागांबाबतचा मागें जो तक्ता दिलेला आहे तो ब्रिटिश सरकारनें १९३२ सालीं दिलेल्या जातीय निर्णयाचें फळ आहे. ब्रिटिश सरकारनें सदर निर्णय कां दिला याचें कारण सरकारतर्फे असें सांगण्यांत येतें कीं, निरनिराळ्या जातींच्या प्रतिनिधींत जागावाटणीच्या मुद्द्यावर एकमत झालें नाहीं म्हणून हिंदी प्रतिनिधींच्या (?) विनंतीला अनुसरून ब्रिटिश सरकारनें 'जातीय निर्णय' देऊन राज्यघटनेच्या मार्गातील एक मोठें विघ्न नाहींसें केलें. परंतु या तक्त्यावरून वरवर जरी नजर फिरविली तरी त्यांत हिंदुस्थानची किती तऱ्हांनीं चीरफाड केलेली आहे तें सहज दिसून येणारें आहे. आजपर्यंतचा मागील इतिहास लक्षांत घेऊन मुसलमान व शिख या जातींना (स्वतंत्र मतदारसंघासुद्धां) आपल्या जातीचे प्रतिनिधी ठराविक प्रमाणांत निवडून देण्यास कॉंग्रेसनें मान्यता दिली होती. परंतु बाकी कोणत्याही हितसंबंधाला स्वतंत्र प्रतिनिधी देण्याचें कॉंग्रेसनें साफ नाकारलें. ज्या कोणाला—मग ते पदवीधर असोत, व्यापारी असोत, स्त्रिया असोत, जमीनदार असोत अगर युरोपियन असोत—कायदेमंडळांतून सभासद म्हणून निवडून यावयाचें असेल त्या सर्वांनीं सर्वसाधारण मतदारसंघांतूनच निवडून आलें पाहिजे. कां कीं, असें जर केलें नाहीं तर आधींच हजारों जातींच्या शकलांमुळें जर्जरित झालेल्या राष्ट्रांत एकजिनसीपणा व एकरूपता येण्याऐवजीं "अनेक हितसंबंधांच्या भांडणाचें स्थळ" असा हिंदभूमीचा दुर्लौकिक कधींही चुकणार नाहीं. शिवाय ज्या हितसंबंधांना रक्षण मिळवावयाचें असेल त्यांच्यावर आपले हितसंबंध जनतेच्या हिताविरुद्ध नाहींत हें सिद्ध करून देण्याची जबाबदारी पडणार. अर्थात् अशा लोकांना सर्वसाधारण मतदारसंघातर्फे निवडून येतां आलें तरच लोकांना त्यांचे हितसंबंध रक्षिणें जरूर आहे असें मानतां येईल. या दृष्टीनें पाहूं लागल्यास ॲंग्लोइंडियन, युरोपियन, हिंदी ख्रिस्ती यांना स्वतंत्र प्रतिनिधी देण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. ॲंग्लोइंडियनांना सबंध हिंदुस्थानांत जवळजवळ साडेअठराशें जागांपैकीं फक्त ११ जागा वाट्याला आल्या आहेत. या जागा घेऊन ते आपल्या हितसंबंधांचें कितीसें रक्षण करूं शकणार ? त्यांना मुख्यतः रेल्वे इ० खात्यांतल्या नोकऱ्या आजपर्यंत जशा वाटेल त्या प्रमाणांत मिळत असत, तशा त्या यापुढेंही

हव्या आहेत व त्याबाबतची व्यवस्था २४२ (२) व (३) या कलमांत कायद्यानें करून ठेवली आहे. शिवाय त्यांच्या व युरोपियनांच्या मुलांच्या शिक्षणाकरितां जादा रक्कम प्रांतिक तिजोरींतून खर्च करण्याची व्यवस्था ८३ कलमानें करून ठेविली आहे. याखेरीज गव्हर्नरला या छोटया जमातींच्या हितसंबंधांचें रक्षण करण्याकरितां जादा अधिकार दिले आहेत ते निराळेच. हिंदी ख्रिस्त्यांना तर स्वतंत्र मतदारसंघ नको असतांना त्यांच्यावर ते लादण्यांत आले आहेत. १९१९ च्या कायद्यानें ख्रिस्त्यांचा समावेश सर्वसाधारण मतदारसंघांत होत असून त्यांच्यापैकीं २ सभासद (जॉर्ज जोसेफ व सॅम्युअल आरन) मद्रास इलाख्यांतून मध्यवर्ती असेंब्लीवर यावयाच्या ११ सभासदांपैकीं निवडून आले आहेत. या उदाहरणावरून राष्ट्रीय महत्त्वाकांक्षेशीं समरस होणाऱ्या कोणत्याही अल्पसंख्याक जमातीला पूर्ण लोकशाहीच्या काळांत सर्वसाधारण जनतेला भिण्याचें कांहीं कारण नाहीं हेंच सिद्ध होतें. तसेंच व्यापारी, कारखानदार, जमीनदार, खाणींचे व मळ्यांचे मालक याही धनाढ्य वर्गाला स्वतंत्र प्रतिनिधित्व देण्याचें बिलकुल प्रयोजन नव्हतें. मजुरांना एक वेळ दिलें तरी चालेल; परंतु वयांत आलेल्या प्रत्येक माणसाला मताचा हक्क मिळाल्यावर शहरांतून मजूरवर्गाला आपला प्रतिनिधी सर्वसाधारण मतदारसंघांतून खास निवडून आणतां येईल. कारण त्यांचेजवळ संख्याबल आहे. त्याला योग्य संघटनेची जोड दिली म्हणजे त्यांचा कार्यभाग तेव्हांच पार पडेल. त्यानंतर पदवीधरांना स्वतंत्र प्रतिनिधी देण्याचें कांहींच कारण नाहीं. विशेषतः हिंदुस्थानसारख्या अज्ञ जनतेनें भरलेल्या देशांत आणखी एका सुशिक्षित जातीची भर घालून आपण कोणतें कार्य साधणार ? शिवाय त्यांच्यातर्फे एखादा माणूस कायदेमंडळांत येऊन सुशिक्षितांचे कोणते हितसंबंध पाहणार ? तसेंच स्त्रियांनींही स्वतंत्र प्रतिनिधित्व मागितलें नसतांना तें त्यांच्यावर, इतर अनेक सामाजिक वा धार्मिक परंपरागत अन्यायांप्रमाणें, लादण्यांत आलें आहे. त्यांतही पुनः शीख, मुसलमान, अँग्लोइंडियन व ख्रिस्ती अशा धार्मिक व वांशिक भेदानुसार फुटीरपणा उत्पन्न केला आहे. राहतां राहिलें, हरिजन व मागासलेल्या जाती यांचें स्वतंत्र प्रतिनिधित्व. जातीय निर्णयांतील हरिजनांच्या

स्वतंत्र मतदारसंघाविरुद्ध महात्मा गांधींनीं प्रायोपवेशन करून मोहीम पुकारली व सुधारकांच्या मार्गातील एक महत्त्वाची धोंड बाजूला केली. ज्या अर्थानें मुसलमानांचें व शीखांचें प्रतिनिधित्व समर्थनीय ठरतें त्या अर्थानें तें हरिजनांच्याबाबत कधींही ठरणार नाहीं. कारण मुसलमान व शीख हे धर्मदृष्ट्या मुसलमान व शीख राहतील; परंतु हरिजनांना हरिजन रहावयाचें नाहीं; त्यांना हिंदुमात्रांत बेमालूमपणें कायमचें मिसळून जावयाचें आहे. याचा अर्थ त्यांच्यांतील मंडळी कायदेमंडळावर येऊं नयेत असा बिलकुल नाहीं; उलट त्यांना भरपूर प्रतिनिधित्व दिलें पाहिजे. शेवटीं मुसलमान व शीख यांच्या हितसंबंधांचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं, राज्यकारभाराच्या मुख्य मुख्य गोष्टी या आर्थिक व राजकीय स्वरूपाच्या असतात; त्यांत धर्माच्या बाबी फारच थोड्या असतात. तिन्ही धर्मांतील गरीब लोक एकाच दारिद्र्याच्या परिस्थितींत लोळणारे व त्यांचीं नित्याचीं दुःखेंही सारखींच जाचक. सर्व धर्मांतील धनाढ्य लोक हे आपल्या वर्गाच्या हिताकरितां एक होतांना दिसतात; परंतु आपल्या स्वतःच्या वैयक्तिक फायद्याकरितां ते आपल्या धर्मांतील गरीब जनतेच्या नांवाचा फायदा करून घेतात. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें व देशापुढील राजकीय स्वातंत्र्य, दारिद्र्य, बेकारी, अज्ञान यांचा नाश इत्यादि महत्त्वाचे राष्ट्रीय प्रश्न व जागतिक राजकारणाचे प्रश्न सोडविण्याकरितां आपल्या दाराशीं तिष्ठत बसले असतांना, कायदेमंडळांतील जागांबाबतचीं हीं जातीय भांडणें देशाच्या हिताला अपकारक ठरत आहेत. शिवाय एका जातीला जास्त जागा दिल्या कीं, तेवढ्या प्रमाणांत त्या दुसऱ्याच्या कमी होतात व अन्यायाचें हें बीं विनाकारण एका जातीच्या मनांत सतत घोळत राहतें हें बंगालच्या उदाहरणावरून चांगलें दिसून येतें. बंगालमध्यें शेंकडा ४५ हिंदु आहेत व शेंकडा ५५ मुसलमान आहेत असें धरून चालण्यास हरकत नाहीं. वास्तविक विशिष्ट मतदारसंघाच्या जागा बाजूला काढल्यास २५० पैकीं १९५ जागा या दोन जातींत वाटण्याकरितां शिल्लक उरतात. इतर प्रांतांतील न्याय लागू केल्यास हिंदु हे अल्पसंख्य ठरत असल्यानें त्यांच्याकडे माप जरा झुकतें ठेवावयास हवें होतें. परंतु मुसलमान हे मागासलेले

आहेत व हिंदु हे पुढारलेले आहेत ही बाब, तसेंच हिंदु हे कांहीं फार मोठ्या प्रमाणांत अल्पसंख्य नाहींत हीही गोष्ट लक्षांत घेतल्यास त्यांना निदान लोकसंख्येच्या प्रमाणांत तरी जागा राखून ठेवावयास पाहिजे होत्या. म्हणजे त्यांना ७८ + ९ = ८७ जागा द्यावयास हव्या होत्या; अर्थात् मग मुसलमानांच्या ११७ – ९ = १०८ राहिल्या असत्या. सध्यां हें प्रमाण ४५ : ५५ असें न पडतां ४० : ६० असें पडत आहे. देशबंधु दास यांनीं केलेल्या 'बंगाल करारा'प्रमाणें वरील प्रमाण ( ४०:६० ) हें समर्थनीय ठरतें ही गोष्ट खरी आहे. परंतु त्या करारामागील, करणाऱ्याचा राजकीय हेतु सध्यांच्या परिस्थितींत पूर्णपणें बामूला पडल्यासारखा झाला आहे. शिवाय येरवडा करारानें ७८ पैकीं ३० जागा हरिजनांना राखून ठेवण्याची जी परिस्थिति निर्माण झाली आहे ती वरील 'बंगाल करारा'-च्या प्रसंगीं क्षितिजावरही निर्माण झाली नव्हती; त्यामुळें त्या वेळीं सदर प्रश्न तितका कठीण नव्हता. शिवाय हिंदु-मुसलमानांना बंगाल्यांत जर एक व्हावयाचें नसेल व एकाचें म्हणणें दुसऱ्यावर चिरंतनपणें लादावयाचें असेल तर २५ युरोपियन सभासदांचें ( शेंकडा १० ) साहाय्य घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी आणखी एक पाचर, जातीय निर्णयानें बंगालच्या राजकारणांत मारून ठेविली आहे. कायदेमंडळाबाहेर हिंदु-मुसलमान स्वराज्याच्या लढ्यांत एकदिलानें सामील झाले, तर युरोपियनांचा जसा टिकाव लागणार नाहीं तीच स्थिति लहान प्रमाणांत बंगाल असेंब्लींत आहे असें समजण्यास हरकत नाहीं. तात्पर्य, हा तिरंगी सामना आहे व तो दीर्घ काळपर्यंत हिंदुस्थानांत खेळला जावा अशी जातीय निर्णयानें व्यवस्था करून ठेविली आहे. अशाही परिस्थितींत कॉंग्रेसनें जातिनिरपेक्ष, शुद्ध राष्ट्रीय राजकारणाच्या तत्त्वावर १९३७ सालीं नव्या घटनेप्रमाणें झालेल्या निवडणुकींत पुढीलप्रमाणें यश मिळविलें:—

| | प्रांत | जागा | कॉंग्रेस | शेंकडा जागा | शेंकडा मतें |
|---|---|---|---|---|---|
| १ | मद्रास | २१५ | १५९ | ७४ | ६५ |
| २ | मुंबई | १७५ | ८६ | ४९ | ५६ |
| ३ | बंगाल | २५० | ५४ | २२ | २५ |
| ४ | संयुक्तप्रांत | २२८ | १३४ | ५९ | ६५ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५ | पंजाब | १७५ | १८ | १०.५ | १३ |
| ६ | बिहार | १५२ | ९८ | ६५ | ७५ |
| ७ | मध्यप्रांत वऱ्हाड | ११२ | ७० | ६२.५ | ६१ |
| ८ | आसाम | १०८ | ३३ | ३१ | .... |
| ९ | वायव्यसरहद्द | ५० | १९ | ३८ | .... |
| १० | ओरिसा | ६० | ३६ | ६० | .... |
| ११ | सिंध | ६० | ७ | ११.५ | १२ |

वरील मोठें यश हें बहुतांशीं सर्वसाधारण मतदारसंघांतून मिळालेलें आहे. मुसलमानांकरितां एकंदर ४८२ जागा; परंतु त्यांतील अवघ्या ५८ जागांकरितां कॉंग्रेसनें उमेदवार उभे केले व त्यांतील २७ म्हणजे जवळ जवळ निम्मे यशस्वी झाले. मजुरांना असलेल्या ३८ जागांपैकीं कॉंग्रेसनें २० लढविल्या व त्यांपैकीं १८ काबिज केल्या. जमीनदारांच्या ३७ जागांपैकीं ८ कॉंग्रेसनें लढविल्या व ४ जिंकल्या. व्यापार, उद्योगधंदे यांच्या वाट्याला आलेल्या ५६ जागांपैकीं कॉंग्रेसनें ८ लढवल्या व ३ जिंकल्या. सर्वसाधारण मतदारसंघांतील २८ स्त्रीजागांपैकीं कॉंग्रेसनें बहुतेक सर्व जिंकल्या.

कॉंग्रेसनें ६ प्रांतांत अधिकारसूत्रें ग्रहण केल्यावर कायदेमंडळांतील कित्येक सभासद कॉंग्रेस पक्षाला येऊन मिळाले आहेत. मुसलमान मतदारसंघांखेरीज इतर सर्वसाधारण मतदारसंघांतून झालेल्या पोटनिवडणुकींत बहुतेक सर्वत्र कॉंग्रेसनेंच यश मिळविलें आहे. त्यांतल्या त्यांत डेमोक्रॅटिक व हिंदुशीख नॅशनॅलिस्ट या पक्षांतील ८ लोक सरहद्दप्रांतांत कॉंग्रेस पक्षाला मिळाल्यामुळें तेथेंही कॉंग्रेसची राजवट सुरू आहे. व त्यानंतर सरहद्दप्रांतांत झालेल्या ४ पोटनिवडणुकींत कॉंग्रेसला तीन जागा मिळावितां आल्यामुळें लौकरच तेथें कॉंग्रेस पक्षाचें खास बहुमत होण्याचा संभव आहे. बंगाल-आसाममध्येंही विरोधी पक्ष या नात्यानें कॉंग्रेसला काम करावें लागत असलें तरी तेथेंही पक्षाच्या संख्येंत पुष्कळच भर पडली असून सत्ता काबीज करण्याचे विचार त्यांच्या मनांत घोळत आहेत. सिंधमधील छोट्या पण दृढ अशा कॉंग्रेसनें आपली चुणूक दाखविली आहे.

(ई)

## जागांचा तक्ता
### प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें

| १<br>प्रांत | २<br>एकंदर जागा | ३<br>सर्वसाधारण जागा | ४<br>मुसलमान जागा | ५<br>युरोपियन जागा | ६<br>हिंदी ख्रिस्ती जागा | ७<br>लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें भरावयाच्या जागा | ८<br>गव्हर्नरनें भरावयाच्या जागा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| मद्रास | ५४ पेक्षां कमी नाहीं<br>५६ पेक्षां जास्ती नाहीं | ३५ | ७ | १ | ३ | ... | ८ पेक्षां कमी नाहीं<br>१० पेक्षां जास्ती नाहीं |
| मुंबई | २९ पेक्षां कमी नाहीं<br>३० पेक्षां जास्ती नाहीं | २० | ५ | १ | ... | ... | ३ पेक्षां कमी नाहीं<br>४ पेक्षां जास्त नाहीं |
| बंगाल | ६३ पेक्षां कमी नाही<br>६५ पेक्षां जास्ती नाहीं | १० | १७ | ३ | ... | २७ | ६ पेक्षां कमी नाही<br>८ पेक्षां जास्त नाहीं |
| संयुक्तप्रांत | ५८ पेक्षां कमी नाहीं<br>६० पेक्षां जास्ती नाहीं | ३४ | १७ | १ | ... | ... | ६ पेक्षां कमी नाहीं<br>८ पेक्षां जास्त नाहीं |
| बिहार | २९ पेक्षां कमी नाहीं<br>३० पेक्षां जास्ती नाहीं | ९ | ४ | १ | ... | १२ | ३ पेक्षां कमी नाहीं<br>४ पेक्षां जास्त नाहीं |
| आसाम | २१ पेक्षां कमी नाहीं<br>२२ पेक्षां जास्ती नाहीं | १० | ६ | १ | ... | ... | ३ पेक्षां कमी नाहीं<br>४ पेक्षां जास्त नाहीं |
| एकूण | २५४ पेक्षां कमी नाहीं<br>२६३ पेक्षां जास्ती नाहीं | ११८ | ५६ | ९ | ३ | ३९ | २९ पेक्षां कमी नाहीं<br>३८ पेक्षां जास्त नाहीं |

मागील पानावरील प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांच्या तक्त्यावरून दिसून येईल कीं, बंगाल, संयुक्तप्रांत व मद्रास या ठिकाणचीं कौन्सिलें सभासदांच्या संख्येच्या दृष्टीनें जवळ जवळ सारख्या आकाराचीं आहेत; व बाकीचीं तीन म्हणजे मुंबई, बिहार आणि आसाम हीं सारखीं आहेत.' शिवाय हें दिसून येईल कीं, मुसलमान, युरोपियन व हिंदी ख्रिस्ती यांच्याखेरीज बाकीचे स्वतंत्र मतदारसंघ कौन्सिलांच्या बाबतींत नाहींसे केले आहेत. युरोपियनांना सहाही प्रांतांतून जागा राखून ठेवल्या आहेत ही ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. हिंदी ख्रिस्त्यांना फक्त मद्रासमध्यें ३ जागा राखून ठेवल्या आहेत. दुसरी एक महत्त्वाची बाब म्हटली म्हणजे बंगाल आणि बिहार या दोन प्रांतांत जवळ जवळ निम्याइतक्या जागा प्रांतिक असेंब्लींतील सर्व सभासदांनीं मिळून प्रमाणशीर मतदानपद्धतीनें निवडून द्यावयाच्या आहेत. या पद्धतीनें बंगाल असेंब्लींतील व बिहार असेंब्लींतील जातवार प्रमाण जसेंच्या तसें कौन्सिलांतून निवडून येईल अशी अपेक्षा होती. परंतु निदान बंगाल कौन्सिलापुरतें बोलावयाचें झाल्यास तसें घडून आलें नाहीं. ही गोष्ट वास्तविक आनंद मानण्याजोगी झाली असती; परंतु खूप पैसे खर्च करून या वेळीं उमेदवारांनीं जातिनिरपेक्ष मतें मिळविलीं अशी दाट अफवा पसरली होती; प्रत्येक मताला एक हजार रुपये देण्यांत आले असें समजतें. यावरून या अप्रत्यक्ष निवडणुकींत मतदार अतिशयच थोडे असल्यामुळें व 'प्रत्येक माणसाची किंमत ठरलेली आहे' या वॉलपोलच्या प्रसिद्ध उक्तींत तथ्य असल्यामुळें लाचलुचपतीला भयंकर वाव आहे हें तेव्हांच लक्षांत भरतें. फेडरल असेंब्लींतील प्रतिनिधी प्रांतिक असेंब्ल्यांतील सभासदांनीं निवडावयाचे हें १९३५ च्या घटनाकायद्यांतील अप्रत्यक्ष निवडणुकीचें तत्त्व कांहीं प्रमाणांत वरीलप्रमाणें बिहार व बंगालमध्यें आधींच सुरू केलें गेलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आणखी एक गोष्ट म्हणजे गव्हर्नरांनीं कांहीं जागा भरावयाच्या ही होय. अर्थात् त्यांनीं 'आज्ञापत्रां'तील सूचनांना धरून याबाबत वागावयाचें आहे ही गोष्ट स्पष्ट आहे.

काँग्रेसनें लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांच्या निवडणुकींत पुढीलप्रमाणें यश मिळविलें:—

| | | एकूण जागा | कॉंग्रेसनें लढविल्या | कॉंग्रेसनें मिळविल्या |
|---|---|---|---|---|
| १ | मद्रास | ४६ | ३३ | २६ |
| २ | मुंबई | २६ | १५ | १३ |
| ३ | बंगाल | ५७ | १२ | ९ |
| ४ | संयुक्तप्रांत | ५२ | १९ | ८ |
| ५ | बिहार | २६ | १२ | ८ |
| ६ | आसाम | २२ | १ | .... |

यावरून दिसून येईल कीं, मद्रास आणि मुंबई या प्रांतांतून कॉंग्रेसला बहुमत मिळालें असून मद्रासेंत व मुंबईत प्रांतिक असेंब्ल्यांना कौन्सिलांच्या विरोधाचें भय बिलकुल उरलेलें नाहीं. एका अर्थानें या दोन प्रांतांत कौन्सिलांचें अस्तित्व निरर्थक ठरलें आहे असें म्हणावयास बिलकुल प्रत्यवाय नाहीं. संयुक्तप्रांत व बिहार या दोन प्रांतांतील असेंब्ल्यांतून कॉंग्रेस पक्षाचें एवढें प्रचंड बहुमत आहे कीं, कौन्सिलांनीं जरी असेंब्लीनें मंजूर केलेल्या बिलांना यशस्वी विरोध केला तरी दोघांच्या जोडसभेंत कॉंग्रेसचेंच बहुमत होऊन कौन्सिलांच्या विरोधाला कांहींच किंमत उरणार नाहीं. राहता राहिलीं बंगाल व आसाम येथील कौन्सिलें. प्रस्तुत त्या प्रांतांतील असेंब्ल्यांतून कॉंग्रेस पक्षाला बहुमताचा पाठिंबा नसल्यामुळें व म्हणून तेथें कॉंग्रेस पक्षाचें सरकार स्थापन होऊं शकत नसल्यामुळें बंगाल व आसाम कौन्सिलांमधील कॉंग्रेसची स्थिति व्यवहार्य राजकारणाच्या क्षेत्रांत येण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं.

( उ ) या ६१ व्या कलमांत उल्लेखिलेल्या ५ व्या शेडयूलमध्यें 'प्रांतिक कायदेमंडळांची रचना' हा विषय आला आहे. त्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग पुढें उतरून घेत आहे:—

## सभासदत्वाची सर्वसाधारण पात्रता

१ निवडून येण्यास पात्र होण्याला त्या इसमानें ब्रिटिश प्रजाजन किंवा फेडरेशनमध्यें सामील झालेल्या संस्थानांचा अधिपति किंवा प्रजाजन असलें पाहिजे.

२ प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे बाबतींत त्याचें वय २५ वर्षां-

पेक्षां कमी असतां कामा नये आणि कौन्सिलाचे बाबतींत ३० वर्षांपेक्षां कमी असतां कामा नये.

३ या शेडयूलमध्यें त्या इसमाच्या विशिष्ट बाबतींत जी पात्रता सांगितली असेल ती त्याच्या ठायीं असली पाहिजे.

४ एकदां मुदत संपली तरी पुन: त्या इसमाला निवडून येण्याकरितां उमेदवार म्हणून उभे राहतां येईल.

( वऱ्हाडच्या आपल्या मुलखापुरता हैद्राबाद आणि वऱ्हाडचा निजाम फेडरेशनमध्यें सामील झाला असल्याचें मागें निजाम व ब्रिटिश राजेसाहेब यांच्यामध्यें झालेल्या करारांत सांगितलें आहेच. त्यामुळें वऱ्हाडी प्रजाजनांना उमेदवार म्हणून उभे राहण्याची पात्रता मिळालेली आहे. वरील २ ऱ्या कलमांतील बंदीनें कोणाही २४ वर्षे वयाच्या हिंदी **पिटला** किंवा १७ वर्षे वयाच्या **थोरल्या माधवरावाला** सभासद होतां न आल्यामुळें पंतप्रधानकीचीं वस्त्रें मिळण्याचा रस्ता रोखून धरला आहे. )

## लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्या

१ निरनिराळ्या प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्यांतून जागा किती व कशा वाटल्या आहेत तें ( इ ) पोटकलमांत दिलेल्या तक्त्यावरून समजून येईल.

२ त्या तक्त्यांतील त्या त्या प्रांताच्या पुढील स्तंभांत सभासदांची एकूण संख्या दिली आहे; त्यांपैकीं, सर्वसाधारण जागा तिसऱ्या स्तंभांत दिल्या आहेत. चौथ्या स्तंभांत हरिजनांकरितां राखून ठेवलेल्या जागा दिल्या आहेत, त्या व मुंबई प्रांतांत मराठ्यांच्याकरितां राखून ठेवलेल्या सात जागा या सर्वसाधारण जागांतच अंतर्भूत समजावयाच्या. ( त्या दोघांची बेरीज करावयाची नाहीं. मद्रास इलाख्यांत १९१९ च्या कायद्यानें ३६ जागा ब्राह्मणेतरांकरितां राखून ठेवल्या होत्या; परंतु १९३५ च्या कायद्यानें त्या काढून टाकल्या आहेत. परंतु मुंबई इलाख्यांतील सात जागा मात्र मराठ्यांकरितां नव्या राजवटींत सुद्धां राखून ठेवल्या आहेत. )

३ पुढील स्तंभांतून मागसलेल्या जाती, शीख, मुसल्मान इ० स्वतंत्र मतदारसंघानें निवडावयाच्या जागा दिल्या आहेत.

४ शेवटच्या पांच स्तंभांत स्त्रियांकरितां ( सर्वसाधारण, शीख, मुसलमान इ० ) राखून ठेवलेल्या जागा दिल्या आहेत.

५ या सर्व जागांकरितां 'प्रादेशिक मतदारसंघ' बनविण्यांत येतील. यांत व्यापार, मजूर, युनिव्हर्सिटी, जमीनदार हे मतदारसंघ अर्थात्‌च येऊं शकणार नाहींत.

६ एका मतदारसंघाला एक किंवा अधिक जागा देण्यांत येतील. ( मुंबई प्रांतांत एकेका मतदारसंघाला चार चार जागा दिल्याचीं कितीतरी उदाहरणें आहेत. बाकीच्या प्रांतांतून हरिजनांच्या जागांशिवाय सर्वत्र 'एका मतदारसंघानें एक सभासद निवडून द्यावयाचा' हीच पद्धत अमलांत आली आहे. ज्या मतदारसंघांत एकापेक्षां अधिक जागा भरावयाच्या आहेत त्या मतदारसंघांत निवडून आलेल्या सभासदांत ज्येष्ठ ( सीनियर ) सभासद कोण समजावयाचा ? जो कायदेमंडळांत सर्वांत जास्त वर्षें सभासद आहे त्याला, का ज्यानें निवडणुकींत सर्वांत जास्त मतें मिळविलीं असतील त्याला ज्येष्ठ समजावयाचें ? 'सर्वांत जास्त मतें मिळविणारा सभासद ज्येष्ठ मानावा' असें अर्स्किन मे यानें आपल्या पुस्तकांत [ पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ. १६८ तळटीप ] लिहिलें आहे. )

७ हरिजनांकरितां किंवा मराठ्यांकरितां ज्या मतदारसंघांतून जागा राखून ठेवल्या जातील त्या मतदारसंघांनीं कमींत कमी १ जागा ( बिनराखीव ) निवडून दिली पाहिजे.

( उदाहरणार्थ, मुंबई उत्तर व उपनगर [ सर्वसाधारण मतदार-संघ ] यांत पुढीलप्रमाणें उमेदवार निवडून आले:—

१ बाळ गंगाधर खेर

२ दत्तात्रेय नथोबा वांद्रेकर [ मराठा ]

३ सावळाराम गुंडाजी सोनगांवकर [ हरिजन ]

तसें न होईल तर हरिजनांबाबत संयुक्त मतदारसंघाचें तत्त्व अमलांत येणार नाहीं. तसेंच ज्या मतदारसंघांत एकापेक्षां अधिक जागा आहेत तेथें सध्यां 'क्युम्युलेटिव्ह' पद्धतीनें मतदान करण्यांत येतें म्हणजे एकाच उमेदवाराला जागांच्या संख्येइतकीं सगळींच्या सगळीं मतें देतां येतात; यामुळें पुनः हरिजन मतदार हरिजन उमेदवाराला व सवर्ण

मतदार सवर्ण उमेद्वाराला आपलीं सगळीं मतें देऊं शकतो. अर्थात् संयुक्त मतदारीचें तत्त्व मागें पडतें. म्हणून या पद्धतीऐवजीं 'डिस्ट्रिब्यूटिव्ह' पद्धति सुरू करावी अशी मागणी मद्रास असेंब्लींत हरिजनपुढारी एम्. सी. राजा यांनीं केली व मद्रास सरकारनें तिला पाठिंबा दिला. या पद्धतीनें एका उमेदवाराला एकच मत देतां येतें; त्यामुळें आपल्या मताचा अधिकार संपूर्णपणें गाजवावयाचा असल्यास कोणातरी हरिजन उमेद्-वाराला सवर्ण मतदारानें मत दिल्यावाचून गत्यंतर उरणार नाहीं. )

८ ज्या मतदारसंघांत हरिजन जागा राखून ठेविली असेल त्यांतील हरिजन मतदारांनीं प्राथमिक निवडणुकींत आपले चार प्रतिनिधी निवडावे. या चार इसमांना सर्वसाधारण निवडणुकींत उमेद्वार समजलें जाईल. या चारांत जो जास्त मतें मिळवील तो निवडून आला असें मान-ण्यांत येईल.

( १९३२ सालीं झालेल्या येरवडा करारान्वयें ही पद्धति ठर-विण्यांत आली आहे. या योगें हरिजनांचे खास प्रतिनिधी निवडून देण्या-बद्दलची मागणी व हिंदूंतून हरिजनांना बाजूला काढण्याला विरोध या दोन्ही गोष्टींचा समन्वय करण्यांत आला आहे. म्हणून या कराराला 'गांधी-अंबेडकर' करार असें सार्थ नांव देतां येईल. मात्र यामुळें हरि-जनांसारख्या मागसलेल्या व अर्थहीन समाजांतील उमेद्वारांना दोन निवडणुकींची खटखट व खर्च करावा लागणार. प्राथमिक निवडणुकी हरिजनांतलि जागृतीच्या अभावीं व पुरेशा लायक इसमांच्या अभावीं, फारशा कोठें कराव्या लागल्या नाहींत हा भाग वेगळा. तथापि यामुळें हरिजनोद्धाराच्या चळवळीस विशेष जोर चढला असें म्हणतां येणार नाहीं. होणारें नुकसान टळलें एवढें फार झालें तर म्हणतां येईल. )

९ स्त्रियांकरितां स्वतंत्र मतदारसंघ केले जातील.

( हे मतदारसंघ स्त्रिया आणि पुरुष मिळून करण्यांत आले आहेत. त्यामुळें स्त्रियांनींच फक्त स्त्रियांना मतें द्यावयाचीं ही आपत्ति टळली आहे. परंतु स्त्रियांचा विरोध असतांही त्यांच्या जागांची जातवार विभागणी केली आहे. )

१० सहाव्या शेड्यूलमध्यें, प्रादेशिक मतदारसंघांतून मत

देण्याचा कोणाला हक्क राहील, तें प्रांतवार सविस्तरपणें देण्यांत आलें आहे; म्हणजे हें सहावें शेडयूल पांचव्या शेडयूलच्या पोटांतून निघालें आहे हें ध्यानांत धरावें.

## लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें

१ ज्या प्रांतांत लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें आहेत त्यांतील जागांची वाटणी ( ई ) पोटकलमांत दिलेल्या तक्त्यांत दिली आहे.

२ त्यांत सर्वसाधारण जागा, मुसलमान जागा, युरोपियन जागा, हिंदी ख्रिस्ती जागा, कांहीं प्रांतांतून असेंब्लीनें प्रमाणशीर मतदानपद्धतीनें निवडून दिलेल्या जागा, व गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें भरावयाच्या जागा अशा क्रमानें स्तंभ पाडले आहेत.

३ कौन्सिलांच्या बाबतींतही 'प्रादेशिक मतदारसंघांतून' एक किंवा एकापेक्षां अधिक जागा ठेवण्यांत याव्या.

( मुंबई प्रांतांत असेंब्लीप्रमाणें अनेक जागा असणारे मतदारसंघ तयार केले आहेत. इतर कोणत्याही प्रांतांत ही पद्धति अवलंबिलेली नाहीं. )

४ ले. कौन्सिलच्या सभासदाची मुदत तो एकदां निवडून आल्यावर ( पोटनिवडणुकी यांत धरावयाच्या नाहींत ) नऊ वर्षे राहील. मात्र पहिल्या निवडणुकी झाल्यावर कांहींची म्हणजे जवळजवळ १/३ सभासदांची मुदत ३ वर्षे, दुसऱ्या १/३ सभासदांची मुदत ६ वर्षे व बाकीच्यांची ९ वर्षे, याप्रमाणें गव्हर्नरानें आपल्या मर्जीप्रमाणें ठरवावी.

( मुंबई प्रांतांतील सभासदांचीं नांवें व त्यांच्या मुदती यापूर्वी विस्तारानें दिल्या आहेत व मुंबई प्रांतांतील अनेकसभासद मतदारसंघामुळें उत्पन्न झालेल्या अडचणींचाही निर्देश मागें करण्यांत आला आहे व ती अडचण कशी दूर केली हेंही सांगितलें आहे.)

## सर्वसाधारण

१ ज्या बाबीसंबंधीं १९३५ च्या कायद्यानें अगर ऑर्डर इन कौन्सिलनें अगर प्रांतिक कायदेमंडळें अस्तित्वांत आल्यानंतर त्यांनीं केलेल्या कायद्यानें तरतूद करण्यांत आली नसेल अशा बाबीबाबत गव्हर्नरनें आपलें वैयक्तिक मत चालविण्याच्या अधिकारांत वरील कलमें आणि

सहाव्या शेड्यूलमधील तरतुदी अमलांत आणण्याकरितां आणि विशेषतः पुढील गोष्टींसंबंधीं नियम करावेत:—

( क ) जागा रिकाम्या झाल्याचें जाहीर करणें व जागा भरण्याची व्यवस्था करणें;

( ख ) उमेद्वाराचें नॉमिनेशन;

( ग ) निवडणूक घडवून आणणें आणि राखीव जागांबाबतचे विशिष्ट नियम संभाळून निवडणुकींचें नियंत्रण करणें;

( घ ) निवडणुकीबाबत उमेद्वारांनीं केलेला खर्च;

( ङ ) निवडणुकीबाबत लाचलुचपतीचे प्रकार व इतर गुन्हे;

( च ) निवडणुकींतून अगर निवडणुकींसंबंधांत उत्पन्न होणारे संशय व तंटे यांचा निकाल करणें;

( छ ) सदर नियमांची अम्मलबजावणी करण्याची पद्धति.

( पार्लमेंटाचे एक सभासद् व्हाइस-ॲडमिरल टेलर यांनीं हिंदुस्थानांतील प्रांतिक निवडणुकींत उमेद्वारांनीं किती खर्च केला याचें पत्रक भारतमंत्र्यांनीं सादर करावें याबाबत पृच्छा केली. उपभारतमंत्री लॉर्ड स्टॅनले यांनीं उत्तर दिलें:—"सदर बाब प्रांतिक सरकारच्या ताब्यांतली असल्यामुळें त्याबद्दल मी माहिती देऊं शकत नाहीं." सर आल्फ्रेड नॉक्स या सभासदानें विचारलें:—"एका सभासदानें निवडणुकीकरितां दहा हजार पौंड खर्च केला ही गोष्ट खरी आहे काय?" लॉर्ड स्टॅनले यांनीं उत्तर दिलें नाहीं.)

× × ×

( यानंतर या शेड्यूलमध्यें प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्या व प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें यांतील जागांचे तक्ते देण्यांत आले आहेत ते यापूर्वीच टिप्पणी [ इ ] व [ ई ] यांत दिले आहेत. )

( ऊ ) पांचव्या शेड्यूलमधील नवव्या कलमांत उल्लेखिलेल्या सहाव्या शेड्यूलमध्यें 'मतदानाच्या हक्का'बाबत तरतुदी दिल्या आहेत. त्यांतील ( १ ) सर्वसाधारण ( २ ) मुंबई ( ३ ) मध्यप्रांत-वऱ्हाड या ३ खंडांपैकीं कांहीं महत्त्वाचीं कलमें, ( विशेषतः अखिल महाराष्ट्राच्या

दृष्टीनें नागपूर-वऱ्हाड भागाची माहिती देणें जरूरीचें वाटल्यामुळें ) पुढें सारांशरूपानें देत आहे:—

## सर्वसाधारण

१ प्रत्येक प्रादेशिक मतदारसंघांत मतदारांची एक यादी ठेवण्यांत येईल. त्या यादींत नसणाऱ्या कोणालाही मत देण्याचा अधिकार नाहीं व त्या यादींत असणाऱ्या प्रत्येकाला मताचा अधिकार आहे.

२ सदर यादी वेळोवेळीं विशिष्ट तारखेपासून दुरुस्त करण्यांत आली असें ठरविण्यांत येईल. ही तारीख गव्हर्नर आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें ठरवील.

३ २१ वर्षें वय पूर्ण झालेलें असल्याशिवाय व ब्रिटिश प्रजाजन किंवा फेडरेशनमध्यें सामील झालेला संस्थानिक अगर संस्थानी प्रजाजन असल्याशिवाय कोणाचेंही नांव यादींत दाखल केलें जाणार नाहीं.

४ लायक कोर्टानें तसें जाहीर केलें असल्यास कोणत्याही वेड्या माणसाला मताचा अधिकार असणार नाहीं.

५ शिखाला शिखांच्या मतदारसंघांत, मुसलमानाला मुसलमान मतदारसंघांत इ० याप्रमाणें मतदारांची यादी तयार होईल. बिगर-शिखाला शीख यादींत, इ० केव्हांही आपलें नांव दाखल करितां येणार नाहीं.

६ त्याचप्रमाणें शीख, मुसलमान इ० यादींत नांव घालण्याचा ज्याला हक्क आहे त्याला सर्वसाधारण मतदारांच्या यादींत नांव दाखल करितां येणार नाहीं.

हा नियम आसाम व ओरिसा या प्रांतांतील स्त्रियांच्या जागांबाबत लागू होणार नाहीं.

७ कोणत्याही प्रांतांत कोणाही इसमाला एकापेक्षां अधिक प्रादेशिक मतदारसंघांत अनेक वेळां मत देतां येणार नाहीं. परंतु ज्या प्रांतांत स्त्रिया सभासद निवडून देण्याकरितां स्वतंत्र पण स्त्रीपुरुषमिश्रित मतदारसंघ असतील त्या मतदारसंघांत एकाच इसमाला दुसऱ्यांदा मत देण्याचा अधिकार राहील.

८ लाचलुचपतीच्या प्रकाराबाबत ज्या इसमाचें नांव मतदारसंघांतून काढून टाकण्यांत आलें आहे त्याचें नांव यादींत घातलें जाणार नाहीं.

९ निवडणुकीचे वेळीं काळ्यापाण्याची अगर कैदेची शिक्षा भोगीत असलेल्या इसमाला मत देतां येणार नाहीं.

१० नवऱ्याच्या पात्रतेमुळें ज्या बायकोला मतदानाचा हक्क मिळाला असेल त्या बायकोचा तो हक्क, तिचा नवरा मेला असला तरी, अबाधित राहील; मात्र सदर स्त्रीनें दरम्यानच्या काळांत पुनर्विवाह केलेला असतां कामा नये (उघडच आहे कीं, पहिल्या नवऱ्यामुळें प्राप्त झालेला हक्क दुसरा नवरा केल्यावर अबाधित कसा राहणार ?); त्याच इसमाला एकापेक्षां अधिक बायका असल्यास कोणत्या बायकोला मताधिकार द्यावयाचा हें ठरविण्यांत येईल. त्या बाईनें आपला राहण्याचा मुक्काम बदलला तर तिचें नांव दुसऱ्या मतदारसंघांत बदलून घेतां येईल.

११ ट्रस्टी, पालनकर्ता, वहिवाटदार अगर रिसीव्हर या नात्यानें एखाद्या इसमाच्या नांवावर जमीन वगैरे मालमत्ता असल्यास त्याला त्यामुळें मताचा अधिकार प्राप्त होणार नाहीं.

१२ कांहीं व्याख्या:—'घर'' किंवा 'इमारत' यांत त्यापैकीं, धंदा, व्यापार, उद्योग याकरितां वापरण्यांत येणाऱ्या भागाचाही अंतर्भाव होतो; 'साक्षर' म्हणजे हिंदुस्थानांत प्रचलित असणारी कोणतीही भाषा अगर पोटभाषा, त्या भाषेंत लिहितां वाचतां येणारा इसम.

१३ एखादा इसम शीख आहे अगर नाहीं असा प्रश्न उपस्थित झाल्यास त्या इसमानें 'आपण शीख आहों' असें जाहीर केलें तरच त्याला शीख मानलें जाईल.

१४ सेवानिवृत्त माणसांमध्यें बडतर्फ केलेल्या इसमांचा अंतर्भाव होणार नाहीं.

## मुंबई

### वस्तीबाबत आवश्यक गोष्टी

१ मुंबई शहर मतदारसंघाबाबत मताची पात्रता संपादूं इच्छिणारा इसम मुंबई शहरांत, ठाणें महालांत अगर दक्षिण साष्टी तालुक्यांत कमींत कमी १८० दिवस वास्तव्य करणारा असला पाहिजे.

२ मुंबई शहराखेरीज इतर नागर मतदारसंघाबाबत त्यानें त्या मतदारसंघांत अगर त्या मतदारसंघाच्या सीमेच्यापासून दोन मैलांपर्यंत कोठेंही असलेल्या घरांत कमींत कमी १८० दिवस वास्तव्य केलेलें असलें पाहिजे.

३ ग्रामीण मतदारसंघांत त्यानें कमींत कमी १८० दिवस त्या मतदारसंघांतील घरांत अथवा जवळच्या मतदारसंघांतील घरांत वास्तव्य केलेलें असलें पाहिजे.

४ युरोपियन आणि अँग्लोइंडियन प्रादेशिक मतदारसंघाबाबत मतदारानें प्रांतांत कोठेंही कमींत कमी १८० दिवस वास्तव्य केलेलें असलें पाहिजे.

५ एखादा इसम मधून मधून एखाद्या घरांत निजत असेल तर त्याची त्या घरांत वस्ती आहे असें समजण्यांत येईल. कांहीं दिवस घरांतून एखादा इसम गैरहजर आहे अगर दुसऱ्या घरांत राहतो या कारणास्तव, तो त्या घरांत राहत नाहीं, असें मानलें जाणार नाहीं; मात्र त्याला त्या घरांत वाटेल तेव्हां येऊन राहण्याची स्वतंत्रता असली पाहिजे आणि त्यानें परत येऊन राहण्याचा हेतु टाकून दिलेला नसला पाहिजे.

## करदानावर अवलंबून असलेली पात्रता

१ मागील जमाखर्ची वर्षांत प्राप्तीवरील कर देणाऱ्या इसमास मताधिकार मिळेल.

## मालमत्तेवर अवलंबून असलेली पात्रता

१ (अ) कमींत कमी ८ रुपये सारा भरणाऱ्या जमीनमालकास अगर कुळास;

(आ) सारा द्यावा लागला असता तर ज्या इनामदाराला ८ रुपये सारा देणें भाग पडलें असतें अशा इनामदाराला;

(इ) खोत असून अथवा खोतींत भागीदार असून कमींत कमी ८ रु. सारा देण्याला जबाबदार असलेल्या खोताला;

(ई) मुंबई शहरांत अगर कोणत्याही म्युनिसिपल हद्दींत

असलेल्या आणि कमींत कमी योग्य ती किंमत असलेल्या
घराच्या मालकास अगर बिऱ्हाडकरूस

मतदाराच्या यादींत नांव घालून घेतां येईल. वरील ( ई ) कलमांतील 'योग्य किंमत' याचा अर्थ:—

( १ ) मुंबई शहरांत वार्षिक ६० रु. भाडें;
( २ ) इतर म्युनिसिपल हद्दींत वार्षिक १८ रु. भाडें;
( ३ ) इतर कोणत्याही घराबाबत, ७५० रु. किमतीचें घर.

## शिक्षणविषयक पात्रता

१ मुंबई युनिव्हर्सिटीची मॅट्रिक्युलेशन अगर स्कूल लीव्हिंग परीक्षा अगर वरील परीक्षांच्या योग्यतेची दुसरी, ठरविण्यांत आलेली परीक्षा किंवा व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेपेक्षां कमी दर्जाची नसणारी परीक्षा उत्तीर्ण झालेल्यांना मताधिकार आहे.

( वरील 'ठरविण्यांत आलेली' याचा अर्थ 'प्रांतिक कायदेमंडळानें कायदा करून' अगर 'गव्हर्नरनें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें नियम करून' ठरविण्यांत आलेली असा घेणेचा आहे. याचा अर्थ मुंबई मंत्रि-मंडळाला टिळक महाराष्ट्र विद्यापिठ, गुजरात विद्यापीठ, महिला विद्यापीठ इ० विद्यापीठांच्या प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झालेल्यांना नियम करून मत-दानाचा हक्क देतां येण्यासारखा आहे. )

## स्त्रियांकरितां पात्रतेची जादा सवलत

१ पेन्शन असलेल्या विधवेस अथवा लष्करी पेन्शन मिळणाऱ्या आईला; तसेंच साक्षर असलेल्या स्त्रियेला मताधिकार मिळेल.

## हरिजन जातीकरितां जादा सवलत

१ साक्षर असलेल्या व प्रांतांत वंशपरंपरागत अगर इतर तऱ्हेनें खेडेगांवांतील तलाठी, पाटील अथवा इतर नोकराचें काम करीत असलेल्या हरिजन जातीच्या इसमाला मताधिकार मिळेल; मात्र गैरवर्तनाबद्दल बडतर्फ झालेल्या व पुनः नेमणूक न झालेल्या इसमास मताचा हक्क मिळणार नाहीं.

## कांहीं बाबतींत यादींत नांव घालून घेण्यास अर्ज करण्याची आवश्यकता

१ शिक्षणविषयक पात्रता असलेल्यांनीं, तसेंच साक्षर स्त्रियांनीं अर्ज केल्यासच त्यांचें नांव यादींत घातलें जाईल.

## संयुक्त मालमत्तेबाबत तरतुदी

१ संयुक्त हिंदु कुटुंबांतील एकाच माणसास मताधिकार मिळेल. सदर माणसाचें नांव कुटुंबानें दिलेलेंच यादींत घातलें जाईल.

## किरकोळ

१ एखाद्या घराची किंमत आकारतांना त्या घरांत असलेली यंत्र-सामुग्री, फर्निचर इत्यादींची किंमत धरतां येणार नाहीं.

२ एखाद्या जमिनीचा आकार किती आहे हें ठरवितांना त्याच गांवांतील इतर जमिनींच्या आकाराच्या सरासरीकडे अगर त्याच गांवांत तशी जमीन नसल्यास शेजारच्या गांवांतील जमिनींच्या सरासरी आकाराकडे लक्ष पुरविण्यांत येईल.

## मध्यप्रांत आणि वऱ्हाड
## वस्तीबाबत आवश्यक गोष्टी

१ ग्रामीण मतदारसंघाच्या बाबतींत त्या मतदारसंघांत राहावयाची जागा असल्याशिवाय व नागर मतदारसंघाबाबत त्या मतदारसंघांत अगर त्याच्या सीमेपासून दोन मैलांच्या आंत राहावयाची जागा असल्याशिवाय कोणाही इसमाचें नांव प्रादेशिक मतदारसंघाच्या मतदारांच्या यादींत घालतां येणार नाहीं.

२ वरील राहावयाच्या जागेबाबत त्याला मताधिकार प्राप्त होईल; मात्र त्यानें मागील जमाखर्ची वर्षांत एकूण कमींत कमी १८० दिवस त्या प्रदेशांतील एखाद्या घरांत प्रत्यक्ष येऊन वस्ती केलेली असली पाहिजे किंवा त्याच्यावर अवलंबून असलेल्या लोकांच्या अगर नोकरांच्या ताब्यांत असलेलें त्याचें स्वतःचें राहतें घर त्या प्रदेशांत कमींत कमी १८० दिवस असलें पाहिजे आणि त्या वर्षांत त्यानें त्या घराला भेट दिलेली असली पाहिजे.

—

## करदानावर अवलंबून असलेली पात्रता

१ (१) इनकम टॅक्स किंवा प्राप्तीचा कर देणाऱ्याला; किंवा (२) प्रांतांतील म्युनिसिपल हद्दींत हैसियतीवर आधारलेला म्युनिसिपल कर कमींत कमी ७५ रु. पर्यंत देणाऱ्यास;

मताधिकार प्राप्त होईल.

## मालमत्तेवर अवलंबून असलेली पात्रता

१ (१) मालक किंवा ठेकेदार म्हणून ज्याच्यावर कमींत कमी दोन रुपये सारा अगर कामिल जमा बसते इतकी इस्टेट अगर महाल मध्यप्रांतांत धारण करणाऱ्यास;

(२) मालक किंवा ठेकेदार म्हणून ज्याच्यावर कमींत कमी २ रुपये आकारलेला अथवा आकारण्याला योग्य असा शेतसारा द्यावा लागत असेल अशी सर जमीन अथवा खुदखस्त मालकी हक्कानें अथवा मालिक मकबुझा अगर रयत म्हणून मध्यप्रांतांत धारण करणाऱ्यास;

(३) कमींत कमी २ रुपये आकाराची शेतजमीन, कुळाच्या नात्यानें नव्हे अशा रीतीनें, वऱ्हाडमध्यें धारण करणाऱ्यास;

(४) वार्षिक भाडें ज्या घराच्या बाबतींत कमींत कमी ६ रुपये आहे अशा घराच्या मालकास अगर बिऱ्हाड-करूस (प्रांतांतील नागर प्रदेशांत);

(५) कामावर असणाऱ्या वतनदार पाटीलपटवाऱ्यास किंवा नोंदलेल्या देशमुख, देशपांडे व लंबरदार यांना;

प्रादेशिक मतदारसंघाच्या मतदारांच्या यादींत नांव घालून घेण्याची पात्रता राहील.

## शिक्षणविषयक पात्रता

१ नागपूर युनिव्हर्सिटीच्या पदवीपरीक्षेच्या कोणत्याही अभ्यासक्रमांत प्रवेश मिळवून देणारी परीक्षा, किंवा तत्समान ठरविण्यांत आलेली परीक्षा, अगर फायनल-मिडल स्कूल परीक्षेपेक्षां कमी दर्जाची

नसणारी कोणतीही ठरविण्यांत आलेली परीक्षा उत्तीर्ण झालेल्यांना प्रादेशिक मतदारसंघांत मताधिकाराची पात्रता राहील.

वऱ्हाडांतील मतदारसंघाबाबत हैद्राबाद संस्थानांतील वरच्या परीक्षांच्या बरोबरीची परीक्षा उत्तीर्ण झालेल्यांना मताधिकार देण्यांत येईल.

## बादशहांच्या व निजामाच्या लष्करांतील नोकरीवर अवलंबून असलेली पात्रता

१ ज्याप्रमाणें बादशहांच्या सैन्यांतील सेवानिवृत्त अधिकाऱ्यांना मताधिकार मिळेल त्याचप्रमाणें निजामाच्या सैन्यांतील अगर हैद्राबाद संस्थानी पोलिसांतील सेवानिवृत्त, पेन्शनदार हपीसराला अथवा शिपायाला वऱ्हाडच्या मतदारसंघाबाबत मताधिकार दिला जाईल.

## स्त्रियांकरितां जादा सवलती

१ बादशहांच्या अथवा निजामाच्या लष्करांतील अथवा निजामाच्या पोलिसफोर्समधील अधिकाऱ्याची पेन्शन मिळणारी विधवा अथवा आई असणाऱ्या स्त्रियांना, तसेंच साक्षर अथवा प्राथमिक शाळेचें सर्टिफिकीट असलेल्या स्त्रियांना मताधिकार मिळेल.

## हरिजनांकरितां जादा सवलती

१ एखादा हरिजन कोटवार, जागल्या किंवा कामावर असलेला गांवमहार असेल तर त्याला मताधिकार प्राप्त होईल.

## कांहीं बाबतींत नांव घालण्यास्तव अर्जाची जरुरी

१ पेन्शन मिळणाऱ्या आईस अथवा विधवेस, किंवा साक्षर अथवा प्राथमिक शाळेचें सर्टिफिकीट असलेल्या स्त्रियेस आपलें नांव यादींत घालून घेण्याकरितां ठराविक नमुन्याप्रमाणें अर्ज करावा लागेल अगर त्यांच्यातर्फे दुसऱ्या कोणी तरी अर्ज केला तरी चालेल. हीच तऱ्हा शिक्षणविषयक पात्रता असणाऱ्या मतदारांच्या बाबत लागू आहे.

## कांहीं व्याख्या

१ इस्टेट, महाल, मालिक मकबुझा, कामिल जमा, सर जमीन, खुदखस्त, लंबरदार, जमीनमहसूल, रयत इ० च्या व्याख्या १९१७ च्या मध्यप्रांत जमीनमहसुलाच्या कायद्यांतील घ्यावयाच्या. तसेंच कांहीं व्याख्या १९२८ च्या वऱ्हाड लॅंड रेविन्यू कोडांतील घ्यावयाच्या आहेत.

६२.—(१) प्रत्येक प्रांतिक कायदेमंडळाच्या एका अथवा दोन्ही प्रतिनिधिसभांची बैठक दरसाल कमींत कमी एकदां तरी बोलावण्यांत येईल, आणि एका अधिवेशनांतील बैठकीचा शेवटचा दिवस आणि त्याच्या पुढल्या अधिवेशनांतील पहिल्या बैठकीकरितां नेमलेली तारीख यांच्यामध्यें बारा महिन्यांचें अंतर असणार नाहीं.

कायदेमंडळाची अधिवेशनें, त्यांची अधिवेशनसमाप्ति आणि (असेंब्ली) बरखास्ती

(२) या कलमांतील तरतुदी लक्षांत घेऊन गव्हर्नरनें वेळोवेळीं आपल्या मर्जीप्रमाणें—

(क) दोन्ही प्रतिनिधिसभांना अथवा कोणत्याही एका सभेला त्याला वाटेल त्या वेळीं आणि ठिकाणीं बोलवावें;

(ख) एका अथवा दोन्ही प्रतिनिधिसभांचीं अधिवेशनें समाप्त करावींत;

(ग) लेजिस्लेटिव्ह असेंब्ली बरखास्त करावी.

(३) या कायद्याच्या ह्या खंडाच्या सुरवातीनंतर सहा महिन्यांपेक्षां अधिक उशिरा नाहीं अशा दिवशीं कायदेमंडळाच्या पहिल्या अधिवेशनाच्या बैठकीकरितां एका अथवा दोन्ही प्रतिनिधिसभांना बोलाविलें पाहिजे.

(अ) वर्षांतून एकदां तरी पार्लमेंटची बैठक बोलावलीच पाहिजे असा विलायतेंत कायदा नाहीं; परंतु तसा प्रघात मात्र पडला आहे. याचें कारण, खर्चाच्या कांहीं रकमांना दरसाल मंजुरीची जरूरी असते आणि दरसाल लष्कराबाबतचा कायदा मंजूर व्हावा लागतो; त्यामुळें या दोन कामांकरितां तरी पार्लमेंटची बैठक बोलवावीच लागते. वरील रूढि अथवा प्रघात या कलमानें कायद्याच्या स्वरूपांत मांडिला आहे. हिंदुस्थानांतही प्रांतिक कायदेमंडळांपुढें गव्हर्नरनें **वार्षिक** अंदाजपत्रक सादर करावयास लावण्याचें काम केलें पाहिजे [कलम ७८ (१)]; आणि ७९ (१) कलमान्वयें असेंब्ल्यांना खर्चाच्या रकमांना मंजुरी देणें, न देणें, अथवा रकमा कमी करणें इ० सर्व अधिकार दिलेले आहेत, ते त्यांनीं बजावले पाहिजेत. त्यामुळें सनदशीरपणें व कायदेशीरपणें राज्य चालवावयाचें असल्यास कायदेमंडळांचीं अधिवेशनें दरसाल बोलवावयास पाहिजेत. शिवाय, कर बसविणाऱ्या कायद्यांची मुदत संपत असल्यास किंवा नवीन कर बसविण्याची आवश्यकता वाटल्यास करांचीं बिलें मंजूर करून घेण्याकरितां असेंब्लीची बैठक बोलावलीच पाहिजे. करवसुलीवर कायदेमंडळांचा प्रतिवर्षी ताबा राहावा एवढ्याकरितां एका वर्षापेक्षां अधिक वर्षांची तरतूद

न करणारीं करांचीं बिलें मांडण्याचा योग्य प्रघात आपण इतःपर पाडणार असें मुंबई अर्थमंत्र्यांनीं तंबाकू बिलाच्या चर्चेवेळीं जाहीर केलें. हा प्रघात लोकशाहीच्या दृष्टीनें अत्यंत समर्पक व योग्य होय यांत संशय नाहीं.

( आ ) विलायतेंत पार्लमेंट बोलावण्याचे, त्याची बैठक समाप्त करण्याचे व हाउस ऑफ कॉमन्स बरखास्त करण्याचे जे अधिकार राजाला आहेत तेच हिंदुस्थानांत राजाच्या प्रतिनिधींना म्हणजे गव्हर्नरांना पोटकलम ( २ ) अन्वयें दिले आहेत. मात्र 'आपल्या मर्जीप्रमाणें' हे शब्द घातले असल्यामुळें या बाबतींतील प्रधानमंडळाचा सल्ला घेण्याचें त्याला कायद्यानें भाग पाडलेलें नाहीं. मग सल्ला मानण्याचें तर दूरच राहिलें. सामान्य परिस्थितींत सभा केव्हां बोलवावयाची व कोठें बोलवावयाची हें प्रधानमंडळालाच विचारून ठरवावें लागणार हें उघड आहे; परंतु असामान्य परिस्थितींत गव्हर्नरनें या बाबतींत कसाही निर्णय केल्यास त्याच्या त्या कृत्याला वरील पोटकलमाचा कायदेशीर आधार आहे. कायदेमंडळाच्या सभासदांकडे गव्हर्नर जी आमंत्रणपत्रिका पाठवील त्याच्यावर काळ आणि स्थळ हीं दोन्हीही असलीं पाहिजेत. यांपैकीं एकही जर चुकून लिहिण्याचें राहून गेलें तर ती आमंत्रणचिठ्ठी वरील कलमांतील स्पष्ट शब्दयोजनेअन्वयें बेकायदेशीर ठरेल. या आमंत्रणाबाबतच्या हुकमाचा नमुना पुढें दिला आहे:—

**लीगल डिपार्टमेंट, १५ डिसेंबर १९३७**

"१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टच्या ६२ कलमानें दिलेल्या अधिकारान्वयें मुंबईच्या गव्हर्नरांनीं मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची बैठक मुंबईच्या असेंब्ली हॉलमध्यें सोमवार ता. १० जानेवारी १९३८ रोजीं दुपारीं २ वाजतां बोलावली आहे.

मुंबईच्या गव्हर्नरांच्या आज्ञेवरून,
जी. एस्. राजाध्यक्ष,
सरकारचा सेक्रेटरी."

साधारणपणें कायदेमंडळाच्या बैठकी दुपारीं ११ वाजतां किंवा २ वाजतां भरतात. उन्हाळ्यामुळें संयुक्तप्रांत कौन्सिलची बैठक रात्रीं ७॥ वाजतां भरविण्यांत येत असे. तसेंच उन्हाळ्यांत नैनीतालला कायदेमंडळाच्या

बैठकी भरवाव्यात या सूचनेला उत्तर देतांना संयुक्तप्रांतीय मुख्य प्रधान पं. गोविंद वल्लभ पंत म्हणाले, " उन्हाळ्याच्या दिवसांत नैनीतालला जाऊन राहण्याचें सरकारनें रहित केलें आहे, हें माहीत असतांना बजेटचर्चेच्या वेळीं याबाबत कोणीही अवाक्षर तोंडातून काढलें नाहीं. आणि आतां सरकार मैदानावर असतांना कायदेमंडळ डोंगरावर भरवावें अशी सूचना करणें जरा विचित्रच आहे." या सूचनेंत विचित्र असें कांहीं नाहीं. दक्षिण आफ्रिकेची राज्यकारभाराची जागा 'प्रिटोरिया' ( ट्रान्सव्हालमध्यें ), न्यायकोर्टाची जागा 'ब्लोइमफाँटिन' ( ऑरेंज फ्री स्टेटमध्यें), व कायदे-मंडळाच्या अधिवेशनाची जागा 'केपटाउन' (केपप्रांतामध्यें ) अशी त्रिस्थळी यात्रा आहे. त्याला डच व ब्रिटिश या भेदांतून उत्पन्न झालेलीं कारणेंही आहेत हें विसरतां येत नाहीं.

इंग्लडमध्यें व स्वायत्त वसाहतींत पार्लमेंट (कॉमन्स सभा) बरखास्त करण्याबद्दल मंत्रिमंडळानें सल्ला द्यावा लागतो व राजा किंवा गव्हर्नर जनरल त्या सल्लयाप्रमाणें वागतोच असा प्रघात पडला आहे. हिंदुस्थानांतही तो पडणें लोकशाहीच्या वाढीच्या दृष्टीनें अतिशय जरूर आहे. समजा, उद्यां प्रांतिक सरकारांचा व कायदेमंडळांचा घटनेंतील फेडरशनबाबतचा सनदशीर रीतीनें जाहीर झालेला विरोध बाजूला सारून फेडरेशन लादण्यांत आलें. त्या प्रसंगीं फेडरेशनला आपण करीत असलेला विरोध मतदारांना संमत आहे अगर नाहीं हें अजमावून पाहण्याकरितां मंत्रिमंडळांनीं गव्हर्नरांना कायदेमंडळें ( असेंब्ल्या— कारण लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें हीं कायम स्वरूपाचीं असल्यामुळें तीं बरखास्त करितां येत नाहींत ) बरखास्त करण्याचा सल्ला दिला तर तो गव्हर्नरांनीं ऐकला पाहिजे; परंतु प्रस्तुतच्या परिस्थितींत, गव्हर्नर 'आपल्या मर्जीप्रमाणें' म्हणजेच दिल्ली व लंडन येथील हुकमाप्रमाणें वागणार यांत संशय दिसत नाहीं. प्रांतिक स्वराज्याच्या प्रारंभींच्या दिवसांत काँग्रेसनें जी आश्वासनमागणी केली त्या वेळीं " मतदारांना याबाबत कौल लावण्यास आपण तयार आहों; गव्हर्नरांनीं कायदे-मंडळें विसर्जित करावींत " अशा प्रकारें काँग्रेसनें आव्हान दिलें होतें. परंतु त्याचा सरकारकडून स्वीकार करण्यांत आला नाहीं. याचें कारण, स्वराज्याच्या कोणत्याही प्रश्नांत— मग तो किरकोळ अधिकाराचा असो

अथवा भरीव सत्ता संपादण्याचा असो—मतदार कॉंग्रेस उमेदवारांनाच पूर्वी पेक्षांही अधिक मोठ्या प्रमाणांत निवडून देणार ही सरकारला मनांतून- वाटणारी भीति हेंच होय. किरकोळ, अंतर्गत किंवा जातीय किंवा वर्ग- कलह माजणाऱ्या प्रश्नावर कदाचित् प्रधानमंडळाच्या सल्ल्यानुसार गव्ह- र्नर असेंब्ली विसर्जन पावावयास लावून फेरनिवडणुकींचा हुकूम काढील, परंतु वर सांगितल्याप्रमाणें सत्तेच्या आक्रमणासंबंधींच्या बाबत तो 'आपल्या मर्जीप्रमाणें' वागणार.

कायदेमंडळाच्या अधिवेशनाच्या शेवटच्या दिवशीं स्पीकर किंवा अध्यक्ष 'कायदेमंडळाचें अधिवेशन समाप्त' केल्याचा संदेश ( गव्हर्नर- कडून आलेला ) वाचून दाखवितो व त्यानंतर अधिवेशन समाप्त झाल्याचें तो जाहीर करितो. इंग्लंडमध्यें हें काम पार्लमेंटचा क्लार्क ( कारकून ) करतो ( मेकून पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ. १९३ ). प्रांतिक स्वराज्याच्या सुरवातीपासून आतांपर्यंत ११ प्रांतांपैकीं एकाही प्रांतांत असेंब्ली बरखास्त करण्याचा प्रसंग गव्हर्नरवर आलेला नाहीं.

( इ ) तिसऱ्या पोटकलमांत 'प्रांतिक स्वराज्या' बाबतचा हा तिसरा खंड ( १९३५ च्या कायद्यापैकीं ) सुरू झाल्यापासून म्हणजे १ एप्रिल १९३७ पासून सहा महिने संपावयाच्या आंत कायदेमंडळांच्या बैठकी बोलावल्याच पाहिजेत असें स्पष्ट कलम आहे. याचें कारण, 'गव्हर्मेंट ऑफ इंडिया ( सुरवात आणि दरम्यानची तरतूद ) ऑर्डर १९३६' यांतील ५ व्या कलमाप्रमाणें गव्हर्नरांना १ एप्रिल १९३७ पासून जास्तींत जास्त सहा महिन्यांपर्यंतचा म्हणजे १ आक्टोबर १९३७ पर्यंतचा खर्च मंजूर करण्यास परवानगी दिली आहे; त्यापुढील सहा महिन्यांच्या खर्चाच्या रकमांना असेंब्लीची मंजुरी पाहिजे; एवढ्याकरितां सदर सहा महिन्यांची मुदत संपण्याच्या पूर्वी असेंब्लीची बैठक भरलीच पाहिजे, हें होय. परंतु गव्हर्नरांनीं तात्पुरत्या मंत्रिमंडळांना कायदेमंडळापुढें शक्य तितक्या जास्त मुदतीपर्यंत यावयास लागूं नये, या हीन व घटनाशास्त्र- दृष्ट्या दुष्ट गोष्टीकरितां, या पोटकलमाचा दुरुपयोग केला ही मोठी लांच्छनास्पद गोष्ट होय. लोकशाहीचा टेंभा मिरविणाऱ्या राष्ट्राच्या प्रतिनिधींनीं वरील गोष्ट करावी हें त्यांतल्या त्यांत जास्त निंदार्ह आहे.

मंत्रिमंडळांची साधारण अशी पद्धत असते कीं, शक्य तितक्या लवकर कायदेमंडळ बोलावून आपणावर व आपल्या कार्यक्रमावर कायदे-मंडळाच्या पाठिंब्याचें शिक्कामोर्तब घ्यावयाचें व मग निर्वेधपणें राज्यकार-भाराच्या दैनंदिन उद्योगाला लागावयाचें. परंतु तात्पुरतीं मंत्रिमंडळें, स्वतःच्या बडेजावास्तव, गव्हर्नरच्या कायदेमंडळांच्या बैठकी न भरविण्या-च्या निर्णयाला हातभार लावतीं झालीं. इकडे बहुमतवाल्या कॉंग्रेस-पक्षीय सभासदांची अधीरता वाढूं लागली. नागपुरास व लखनौस कॉंग्रेस पक्षाच्या निवडलेल्या पुढाऱ्यांनीं म्हणजे अनुक्रमें डॉ. खरे व पंडित पंत यांनीं याबाबत आपणच पुढाकार घेऊन कायदेमंडळाच्या सर्व सभासदांना आमंत्रणपत्रें पाठविलीं व अधिवेशनें भरविलीं; त्यांत स्पीकर, डेप्युटी स्पीकर यांच्या निवडणुकी केल्या; तात्पुरत्या मंत्रिमंडळावर अविश्वासाचे ठराव मंजूर केले व ते ठराव स्पीकरनीं गव्हर्नराकडे पाठविले. परंतु या अधिवेशनांना व ठरावांना, प्रचारापेक्षां व बहुमतवाल्या पक्षाचे खरें मनो-गत काय आहे हें फिरून एकदां स्पष्ट करण्यापलीकडे, ब्रिटिश मुत्सद्द्यां-च्या गोटांत, कायदेशीर अशी कांहींच किंमत नव्हती. क्रांतीचा जन्म होण्यास योग्य अशी जर कोणती परिस्थिति असेल तर ती वर लिहिलेल्या-सारखी होय; परंतु अशा या क्रांतिमय वातावरणाचा फायदा घेण्यास पुढारी तयार असले तरी जनतेची पूर्ण तयारी असावी लागते. ती तशी नसल्यामुळें वर वर्णन केलेल्या अधिवेशनांना किंमत देणारी जनता भेटली नाहीं. जनतेनें खरा पाठिंबा दिला असता तर हींच अधिवेशनें कायदेशीर झालीं असतीं. तेव्हां कायदेशीर व बेकायदेशीर या शब्दांची खरी व्याख्या जनतेच्या सक्रिय निश्चयावर ठरत असते, हेंच राजकारणशास्त्राच्या मूलभूत सिद्धांतावरून म्हणावें लागतें.

ब्रिटिश पार्लमेंटच्या इतिहासांत पार्लमेंट बोलावण्यास राजा जागेवर नव्हता व म्हणून पार्लमेंटनेंच आपली सभा बोलावल्याचीं दोन उदाहरणें आहेत. एक १६६० सालीं; लॉंग पार्लमेंटनें (दीर्घकाळपर्यंत टिकलेलें) आपली बैठक आपण भरवून दुसऱ्या चार्लसला राज्यावर येण्याचें निमंत्रण दिलें व तें स्वतः विसर्जन पावलें. दुसरें उदाहरण १६८८ सालचें; दुसरा जेम्स राजा राज्यत्याग करून पळून गेल्यानंतर व जेम्सची मुलगी मेरी व

तिचा नवरा वुइल्यम १६८९ सालीं राज्यावर येईपर्यंतचा जो काळ त्या काळांत भरलेलें. हीं दोन्हीं वर्षें इंग्लंडांत राज्यक्रांतीचींच समजलीं जातात. अशा वेळीं पार्लमेंट आपण होऊन भरलें ही अपवादात्मक गोष्ट झाली असें पुढील वाक्यांत मे या ग्रंथकारानें म्हटलें आहे. “ राष्ट्र भयंकर संकटांत सांपडलें असतांना जी गोष्ट करणें भाग पडलें ती नेहमींच्या सामान्य काळांत उदाहरणादाखल घेणें बरोबर होणार नाहीं.” ( मेकृत पार्लमेंटरी प्रॅक्टिस, पृष्ठ ४६ ).

कायदेमंडळांपुढें भाषण करण्याचा आणि त्यांच्याकडे संदेश पाठविण्याचा गव्हर्नरचा हक्क

६३.—(१) गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें लेजिस्लेटिव्ह असेंब्लीपुढें अथवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असलेल्या प्रांताच्या बाबत प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही प्रतिनिधिसभेपुढें किंवा एकत्र भरलेल्या दोघांच्या जोडसभेपुढें भाषण करावें आणि या कामाकरितां सभासदांना हजर राहण्यास लावावें.

(२) त्या वेळीं कायदेमंडळापुढें असलेल्या कोणत्याही बिलाबाबत अथवा इतर कामाकरितां गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें प्रांतिक कायदेमंडळाच्या एका अथवा दोन्ही प्रतिनिधिसभांकडे संदेश पाठवावेत आणि वरीलप्रमाणें ज्या सभेकडे एखादा संदेश पाठविला असेल त्या सभेनें संदेशांत विचारांत घेण्यास सांगितलेल्या कोणत्याही गोष्टीबाबत शक्य तितक्या लवकर विचार करावा.

( अ ) ६० व्या कलमांत सांगितल्याप्रमाणें गव्हर्नर हा कायदेमंडळाचा एक घटक आहे. म्हणून तो जरी कोणत्याही प्रतिनिधिसभेचा सभासद नसला तरी त्याला त्या सभांना उद्देशून भाषण करण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. मुंबई प्रांतांत प्रांतिक स्वराज्याच्या सुरवातीपासून आतांपर्यंत तरी ब्रॅबोर्न किंवा लमली यांपैकीं एकाही गव्हर्नरानें कायदेमंडळापुढें भाषण केलेलें नाहीं किंवा पोटकलम ( २ ) मध्यें सांगितलेल्या कारणाकरितां संदेशही पाठविलेला नाहीं. बिलांना मंजुरी दिल्याबद्दलचे किंवा कायदेमंडळाचें अधिवेशन समाप्त केल्याबद्दलचे संदेश हे केवळ औपचारिक स्वरूपाचे असल्यामुळें त्यांचा वरील (२) ऱ्या पोटकलमांतील संदेशांशीं कांहींही संबंध नाहीं. पहिल्या पोटकलमांत किंवा दुसऱ्या पोटकलमांत हजर राहण्याबाबत किंवा विचारांत घेण्याबाबत ‘भाग पाडणें’ अशी शब्दयोजना केलेली आहे. त्याचा कायद्याच्या दृष्टीनें अर्थ केल्यास

त्यांत 'सक्तीचा' भाग येतो. परंतु हजर न राहिल्यास अथवा गव्हर्नरनें विचारांत घेण्यास सांगितलेल्या बाबीचा विचार करण्याचें नाकारल्यास कोणतीच शिक्षा नसल्यानें वरील 'सक्ती'च्या निदर्शक शब्दयोजनेंत कांहीं राम नाहीं. म्हणून 'रिकायर' (भाग पाडणें) या शब्दाऐवजीं मे यानें (पार्लमेंटरी प्रॅक्टिस, पान १६१ तळटीप) सांगितल्याप्रमाणें 'डिझा-यर' (इच्छिणें, इच्छा प्रदर्शित करणें) अशासारख्या शब्दानें योग्य तें काम भागलें असतें.

(आ) गव्हर्नर सभागृहांत आला असतां किंवा त्याचा संदेश वाचून दाखविला जात असतां सर्व सभासदांनीं उठून उभे राहिलें पाहिजे असा आजपर्यंत संकेत असे. परंतु लॉर्ड विलिंग्डनच्या दडपशाहीच्या कारकीर्दीपासून मध्यवर्ती असेंब्लींतील कॉंग्रेस सभासदांनी वरील संकेतास अजीबात फाटा दिला आहे. यांत कोणाही व्यक्तीचा अपमान करण्याचा हेतु नसून साम्राज्यशाहीचा बडेजाव नष्ट करण्याचा उद्देश आहे.

प्रधान आणि ॲडव्होकेट जनरल यांचे प्रतिनिधि-सभाबाबतचे हक्क

६४.—प्रांताच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीत किंवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असलेल्या प्रांताच्या बाबतींत दोन्ही प्रतिनिधिसभांतून अथवा त्यांच्या जोडबैठकींमधून तसेंच कायदेमंडळाच्या कोणत्याही कमिटीचा तो सभासद असल्यास त्या कमिट्यांतून बोलण्याचा आणि इतर तऱ्हेनें त्यांच्या कामकाजांत भाग घेण्याचा प्रत्येक प्रधानाला व ॲडव्होकेट जनरलला हक्क आहे; परंतु या कलमाच्या आधारें मत देण्याचा हक्क मात्र त्यांना प्राप्त होणार नाहीं.

(अ) ५१ (२) कलमाप्रमाणें कोणताही प्रधान नेमणूक झाल्या-नंतर ६ महिन्यांच्या आंत कोणत्या तरी एका सभागृहाचा सभासद असल्याशिवाय आपल्या जागेवर राहूं शकत नाहीं. परंतु ही सहा महिन्यांची मुदत संपेपर्यंत त्याला ६४ कलमाप्रमाणें कायदेमंडळाच्या दोन्हीही सभांतून बोलण्याचा किंवा इतर सर्व तऱ्हेनें वादविवादांत भाग घेण्याचा हक्क आहे.

तसेंच एक प्रधान हा दोन्ही सभांचा सभासद असूं शकत नाहीं. परंतु तो ज्या सभेचा सभासद नसतो त्या सभेंत मत देण्याच्या अधिकारा-खेरीज त्याला बाकीचे सर्व अधिकार वरील कलमानें आपोआप प्राप्त होतात.

हिंदुस्थानांतील सहा प्रांतांतून लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें आहेत. परंतु मद्रासमधील एका प्रधानाखेरीज ( डॉ. राजन् ) कोणीही प्रधान कौन्सिलाचे सभासद नाहींत. परंतु सर्व प्रधानांना कौन्सिलांत जाऊन ठराव, बिलें, बजेट इ० मांडावें लागतें व प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं लागतात; मात्र त्यांना कौन्सिलांत सभासद म्हणून मत देतां येत नाहीं. बंगाल कौन्सिलांतील विरोधी पक्षाचे (कॉंग्रेस) पुढारी डॉ. मुकर्जी यांनीं असा मुद्दा उपस्थित केला कीं, " अर्थमंत्र्याला तो कौन्सिलाचा सभासद नसल्यामुळें बंगाल-प्रधान-पगार-बिल कौन्सिलापुढें मांडतां येणार नाहीं. बिगरसभासद मंत्र्यांनीं कौन्सिलांत पाहिजे तर बसावें किंवा इतर तऱ्हेनें कौन्सिलाच्या कामकाजांत भाग घ्यावा; परंतु त्यांना कोणत्याही नवीन कामाला सुरवात करितां येणार नाहीं." यावर कौन्सिलच्या अध्यक्षानें ( श्री. सत्येन्द्रचंद्र मित्र ) ॲडव्होकेट जनरलचें मत विचारलें असतां ॲ. ज. म्हणाले, " विशिष्ट परिस्थितींत [ कलम ५७ ( २ ) ] एखाद्या सरकारी अधिकाऱ्याला सुद्धां सभागृहांतील कामकाजाला सुरवात करावी लागेल; मग मंत्र्यांना तसें करण्यास कोणतीच हरकत नाहीं. एका मत देण्याच्या हक्काखेरीज बिगरसभासद मंत्र्यांना सभासदांचे सर्व हक्क संपूर्णपणें प्राप्त होतात." कौन्सिलच्या अध्यक्षांनीं ॲ. ज. चे मताप्रमाणेंच सदर प्रकरणीं निकाल दिला.

( आ ) दुसऱ्या एका प्रसंगीं डॉ. मुकर्जी यांनीं असा हरकतीचा मुद्दा उपस्थित केला कीं, " बिगरसभासद मंत्र्याला सभागृहाचा पुढारी ( लीडर ऑफ दि हाउस ) म्हणवून घेतां येईल काय ? " त्यावर कौन्सिलच्या अध्यक्षांनीं पुढीलप्रमाणें निर्णय दिला:—" सभागृहाचा पुढारी हा कौन्सिलचा सभासद असला पाहिजे आणि या दृष्टीनें पाहिलें असतां कौन्सिलचा पुढारी म्हणवून घेणाऱ्या मुख्य मंत्र्याला, तो कौन्सिलचा ( पूर्ण ) सभासद नसल्याकारणानें, पुढारीपणाचें काम करितां येणार नाहीं. म्हणून कौन्सिलच्या निवडून आलेल्या कोणत्या तरी सभासदास सभागृहाचा पुढारी म्हणून नेमल्याशिवाय सभागृहाचें काम बरोबर चालणार नाहीं." या निर्णयाप्रमाणें कौन्सिलच्या एखाद्या सभासदास मंत्रिमंडळांत घेतलें जाण्याचा संभव होता; परंतु तसें कांहीं घडलें नाहीं. फार झालें

तर अध्यक्षांच्या मताला मान देण्याकरितां मुख्य प्रधानांनीं आपणाला 'सभागृहाचे पुढारी' ही मानाची पदवी लावण्याचें सोडून दिलें असावें. मद्रास कौन्सिलांत डॉ. राजन् हे सभासदमंत्री असतांना सुद्धां बिगर-सभासद मुख्य मंत्री श्री. राजगोपाळाचार्य हेच सरकारी धोरणें सभागृहांत जाहीर करितात व मत देण्याखेरीज बाकीचे सर्व कामकाज सभागृहाचे पुढारी या नात्यानें चालवितात.

( इ ) ॲडव्होकेट जनरलची परिस्थिति थोडीशी निराळी आहे. मंत्र्याप्रमाणें तो कोणत्याच कायदेमंडळाचा सभासद असूं शकत नाहीं किंवा होऊं शकत नाहीं; तथापि ६४ व्या कलमाप्रमाणें मत देण्याखेरीज त्याला सभासदाचे सर्व हक्क प्राप्त होतात. असेंब्लींत किंवा कौन्सिलांत कोठेंही तो बसूं शकतो व सर्व तऱ्हेनें तो कामकाजांत भाग घेऊं शकतो. मद्रास कौन्सिलांत सर के. व्ही. रेड्डी यांनीं असा हरकतीचा मुद्दा उपस्थित केला कीं, " ॲडव्होकेट जनरलला १९३५ च्या कायद्याप्रमाणें सभागृहापुढील एखाद्या ठरावाला अनुमति देतां येणार नाहीं; किंवा विरोध करितां येणार नाहीं; त्याचें काम फक्त सल्ला देण्याचें आहे." हा मुद्दा अर्थातच अध्यक्षांनीं मान्य केला नाहीं. वरील हरकतीवरून दक्षिण आफ्रिकेंत एजंट जनरलचें, मद्रासेंत ॲक्टिंग गव्हर्नरचें व मुख्य प्रधानाचें ( तात्पुरत्या प्रधानमंडळाच्या ) काम केलेल्या रेड्डींच्या कायद्याच्या ज्ञानाबद्दल मात्र कींव करावीशी वाटते.

बिहारचे पहिले ॲडव्होकेट जनरल सुलतान अहमद यांनीं त्या जागेचा राजीनामा दिल्यानंतर बिहार कॉंग्रेस मंत्रिमंडळानें त्या जागीं बिहार कौन्सिलांत निवडून आलेले कॉंग्रेसपक्षीय सभासद श्री. बलदेव सहाय यांची नेमणूक केली. परंतु ६९ ( १ ) ( क ) कलमाप्रमाणें ॲडव्होकेट जनरलची जागा ही पगाराची जागा (ऑफिस ऑफ प्रॉफिट) असल्यामुळें सदर जागा पतकरणाऱ्या सभासदास आपल्या सभासदत्वाचा राजीनामा देणें भाग होतें. या कलमास त्यांतीलच पोटकलम ( ४ ) मध्यें सांगितल्याप्रमाणें 'मंत्र्यांची जागा' हा एक अपवाद आहे, परंतु त्यांत ॲडव्होकेट जनरलची जागा बसत नसल्यामुळें (जरी मंत्र्याप्रमाणें त्यांनीं रु. ५०० च पगार घेण्याचें ठरविलें तरी) कौन्सिलचें सभासदत्व तरी

सोडलें पाहिजे किंवा ॲ. ज. ची जागा तरी स्वीकारतां कामा नये असा पेच येऊन पडला. यांतून मार्ग म्हणून ६९ (१) (क) कलमांतील शेवटच्या भागाच्या आधारें—" प्रांतिक कायदेमंडळानें एखाद्या पगाराच्या जागेबाबत नालायकीचा शिक्का काढून टाकल्यास त्या जागेखेरीज " —बिहार प्रांतिक कायदेमंडळानें मंत्र्याप्रमाणेंच ॲडव्होकेट जनरलचें पूर्ण सभासदत्व राखण्याची योजना नवीन कायदा करून मंजूर केली. सेवेच्या भावनेनें काम करावयास निघालेल्या पक्षास कायद्याची कशी अडचण पडत नाहीं व तशी उत्पन्न झाल्यास तिचा निरास करण्याचा मार्ग कसा निघतो हें वरील उदाहणावरून चांगलें निदर्शनास येतें.

प्रतिनिधिसभांचे अधिकारी

६५.—(१) प्रत्येक प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ली आपल्यापैकी दोघां सभासदांना अनुक्रमें स्पीकर व डेप्युटी स्पीकर म्हणून शक्य तितक्या लवकर निवडून देईल आणि जितक्या वेळीं स्पीकरची किंवा डेप्युटी स्पीकरची जागा मोकळी राहील तितक्यान्दा असेंब्ली दुसऱ्या सभासदाला स्पीकर किंवा डेप्युटी स्पीकर म्हणून निवडून देईल.

(२) असेंब्लीचा स्पीकर किंवा डेप्युटी स्पीकर म्हणून अधिकारावर असणारा सभासद, जर त्याचें असेंब्लीचें सभासदत्व नष्ट झालें तर, आपली अधिकाराची जागा खाली करील; तसेंच त्याला गव्हर्नरकडे स्वदस्तुरचें पत्र लिहून आपल्या अधिकाराच्या जागेचा राजीनामा देतां येईल आणि त्या वेळीं असणाऱ्या असेंब्लीच्या सर्व सभासदांच्या संख्येपैकी बहुमतानें असेंब्लीचा ठराव मंजूर झाल्यास त्याला अधिकाराच्या जागेवरून काढून टाकतां येईल; परंतु या पोटकलमांतील उद्देशाकरितां असलेला कोणताही ठराव कमींत कमी १४ दिवसांची तसा ठराव मांडणार असल्याबद्दलची आगाऊ सूचना दिल्याशिवाय मांडतां येणार नाहीं.

मात्र ज्या ज्या वेळीं असेंब्ली विसर्जन पावेल त्या त्या वेळीं विसर्जनानंतर असेंब्लीच्या पहिल्या बैठकीच्या अगोदरपर्यंत तो (स्पीकर) आपली जागा खाली करणार नाहीं.

(३) जोंपर्यंत स्पीकरची जागा मोकळी आहे तोंपर्यंत त्या जागेचें काम डेप्युटी स्पीकरकडून केलें जाईल किंवा डेप्युटी स्पीकरचीही जागा रिकामी असेल तेव्हां गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणें या कामाकरितां असेंब्लीच्या ज्या सभासदाला नेमील त्या सभासदाकडून तें केलें जाईल; असेंब्लीच्या एखाद्या बैठकीला स्पीकर गैरहजर असल्यास डेप्युटी स्पीकर किंवा तोही गैरहजर असल्यास असेंब्लीच्या कामकाजाच्या

नियमान्वयें ठरविलेला इसम किंवा सदर इसम हजर नसल्यास असेंब्ली ठरवील तो दुसरा इसम स्पीकरचें काम पाहील.

(४) लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या स्पीकरला व डेप्युटी स्पीकरला प्रांतिक कायदे-मंडळाच्या कायद्यानें अनुक्रमें ठरलेले पगार मिळतील; याबाबतची तरतूद कायद्यानें होईपर्यंत गव्हर्नर ठरवील ते पगार त्यांना मिळतील.

(५) लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असलेल्या प्रांताच्या बाबत या कलमांत वर सांगितलेल्या तरतुदी (वरील [२] पोटकलमांतील प्रोव्हिजो म्हणजे मर्यादात्मक भागाखेरीज) जशा लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या संबंधांत लागू आहेत तशा त्या लेजिस्ले-टिव्ह कौन्सिलाबाबतही लागू होतील; फक्त त्यांत 'स्पीकर' आणि 'डेप्युटी स्पीकर' या हुद्द्यांऐवजी अनुक्रमें 'अध्यक्ष' व 'उपाध्यक्ष' हे हुद्दे योजावे आणि 'असेंब्ली'चा उल्लेख जेथें जेथें असेल त्या त्या ठिकाणीं 'कौन्सिल' असें घालावें.

(अ) 'शक्य तितक्या लौकर' या शब्दांचा अर्थ लवचिक आहे; व तो वाटेल तसा करतां येईल. सार्वत्रिक निवडणूक झाल्याबरोबर वास्त-विक स्पीकर, डेप्युटी स्पीकर यांच्या निवडणुकी करण्याकरितां असेंब्लीची बैठक गव्हर्नरानें बोलवावयाची असते. त्याप्रमाणें काँग्रेसेतर प्रांतांतून अशा बैठकी ताबडतोब भरल्या; परंतु काँग्रेसचें बहुमत असलेल्या कायदेमंडळां-च्या बैठकी मात्र राजकीय डावपेच मनांत धरून गव्हर्नरांनीं बोलावल्या नाहींत. त्या प्रांतांतून काँग्रेसच्या पक्षाच्या पुढाऱ्यांनीं या ६५ व्या कलमां-च्या (१) पोटकलमांतील 'शक्य तितक्या लौकर' या शब्दांकडे बोट दाखवून गव्हर्नराला कायद्याप्रमाणें वागण्याची विनंति केली; परंतु वर सांगितल्याप्रमाणें त्याचा कांहींही उपयोग झाला नाहीं. परंतु काँग्रेसच्या आश्वासनमागणीवर उत्पन्न झालेला पेचप्रसंग नाहींसा झाल्याबरोबर एका आठवड्याच्या आंत काँग्रेस प्रांतांतून कायदेमंडळांचीं अधिवेशनें भरून स्पीकर, डेप्युटी स्पीकर, अध्यक्ष, उपाध्यक्ष यांच्या निवडणुकी झाल्या.

(आ) आजपर्यंत प्रांतिक कायदेमंडळें काय किंवा मध्यवर्ती दोन्ही कायदेमंडळें काय यांच्या अध्यक्षाला व उपाध्यक्षाला 'प्रेसिडेंट' व 'डेप्युटी प्रेसिडेंट' अशीं नांवें होतीं, परंतु नवीन कायद्याप्रमाणें प्रांतिक असेंब्ली व फीडरल असेंब्ली या दोघांच्या अध्यक्षांना व उपाध्यक्षांना 'स्पीकर' व 'डेप्युटी स्पीकर' अशीं नांवें ब्रिटिश हौस ऑफ कॉमन्सच्या व अमेरिकन हौस ऑफ रिप्रेझेन्टेटिव्हजूच्या धर्तीवर देण्यांत आलीं असून जुनीं 'प्रेसिडेंट' व

डेप्युटी प्रेसिडेंट' हीं नांवें प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें व कौन्सिल ऑफ स्टेट ( फीडरल ) यांच्या अध्यक्ष, उपाध्यक्षांना लावण्यांत आलीं आहेत. 'प्रेसिडेंट' याचा अर्थ सभेचा 'अध्यक्ष'; पण 'स्पीकर' याचा अर्थ 'वक्ता' असा आहे. 'स्पीकर' शब्दाची योजना मुळांत योग्य अशीच आहे. कारण हाउस ऑफ कॉमन्सतर्फे राजाला उद्देशून **बोलण्याचा** अधिकार हा मुळांत फक्त स्पीकरचाच असें म्हणून स्पीकर (सभेचें मुख, मेकृत पा. प्रॅ. पृ. १७७ ) हें सार्थ नांव ठेवण्यांत आलें. परंतु हल्लीं सभेची व्यवस्था, शिस्त व कामकाज निःपक्षपातीपणानें चालविणें याशिवाय स्पीकरकडे लोकांतर्फे बोलण्याचें असें काम राहिलेलें नाहीं. तें काम आतां पार्लमेंटांतील बहुमतवाल्या पक्षाच्या पुढाऱ्याकडे गेलें आहे. परंतु 'काप जाऊन भोंकें शिल्लक राहतात' त्याप्रमाणें स्पीकरची स्थिति झाली आहे. स्पीकर हजर नसला म्हणजे त्याच्या जागीं काम करितो तो डेप्युटी स्पीकर. फ्रान्समध्यें लोकांच्या प्रतिनिधीलाच 'डेप्युटी' म्हणतात, कारण तो सर्व लोकांकरितां काम करणारा असतो. फ्रेंच कायदेमंडळांना 'चेंबर ऑफ डेप्युटीज' असें नांव आहे. मे आपल्या 'पार्लमेंटरी प्रॅक्टिस' या पुस्तकांत (पृ. १४५ ) म्हणतो:—" प्रधानानें स्पीकरच्या जागेकरितां नांव सुचवूं नये असा प्रघात आहे. कारण तसें सुचविलें गेल्यास प्रधानांचा मित्र म्हणून स्पीकरची गणना केली जाईल व त्याच्या निःपक्षपातीपणास धक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं. म्हणून त्याचें नांव सुचविणारा व त्याला अनुमोदन देणारा प्रधानांखेरीज दुसरा कोणी तरी असावा." शिवाय त्याची निवड एकमतानें झाल्यास उत्तमच. वर लिहिलेलें मेचें म्हणणें जरी योग्य असलें तरी निवडणुकीच्या वेळीं बहुमतवाला पक्ष ज्याचें नांव सुचवील त्याचीच स्पीकरच्या जागीं निवड होणार हें उघड आहे. बहुमतवाला पक्ष तरी दुसऱ्या पक्षाचा माणूस काय म्हणून पसंत करील ? निवडणूक झाल्यावर सर्व पक्षांचे लोक 'आपण यापुढें निःपक्षपातीपणानें सभागृहाचें काम चालवाल अशी आशा आहे' असें म्हणून स्पीकरचें अभिनंदन करितात व स्पीकरही ह्या सर्व अभिनंदनांचा स्वीकार करून 'आपण निःपक्षपातीपणानें काम चालवूं व सभागृहाच्या हक्कांचें रक्षण करूं' असें उलट आश्वासन देतो; हा औपचारिक भाग झाला. ह्या स्पीकरच्या निःपक्षपातीपणाचा परिणाम

म्हणून पुढें होणाऱ्या सार्वत्रिक निवडणुकींत स्पीकरला कोणीही उमेदवार विरोध करण्यास उभा राहत नाहीं व तो बिनविरोध निवडून येतो; व पुनः त्याची स्पीकरच्या जागीं बिनविरोध निवडणूक होते. यासंबंधींचें आपल्याकडील उदाहरण द्यावयाचें झाल्यास मध्यवर्ती असेंब्लीचे प्रेसिडेंट विठ्ठलभाई पटेल यांचें देतां येईल. पहिल्या खेपेला अध्यक्षाचे निवडणुकीचे बाबत अत्यंत चुरशीचा सामना झाला. स्वराज्य पक्षातर्फे पटेल यांना ५८ मतें मिळालीं व सरकार पक्षातर्फे दिवाणबहादुर टी. रंगाचारी यांना ५६ मतें मिळून अवघ्या दोन मतांनीं विठ्ठलभाई पटेल यांचा विजय झाला. या वेळीं ते मुंबई शहरातर्फे ( दोन सभासद निवडून देण्याचा अधिकार असलेला सर्व साधारण मतदारसंघ ) निवडून आले होते; परंतु पुढील खेपेस बिनविरोध निवडून येण्याच्या दृष्टीनें ते गुजराथेंत ( एक सभासद निवडून देण्याचा हक्क असलेला मतदारसंघ ) उभे राहिले व बिनविरोध निवडून आले; व अध्यक्षाच्या जागेवर त्यांची बिनविरोध निवड झाली.

( आ ) अकरा प्रांतांतील असेंब्ल्यांतून व कौन्सिलांतून पुढील-प्रमाणें स्पीकर, डेप्युटी स्पीकर, प्रेसिडेंट व डेप्युटी प्रेसिडेंट निवडून आले आहेत:—

## प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ली

| प्रांत | स्पीकर | डेप्युटी स्पीकर |
|---|---|---|
| १ मद्रास | सांबमूर्ति | रुक्मिणी लक्ष्मीपति |
| २ मुंबई | मावळणकर | नारायणराव जोशी |
| ३ बंगाल | अझीझुल हक्क | अश्रफअली चौधरी |
| ४ संयुक्तप्रांत | पुरुषोत्तमदास तंडन | अबदुल हकीम |
| ५ पंजाब | चौधरी शहाबुद्दिन | सरदार दसौंधा सिंग |
| ६ बिहार | रामदयाळु सिंग | प्रो. अबदुल बारी |
| ७ मध्यप्रांत व ऱ्हाड | घनःश्याम गुप्त | अनुसूयाबाई काळे. |
| ८ आसाम | वसंतकुमार दास | अमीनुद्दिन अहंमद |
| ९ सरहद्द प्रांत | खुदाबक्ष खान | महमद सरवार ताहीर खैली |

| | | | |
|---|---|---|---|
| १० | ओरिसा | मुकुंदप्रसाद दास | नन्दकिशोर दास |
| ११ | सिंध | १ भोजसिंग पहालजानी<br>२ मीरन महमद शहा | खानसाहेब गबोल. |

## प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें

| प्रांत | प्रेसिडेंट | डेप्युटी प्रेसिडेंट |
|---|---|---|
| १ मद्रास | रामराव | वेंकटस्वामी नायडू |
| २ मुंबई | मंगळदास पक्वासा | रामभाऊ सोमण |
| ३ बंगाल | सत्येंद्रचंद्र मित्र | हमीदुल हक्क चौधरी |
| ४ संयुक्तप्रांत | सीताराम | बेगम अझीझ रसूल |
| ५ बिहार | राजीवनारायण सिंग | सय्यद नाकी इमाम |
| ६ आसाम | मनमोहन लाहिरी | बेगम झुबेदा रहमान |

या निवडणुकीबाबत पुढील गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत:—

(१) ११ स्पीकरपैकीं, सिंध प्रांताचे भोजसिंग पहालजानी कैलासवासी होईपर्यंत, ८ स्पीकर हिंदु होते व बाकीचे तीन मुसलमान होते. सिंध-सारख्या बहुसंख्य मुसलमान प्रांतांत भोजसिंग पहालजानी हे हिंदु गृहस्थ निवडून आले हें विशेष आहे. त्यांच्या मरणानंतर मीरन महमद शहा हे मुसलमान गृहस्थ निवडून आल्यामुळें आतां हिंदु-मुसलमान स्पीकरांचें प्रमाण ७ : ४ असें पडतें. एकही स्त्री स्पीकर म्हणून निवडली गेली नाहीं. डेप्युटी स्पीकरमध्यें ४ हिंदु, ६ मुसलमान व १ शीख असें प्रमाण पडत आहे. डेप्युटी स्पीकरांत रुक्मिणी लक्ष्मीपति व अनुसूयाबाई काळे या स्त्रियांची निवड झाली आहे; परंतु एकही मुसलमान स्त्री डेप्युटी स्पीकर म्हणून निवडली गेली नाहीं.

कौन्सिलांचे सहाही प्रेसिडेंट हिंदु आहेत; एकही मुसलमान किंवा स्त्री नाहीं. डेप्युटी प्रेसिडेंटांत मात्र चार मुसलमान असून हिंदु फक्त दोन आहेत. ४ मुसलमानांपैकीं २ मुसलमान स्त्रिया डेप्युटी प्रेसिडेंट आहेत; एकही हिंदु स्त्री डेप्युटी प्रेसिडेंट नाहीं.

( २ ) पक्षाच्या दृष्टीनें विचार केल्यास वरील विभागणी पुढील-प्रमाणें करितां येईल:—

११ स्पीकरपैकीं ७ स्पीकर कॉंग्रेसवाले आहेत; व ११ डेप्युटी स्पीकरपैकीं ६ डेप्युटी स्पीकर कॉंग्रेसवाले आहेत. आसाम प्रांतांत कॉंग्रेस सरकार नसून वसंतकुमार दास हे कॉंग्रेसवाले स्पीकर आहेत; पण सरहद्द प्रांतांत कॉंग्रेस सरकार असूनही खुदाबक्ष हे बिनकॉंग्रेसवाले स्पीकर आहेत.

६ प्रेसिडेंटांपैकीं ३ प्रेसिडेंट कॉंग्रेसवाले असून ६ डेप्युटी प्रेसिडेंटांपैकीं २ डेप्युटी प्रेसिडेंट कॉंग्रेसवाले आहेत. बंगाल प्रांतांत कॉंग्रेस सरकार नसूनही सत्येंद्रचन्द्र मित्र हे कॉंग्रेसवाले प्रेसिडेंट म्हणून निवडून आले आहेत ही विशेष नमूद करण्यासारखी गोष्ट आहे. अलीकडे वर्किंग कमिटीच्या ठरावाप्रमाणें सत्येंद्रचंद्र मित्र यांच्याकडे रु. ५०० पेक्षां अधिक मिळणाऱ्या पगाराबाबत मागणी करण्यांत आली. सदर रक्कम प्रांतिक कॉंग्रेस फंडांत प्रांताच्या उपयोगाकरितां जमा व्हावयाची होती. परंतु त्यांनीं सदर रक्कम देण्याचें नाकारल्यामुळें त्यांचें प्राथमिक कॉंग्रेस सभासदत्व काढून घेण्यांत आलें असून वर्किंग कमिटी पुनः परवानगी देईपर्यंत त्यांना कॉंग्रेसतर्फे कोणत्याही प्रातिनिधिक संस्थांच्या निवडणुकीला उभे राहतां येणार नाहीं.

( ३ ) प्रांतिक स्वराज्याच्या आरंभापासून आतांपर्यंत भोजसिंग पहालजानी यांच्या मृत्यूखेरीज स्पीकर ३० मध्यें कोणताही बदल झाला नाहीं. कोणी राजीनामा दिला नाहीं किंवा कोणाला असेंब्ल्यांनीं किंवा कौन्सिलांनीं काढून टाकिलेलें नाहीं. त्यामुळें ६५ व्या कलमांतील यासंबंधींच्या तरतुदींचा अद्याप कोठेंही उपयोग करावा लागलेला नाहीं.

बरें, अद्याप कोठलीही असेंब्ली बरखास्त करण्याचा प्रसंग न आल्यामुळें जुन्या स्पीकरला नवीन असेंब्लीची बैठक भरेपर्यंत काम करीत राहण्याचा प्रसंग आलेला नाहीं. कौन्सिलें बरखास्त कधींच होत नाहींत;

त्यामुळें त्यांतील प्रेसिडेंटांची व डेप्युटी प्रेसिडेंटांची मुदत ( ३ किंवा ६ किंवा ९ वर्षें ) भरल्यावर त्यांच्या जागीं दुसऱ्यांची निवडणूक व्हावयाची. मुंबई प्रांतापुरतें बोलावयाचें तर पक्वासा व सोमण या दोघांची सभासदत्वाची मुदत ९ वर्षांची ठरली गेल्यामुळें हे दोघेही ९ वर्षेपर्यंत प्रेसिडेंट व डेप्युटी प्रेसिडेंट म्हणून काम करणार. जुन्या स्पीकरनें नवीन स्पीकर निवडला जाईपर्यंत काम पहावयाचें ही वहिवाट ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्समधील आहे ( मेकृत पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ० १८० ).

डेप्युटी स्पकिर हा इतर सभासदांत न बसतां स्पीकरच्या खालच्या बाजूस डाव्या अंगाला बसण्याचा प्रघात आहे. त्याच्या उजव्या बाजूस असेंब्लीचा सेक्रेटरी ( सरकारी नोकर ) बसतो. स्पीकरच्या उजव्या बाजूच्या रांगांतून सरकारी पक्ष ( प्रधान व इतर ) व डाव्या बाजूस विरोधी पक्ष अशी सभागृहांत बसण्याची योजना केलेली असते.

स्पीकर किंवा डेप्युटी स्पीकर, तसेंच प्रेसिडेंट किंवा डेप्युटी प्रेसिडेंट यांची पहिल्या प्रथम निवडणूक होण्यापूर्वी सभागृहाचें अध्यक्षस्थान गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें नेमलेल्या गृहस्थानें स्वीकारावें अशी वरील (३) ऱ्या पोटकल्मानें व्यवस्था करून ठेविली आहे. अर्थात् या तरतुदीची जरूरी पुनः केव्हांही लागणार नाहीं. मुंबई असेंब्लींत व कौन्सिलांत हें काम गव्हर्नरनें रावबहादुर चितळे ( सभागृहांतील सर्वांत वृद्ध सभासद ) व प्रो. दावर यांजवर अनुक्रमें सोपविलें होतें. (६) काँग्रेस प्रांतांतून काँग्रेस मंत्रिमंडळें हीं जरी दुसरीं असलीं तरी स्पीकर व डेप्युटी स्पीकर हे मात्र पहिलेच होत. याचें कारण, मंत्रिमंडळ नेमावयाचें असतें व स्पीकर निवडावयाचा असतो, हें होय.

स्पीकर किंवा डेप्युटी स्पीकर गैरहजर असतांना काय करावें याची व्यवस्था असेंब्लीनें ८४ व्या कलमांत तिला दिलेल्या अधिकारान्वयें तयार होणाऱ्या नियमांत करावयाची आहे. नवीन असेंब्ली आपल्या कामकाजाचे नियम तयार करीपर्यंत ८४ ( ३ ) कलमान्वयें गव्हर्नरानें तयार केलेल्या नियमाप्रमाणें असेंब्लीचें कामकाज चालावयाचें. त्या नियमांत स्पीकरनें दर अधिवेशनाच्या प्रारंभीं चौघा चेअरमनांचें एक पॅनेल

नेमावयाचें असतें असा नियम आहे. तेव्हां स्पीकर किंवा डेप्युटी स्पीकर जर गैरहजर असतील तर वरील चौघां चेअरमनांपैकीं अनुक्रमानें कोणी तरी अध्यक्षाच्या खुर्चीवर विराजमान व्हावयाचें. ही सहाही मंडळी गैरहजर असली तर काय करावयाचें—'ततःकिम्'–हा प्रश्न कांहीं सुटत नाहीं. त्याला उत्तर ६५ ( ३ ) कलमांत शेवटीं देऊन ठेवलें आहे. तें हें कीं, याबाबत असेंब्लीनें कोणालाही स्पीकर म्हणून ठरवावें. म्हणजे तेवढ्या वेळेपुरती असेंब्लीनें अध्यक्षाची निवडणूक करावी व आपलें काम अध्यक्षाच्या अभावीं बंद पडूं न देतां पुढें चालू ठेवावें.

( ई ) (४) थ्या पोटकलमांत स्पीकर इ० चा पगार कायद्यानें ठरविण्याचा अधिकार कायदेमंडळांना दिलेला आहे. परंतु सदर कायदा मंजूर होण्यापूर्वी पगार गव्हर्नरनें ठरवावयाचा आहे. पूर्वीच्या वहिवाटी-प्रमाणें हजार दोन हजार रुपये याप्रमाणें गव्हर्नरनीं स्पीकर इ० चे पगार ठरविले होते. १९१९ च्या कायद्याप्रमाणें त्या राजवटींत कायदे-कौन्सिलांच्या अध्यक्ष उपाध्यक्षांना खालीलप्रमाणें पगार होते:—

| प्रांत | प्रेसिडेंट (दरमहा रुपये) | डे० प्रेसिडेंट ( दरमहा रुपये ) |
|---|---|---|
| १ मुंबई | ३००० | ५०० |
| २ बंगाल | ३००० | ५०० |
| ३ पंजाब | ३००० | .... |
| ४ मद्रास | २००० | ५०० |
| ५ संयुक्तप्रांत | २००० | ५०० |
| ६ बिहार व ओरिसा | २००० | २५० |
| ७ मध्यप्रांत व वऱ्हाड | २००० | .... |
| ८ आसाम | १००० | १ |
| ९ वायव्य सरहद्द | ८३३ | .... |

(मध्यवर्ती असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांच्या अध्यक्षांचे पगार दरमहा ४००० रुपये.)

सध्यां ११ प्रांतांतून स्पीकर, इ० चे पगार पुढीलप्रमाणें आहेत:—

| प्रांत | स्पीकर | डे० स्पीकर | प्रेसिडेंट | डे० प्रेसिडेंट |
|---|---|---|---|---|
| १ मद्रास | ५०० | २५० | ५०० | २५० |
| २ मुंबई | ५०० | १०० | ५०० | १०० |
| ३ बंगाल | २००० | २५० | १५०० | १६६ |
| ४ संयुक्तप्रांत | ५०० | २५० | ५०० | १६६ |
| ५ पंजाब | .... | .... | | |
| ६ बिहार | ५०० | २५० | ४०० | २५० |
| ७ मध्यप्रांत व वऱ्हाड | ५०० | २५० | | |
| ८ आसाम | १००० | .... | १००० | .... |
| ९ सरहद्द | .... | .... | | |
| १० ओरिसा | ४०० | १५० | | |
| ११ सिंध | .... | .... | | |

कांहीं प्रांतांचे आंकडे मिळाले नसल्यामुळें दिलेले नाहींत; तथापि वरील आंकडेवार माहितीवरून कॉंग्रेस व कॉंग्रेसेतर प्रांतांतील या

पगाराबाबतचा फरक चटदिशीं नजरेंत भरतो. सर्वसाधारणपणें काँग्रेस प्रांतांतून स्पीकर व प्रेसिडेंट यांचा पगार रु. ५०० ठरविलेला आहे. ओरिसामध्यें स्पीकरचा व बिहारमध्यें प्रेसिडेंटचा पगार तर रु. ४०० ठरविलेला आहे. डे० स्पीकर व डे० प्रेसिडेंट यांचा काँग्रेस प्रांतांतून जास्तींत ज़ास्त रु. २५० व कमींत कमी रु. १०० पगार ठरविण्यांत आला आहे. मुंबई प्रांतांत स्पिकर आणि प्रेसिडेंट व डे०, स्पीकर आणि डे० प्रेसिडेंट यांच्या पगाराच्या कायद्याला ( १९३७ चा दुसरा कायदा ) १६ आक्टोबर १९३७ रोजीं गव्हर्नरची मंजुरी मिळाली. या कायद्यांतील चौथ्या कलमान्वयें प्रेसिडेंट आणि स्पीकर यांना आपल्या प्रेसिडेंट व स्पीकर या जागेच्या कामाव्यतिरिक्त पैसे मिळविण्याकरितां दुसरा कोणताही उद्योग अगर धंदा करितां येणार नाहीं. त्या कायद्यांतील सहाव्या कलमान्वयें डे० स्पिकर व डे० प्रेसिडेंट यांना या कामाकरितां मिळणाऱ्या पगारा-खेरीज इतर कोणताही पगार मिळण्यास आडकाठी ठेवलेली नाहीं.

इतर प्रांतांतील कांहीं आंकडे मननीय आहेत. बंगाल कौन्सिल व आसाम असेंब्ली यांचे प्रेसिडेंट व स्पिकर ( अनुक्रमें ) हे काँग्रेसवाले असल्यामुळें त्यांना आपल्या जास्त पगारापैकीं स्वतःकरितां फक्त रु. ५०० च ठेवून घेऊन बाकीचे रुपये काँग्रेस पक्षाला द्यावे लागणार. त्यापैकीं बंगाल कौन्सिलच्या प्रेसिडेंटानें रु. ५०० वरील रक्कम देण्याचें नाका-रल्यामुळें त्याला काँग्रेस सभासदत्वास मुकावें लागल्याबद्दल मागें वर्णन आलेंच आहे. आसामस्पीकर सरकारांतून ५०० च रुपये पगार घेतो.

बिहार व संयुक्तप्रांतांतील प्रेसिडेंटांना ते काँग्रेसवाले नसूनही त्या प्रांतांत काँग्रेस सरकार असल्यामुळें दरमहा रु. ५०० वरच समाधान मानून घ्यावें लागत आहे. बिहारमध्यें तर रु. ५०० ही मिळत नाहींत. संयुक्तप्रांत कौन्सिलनें काँग्रेसला विरोध दर्शविण्याकरितां तेथील डेप्युटी स्पिकरचा पगार बराच कमी करणारी उपसूचना मंजूर केली; परंतु असेंब्लीनें तीं फेटाळल्याकारणानें कौन्सिलला असेंब्लींतील बहुमतापुढें, नव्हे एकमतापुढें हार खावी लागली.

पगाराशिवाय स्पीकर व प्रेसिडेंट यांना घरभाडें व वाहनभाडें

मिळून दरमहा रु. २५० पर्यंत अलावन्सही मिळण्याची मुंबई कायद्यानें व्यवस्था केली आहे.

वरील ( ४ ) पोटकलमांत कायदेमंडळानें पगार ठरविण्यापूर्वी गव्हर्नरनें ठरवावे असें म्हटलें आहे. गव्हर्नर या शब्दापुढें नेहमींप्रमाणें 'आपल्या मर्जीप्रमाणें' किंवा 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' हे शब्द नसल्यामुळें वरील पगार ठरविण्याचें काम गव्हर्नरानें मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणेंच केलें पाहिजे हें उघड आहे. कारण जी गोष्ट पुढें कायदेमंडळानें कायदा करून ठरवावयाची आहे ती गोष्ट कायदा होण्या-पूर्वी कायदेमंडळाच्या वतीनें प्रधानमंडळानेंच ठरविली पाहिजे हें ओघानें-च प्राप्त होतें. व हीच योजना वरील 'गव्हर्नर' या नुसत्या ( उपाधि-रहित ) शब्दानें करून ठेविली आहे. कॉंग्रेस प्रांतांत अर्थात् वरील सल्ला तात्पुरत्या मंत्रिमंडळानें दिलेला असणार हें उघड आहे व तो सल्ला पूर्वीच्या वहिवाटीहून निराळा नव्हता ही गोष्टही जाहीर झालेली आहे.

मुंबईच्या गव्हर्नरानें ८ जुलै १९३७ रोजीं या पगाराबाबत पुढील हुकूम काढला:—

" १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ६५ व्या कलमा-च्या (पांचव्या पोटकलमासह) चौथ्या पोटकलमांत दिलेल्या अधिकारा-न्वयें मुंबईच्या गव्हर्नरानें पुढील लोकाना त्यांच्या नांवापुढें दिलेले पगार ठरविले आहेत:—

( १ ) मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचा प्रेसिडेंट—दरमहा १५०० रुपये
( २ ) ,, ,, ,, डेप्युटी प्रेसिडेंट—,, १५० रुपये
( ३ ) मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा स्पीकर— ,, २००० रुपये
( ४ ) ,, ,, ,, डेप्युटी स्पीकर— ,, २५० रुपये

मुंबईच्या गव्हर्नरच्या हुकमावरून
सी. डब्ल्यू. ए. टर्नर,
सरकारचा चीफ सेक्रेटरी. "

( उ ) वरील ( ५ ) पोटकलमांत म्हटलें आहे कीं, वरच्या चारी कलमांतून 'असेंब्ली' ऐवजीं 'कौन्सिल' व 'स्पीकर', 'डे० स्पीकर' ऐवजीं 'प्रेसिडेंट', 'डे० प्रेसिडेंट' असें सहा प्रांतांतील कौन्सिलां

(वरिष्ठ सभा) बाबत समजलें पाहिजे. याला फक्त ( २ ) च्या पोटकलमां-तील शेवटच्या अटीच्या भागाचा अपवाद मानला आहे. कारण उघड आहे कीं, असेंब्लीप्रमाणें कौन्सिल हें केव्हांही नाहींसें होणारें नसल्यामुळें कौन्सिलच्या बाबतींत एक असेंब्ली जाऊन दुसरी असेंब्ली येईपर्यंतच्या काळापुरती दरम्यानची व्यवस्था असेंब्लीच्या बाबतींत जी करावी लागते ती करण्याचें बिलकुल प्रयोजन उरत नाहीं.

( ऊ ) आतां शेवटीं स्पीकरनें किंवा प्रेसिडेंटनें पक्षविषयक राज-कारणांत भाग घ्यावा, का त्यापासून अलिप्त असावें, या महत्त्वाच्या प्रश्नाचा जातां जातां का होईना, उल्लेख केल्यावांचून या कलमावरील टिप्पण्या पुऱ्या करितां येत नाहींत. हा केवळ तात्त्विक चर्चेचा प्रश्न राहिलेला नसून संयुक्तप्रांत असेंब्लीचे स्पीकर बाबू पुरुषोत्तमदास तंडन यांनीं स्वतःच्या वर्तनानें व मतप्रतिपादनानें या प्रश्नास चांगलेंच तोंड पाडलें आहे. स्पीकर म्हणून निवडून आल्यानंतर त्यांनीं लगेच जाहीर केलें कीं, "ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सच्या स्पीकरचा कित्ता मी पुढें ठेवणार नाहीं. कॉंग्रेसपक्ष मी सोडणार नाहीं; व सभागृहाबाहेर कॉंग्रेसच्या सर्व कामांतून मी संपूर्णपणें भाग घेण्याचें ठरविलें आहे. किंबहुना, याच निश्चित समजुतीवर मी स्पीकर होण्याचें कबूल केलें." अशा तऱ्हेनें या प्रश्नाला चालना मिळाल्यावर त्यासंबंधीं जिकडे तिकडे चर्चा व वाद सुरू झाले. संयुक्तप्रांताचे मुख्य प्रधान पंडित गोविंद वल्लभ पंत यांनीं आपलें मत प्रतिपादलें कीं, "लोकशाही राज्यपद्धतींत स्पीकरच्या जागेचें महत्त्व अतिशय आहे. लोकशाहीला व स्वतंत्र संस्थांना पोषक अशा सभा-गृहांतील, रूढि, संकेत व प्रघात यांना उचलून धरण्याचें व त्यांना वाढीला लावण्याचें महत्त्वाचें कार्य स्पीकरनें करावयाचें आहे. ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सपेक्षां आपली स्थिति अत्यन्त भिन्न आहे. आम्हाला अजून स्वातंत्र्याचा मार्ग किती तरी चोखाळावयाचा आहे. अशा वेळीं आपल्यांतील स्पीकरसारख्या दर्जाच्या माणसाच्या स्वातंत्र्याच्या चळवळींतील कार्याला आपणाला मुकतां येणार नाहीं. परंतु अमेरिकेंतल्याप्रमाणें किंवा फ्रान्समधील स्पीकरप्रमाणें त्यानें आपल्या पक्षाचें कळसूत्री बाहुलें बनावें हेंही मला संमत नाहीं. आपल्याला दोन्हींतील सुवर्णमध्य गांठला पाहिजे." प्रख्यात घटनाशास्त्रपंडित डायसी विचारतो कीं, "ज्या पक्षाचें पार्लमेंटांत

बहुमत आहे तो आपल्या पक्षाच्या मताचा माणूस स्पीकरच्या जागेकरितां कां पसंत करणार नाहीं ? " महात्मा गांधी व पंडित नेहरू यांनीं पुरुषोत्तमदास तंडन यांच्या विचारसरणीस उचलून धरिलें व त्यांच्या या धीटपणाबद्दल त्यांनीं त्यांचें अभिनंदन केलें. पंडित नेहरू म्हणाले, "स्पीकरची जागा किंवा दुसरी कोणतीही जागा यांना स्वराज्याच्या मोठ्या प्रश्नापुढें तितकीच किंमत मी देईन. स्पीकरनें सभागृहाबाहेर सदर लढ्यांत जोरानें भाग घेतला पाहिजे. स्पीकर म्हणून निवडून आला कीं, लगेच चमत्कार होऊन त्याचीं राजकीय मतें व कामें यांनीं कां दडून बसावें हें मला समजत नाहीं. आम्हांला तृतीयप्रकृति बनावयाचें नाहीं. असली फसवणूक आम्ही आपली व इतरांची करितां कामा नये. जें ब्रिटिश असेल तें आंधळेपणानें गिराविण्याची आम्हांला खोडच लागली आहे. ही परदास्यशृंखला आपणास तोडून टाकावयाची आहे. माझें असें म्हणणें नाहीं कीं, चांगल्या गोष्टी पूर्ण विवेक केल्यावर आम्ही घेऊं नयेत." संयुक्तप्रांत असेंब्लींत स्पिकरच्या या धोरणाबद्दल स्पीकरलाच प्रश्न विचारले असतां त्यांनीं त्या प्रश्नांना मनाई केली व असें उत्तर दिलें कीं, "याबाबत माझीं मतें मी प्रथमच जाहीर केलीं आहेत. बाहेर जरी माझ्या पक्षाचें मी काम केलें तरी सभागृहांत मी माझें स्पीकरचें कर्तव्य अत्यन्त निःपक्षपातिपणानें करीत आलों आहे. हें काम करीत असतांना कॉंग्रेससारखी उच्च नैतिक भूमिकेवरून काम करणारी संस्था, माझ्यावर अयोग्य दडपण आणील हें केवळ अतर्क्य आहे. परंतु समजा कीं, ही असंभवनीय गोष्ट घडूं लागली तर त्याच दिवशीं मी माझ्या जागेचा राजीनामा देईन." दिल्लीस जानेवारी १९३८ मध्यें सर अबदुर रहिम यांच्या अध्यक्षतेखालीं स्पीकर व प्रेसिडेंट यांची सभा झाली त्यांतही या प्रश्नाची चर्चा झाली. परंतु तंडनच्या विचारसरणीस विशेष पाठिंबा मिळाला नाहीं. इतर कॉंग्रेस स्पीकर किंवा प्रेसिडेंट यांनींही तंडनचा पाठपुरावा केला नाहीं याचें आश्चर्य वाटतें ! परंतु पुढें संयुक्तप्रांत असेंब्लींत स्पीकरसंबंधींचा पंडित पंत यांनीं मांडलेला पुढील ठराव खूप वादविवादानंतर मंजूर झाला:—

"या सभागृहाचें असें मत आहे कीं, स्पीकर म्हणून निवडून आलेल्या इसमाच्या सार्वजनिक कार्यांत, तो स्पीकर निवडला गेला

एवढ्याच कारणास्तव, व्यत्यय येण्याचें बिलकुल कारण नाहीं; त्याला सभागृहाबाहेर राजकीय चळवळींत आपल्या मर्जीप्रमाणें भाग घेण्याची मोकळीक असावी."

या ठरावानें तंडनजींना आपल्या मतप्रणालीस सभागृहाचा सनदशीर रीतीनें व्यक्त झालेला पाठिंबा मिळाला व हें आपलें मत जाहीर करण्याकरितांच कीं काय तंडनजींनीं हरिपुरा कॉंग्रेसच्या खुल्या अधिवेशनांत राष्ट्रीय शिक्षणविषयक ठरावावर लांबलचक भाषण केलें. गोष्ट अशी आहे कीं, जगांत कोणताही नवा प्रघात पाडणारा माणूस प्रथम अत्यन्त अल्पमतांत असतो. परंतु त्याच्या ठायीं जोम असला व त्याच्या विचारसरणींत सत्यांश असला तर तो विरुद्ध मताशीं टक्कर देत देत आपली वाट दिवसेंदिवस रुंद करीत जातो. या न्यायानें प्रथम इतर कॉंग्रेस स्पीकर व प्रेसिडेंट यांनीं तंडनजींचा कित्ता गिरविला पाहिजे व आपल्या चोख वर्तनानें असें निदर्शनास आणून दिलें पाहिजे कीं, त्यांनीं कॉंग्रेसच्या पक्षनिविष्ट राजकारणांत कितीही जोरानें भाग घेतला तरी सभागृहांत सर्व पक्षांना, विशेषतः अल्पमतवाल्या पक्षांना, त्यांच्याकडून न्यायाशिवाय दुसरें कांहींही मिळणार नाहीं. ही गोष्ट अवघड तर खरीच, परंतु अशा गोष्टी करून दाखविण्यांतच खरा पुरुषार्थ आहे. कालिदासानें अशा सर्व प्रसंगांना उद्देशून एक महासिद्धान्त सांगितलाच आहे कीं,

"विकारहेतौ सति विक्रियन्ते येषां न चेतांसि त एव धीराः"

( ए ) या स्पीकरप्रकरणाबाबत एक किरकोळ गोष्ट राहून गेली. ती ही कीं, "सरकारच्या दृष्टीनें स्पीकरचा दर्जा काय आहे?" सदर प्रश्नाला उत्तर देतांना आसाम असेंब्लीचे स्पीकर श्री. वसंतकुमार दास ( कॉंग्रेस ) म्हणाले : "आपल्या कामाबाबत स्पीकरला संपूर्ण मोकळीक आहे व त्याला कोणत्याही कामाबाबत सरकारची आगाऊ मंजुरी घ्यावी लागत नाहीं. आपला प्रवास हा खासगी नसून सरकारी कामाकरितां होता असा त्यानें दिलेला नुसता दाखला पुरेसा मानला जातो. स्पीकर हा कांहीं सरकारी नोकर नाहीं; सरकारकडून जरी त्याला पगार मिळत असला तरी तो कायदेमंडळाचा सेवक आहे. गव्हर्नरनें याबाबत जरी कांहीं जाहिरनामा काढला नसला, तरी एका खात्याचा प्रमुख म्हणून स्पीकर-

ला वागविलें जातें." वरच्या शेवटच्या वाक्यावरून मध्यवर्ती असेंब्लींत अध्यक्ष विठ्ठलभाई पटेल हे सरकारबरोबर लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचें स्वतंत्र खातें आपल्या अधिकाराखालीं असावें याबाबत कसे झगडले व त्यांनीं त्यांत कसें यश मिळविलें, याची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं.

( ऐ ) दुसऱ्या पोटकलमांत 'गव्हर्नरला स्वदस्तुरचें पत्र लिहून स्पीकरला आपल्या अधिकाराच्या जागेचा राजीनामा देतां येईल' असें लिहिलें आहे. मद्रास असेंब्लीचे स्पीकर श्री. सांबमूर्ति यांच्या परदेशगमनाला काँग्रेस वर्किंग कमिटीनें विरोध केल्यामुळें त्यांनीं वरील तरतुदीच्या आधारें राजीनामा देण्याचें ठरविलें होतें; परंतु उभयपक्षीं भेटींत वाटाघाटी होऊन सांबमूर्तींनीं राजीनामा न देण्याचें ठरलेलें सर्वश्रुत आहेच.

प्रतिनिधि सभांतील मतदान, कांहीं जागा रिकाम्या असल्या तरी सभांचें काम चालू राहणें आणि गणपूर्ति (कोरम)

६६.—( १ ) या कायद्यांत स्पष्टपणें इतर तऱ्हेनें तरतूद केलेली असल्यास त्याखेरीज प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही एका सभेंतील अथवा जोडसभेंतील सर्व प्रश्नांचा निर्णय हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांच्या मतांच्या बहुमतानें केला जाईल; या वेळीं स्पीकर किंवा अध्यक्ष किंवा त्यांचे जागीं काम करणारा इसम याचें मत मोजलें जाणार नाहीं.

स्पीकर किंवा प्रेसिडेंट किंवा त्यांचे जागीं काम करणारा इसम यांनीं पहिल्यांदा मत द्यावयाचें नाहीं, परंतु समसमान मतें पडल्यास त्यांना मताचा अधिकार आहे व हा निर्णयात्मक अधिकार ते बजावतील.

( २ ) प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही प्रतिनिधिसभेला, त्यांतील एखाद्या सभासदाची जागा रिकामी असली तरी, आपलें काम चालविण्याचा अखत्यार आहे; आणि जरी मागाहून असें आढळून आलें कीं, एखादा इसम, तसें करण्याची पात्रता नसतांही, बैठकींत बसला किंवा त्यानें मत दिलें अथवा इतर तऱ्हेनें कामकाजांत भाग घेतला तरी सुद्धां कायदेमंडळाचें कामकाज कायदेशीर मानलें जाईल.

( ३ ) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीची बैठक चालू असतांना असा प्रसंग आला कीं, सभागृहांत असेंब्लीच्या एकूण सभासदांच्या संख्येच्या एकषष्ठांशापेक्षां कमी सभासद हजर आहेत, तसेंच प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या बैठकींत एखाद्या प्रसंगीं दहापेक्षां कमी सभासद हजर आहेत, तर अशा वेळीं स्पीकर किंवा अध्यक्ष किंवा त्यांचे जागीं काम करणारा इसम यांचें हें काम आहे कीं, सभेचें काम तहकूब केलें पाहिजे किंवा अनुक्रमें कमींत कमी एकषष्ठांश सभासद अथवा कमींत कमी दहा सभासद हजर होईपर्यंत सभेचें काम बंद ठेविलें पाहिजे.

( अ ) पहिल्या पोटकलमांत 'इतरत्र स्पष्टपणें असलेल्या तरतुदी'-बाबत जो उल्लेख आला आहे तो ६५ ( २ ) व ८३ या दोन कलमांना उद्देशून आहे. वर आलेल्या ६५ ( २ ) कलमांत 'स्पीकर, डे० स्पीकर, अध्यक्ष व उपाध्यक्ष यांना काढून टाकण्याचा ठराव असेंब्लीच्या अथवा कौन्सिलाच्या **सर्व सभासदांच्या** बहुमतानें मंजूर होईल तर' अशी व्यवस्था आहे. **हजर असलेल्या व मत देणाऱ्या** सभासदांच्या बहुमतानें स्पीकर इत्यादींना काढून टाकतां येणार नाहीं. तसेंच ८३ व्या कलमांत अँग्लोइंडियन आणि युरोपियन या जातींना शिक्षणाकरितां दिल्या जाणाऱ्या देणग्या कमी करण्याचा अधिकार प्रांतिक असेंब्लीच्या **सर्व सभासदांच्या** तीनचतुर्थांशइतक्या बहुमतालाच दिलेला आहे.

( आ ) प्रथम मतमोजणींत स्पीकरला किंवा प्रेसिडेंटला मत नाहीं; याचा अर्थ, तेवढ्यापुरता त्याचा सभासदत्वाचा सर्वसाधारण हक्क हिरावून घेतल्यासारखें होतें. ही योजना अध्यक्षाचें निःपक्षपातित्व राखण्याच्या हेतूनें केलेली दिसते; परंतु कायदेमंडळानें ज्या पोटकमिट्या नेमावयाच्या किंवा निरनिराळ्या संस्थांवर कायदेमंडळातर्फे जे प्रतिनिधी पाठवावयाचे असतात त्यांच्या निवडणुकींत स्पीकरनें किंवा अध्यक्षानें भाग घेण्यास या कलमानें बाध येण्याचें वास्तविक कांहीं कारण नाहीं.

आठव्या शेड्यूल ( फीडरल रेल्वे अँथॉरिटी ) मध्यें ६ व्या कलमांत म्हटलें आहे कीं, " अँथॉरिटीनें केलेल्या गोष्टी आणि त्यांच्या-पुढें आलेले प्रश्न यांचा निकाल हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांच्या बहुमतानें केला जाईल. एखाद्या बैठकींत जर समसमान मतें पडलीं, तर अध्यक्षानें दुसरें किंवा निर्णायक मत द्यावयाचें आहे." यावरून सदर अध्यक्षानें प्रसंग पडल्यास दोनदां मत द्यावयाचें हें स्पष्ट होतें. असेंब्ली किंवा कौन्सिल यांचे अध्यक्ष आणि फीडरल रेल्वे अँथॉरिटीचा अध्यक्ष यांच्या मत देण्याच्या अधिकारांत हा महत्त्वाचा फरक दिसून येतो. असा फरक करण्याचें कारण बहुधा कायदे करणारी सभा व कारभार पाहणारी सभा या भेदांत असावें असें वाटतें.

ब्रिटिश कॉमन्स सभेंत अशा प्रकारें समसमान मतें पडण्याचा प्रसंग क्वचित्च येतो. १२ एप्रिल १९३८ रोजीं कमांडर लॉकर लँपसन

या खासगी सभासदाच्या बिलावर (ज्यू नागरिकत्वाबाबतचे) पहिल्या वाचनाचे वेळीं ११४ मतें अनुकूल व तितकींच मतें प्रतिकूल पडलीं. स्पीकरनें आपलें निर्णायक मत बिलाला अनुकूल दिलें. या बिलाचा उद्देश 'ज्यू लोकांना पॅलेस्टाइनखेरीज इतर देशांत पॅलेस्टाइनचे नागरिक म्हणवून घेण्याचा व मॅंडेटखालीं संरक्षित असें म्हणवून घेण्याचा हक्क असावा' हा होता.

समसमान मतें पडल्यास कास्टिंग किंवा निर्णायक मत देण्याचा अधिकार स्पीकरला दिलेला आहे. 'कास्टिंग' या शब्दांतील 'कास्ट' या धातूचा नेहमींचा 'टाकणें' हा अर्थ अभिप्रेत नाहीं; तर जुना, उपयोगांतून नाहींसा झालेला जो अर्थ 'फिरविणें' तो घेतला पाहिजे. कारण उघडच आहे कीं, अध्यक्षाचें मत एखाद्या बाबीच्या निर्णयाला या बाजूला किंवा त्या बाजूला फिरवितें. अध्यक्षानें हें निर्णायक मत कसें द्यावें याबाबतही कांहीं रूढि व प्रघात पडले आहेत. त्यांपैकीं एक रूढि अशी सांगतां येईल कीं, चालू वहिवाट कायम राखण्याकरितां (स्टेटस को) निर्णायक मताचा उपयोग अध्यक्षानें केला पाहिजे. या रूढीचें मूळ तपासलें तर असें दिसून येईल कीं, समाजाला आपली जुनी जागा सोडून पुढें प्रगति करण्यांत धोका आहे कीं काय, अशी वेळोवेळीं शंका उपस्थित होते. शिवाय रूढींत बदल करण्याचें पातक (जबाबदारी म्हणा पाहिजे तर) एकाच माणसानें आपल्या शिरावर काय म्हणून घ्यावें? तात्पर्य काय कीं, हा एक प्रकारें जुन्या-नव्याचा झगडा आहे. पुराणमतवादी समाज वरील प्रघाताला मान्यता देईल; तर प्रगमनशील व पुरोगामी समाज वरील प्रघात शक्य तेथें मोडून काढण्याचा खटाटोप करील. अर्थात् कायद्याच्या दृष्टीनें अध्यक्षानें आपलें निर्णायक मत कसें द्यावें याविषयीं त्यावर कोणतेंच बंधन नाहीं.

(इ) दुसऱ्या पोटकलमाचा उद्देश कायदेमंडळांचें कामकाज, एखादी जागा कांहीं कारणानें रिकामी पडल्यास बंद पडूं नये हें साधण्याचा आहे. तसेंच प्रसंगवशात् एखाद्या भलत्या माणसानें [उ० ज्या सभागृहाचे मंत्री सभासद नाहींत अशा सभागृहांत मंत्र्यांनीं किंवा कोणत्याही सभागृहांत ॲडव्होकेट जनरलनें (क. ६४)] मत दिलें असें मागाहून आढळून आलें तरीही सभागृहांत झालेलें काम कायदेशीर मानलें जाईल.

चूक होत असतांना ती दाखविली गेल्यास ती होऊं न देण्याचा अध्यक्षाला पूर्ण अधिकार आहे. पण झाल्यावर त्याबाबत कांहीं इलाज चालणार नाहीं. तसेंच ६७ कलमान्वयें प्रत्येक सभासदास प्रथम शपथ घ्यावी लागते; ती न घेतां जर कोणी सभासदानें मत दिल्याचें मागाहून आढळून आलें तरी ती चूक दुरुस्त करितां येणार नाहीं.

(ई) तिसऱ्या पोटकलमांत असेंब्ली व कौन्सिल यांचा कोरम (काम चालण्यास कमींत कमी लागणारी हजर सभासदांची संख्या) काय असावा याची तरतूद केली आहे. याप्रमाणें मुंबई असेंब्लीचा कोरम $\frac{१७५}{६}$ म्हणजे २९ ठरतो. सभासदांच्या हातांत सभा बंद पाडण्याचें हें एक अमोघ साधन आहे. ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्समध्यें सहाशेंच्या वर सभासद असून त्या सभेचा कोरम अवघा ४० आहे (५ जानेवारी १६४० चा म्हणजे जवळजवळ तीनशें वर्षांपूर्वींपासून चालत आलेला नियम); म्हणजे याचा अर्थ असा कीं, कोणाही २० सभासदांच्या मतानें कोणताही कायदा मंजूर होण्याची यानें व्यवस्था (अथवा भीति) निर्माण करून ठेविली आहे. लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांचा कोरम मात्र कांहीं प्रमाणानें न ठरवितां मनाला येईल तसा म्हणजे १० हा ठरविला आहे. यानें असें होतें कीं, मद्रास, बंगाल व संयुक्तप्रांत येथील कौन्सिलांबाबत कोरम $\frac{१}{८}$ किंवा $\frac{१}{६}$ म्हणजे असेंब्ली कोरमइतका ठरतो. मुंबई व बिहार या कौन्सिलांबाबत तो $\frac{१}{३}$ ठरतो व आसामच्या बाबत तर तो $\frac{१}{२}$ ठरतो. ही व्यवस्था अतिशय गैरसोईची व अन्यायाची होय यांत शंका नाहीं; परंतु कौन्सिलांना तितकेसे अधिकार व महत्त्व नसल्यानें हा धडधडीत अन्याय चांगला नजरेंत भरत नाहीं. या पोटकलमांत असेंब्ली व कौन्सिल यांच्या जोडबैठकीस कोरम काय असावा याबद्दल निश्चित कांहींच सांगितलेलें नाहीं. त्याबाबत, ८४ व्या कलमान्वयें करावयाच्या नियमांत, व्यवस्था करितां येण्यासारखी आहे.

(उ) तिसऱ्या पोटकलमांत सभेचें काम तहकूब करण्याचा अधिकार, विशिष्ट परिस्थितींत म्हणजे कोरम नसतांना, स्पीकरला किंवा प्रेसिडेंटला आहे असें म्हटलें आहे. परंतु सर्वसाधारणपणें कांहीं दिवस किंवा कांहीं आठवडेपर्यंतही सभागृहाचें काम तहकूब करण्याचा अधिकारही

स्पीकरला किंवा प्रेसिडेंटला आहे हें ओघानेंच प्राप्त होतें. कारण ६२ (२) (ख) आणि (ग) कलमांत असेंब्ली किंवा कौन्सिल यांचें अधिवेशन समाप्त करण्याचा व असेंब्ली बरखास्त करण्याचा असे अधिकार गव्हर्नरचे आहेत असा स्पष्ट उल्लेख आहे, परंतु असेंब्ली किंवा कौन्सिल कांहीं दिवस किंवा आठवडे तहकूब करण्यासंबंधींचा त्यांत बिलकुल उल्लेख नाहीं; सबब तो अधिकार स्पीकर किंवा प्रेसिडेंट यांचाच असून तो ते बजावीत असल्याचें आढळून येतें. मे आपल्या पुस्तकांत (पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ. ५२) या तहकुबीसंबंधीं लिहितो : "यद्यपि राजा आपली पसंती दर्शवितो तथापि तहकुबीचा हक्क हा सर्वस्वीं कॉमन्स सभेच्या अखत्यारींतला आहे. राजानें त्यांत ढवळाढवळ करणें हें १८१४ पासून जवळ जवळ निषिद्ध मानलें गेलें आहे." मुंबई प्रांतांतलें उदाहरण घ्यावयाचें झाल्यास, जुलै १९३७ च्या तिसऱ्या आठवड्यांत सभासदांचा शपथविधि व स्पीकर, डे० स्पीकर यांची निवडणूक झाल्यावर मुख्य प्रधानांच्या विनंतीप्रमाणें असेंब्लीचे स्पीकर ना. मावळणकर यांनीं आपल्या अधिकारांत असेंब्लीचें अधिवेशन ऑगस्ट १९३७ च्या तिसऱ्या आठवड्यापर्यंत पुढें ढकललें होतें, या गोष्टीवरून तहकुबीचा अधिकार स्पीकरचा आहे हें स्पष्ट आहे.

ही गोष्ट अनुमानानें सिद्ध केली आहे, परंतु ८४ (३) कलमांतलि अधिकारान्वयें मद्रास गव्हर्नरनें केलेल्या मद्रास असेंब्ली नियमांत ही बाब पुढीलप्रमाणें स्पष्ट करण्यांत आली आहे:—

"१९३५ च्या कायद्याच्या ६२ व्या कलमांतील (२) ऱ्या पोटकलमाच्या तरतुदींना बाध न आणतां, असेंब्लीच्या अध्यक्षाला वेळोवेळीं असेंब्लीची बैठक तहकूब करण्याचा अधिकार राहील."

(ऊ) ६६ व्या कलमाच्या (१) पोटकलमांत "सर्व प्रश्नांचा निकाल मतें घेऊन लावावयाचा" असें स्पष्ट म्हटलें आहे. सिंध असेंब्लीचे माजी स्पीकर कै० भोजसिंग पहालजानी यांनीं एकदां एका प्रश्नावर मतें न घेतांच एकंदरींत सभागृहाचें सर्वसाधारण मत अंदाजून त्याप्रमाणें निकाल दिला. यावर कॉंग्रेसपक्षातर्फे श्री. सिध्वा यांनीं ६६ (१) कलमाधारें हरकतीचा मुद्दा उपस्थित केला कीं, "स्पीकरनें मतें घेतलीं पाहिजेत; सभागृहाचें मत अंदाजानें अजमावून भागणार नाहीं."

परंतु सिंध स्पीकरनें हा मुद्दा बरोबर नसून आपण केलें तेंच बरोबर होतें असा निकाल दिला. असें करण्यांत सरकारचा पराभव अथवा नाचक्की टाळण्याचा उद्देश होता हें त्या वेळीं उघड उघड दिसून आलें. स्पीकरसारख्या जबाबदार व निःपक्षपाती गृहस्थानें अशा मोहास बळी पडावें ही गोष्ट अत्यन्त वाईट झाली. कायद्याच्या कलमाच्या अर्थाच्या दृष्टीनें श्री. सिध्वा यांच्या मुद्द्यांत तथ्य होतें असेंच कोणीही म्हणेल.

## कायदेमंडळांच्या सभासदांबाबत तरतुदी

सभासदांची शपथ

६७.—प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ली किंवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिलच्या प्रत्येक सभासदानें आपली जागा घेण्यापूर्वी गव्हर्नरसमोर किंवा त्यानें नेमलेल्या इसमासमोर चौथ्या शेड्यूलमधील आपापल्या अनुरूप असलेल्या नमुन्याबरहुकूम शपथ घेऊन सही करावी.

(अ) गव्हर्नरांना राजेसाहेबांकडून आलेल्या 'आज्ञापत्रा'च्या पुरवणींत शपथेचे तीन नमुने दिले आहेत. त्यांपैकीं पहिल्या नमुन्याप्रमाणें गव्हर्नरनें चीफ जस्टिसपुढें राजनिष्ठेची शपथ घ्यावयाची असते. दुसऱ्या नमुन्याप्रमाणें गव्हर्नरनें प्रधानांना अधिकारपदाची शपथ घ्यावयास लावायची असते. आणि तिसऱ्या नमुन्याप्रमाणें मंत्र्यांनीं रहस्यभेद न करण्याबद्दलची शपथ घ्यावयाची असते. ६७ कलमाप्रमाणें मंत्र्यांना प्रथम गव्हर्नरसमोर सभासदत्वाची शपथ घेऊन नंतरच अधिकारपदाची स्वतंत्र शपथ घेणेची असते हें उघड आहे. तेव्हां मुंबई प्रांतांतील तात्पुरत्या मंत्रिमंडळांतील तिघा मंत्र्यांना ( चौथे मंत्री हुसेनअली रहिमतुल्ला हे कोणत्याच कायदे-मंडळाचे सभासद नव्हते ) व कॉंग्रेस मंत्रिमंडळांतील साती मंत्र्यांना त्यांनीं सभासदत्वाची शपथ गव्हर्नरसमोर आधींच घेतली असल्यामुळें कायदेमंडळाच्या अधिवेशनाच्या पहिल्या दिवशीं इतर सभासदांप्रमाणें शपथ घेणें जरूर नव्हतें. शिवाय ज्याच्यासमोर शपथ घ्यावी असें गव्हर्नर ठरवील त्यानें आगाऊ गव्हर्नरसमोर शपथ घेतलेली असली पाहिजे. मुंबई असेंब्लींत रावबहादुर चितळे यांची या कामीं गव्हर्नरनें नेमणूक केली होती; व कौन्सिलांत प्रो० दावर यांची नेमणूक केली होती. ६५ (३) कलमाप्रमाणें नेमावयाचा इसम व ६७ कलमाप्रमाणें नेमावयाचा

इसम हे दोघेही एकच असूं शकतील किंवा निरनिराळे असूं शकतील. कारण दोन्ही कामें भिन्न आहेत. सोयीच्या दृष्टीनें एकानेंच दोन्ही कामें करणें हें ठीक आहे. यासंबंधींचा मुंबई गव्हर्नराचा हुकूम पुढीलप्रमाणें होताः—

गणेशखिंड, १४ जुलै १९३७

"१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ६७ व्या कलमान्वयें दिलेल्या अधिकारांत मुंबईच्या गव्हर्नरानें मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलकरितां प्रो० दावर आणि निवडून आलेला प्रेसिडेंट यांची व मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीकरितां रा. ब. चितळे आणि निवडून आलेला स्पीकर यांची नेमणूक केली असून त्यांच्या पुढें सभासदांनीं सभागृहाचे सभासद म्हणून बसण्यापूर्वी शपथ घ्यावयाची अगर प्रतिज्ञा करावयाची आहे.

मुंबई गव्हर्नराच्या आज्ञेवरून,
सी. डब्ल्यु. ए. टर्नर,
सरकारचा चीफ सेक्रेटरी".

चौथ्या शेड्यूलमध्यें शपथेचे पांच प्रकार दिले आहेत. त्यांपैकीं पहिले तीन कायदेमंडळाच्या सभासदांकरितां आहेत; व शेवटचे २ न्यायाधीशांनीं घ्यावयाच्या शपथेसंबंधीं आहेत. कायदेमंडळाच्या ३ प्रकारांपैकीं पहिला प्रकार ब्रिटिश प्रजाजनांकरितां असून दुसरा प्रकार हिंदी संस्थानिकांकरितां आहे व तिसरा संस्थानी प्रजाजनांकरितां आहे. फेडरेशन अस्तित्वांत आल्यावर दुसऱ्या व तिसऱ्या प्रकाराचा उपयोग होणार आहे. तूर्त फक्त पहिल्या प्रकाराप्रमाणेंच सर्व प्रांतिक कायदेमंडळांतून शपथविधि झाल्याचें दिसून येतें. हा शपथेचा पहिला प्रकार पुढें दिला आहेः-

१

ब्रिटिश प्रजाजन असणाऱ्या, कायदेमंडळाच्या सभासदानें घ्यावयाच्या शपथेचा अगर करावयाच्या प्रतिज्ञेचा नमुनाः—

"अमुक कौन्सिलचा (असेंब्लीचा) मला सभासद निवडण्यांत (अथवा नेमण्यांत) आल्यामुळें मी गंभीरपणें शपथ घेतों (किंवा प्रतिज्ञा करितों) कीं, कौन्सिलचा (असेंब्लीचा) सभासद या नात्यानें मी हिंदुस्थानचे

बादशहा व त्यांचे वारस यांच्यांशीं राजनिष्ठ राहीन व माझ्यावर येणारीं कर्तव्यें मी नेकीनें पार पाडीन."

याला अपवाद फक्त निजामसाहेबांच्या वऱ्हाडी प्रजेच्या प्रतिनिधीं-चा. ४७ (१) (ख) कलमांत सांगितल्याप्रमाणें वऱ्हाडी प्रजेच्या प्रतिनिधींनीं निजामसाहेबांशीं राजनिष्ठ राहून शिवाय इंग्लंडचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा यांच्याशीं राजनिष्ठ राहण्याबद्दलची शपथ घ्यावयाची आहे. चौथ्या शेडयूलमध्यें शपथांचे निरनिराळे जे नमुने दिले आहेत, त्यांतील हिंदी संस्थानिकांनीं किंवा त्यांच्या प्रजाजनांनीं घ्यावयाच्या शपथेच्या प्रकारांत हिंदी संस्थानिकांच्या संमतीशिवाय पार्लमेंटला बदल करितां येणार नाहीं ( दुसरें शेडयूल पहा ).

*( आ ) वरील कायद्याच्या कलमांत जरी 'शपथ घेणें' एवढेच शब्द आहेत तरी ४ थ्या शेडयूलमधील नमुन्यांत* 'घ्यावयाच्या शपथेचा' *अथवा 'करावयाच्या प्रतिज्ञेचा' ( ॲफरमेशन )* चा नमुना, अशी वैकल्पिक *शब्दयोजना वापरलेली* आहे; आणि 'शपथेंत' प्रतिज्ञेचा अंतर्भाव होतो हें ३११ (७) या कलमांत स्पष्टपणें सांगितलें आहे. ज्यांना सदसद्विवेक-बुद्धीला स्मरून शपथ घेऊं नये असें वाटतें त्यांच्याकरितां ही दुसरी योजना सुचविण्यांत आली आहे. या दुरुस्तीच्या मुळाशीं बराच झगडा झालेला आहे हें पुढील हकीकतीवरून लक्षांत येईल. हिंदुस्थानच्या हिता-विषयीं बरीच कळकळ बाळगणारे म्हणून चार्लस ब्रॅडलॉ (१८३३–९१) यांची बरीच ख्याति होती. ते एक स्वतंत्र विचारवादी मुत्सद्दी होते. १८७४ ते १८८५ पर्यंत त्यांचा बेझंटबाईबरोबर समान कार्याच्या दृष्टीनें अत्यंत निकट संबंध होता. १८८० सालीं ते पार्लमेंटचे सभासद निवडून आले; परंतु त्यांनीं शपथ घेण्याचें नाकारल्यामुळें त्यांना पार्लमेंटांत ६ वर्षें-पर्यंत बसूं देण्यांत आलें नाहीं; शेवटीं 'शपथे'ऐवजीं दुसरा 'प्रतिज्ञे'चा प्रकार सुचविण्यांत आल्यानंतर त्याप्रमाणें 'प्रतिज्ञा' करून त्यांनीं पार्लमेंटां-तील आपली जागा विराजमान केली.

( इ ) आतां या 'शपथे' बाबत एका महत्त्वाच्या तात्त्विक प्रश्नाचा विचार करणें जरूर आहे. ज्यांचें 'संपूर्ण स्वातंत्र्य' व 'ब्रिटिश संबंध तोडून टाकणें' हें ध्येय आहे अशा सज्जनांनीं निवडून आल्यावर कायदेमंडळांत

बसण्यापूर्वी ब्रिटिश राजाविषयीं राजनिष्ठेची शपथ अथवा प्रतिज्ञा सदसद्विवेकबुद्धीला स्मरून कशी घ्यावयाची अथवा करावयाची ? शपथ घ्यावी तर मनाला असत्यपणाचा धक्का बसतो. न घ्यावी तर कायदेमंडळांतून लोकसेवा अगर राष्ट्रकार्य करण्यास मुकावें लागतें. अशा स्थितींत 'इकडे आड, तिकडे विहीर' असें झाल्यास नवल नाहीं. उत्पन्न होणाऱ्या या परिस्थितीला उद्देशून सार्वत्रिक निवडणूक झाल्याबरोबर फेब्रुवारी १९३७ मध्यें काँग्रेस वर्किंग कमिटीनें 'शपथे' बाबत पुढीलप्रमाणें ठराव केला:—

"राजनिष्ठेची शपथ घेण्याच्या युक्तायुक्ततेबद्दल संशय उपस्थित केले गेले असल्यामुळें वर्किंग कमिटी असें जाहीर करूं इच्छिते कीं, कायदेमंडळांतील काम करण्यास पात्र करून घेण्याकरितां शपथ घ्यावी लागल्यास त्यामुळें आपली स्वातंत्र्याची मागणी रेसभरही कमी होत नाहीं........काँग्रेसवाले, तसेंच सर्व हिंदी लोक यांनीं प्रथम आपल्या देशाशीं एकनिष्ठ राहिलें पाहिजे आणि कायदेमंडळांतील राजनिष्ठेची शपथ मूळच्या देशनिष्ठेला यत्किंचितही बाध आणूं शकत नाहीं." वर्किंग कमिटी वरील ठराव करूनच थांबली नाहीं, तर तिनें मार्च १९३७ मध्यें दिल्ली येथें काँग्रेसतर्फे निवडून आलेल्या कायदेमंडळांतील सर्व सभासदांची एक परिषद (कनवेन्शन) भरविली व त्या प्रसंगीं सर्व सभासदांकडून देशाच्या स्वातंत्र्याकरितां लढण्याबद्दल व देशाशीं एकनिष्ठ राहण्याबद्दल शपथ घेवविली. हा शपथविधि काँग्रेसच्या अध्यक्षाचे नेतृत्वाखालीं मोठ्या गंभीर वातावरणांत पार पडला. अशा तऱ्हेनें सभासदांची निष्ठा अगोदर देशानें अन्तःकरणपूर्वक काबीज केल्यानंतर कायदेमंडळांतील शपथेला केवळ बाह्य देखाव्याचें व व्यावहारिक स्वरूप येऊन तो एक फार्स मानला जावा हें अगदीं उघड आहे. अर्जुन सुभद्रेला घेऊन आल्यावर द्रौपदीनें 'सुबद्धस्यापि भारस्य पूर्वबंधः श्लथायते' असे सार्थ उद्गार काढल्याचें व्यासांनीं महाभारतांत वर्णन केलें आहे. गवताच्या भाऱ्याला एक दोरी चांगली घट्ट आवळलेली असावी, आणि तिलाच पुन: दुसरी दोरी आवळून बांधली तर पहिली दोरी थोडी तरी सैल होतेच, असा द्रौपदीच्या वरील मार्मिक टोमण्याचा भावार्थ आहे. त्याप्रमाणें दुसऱ्या शपथेनें पहिल्या शपथेस थोडा का होईना बाध येणार हें स्पष्ट आहे; तथापि हेंही तितकेंच खरें आहे कीं, पहिल्या शपथ-

**परिग्रहाची** सर दुसऱ्या शपथ**परिग्रहाला** येत नाहीं हें या संसाराचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्याच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं.

बाबू शिवप्रसाद गुप्त यांच्या पत्राला उत्तर देण्याच्या निमित्तानें महात्मा गांधी यांनीं 'हरिजन'मध्यें या प्रश्नाचा बराच ऊहापोह केला असून आपली भूमिका पुढीलप्रमाणें विशद केली आहे. "धार्मिक आणि बिनधार्मिक असे शपथेचे प्रकार कल्पिले पाहिजेत. पार्लमेंटच्या सभासदांनीं घेतलेल्या शपथेला 'घटनाविषयक' म्हणतां येईल, 'धार्मिक' कदापि म्हणतां येणार नाहीं. कायदेमंडळाचा सभासद जी शपथ घेतो तिचा अर्थ घटनेच्या दृष्टीनेंच घ्यावयास हवा. शपथेचा अर्थ घटनेंत तरी दिलेला असेल किंवा तिचा अर्थ वहिवाटीनें पडत जाऊन वाढीला लागलेला असेल. ब्रिटिश घटनाशास्त्राप्रमाणें राजनिष्ठेच्या शपथेचा अर्थ माझ्या मतें एवढाच कीं, कायदेमंडळाचा सभासद आपलें धोरण पुढें रेटतांना घटनेच्या मर्यादेंत राहून आपलें काम करील. माझें असें स्पष्ट मत आहे कीं, शपथेशीं कोणत्याही रीतीनें विसंगत न बनतां कायदेमंडळांत संपूर्ण स्वातंत्र्याकरितां उपाययोजना करितां येतील. हीच तर ब्रिटिश घटनेची खुबी अथवा मख्खी होय. दक्षिण आफ्रिकेंतील यूनियन पार्लमेंटचे सभासद हिंदुस्थानांतल्या शपथेसारखीच शपथ घेऊनसुद्धां आज मित्तीला आपलें संपूर्ण स्वातंत्र्य पुकारण्यास पूर्णपणें मोकळे आहेत. म्हणूनच मी माझी आश्वासनमागणी ब्रिटिश सरकारपुढें मांडण्याचें धारिष्ट केलें. संपूर्ण स्वातंत्र्याची आपण जी चळवळ करीत आहोंत ती ब्रिटिश सरकारनें बेकायदा ठरविलेली नाहीं. तसें असतें तर ब्रिटिश सरकारनें मुळांतच स्वातंत्र्यवादी कॉंग्रेसवाल्यांना निवडणुकींना उभेच कां राहूं दिलें असतें ? आणि त्यानंतर कॉंग्रेस पक्षाच्या पुढाऱ्यांना गव्हर्नरांनीं मंत्रिपदें स्वीकारण्याबद्दल निमंत्रण कां दिलें असतें ? तेव्हां या प्रश्नाकडे व्याकरणशास्त्र, अगर भाषाशास्त्र या दृष्टीनें पाहतां कामा नये. कायद्याच्या भाषेनें व परंपरागत रूढीनें या प्रश्नाकडे पहावयास आपण शिकलें पाहिजे. म्हणून या सर्व प्रकरणांत मला विसंगतता अगर सत्याला आघात कोठेंच दिसत नाहीं. आणि म्हणूनच, संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय व १९३५ चा कायदा मोड-

ण्याची प्रतिज्ञा यांच्याशीं कोणतीही विसंगति उत्पन्न न होतां कायद्याप्रमाणें काँग्रेस सभासदांनीं शपथ घेण्यास कोणतीच हरकत नाहीं."

मद्रास प्रांतांतील विल्लुपुरम् जिल्हा बोर्डानें १९२५, १९३० व १९३३ सालीं दुरुस्त्या झालेला 'मद्रास राजनिष्ठेच्या शपथेचा कायदा' आयर्लंडचें उदाहरण गिरवून, रद्द करण्याबाबत मद्रास सरकारला विनंति केली आहे. यावरून वारे कोणत्या दिशेनें वाहत आहेत तें स्पष्टपणें दिसून येतें.

जागा रिकाम्या होणें

६८.—(१) प्रांतिक कायदेमंडळाच्या दोन्ही प्रतिनिधिसभाचा सभासद कोणालाही राहतां येणार नाहीं, आणि एखादा इसम दोन्ही सभांत निवडून आला तर कोणत्या तरी एका सभेचें सभासदत्व सोडून देण्याबाबतची तरतूद आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें गव्हर्नरनें केलेल्या नियमान्वयें करण्यांत येईल.

(२) फीडरल कायदेमंडळ आणि प्रांतिक कायदेमंडळ या दोहोंचा सभासद कोणालाही राहतां येणार नाहीं आणि एखादा इसम फीडरल आणि प्रांतिक अशा दोन्ही कायदेमंडळांत सभासद म्हणून निवडून आला तर आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें प्रांताच्या गव्हर्नरनें केलेल्या नियमांत निर्दिष्ट केलेली मुदत संपतांक्षणीं सदर इसमानें आगाऊ फीडरल कायदेमंडळांतील आपल्या जागेचा राजीनामा दिलेला नसल्यास त्याची प्रांतिक कायदेमंडळांतील जागा रिकामी होईल.

(३) जर कायदेमंडळाचा एखादा सभासद—

(क) या कलमाच्या लगेच पुढें असलेल्या कलमाच्या (१) पोटकलमांत सांगितलेल्या कोणत्याही नालायकीच्या प्रकारांत सांपडेल; किंवा

(ख) आपल्या स्वदस्तुरच्या सहीनें गव्हर्नरला पत्र लिहून आपल्या जागेचा राजीनामा देईल,

तर त्याची जागा त्यानंतर रिकामी होईल.

(४) प्रतिनिधिसभेचा एखादा सभासद जर सभेच्या परवानगीशिवाय सभेच्या सर्व बैठकांना साठ दिवसपर्यंत गैरहजर राहिला तर त्याची जागा रिकामी झाली असें ती सभा जाहीर करील. मात्र सदर साठ दिवसांची मुदत मोजतांना जेवढ्या कालखंडांत सभेचें अधिवेशन समाप्त झालेलें असेल किंवा ओळीनें चार दिवसांपेक्षां अधिक दिवसांकरितां तहकूब केलेलें असेल तेवढ्या कालखंडाचा हिशेब केला जाणार नाहीं.

(अ) कोणाही सभासदानें एकाच वेळीं दोन कायदेमंडळांचा सभासद असूं नये ही गोष्ट योग्य अशीच आहे. परंतु एखादा इसम दोन्ही सभागृहांत निवडून आला तर त्यानें कोणती जागा सोडावयाची याचे नियम तयार करण्याचें काम गव्हर्नरच्या 'वैयक्तिक मता' वर सोपविलें आहे. हे नियम मुंबई प्रांतांत १८ सप्टेंबर १९३६ रोजीं गव्हर्नर इन कौन्सिलच्या हुकमानें "मुंबई (समकालीन सभासदत्वास बंदी) नियम, १९३६" या नांवानें प्रसिद्ध केले आहेत (मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिल व मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्ली मॅन्युअल भाग २ रा, पृ. ६७-६८); त्यांतील मुख्य नियम पुढें दिले आहेत:—

१ कौन्सिल व असेंब्ली या दोहोंत जर कोणी निवडून आला तर त्यानें गॅझेटमध्यें नांव प्रसिद्ध झाल्यापासून दहा दिवसांच्या आंत आपण कोणत्या सभेचा सभासद राहूं इच्छितों तें कळविलें पाहिजे. हें त्याचें कळविणें निर्णायक मानलें जाईल. वरीलप्रमाणें जर कळविलें नाहीं तर त्याची असेंब्लींतील जागा रिकामी होईल.

२ जर एखादा इसम आधीं लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा सभासद असून कौन्सिलांत निवडून आला तर त्याचें असेंब्लीचें सभासदत्व नष्ट होईल.

३ तसेंच जर एखादा इसम आधीं कौन्सिलचा सभासद असून असेंब्लींत निवडून आला तर त्याचें कौन्सिलांतलें सभासदत्व नष्ट होईल.

४ प्रांतिक कायदेमंडळांतला एखादा सभासद जर फीडरल कायदेमंडळांत निवडून आला तर ज्या मुदतींत त्यानें आपलें कोठलें सभासदत्व ठेवावयाचें तें कळवावयाचें असतें ती मुदत गॅझेटमध्यें निवडणुकीचा निकाल जाहीर झाल्यापासून १० दिवसांची राहील.

(आ) ६९ (१) कलमांत सांगितलेल्या नालायकीच्या बाबी एखाद्या इसमाच्या बाबतींत लागू असल्या तर त्याला मुळीं निवडणुकीलाच उभे राहतां येणार नाहीं किंवा निवडून आलाच तर त्याला सभासद म्हणून असेंब्लींत अगर कौन्सिलांत बसतां येणार नाहीं. परंतु ६८ (३) (क) कलमानें असेंब्लींत किंवा कौन्सिलांत काम करणाऱ्या सभासदाच्या बाबतींत कालांतरानें जर ६९ (१) कलमांत सांगितलेली नालायकी उत्पन्न

झाली तरीही त्याचें सभासदत्व रद्द होईल हें अगदीं उघड आहे. यासंबंधांत पूर्वखानदेशचे बॅ. विठ्ठल नथू पाटील यांचें उदाहरण लक्षांत घेण्यासारखें आहे. ते सरकारी वकील आहेत; ३०७ कलमान्वयें, ते पूर्णपणें सरकारी नोकर नसल्यामुळें प्रांतिक असेंब्लीच्या निवडणुकीस उभे राहूं शकले व निवडूनही आले. परंतु काँग्रेस सरकारच्या राजवटींत पहिलाच कायदा झाला त्यांत 'सरकारी वकिलांचा' कायदेमंडळाच्या सभासदत्वाबाबतचा नालायकीचा शिक्का काढून घेण्यांत आला नाहीं, त्यामुळें कलम ६८ (३) प्रमाणें त्यांची जागा रिकामी झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. सरकारचें सदर कृत्य हें बेकायदेशीर असल्याबद्दल बॅ. पाटील कोर्टांत तक्रार करणार असल्याबद्दल जाहीर झालें होतें. परंतु कायदेशीर सल्ला मिळाल्यामुळें व कांहीं इतर कारणांमुळें सदर तक्रार कोर्टापुढें आलेली नाहीं. ही झाली बाह्य परिस्थितीची सक्ती; परंतु स्वखुषीनें कोणालाही आपल्या सभासदत्वाचा राजीनामा देतां येईल, मात्र तो स्वतःच्या सहीनें गव्हर्नरकडे पाठविला पाहिजे. स्वतःची सही याच्यापेक्षां खुषीचें दुसरें चांगलें गमक तें काय असणार ! आणि गव्हर्नरकडे पाठवावयाचें कारण कीं तो ६० (१) कलमान्वयें कायदेमंडळाचा कायमचा घटक असून शिवाय तो प्रांतिक सरकारचा म्होरक्या आहे, हें होय.

(इ) कायदेमंडळाच्या सभासदांना रजा देण्याची पद्धत ही पार्लमेंट सभेंतल्या रिवाजावरून उचललेली आहे (पहा आर्स्किन मेकृत पार्लमेंटरी प्रॅक्टिस, पृ. १११). दिवस मोजण्याच्या बाबतींत (४) थ्या पोटकलमांत जी सवलत ठेवलेली आहे तीही रास्त अशीच आहे. त्याच पोटकलमांतील 'चार दिवसांपेक्षां अधिक दिवसांची तहकुबी' या शब्दयोजनेवरून कलम ६६ (३) यावरील टिप्पण्यांत तहकुबीच्या अधिकारासंबंधीं बांधलेल्या अंदाजाला दुजोरा मिळतो.

(ई) इंग्लंडांत रिकामी जागा भरण्याबाबत हुकूम काढण्याचा अधिकार सरकारकडे नसून हौस ऑफ कॉमन्सकडे आहे, हा तेथील व येथील परिस्थितींतील फरक लक्षांत घेण्यासारखा आहे.

(उ) संयुक्त प्रांतांतील स्त्री-सभासद महाराणी जगदंबादेवी निवडून आल्यापासून असेंब्लीला कधींच हजर न राहिल्यामुळें न्यायमंत्री

डॉ. कटजू यांनीं त्यांची जागा रिकामी झाल्याचें जाहीर करणारा ठराव मांडला व तो एकमतानें मंजूर झाला. जातां जातां एक सभासद महंमद इशक खान उद्गारले, " हें स्त्री-दाक्षिण्याला धरून आहे काय ? "

सभासदत्वाबाबत अपात्रतेचीं कारणें

६९.—( १ ) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ली अगर लेजिस्लेटिव्ह कौन्सिल यांचा सभासद म्हणून निवडून येण्यास व सभासद असण्यास खालीलपैकीं कोणीही इसम नालायक मानला जाईल—

( क ) प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें ज्या सरकारी नोकरीबाबत त्या नोकराची नालायकी काढून टाकलेली आहे अशा नोकरीखेरीज इतर कोणत्याही सरकारी नोकरीच्या जागेवर जर तो इसम असेल;

( ख ) जर सदर इसमाचें डोकें ताळयावर नसेल व योग्य कोर्टानें तसे जाहीर केलेलें असेल;

( ग ) दिवाळखोर म्हणून जाहीर झाला असून जर त्याच्यावरील पुढील आर्थिक जबाबदारी नाहींशी झालेली नसेल;

( घ ) ह्या कायद्याच्या या खंडास सुरवात होण्यापूर्वी किंवा सुरवात झाल्यानंतर जर सदर इसमास निवडणुकीबाबतच्या गुन्ह्याबाबत अथवा लाचलुचपतीच्या अगर बेकायदा वर्तनाबाबत—जो गुन्हा अगर जें वर्तन ऑर्डर इन कौन्सिलनें किंवा प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें कायदेमंडळाच्या सभासदत्वाबाबत नालायकी निर्माण करणारें ठरविलेलें असेल—शिक्षा झालेली असेल किंवा निवडणूक बरोबर किंवा नीट झाली अगर नाहीं यासंबंधींच्या खटल्यांत जर सदर इसमावर गुन्हा शाबीत झाला असेल; मात्र त्या ऑर्डरीच्या किंवा कायद्याच्या कलमांतून याबाबत निर्दिष्ट केलेली मुदत टळली असल्यास वरील नालायकी नष्ट होईल.

( ङ ) ह्या कायद्याच्या या खंडास सुरवात होण्यापूर्वी किंवा सुरवात झाल्यानंतर जर सदर इसमास ब्रिटिश हिंदुस्थानांतील अगर फेडरेशनमध्यें सामील झालेल्या एखाद्या संस्थानांतील कोर्टानें दुसऱ्या कोणत्याही गुन्ह्याबाबत अपराधी ठरवून काळयापाण्याची अथवा दोन वर्षांहून कमी नाहीं इतकी शिक्षा दिली असेल; मात्र सदर इसमाची तुरुंगांतून मुक्तता होऊन पांच वर्षें अगर गव्हर्नर एखाद्या विशिष्ट इसमाच्या बाबतींत आपल्या मर्जीप्रमाणें जितकी कमी मुदत ठरवील तितकी टळली असल्यास वरील नालायकी नष्ट होईल.

( च ) फीडरल अथवा कोणत्याही प्रांतिक कायदेमंडळाकरितां उमेदवार म्हणून मान्यता मिळाली असतांना किंवा अशा उमेदवाराचा निवडणूकएजंट म्हणून काम केलें असतांना जर सदर इसम ह्या कायद्याखालीं काढलेल्या ऑर्डर इन कौन्सिलनें किंवा फीडरल अगर प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही कायद्यानें

निर्दिष्ट केलेल्या पद्धतीनें व मुदतींत निवडणुकीच्या खर्चाचें पत्रक सादर करण्यास चुकेल तर; मात्र वरील पत्रक ज्या तारखेस सादर करावयास पाहिजे होतें त्या तारखेपासून पांच वर्षांची मुदत टळली असल्यास किंवा गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें सदर नालायकी काढून टाकली असल्यास वरील नालायकी नष्ट होईल.

ह्या पोटकलमाच्या (च) सदरांतील नालायकी, निवडणुकीच्या खर्चाचें पत्रक ज्या तारखेस सादर करावयास पाहिजे होतें त्या तारखेपासून एक महिना किंवा गव्हर्नर एखाद्या विशिष्ट माणसाच्या बाबतींत आपल्या मर्जीप्रमाणें जी अधिक मुदत देईल ती संपेपर्यंत अमलांत येणार नाहीं.

(२) काळ्यापाण्याची अगर फौजदारी गुन्ह्याबाबत कोणतीही शिक्षा भोगीत असलेला इसम प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही सभेचा सभासद म्हणून निवडून येण्यास पात्र ठरणार नाहीं.

(३) ह्या कलमाच्या (१) ल्या पोटकलमाच्या (घ) अथवा (ङ) सदरान्वयें गुन्हाशाबितीमुळें अथवा गुन्हा शाबीत होऊन शिक्षा झाल्यामुळें नालायक ठरणारा इसम नालायकी ठरण्याच्या तारखेला कोणत्याही प्रतिनिधिसभेचा सभासद असल्यास त्याची जागा, या अगर लगतच्या मागील कलमांत कांहीही सांगितलें असलें तरी, नालायकी ठरल्या तारखेपासून तीन महिने होऊन जाईपर्यंत किंवा जर त्या तीन महिन्यांच्या मुदतींत गुन्हाशाबिती अथवा शिक्षा यासंबंधांत अपील किंवा फेरतपासणीकरितां अर्ज केला असेल तर त्या अपिलाचा किंवा अर्जाचा निकाल लागेपर्यंत, सदर नालायकीच्या कारणास्तव रिकामी होणार नाहीं; परंतु या पोटकलमान्वयें त्याचें सभासदत्व कायम राखलेल्या मुदतींत त्यानें कायदेमंडळांत बसतां अगर मत देतां कामा नये.

(४) एखादा इसम फेडरेशनमध्यें अगर प्रांतामध्यें मंत्री आहे याच केवळ कारणास्तव त्याला या कलमाच्या दृष्टीनें सरकारी नोकर म्हणून मानलें जाणार नाहीं.

(अ) या कलमांतील पहिल्या पोटकलमाच्या (क) भागांतील 'सरकारी नोकरी' (ऑफिस ऑफ प्रॉफिट) यासंबंधीं जास्त विवरण करणें जरूर आहे. ब्लॅकस्टोननें 'ऑफिस' याचा अर्थ 'सरकारी किंवा खाजगी नोकरी करण्याचा व त्यापासून मिळणारी फी किंवा पगार घेण्याचा हक्क' असा केला आहे (टीका). 'ऑफिस ऑफ प्रॉफिट' यांतील 'प्रॉफिट (नफा)' या शब्दानें व्यापारधंद्यांत मिळणारा फायदा या ठिकाणीं विवक्षित नाहीं. चवथ्या पोटकलमान्वयें 'मंत्र्यांना' या 'सरकारी नोकरी'च्या अपात्रतेंतून मोकळें केलें आहे हें रास्तच आहे. १७०१ च्या ॲक्ट ऑफ सेटलमेंटनें कोणा पार्लमेंटच्या सभासदानें मंत्रि-

पदाचा स्वीकार केला कीं त्याला आपल्या सभासदत्वास मुकावें लागे, परंतु कालान्तरानें लोकप्रतिनिधींतलिच लोक मंत्री होण्याची रूढि पडल्यामुळें सभासदत्व नष्ट होणें ही गोष्ट रद्द झाली आहे. असें जर झालें नसतें तर पार्लमेंटाच्या बाहेरील लोकांचें प्रधानमंडळ बनवावें लागलें असतें व मंत्रिमंडळ हें पार्लमेंटास जबाबदार असलें पाहिजे या लोकशाहीच्या मुख्य तत्त्वाचा विकास होणें अत्यंत दुर्घट झालें असतें. 'मिनिस्टर' या शब्दाला आज जी किंमत आली आहे त्याचें कारण त्या जागीं लोकांनीं निवडलेले व लोकांच्या विश्वासास पात्र असलेले लोक नेमले जातात, म्हणूनच होय; एरवीं त्या शब्दाचा मुळांतला अर्थ 'सर्वंट (नोकर)' असाच आहे. 'प्राइम मिनिस्टर' म्हणजे 'फर्स्ट सर्वंट' (पहिला नोकर) हा अर्थ अगदीं बरोबर आहे. परंतु नवीन अर्थानें 'मिनिस्टर'ला सरकारी नोकर म्हटलें जात नाहीं किंवा त्याला सिव्हिल सर्विसचे नियमही लागू करण्यांत येत नाहींत. तथापि राज्यकारभाराचा चोखपणा कायम रहावा म्हणून नोकरांच्या बाबत जे कांहीं योग्य नियम आहेत ते प्रधानांच्या बाबत लागू केले गेले पाहिजेत. मग तें नियमानें घडून येवो अथवा वहिवाटीनें घडून येवो. उ० व्यापार, उद्योगधंदे इ० कंपन्यांचे डायरेक्टर त्यांनीं असतां कामा नये; नाहीं तर त्यांच्या अधिकाराच्या जागेचा फायदा सदर कंपन्यांकडून कळत न कळत घेतला जाण्याचा जबरदस्त संभव असतो. या दृष्टीनें संयुक्तप्रांत असेंब्लींतील पुढील प्रश्नोत्तरें विचार करण्यासारखीं आहेत: —

**मु० हु० किडवाई:**—प्रधानमंत्री (पंडित पंत) व जमीन महसूलमंत्री (रफी अहमद किडवाई) हे अजून 'हिंदुस्थान न्यूजपेपर्स लिमिटेड' या कंपनीचे डायरेक्टर आहेत काय ?

**तिवारी** (प्रधानमंत्र्याचे पार्लमेंटरी सेक्रेटरी):— प्रधानपदें स्वीकारल्यापासून ते डायरेक्टरबोर्डाच्या एकाही सभेला हजर राहिलेले नाहींत. प्रधानमंत्र्यांनीं राजीनामा दिला आहे.

**मु० हु० किडवाई:**—प्रधानमंत्र्यांनीं केव्हां राजीनामा दिला आहे ?

**पंडित पंत** (स्वतःच):—आपण आपला प्रश्न पाठविल्यानंतर.

(आ) संयुक्तप्रांतांत तेथील सरकारनें श्रीकृष्ण दत्त पालीवाल

(मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद) यांना रूरल डेव्हेलपमेंट कमिशनर (ग्रामसुधारणा अधिकारी) म्हणून मोठ्या जबाबदारीच्या जागेवर नेमलें. कांहींचें म्हणणें असें कीं, या जागेच्या स्वीकारामुळें त्यांचें असेंब्लीचें सभासदत्व नष्ट होतें. दुसऱ्या कांहींचें म्हणणें असें कीं, सदर जागा पगारी नसल्यामुळें ती 'ऑफिस ऑफ प्रॉफिट' होऊं शकत नाहीं: त्यामुळें त्यांची असेंब्लीची जागा नाहींशी होण्याचें कांहींच कारण नाहीं. बरीच वाटाघाट होऊन पालीवाल यांनीं कमिशनरच्या जागेचा राजीनामा दिला.

मुंबई प्रांतांत कुलाबा जिल्हा मुसलमान मतदारसंघातर्फे सार्वत्रिक निवडणुकींत निवडून आलेले फाजल रहिमतुल्ला यांची टॅरिफ बोर्डावर नेमणूक झाल्यामुळें त्यांचें मुंबई असेंब्लीचें सभासदत्व रद्द करण्यांत आलें. सरकारी वकिलांना, जरी ते सरकारचे संपूर्ण नोकर नसले तरी, असेंब्लींत निवडून येतां येत नाहीं. विलायतेंत सरकारी कंत्राटदारांना पार्लमेंटचे सभासद होतां येत नाहीं (अर्स्किन मेकून पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ. २९). परंतु पहिल्या पोटकलमाच्या (क) भागांत प्रांतिक कायदेमंडळांना एखाद्या सरकारी नोकराची नालायकी दूर करण्याचा कायदा करण्याचा अधिकार दिला आहे. त्याअन्वयें निरनिराळ्या प्रांतांत यासंबंधीं कायदे करण्यांत आले आहेत. मध्यप्रांताच्या कायद्यानें सरकारी वकिलांची नालायकी दूर केली आहे तर मुंबई कायदेमंडळानें तसें करण्याचें नाकारलें आहे. टेरिटोरियल फोर्समधील कमिशन धारण करणाऱ्या अधिकाऱ्यांवरील अपात्रतेचा शिक्का नाहींसा करण्याबाबत डॉ. महाजनी यांनीं मुंबई कौन्सिलांत आणलेली सूचना मुंबई कायदेमंडळानें मान्य केली. ब्रिटिश पार्लमेंटांत सुद्धां वरील अपात्रता मानण्यांत येत नाहीं (मेकून पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ.३७). पार्लमेंटरी सेक्रेटरींच्या नेमणुकीमुळें तर मुख्यत: प्रांतिक कायदेमंडळांनीं ताबडतोब कायदे केले. या सेक्रेटरींच्या बाबत सविस्तर विचार या कलमावरील शेवटच्या टिप्पणींत केलेला आहे.

(इ) पोटकलम (१) (ग) कलमाच्या आधारें बंगालचे मुख्य प्रधान ना. फजलूल हक यांची दिवाळखोरी शाबीत करण्याचा प्रयत्न कलकत्ता हायकोर्टांत झाला होता. परंतु हें प्रकरण हायकोर्टानें फजलूल हक यांच्या वतीनें निकाल देऊन काढून टाकलें.

पोटकलम ( १ ) ( घ ) मध्यें लाचलुचपतीचा प्रकार एखाद्या निवडून आलेल्या सभासदाचे बाबतींत सिद्ध झाल्यास त्याला योग्य ती शिक्षा करण्याबद्दल योजना केली आहे. याचें एक उदाहरण पुढील देतां येईल:—

पंजाब असेंब्लीचे एक सभासद शेठ रामनारायण वर्माणी यांना, वरील गुन्ह्यास्तव, नेमलेल्या ट्रिब्यूनलनें अपराधी ठरविलें. गव्हर्नरनें ट्रिब्युनलच्या शिफारशींना मान्यता देऊन शेठ रामनारायण यांना निवडणुकीत मत देण्याचा व उमेदवार म्हणून उभे राहण्याचा हक्क सहा वर्षेपर्यंत गाजवितां येणार नाहीं व त्यांचें नांव मतदारांच्या यादींतून काढून टाकलें जावें अशी शिक्षा फर्माविली आहे. दुसरें उदाहरण सरहद्द प्रांतांतील:— सरवारखान आणि झमानखान या दोघांना ६ वर्षेपर्यंत निवडणुकींना उभे राहतां येणार नाहीं असा ट्रिब्युनलनें निकाल दिला आहे.

( ई ) पोटकलम ( १ ) ( ङ ) मध्यें दोन वर्षांपेक्षां अधिक शिक्षा झालेल्यांना पांच वर्षेपर्यंत अपात्र ठरविलें आहे. ही पांच वर्षांची मुदत कमी करण्याचा अधिकार गव्हर्नरला दिला आहे ही गोष्ट खरी आहे. परंतु त्याचा उपयोग नेहमींच योग्य तऱ्हेनें केला जाईल ही खात्री नाहीं. वास्तविक सामान्य गुन्ह्याबाबत ज्यांना शिक्षा झालेली असते असे लोक या राजकीय निवडणुकांतून पडतात कशाला व त्यांना निवडून तरी कोण देतो ? तेव्हां या कलमांतील बंदीच्या हत्याराचा उपयोग राजकीय कारणास्तव गुन्हे केलेल्या राजबंदींच्या बाबतच केला जाणार हें सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ आहे. १९१९ च्या कायद्यांत सहा महिन्यांच्या वर शिक्षा झालेल्यांना गव्हर्नरच्या परवानगीशिवाय निवडणुकीला उभे राहतां येत नव्हतें. यामुळें गव्हर्नरकडे विनंति करावी न लागतां देशबंधु दास व पंडित मोतीलाल नेहरूंसारखे लोकाग्रणी कौन्सिलांत व असेंब्लींत निवडून येऊं शकले. पुढें हें सहा महिन्यांच्या शिक्षेचें कलम जाऊन प्रस्तुतच्या १९३५ च्या कायद्यानें त्या ठिकाणीं दोन वर्षांची मुदत घातली. परंतु दरम्यान झालेल्या कायदेभंगाच्या चळवळींत शिक्षांचेंही प्रमाण सरास ६ महिन्यांवरून दोन वर्षांपर्यंत गेलेलें आढळून येतें. त्यामुळें शिथिल झालेल्या बंधनाचा तादृश फायदा नाहीं. १९३४ सालच्या झालेल्या मध्यवर्ती असेंब्लीच्या निवडणुकीचे वेळीं सध्यां मध्यप्रांतांत स्थानिक स्वराज्याचे मंत्री असलेले पंडित

द्वारकाप्रसाद मिश्र यांच्यावरील बंदी जबलपूर म्युनिसिपालिटीच्या प्रकरणांतील आकसामुळें गव्हर्नर जनरलनें काढण्याचें नाकारलें होतें. परंतु १९३७ च्या सार्वत्रिक निवडणुकीचे वेळीं सरकारनें सरहद्दप्रांताखेरीज याबाबत लोकांना अप्रिय होणारें वर्तन करण्याचें. अनुभवानें शहाणे होऊन, टाळल्याचें दिसून येतें. अगदीं अलीकडचें उदाहरण म्हणजे पंजाब गव्हर्नरनें डॉ. सत्यपाल यांच्यावरील अपात्रता नाहींसें केल्याचें जाहीर केलें हें होय. वरील अपात्रतेबद्दल कायदा करण्याचे वेळीं पार्लमेंटांत वाद झाला. त्या वेळीं मि० चर्चिल यांनीं या कलमांना पुढीलप्रमाणें कसून विरोध केला होता: ते म्हणाले: "या बाबतींत दोन मोठीं तत्त्वें लक्षांत घेतलीं पाहिजेत. पहिलें असें कीं, अपराध करणाऱ्यानें शिक्षा भोगून टाकिली म्हणजे त्या गुन्ह्याची संपूर्ण निष्कृति झाली असें मानलेंच पाहिजे. शिक्षा भोगून ही मागून डाग राहिलाच तर मग त्या शिक्षा भोगण्याचा उपयोग तो काय? गुन्हा शाबीत होईपर्यंत ज्याप्रमाणें प्रत्येक आरोपीला निरपराधी मानिलें पाहिजे त्याचप्रमाणें कायद्याप्रमाणें झालेली शिक्षा भोगून झाल्यावर गुन्हेगार त्यांतून संपूर्णपणें बाहेर पडलाच पाहिजे. कैदेंतून सुटका झाल्यावरही त्याच्या पाठीमागें बंधनाचें टुमणें लावणें म्हणजे एक प्रकारें शिक्षेची मुदत, निराळ्या स्वरूपांत का होईना, वाढविण्यासारखेंच आहे. दुसरें तत्त्व म्हणजे मतदारांना आपला प्रतिनिधी निवडून पाठविण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य असणें हें होय." मि० आयझॅक फूट यांनीं मि० चर्चिल यांच्या वरील मुद्द्यांना दुजोरा दिला:— "आपला प्रतिनिधी निवडण्याचा हक्क मतदारांनीं अनिर्बंधपणें उपयोगांत आणला पाहिजे. जॉन विल्किस* यानें याबाबत जो झगडा केला त्यामुळेंच आपलें पार्ल-

* जॉन विल्किस (१७२७–१७९७) ब्रिटिश राजकारणी चळवळ्या पुरुष; 'नॉर्थ ब्रिटन' या आपल्या वर्तमानपत्रांतून बूट प्रधानमंडळांवर हल्ला चढविल्यामुळें १७६३ त अटक झाली; सुटका झाली; खासगी प्रसाराकरितां म्हणून लिहिलेल्या 'स्त्रियांबाबत निबंध' या बेअब्रूकारक चोपड्याबद्दल १७६४ त पार्लमेंटांतून हकालपट्टी झाली; अनेक वेळां पार्लमेंटांत निवडून आला परंतु अपात्र ठरवून हकालपट्टी केली; लंडनचा शेरीफ, १७७१; लॉर्ड मेयर, १७७४; त्याच वर्षी पार्लमेंटचा सभासद म्हणून पुनः निवडून आला आणि शेवटीं त्याला पार्लमेंटांत बसूं देण्यांत आलें; १७९० पर्यंत तो पार्लमेंटाचा सभासद होता.

मेंटरी स्वातंत्र्य बऱ्याच अंशानें विस्तृत झालें आहे. आपल्या न्याय्य स्वातंत्र्याच्या हक्काकरितां ज्या हिंदी लोकांना प्रचलित कायद्याच्या मर्यादा नाइलाजानें ओलांडाव्या लागल्या असे किती तरी लोक हिंदुस्थानांत आहेत. अशांना निवडून येण्याची मुभा ठेवल्यास त्यांना सनदशीर रीतीनें देशाची आर्थिक, सामाजिक इ० उन्नति करण्याच्या कामांत भाग घेतां येईल. तुरुंगांत जाणें हा कांहीं काळिमा नाहीं. तुरुंगांत गेलेल्यांना आपण जर बंदी केली असती तर जॉन बर्न्स, जॉन विल्किस, सर रॉबर्ट वालपोल (मुख्य प्रधान), सर जॉन इलियट, जॉन हॅम्पडन इ० च्या सेवेला पार्लमेंट मुकलें नसतें काय? फार लांब कशाला, ख्रिस्ती संत ॲपॉसल पॉल हाही तुरुंगांत गेला नव्हता काय?" या आक्षेपांना उत्तर देतांना सॉलिसिटर जनरल म्हणाले:-- "आपण ठरवीत आहोंत ती अपात्रता कांहीं नवीन नाहीं. १९०९ व १९१९ या दोन्ही कायद्यांतून ती पुष्कळच जाचक तऱ्हेची होती. या कायद्यांत तिचें स्वरूप पुष्कळसें सौम्य करण्यांत आलें आहे. कानडा, ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका इ० देशांच्या घटनांतून अशा प्रकारचीं कलमें आहेत. तसेंच गुन्ह्यागुन्ह्यांत फरक करणें हें मोठें कठीण आणि नाजुक काम आहे. आतां ही गोष्ट मी एकदम कबूल करितों कीं, हिंदुस्थानांत किती तरी चांगलीं माणसें तुरुंगांत जाऊन आलेलीं आहेत. परंतु हेंही नाकारतां येणार नाहीं कीं चांगल्याबरोबर किती तरी वाईट माणसेंही तुरुंगाचा आश्रय करितात. तेव्हां चांगल्या माणसांच्या बाबतींत निर्बंध दूर करण्याचा अधिकार मुद्दामच गव्हर्नरच्या हातीं राखून ठेविला आहे आणि योग्य बाबतींत त्याचा उपयोगही केला जाईल."

६१ (१) (च) कलमांतील तरतुदीप्रमाणें निवडणुकीच्या खर्चाचें पत्रक ठरलेल्या तारखेपूर्वी सादर न केल्याबद्दल पंजाब असेंब्लीच्या निवडणुकींत उभे राहिलेले व पराभूत झालेले ऐंशी उमेदवार व त्याशिवाय कांहीं उमेदवारांचे चौदा एजंट यांना चार वर्षेंपर्यंत मत देण्याला व उमेदवार म्हणून निवडणुकीला उभे राहण्याला नालायक ठरविण्यांत आल्याचें नुकतेंच जाहीर झालें आहे.

(इ) दुसऱ्या पोटकलमांत शिक्षा भोगणाऱ्या माणसाला सभासद

म्हणून निवडून येतां येणार नाहीं असें म्हटलें आहे. याचा अर्थ, गुन्हा शाबीत होऊन शिक्षा न होतांच ज्यांना पकडून तुरुंगांत दीर्घ कालपर्यंत डांबून ठेविलें आहे अशा डेटिन्यूंना निवडणुकीला उभे राहतां येतें व निवडूनही येतां येतें. निवडून आल्यावर त्यांना सरकारच्या दडपशाही धोरणामुळें कौन्सिलांतून बसतां येत नाहीं व कामकाजांत भाग घेतां येत नाहीं ही गोष्ट वेगळी. याचीं गेल्या १२।१४ वर्षांतील दोन ठळक उदाहरणें देतां येतील. सध्यांच्या बंगाल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष श्री. सत्येंद्रचंद्र मित्र हे बंगाल ऑर्डिनन्सअन्वयें १९२४ सालीं अटकेंत होते; तथापि ते मध्यवर्ती असेंब्लीचे सभासद होऊं शकले व असूं शकले. अगदीं अलीकडचें दुसरें उदाहरण म्हटलें म्हणजे सध्यांच्या बंगाल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतील विरोधी पक्षाचे पुढारी श्री. शरच्चंद्र बोस हे १९३४ सालीं स्टेट प्रिझनर ( बादशाही कैदी ) म्हणून अटकेंत असतां कलकत्ता शहरातर्फे मध्यवर्ती असेंब्लींत सभासद म्हणून निवडून आले, हें होय. आतां अटकेंत असल्यामुळें ६८ ( ४ ) या कलमान्वयें ६० दिवस गैरहजर असल्यास व असेंब्लीनें किंवा कौन्सिलानें परवानगी न दिल्यास त्या सभासदाकडे त्याचा कांहींच दोष येत नाहीं. दोष सर्वस्वीं अटकेंत ठेवणाऱ्याचा व ही विशिष्ट परिस्थिति न ओळखणाऱ्या असेंब्लीचा वा कौन्सिलचा होय. हें उघड आहे.

( ई ) आतां शेवटीं पार्लमेंटरी सेक्रेटरीबाबत विचार करूं. १९१९ च्या कायद्यानें प्रधानांना कौन्सिलाच्या कार्यांत मदत करण्याकरितां म्हणून निवडून आलेल्या सभासदांतून 'कौन्सिल सेक्रेटरी' नेमण्याची गव्हर्नरांना मुभा देण्यांत आली होती. परंतु त्याप्रमाणें कोठल्याही गव्हर्नरनें 'कौन्सिल सेक्रेटरीं'ची नेमणूक केली नाहीं. याच कारणास्तव बहुधा १९३५ च्या कायद्यांत त्याबाबत नामनिर्देशही करण्यांत आलेला दिसत नाहीं. नवीन प्रांतिक स्वराज्याच्या अमदानींत निरनिराळ्या प्रधानांनीं 'पार्लमेंटरी सेक्रेटरी'च्या जागा निर्माण केल्या आहेत. फक्त बंगाल, आसाम आणि मध्यप्रांत व वऱ्हाड या तीन प्रांतांत पार्लमेंटरी सेक्रेटरी नेमलेले दिसत नाहींत, परंतु या प्रांतांतून कामाच्या मानानें प्रधानांचीच संख्या पुष्कळ म्हणजे अनुक्रमें ११, ६, ७, अशी आहे. इतर प्रांतांतून प्रधानांच्या संख्येइतके,

दीडपट व क्वचित् दुप्पट इतके पार्लमेंटरी सेक्रेटरी नेमलेले दिसतात. मुंबई प्रांतांत सात प्रधान; तर सहा पार्लमेंटरी सेक्रेटरी. मद्रासेंत प्रत्येक प्रधानाला एक पार्लमेंटरी सेक्रेटरी आहे. संयुक्तप्रांतांत प्रधान सहा तर सेक्रेटरी तेरा. अशी विविध परिस्थिति दिसून येते. हे पार्लमेंटरी सेक्रेटरी नेमण्यांत हेतु काय असा प्रश्न साहजिकच निर्माण होतो. इंग्लंडांत सेक्रेटरी ऑफ स्टेट असतात; त्यांना पार्लमेंटरी अंडरसेक्रेटरी असतात व सेक्रेटरी ऑफ स्टेटशिवाय इतर प्रधान असतात; त्यांचे मदतनीस म्हणून पार्लमेंटरी सेक्रेटरी नेमलेले असतात. शिवाय प्रत्येक प्रधानाचे खासगी ( प्रायव्हेट ) सेक्रेटरी असतात ते निराळेच. नवीन होतकरू सभासदांना राज्यकारभार चालविण्याचें प्रत्यक्ष शिक्षण देण्याकडे याचा उपयोग व्हावा अशी मुळां-तील कल्पना आहे. जात्यावर बसलें म्हणजे ओवी सुचते त्याप्रमाणें जबाबदारी टाकली म्हणजे हळूहळू ती पेलण्याचें सामर्थ्य येत असतें. शिवाय दुसरा एक हेतु असूं शकेल; तो हा कीं, प्रधानमंडळांत पक्षाच्या सर्वच प्रमुख मंडळींना घेतां येणें कठीण जातें; कारण प्रधानमंडळाची संख्या तरी किती वाढवावयाची ? त्याला कांहीं तरी मर्यादा ही पाहिजेच. तेव्हां शिलकी राहिलेल्या. पक्षांतील धेंडांना कांहीं तरी स्थान देणें अवश्य ठरतें. हिंदुस्थानांतील प्रांतांत अद्याप सदर पार्लमेंटरी सेक्रेटरींची संस्था बाल्यावस्थेंत आहे. वेगवेगळ्या परिस्थितीप्रमाणें ती ठिकठिकाणीं निरनिराळीं रूपें धारण करीत आहे. पंजाबांत या सेक्रेटरींना कायदेमंडळाच्या कार्यांत प्रधानांना मदत करणें याशिवाय प्रत्यक्ष अम्मलबजावणीच्या खात्यांत काम ठेविलेलें नाहीं. मतदारसंघाला नेहमीं प्रधानमंडळाच्या कार्याचा परिचय करून देणें व प्रधान सांगतील त्या कामगिरीवर जाणें. एवढेंच काम त्यांनीं एरवीं करावयाचें आहे. प्रवासभत्ता व रोजचा भत्ता याबाबत त्यांना पहिल्या वर्गाच्या अधिकाऱ्याप्रमाणें वागवावें असें पंजाब सरकारनें ठरविलें आहे. परंतु एवढ्यानें त्यांचा दर्जा. त्यांनीं निश्चित कोणतें काम करावयाचें तें, सरकारतर्फेचें धोरण त्यांना जाहीर करितां येतें कीं नाहीं तें. तसेंच खात्यांच्या सेक्रेटरींनीं व इतर अधिकाऱ्यांनीं त्यांच्याशीं कसें वागावयाचें इत्यादि किती तरी गोष्टींचा उलगडा होणें अगत्याचें असून सुद्धां तो तसा होत नाहीं. नाहींपेक्षां 'त्रिशंकू'सारखी त्यांची लोंबती परिस्थिति

निर्माण झाल्यावांचून राहणार नाहीं. ही परिस्थिति निश्चित नसल्यामुळें खालचे सरकारी अधिकारी पार्लमेंटरी सेक्रेटरींच्याबरोबर कसें वर्तन करितात तें संयुक्तप्रांत असेंब्लींतील पुढील प्रश्नोत्तरांवरून चांगलें ध्यानांत येतें.

प्र०—जमीनमहसूल मंत्र्यांचे पार्लमेंटरी सेक्रेटरी श्रीयुत जैन हे गोरखपुरला गेले असतां जॉइंट मॅजिस्ट्रेट मि. डी. वॅली यांच्याशीं त्यांचा खटका उडाला काय ?

उ०—होय.

प्र०—काय खटका उडाला तो सरकार सांगूं शकेल काय ? प्रत्यक्ष काय घडलें तें सांगाल काय ?

उ०—डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें श्री. जैन यांचा योग्य तऱ्हेनें आदर-सत्कार केला नाहीं; जैन यांनीं आपल्या जिल्ह्यांत कां यावें याबद्दल डि. मॅजिस्ट्रेटनें रोष व्यक्त केला; जलप्रलयाबाबत उपाय योजण्याचे कामीं जैन यांच्याबरोबर डि. मॅजिस्ट्रेटनें योग्य तें सहकार्य केलें नाहीं.

प्र०—जैन यानीं वॅलीसाहेबाच्या वर्तनाबद्दल मुख्य प्रधानांकडे तक्रार केली आहे काय ? केली असल्यास मुख्य प्रधान त्याच्यावर काय इलाज करणार आहेत ?

उ०—होय, तक्रार आली आहे. कमिशनरकडून सदर वर्तनाबाबत रिपोर्ट मागितला आहे.

प्र०—वॅलीला लखनौला बोलावून मुख्य प्रधानानीं त्याची कान-उघाडणी केली ही गोष्ट खरी आहे काय ?

उ०—कमिशनरला अशी सूचना केली होती की वॅलीनें लखनौला येऊन चीफ सेक्रेटरीची भेट घ्यावी.

प्र०—वॅलीच्या तर्फेचें काय म्हणणें आहे हें सरकार सभागृहाला सांगूं शकेल काय ?

उ०—आपण अदबीनें वागलों नाहीं असा समज होण्यास आपण कारणीभूत झालों याबद्दल वॅलीनें दिलगिरी प्रदर्शित केली असून अपमान करण्याचा आपला हेतु नव्हता अशी त्यानें सरकारची खातरजमा केली आहे.

प्र०—वॅली व इतर कांहीं डेप्युटी कलेक्टर यांची बदली करण्याचें घाटत आहे ही गोष्ट खरी आहे काय ? कोणत्या कारणास्तव त्यांची बदली करण्यांत येत आहे ?

उ०—वॅलीची जॉइंट मॅजिस्ट्रेट म्हणून आग्र्याला बदली केली आहे व इतरांच्या बदल्या करण्याची वाटाघाट चालू आहे; परंतु त्यांचा या प्रकरणाशीं कांहीं संबंध नाहीं.

प्र०—पार्लमेंटरी सेक्रेटरींचा दर्जा काय आहे ?

उ०—पार्लमेंटरी सेक्रेटरी हे प्रधानांना, त्यांच्या कायदेमंडळ-विषयक व अम्मलबजावणीखात्यासंबंधींच्या कामांत, मदत करितात.

प्र०—पार्लमेंटरी सेक्रेटरींना कसें वागवावें, त्यांचा मानमरातब कसा करावा, यासंबंधीं सरकारनें जिल्हाधिकाऱ्यांना कांहीं हुकूम काढले आहेत काय ? काढले नसल्यास, सर्वसाधारण हुकूम काढण्याचा सरकारचा विचार आहे काय ?

उ०—अद्याप हुकूम काढले नाहींत. या गोष्टीचा विचार चालू आहे.

या पार्लमेंटरी सेक्रेटरींच्या कामाबद्दल संयुक्तप्रांतांतील मुख्य प्रधानांचे पार्लमेंटरी सेक्रेटरी श्री. वेंकटेश नारायण तिवारी यांनीं विचारणा केल्या-वरून प्रख्यात घटनाशास्त्रपंडित प्रो. कीथ यांनीं आपले विचार पुढील-प्रमाणें पत्रद्वारा कळविले आहेत:—

" ज्या त्या अम्मलबजावणीच्या खात्यांत या सेक्रेटरींना काम दिलेलें असतें; तसेंच आपापल्या प्रधानांच्या हाताखालीं त्यांनीं पार्ल-मेंटांत आपल्या खात्याची बाजू मांडावयाची असते. निरनिराळ्या स्टेटसेक्रेटरींच्या कचेऱ्यांतून या पार्लमेंटरी सेक्रेटरींना बरींच कामें दिलेलीं असतात; कित्येकदां तर अंडरसेक्रेटरींना कांहीं किरकोळ खातीं सर्वस्वी तोडून दिलेलीं असतात, म्हणजे त्यांचें म्हणणें किंवा त्यांनीं दिलेले हुकूम अखेरचे मानले जातात. अर्थात् तो आपली तारतम्यबुद्धि चालवितो आणि कांहीं कांहीं महत्त्वाच्या बाबतींत–उदा० ज्याबाबत प्रधानानें अद्याप धोरण ठरविलेलें नसतें अथवा ज्या बाबींची चर्चा कायदेमंडळांत होण्याचा संभव असतो अशा बाबतींत—तो प्रधानाला कळवितो आणि त्याचा निर्णय मागवून घेतो. असें असलें तरी किती तरी गोष्टींत तो स्वतःच निर्णय ठरवितो.

याखेरीज जीं खातीं साक्षात् त्याच्याकडे तोडून दिलेलीं नसतील अशाबद्दलचीही माहिती त्याला देण्यांत येते: म्हणजे प्रसंगच पडल्यास त्याबद्दल त्याला कायदेमंडळांत माहितीपूर्ण भाषणें करून आपल्या खात्याची बाजू चांगल्या तऱ्हेनें मांडतां येते. तात्पर्य, अंडरसेक्रेटरीनें आपल्या मुख्याचा किरकोळ कामाबाबतचा भार हलका करावा आणि बाकीच्या मुख्य विषयांबाबत निर्णय जरी मुख्यानें करावयाचे असले तरी आपली माहिती त्या अंडरसेक्रेटरीनें जय्यत ठेविली पाहिजे. म्हणूनअंडर सेक्रेटरी, त्याला अखेरचा निर्णय करावयाचा नसला तरी, मुख्य मुख्य कागदपत्र पाहिल्याशिवाय राहत नाहीं, आणि ठराविक बाबतींत तो, वर सांगितलेल्या धोरणाच्या वगैरे बाबी खेरिजकरून, स्वतःच निर्णय ठरवितो. अर्थात् या संबंधांत ठरीव साच्याचे नियम बांधून देणें अशक्य आहे. उदाहरणार्थ, कॉलनींचा अंडरसेक्रेटरी हा आर्थिक बाबींत तज्ज्ञ असला तर तें काम त्याच्यावर सोपविलें जाईल व त्याचा वरिष्ठ फक्त औपचारिक रीत्या शेवटचे निर्णय ठरवील. स्वायत्त वसाहतींचा अंडरसेक्रेटरी जर 'परदेशांत निवासाकरितां देश्य लोक पाठविणें' या विषयाचा हौशी असला तर तें सर्व काम तोच करील. अर्थात् स्टेटसेक्रेटरीला महत्त्वाच्या सर्व बाबी कळविल्याच पाहिजेत. आणि ज्या बाबींचा संबंध इतर खात्यांशीं असतो आणि म्हणून ज्यांच्या बाबत प्रधानमंडळानें एकत्र जमून निर्णय करणें अवश्य आहे अशा सर्व बाबी मुख्य स्टेटसेक्रेटरीच्या मार्फतच गेल्या पाहिजेत. परंतु एखादा अंडरसेक्रेटरी हुशार असला आणि खात्याच्या कायम सेक्रेटरीशीं त्याचा परिणामकारक संबंध असला तर तो स्टेटसेक्रेटरीला पुष्कळच प्रकारें साहाय्य करूं शकेल. जर अंडरसेक्रेटरी आणि खात्याचा कायम सेक्रेटरी यांचें एखाद्या विषयाबाबत एकमत झालें तर स्टेटसेक्रेटरीला तसदी देण्याचें कारणच पडणार नाहीं; किंवा पडलेंच तर अतिशय थोडा वेळ खर्चून स्टेटसेक्रेटरीला सदर काम उरकतां येईल.

कांहीं खात्यांच्या बाबत त्या खात्याची वसुली, जमाखर्च वगैरे काम अंडरसेक्रेटरीकडे दिलेलें असतें. परराष्ट्रीय कचेरींत राष्ट्रसंघाच्या कामाकरितां एका स्वतंत्र अंडरसेक्रेटरीची योजना केलेली आहे. परंतु सांगायची मुद्द्याची गोष्ट म्हटली म्हणजे प्रत्यक्ष राज्यकारभारांतील बरेंचसें

काम अंडरसेक्रेटरीला करावें लागतें. ट्रेझरी खात्याकडील पार्लमेंटरी सेक्रेटरीइतकें प्रत्यक्ष उलाढालीचें काम इतर फारच थोड्या लोकांना करावें लागत असेल.

यांतील सरळ तत्त्व एवढेंच कीं. त्या त्या खात्याची चांगली माहिती असल्याशिवाय अंडरसेक्रेटरीला आपल्या वरिष्ठाला पार्लमेंटांत परिणामकारक मदत करितां येणार नाहीं; आणि खात्यांतून प्रत्यक्ष दररोज काम केल्याशिवाय आणि किरकोळ गोष्टींत स्वतः निर्णय करण्याची सवय असल्याशिवाय, तसेंच शेरे लिहिण्याची व इतर प्रश्नांबाबत सूचना करण्याचीही सवय असल्याशिवाय पार्लमेंटांत तो आपली कामगिरी चांगल्या तऱ्हेनें बजावूं शकणार नाहीं. यांत असें होणारच कीं. कित्येक अंडर-सेक्रेटरी आळशी असणार; पण दुसरे कित्येक अतिशय मेहनती असून आपल्या कामांत गढून गेलेले असतात. हेच लोक पुढें स्टेटसेक्रेटरी किंवा प्रधान म्हणून पुढें सरकतात; मात्र त्यांच्याजवळ पार्लमेंटांत जरूर असलेलें वादविवाद इत्यादि बाबतींतील कौशल्य भरपूर असलें पाहिजे.

प्रधानांच्या पार्लमेंटरी **प्रायव्हेट** (खासगी) सेक्रेटरीची गोष्ट थोडीशी निराळी आहे. त्याला खात्यांतील राज्यकारभाराचें काम दिलेलें नसतें; तो फक्त प्रधानांना त्यांच्या पार्लमेंटरी कामांत मदत करतो. उदाहरणार्थ, सभागृहाबाहेरच्या राजकीय सभा इत्यादींबाबत प्रधानाचें काम करणें इ०. त्या जागेला पगार नसतो व ती जागा एक प्रकारें भूषण म्हणूनच मानली जाते. त्यामुळें एखाद्या हौशी होतकरू तरुणाला प्रधानमंडळांतील प्रत्येकाची ओळख व परिचय करून घेतां येतो; हें जरी खरें असलें तरी ही प्रायव्हेट सेक्रेटरीची जागा पार्लमेंटरी अंडरसेक्रेटरी किंवा पार्लमेंटरी सेक्रेटरीच्या जागेच्या मानानें पुष्कळच कमी महत्त्वाची जागा आहे. निदान तूर्त तरी हिंदुस्थानांतील कायदेमंडळांतून असल्या प्रायव्हेट सेक्रेटरींच्या जागांची जरूरी आहे असें मला वाटत नाहीं."

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत या पार्लमेंटरी सेक्रेटरींच्या कामाबद्दल अनिश्चितपणा व अपुरेपणा असल्यामुळें कांहींनीं राजीनामे दिले आहेत; यांत मद्रास प्रांतांतील श्री. कोटा रामकृष्ण कारंथ यांचें नांव साहजिकच लक्षांत येतें. अगदीं अलीकडे संयुक्तप्रांतांत या प्रश्नावर गव्हर्नर आणि

मंत्रिमंडळ यांच्या दरम्यान पेचप्रसंग निर्माण होतो कीं काय अशी परिस्थिति उत्पन्न झाल्याचें जाहीर झालें होतें. किरकोळ गोष्टींबाबतही हुकूम काढणें अथवा कामांच्या फाइलीवर आपलें मत नमूद करून ठेवणें या गोष्टींना सुद्धां गव्हर्नर आणि डिपार्टमेंटल सेक्रेटरी यांचेकडून हरकत घेण्यांत आली होती. याबाबत पार्लमेंटरी सेक्रेटरी श्री. तिवारी यांनीं पुढील खुलासा केला आहे:—"कायदे करण्याच्या क्षेत्रांत जर पार्लमेंटरी सेक्रेटरीवर कामें सोपविणें १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाला विरोधी नाहीं. तर अम्मलबजावणीखात्याबाबत त्यांच्यावर कामें सोपविण्याला कायद्याची काय हरकत असावी हें मला तरी समजत नाहीं. अशी बंदी कायद्यानें स्पष्टपणें कोठेंही केलेली नाहीं. आणि जोंपर्यंत तशी ती केलेली नाहीं तोंपर्यंत या सेक्रेटरीवर कामें सोपवितां येणार नाहींत असें म्हणणें हें अर्थ करण्याचे जे नियम ठरलेले आहेत त्यांशीं सर्वस्वी विरुद्ध आहे." या सेक्रेटरींना 'डेप्युटी मिनिस्टर' असें नांव देऊन त्यांना दर्जा वाढवावा व 'मिनिस्टर' जीं जीं कामें करतात त्यांपैकीं कांहीं विशिष्ट बाबीपुरतीं. प्रो. कीथ यांनीं मागें सांगितल्याप्रमाणें, त्यांच्याकडे सोपविण्यांत यावींत म्हणजे उपस्थित होणारा तंटा टळून या अनिर्णित प्रश्नाचा एकदांचा कायमचा निकाल तरी लागेल. वर सुचविल्याप्रमाणें संयुक्तप्रांत प्रधानमंडळानें 'नित्याच्या दैनंदिन राज्यकारभारांतील किरकोळ गोष्टी निकालांत काढण्याचा अधिकार त्या त्या खात्यांच्या पार्लमेंटरी सेक्रेटरींना देण्याचें' ठरविलें आहे. वर उल्लेखिलेल्या 'किरकोळ गोष्टींत' २४ तासांत ज्यांचा निकाल केला पाहिजे अशीं कामें. तसेंच ज्याबाबत धोरणांत बदल करावयाचा आहे किंवा पैशाचा संबंध येतो किंवा खात्याचा सेक्रेटरी व पार्लमेंटरी सेक्रेटरी यांच्यांत मतभेद आहे अशीं कामें, यांचा अंतर्भाव होणार नाहीं हें उघड आहे.

पात्र नसताना किंवा अपात्र ठरल्यावर कायदेमंडळात बसणे आणि मत देणे याबद्दल शिक्षा

७०. पात्रता नसतांना किंवा सभासदत्वाबाबत नालायक ठरला असतांना किंवा लगतच्या मागील कलमांतील तिसऱ्या पोटकलमाच्या तरतुदीअन्वये प्रतिबंध केला असतांना, जर प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा किंवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचा सभासद म्हणून एखादा इसम सभागृहांत बसेल आणि मत देईल तर तो बसेल किंवा मत देईल त्या प्रत्येक दिवसागणिक

त्याला पांचशे रुपये दंड द्यावा लागेल आणि सदर दंड प्रांताकडे येणे असलेलें कर्ज म्हणून त्याच्याकडून वसूल केला जाईल.

( अ ) ६९ व्या कलमांतील ( ३ ) पोटकलमांतील उल्लेख म्हणजे एखाद्या सभासदावर खटला चालू असला तर किंवा त्यानें अपील किंवा फेरतपासणीचा अर्ज केलेला असला तर त्याचें सभासदत्व अपील किंवा तपासणीअर्जाचा निकाल होईपर्यंत रद्द होत नाहीं; तथापि सदर मुदतींत त्याला सभागृहांत बसतां येत नाहीं किंवा त्याला मत देतां येत नाहीं. असें त्यानें केल्यास तो दरदिवशीं पांचशें रुपये दंडास पात्र होईल. ही शिक्षा आर्थिक दृष्टचा आपल्यासारख्या गरीब देशांत जबर मानली जाईल. तिचा उद्देश वरीलसारखे प्रकार होऊं नयेत असा बंदोबस्त करण्याचा आहे. प्रांतिक स्वराज्याच्या प्रारंभापासून आतांपर्यंत हा शिक्षेचा प्रकार जाणता वा अजाणता कोणी ओढवून घेतल्याचें दिसत नाहीं. त्यामुळें वरील कलम प्रत्यक्ष व्यवहारांत आलेलें नाहीं. शेतांतल्या बुजगावण्याप्रमाणें त्याचा उपयोग मात्र आहे यांत शंका नाहीं.

पात्रता नसलेल्या लोकांत पुढील गृहस्थांचा समावेश करितां येईल : ( १ ) परके लोक, पाहुणे इ०: ( २ ) ज्यांनीं आपल्या सभासदत्वाचा राजीनामा दिला आहे असे: ( ३ ) ओळीनें साठ दिवस गैरहजर असल्यामुळें ज्यांना सभागृहानें काढून टाकिलें आहे असे: आणि ( ४ ) ज्यांनीं राजनिष्ठेची शपथ घेतलेली नाहीं असे.

आणि अपात्र ठरलेल्या लोकांत वरील ६९ कलमांतील वर्णिलेले लोक येतील.

या कलमांत उल्लेखिलेला दंड इतर दंडाप्रमाणें माफ करण्याचा किंवा वसूल न करण्याचा अधिकार सरकारला राहील हें स्पष्ट आहे.

सभासदाचे हक्क इ०

७१.—( १ ) ह्या कायद्यांतील कलमे आणि कायदेमंडळातील कामकाजाचे नियंत्रण करणारे नियम आणि स्टँडिंग ऑर्डरी यांना बाध न आणता, प्रत्येक प्रांतिक कायदेमंडळात भाषणस्वातंत्र्य राहील आणि कायदेमंडळांत अगर तत्संबंधांच्या कमिटींत केलेल्या भाषणाबाबत अगर दिलेल्या मताबाबत कायदेमंडळाच्या कोणत्याही सभासदावर कोर्टांत खटला भरतां येणार नाहीं, तसेच अशा कायदेमंडळाच्या हुकमानें

प्रसिद्ध झालेल्या रिपोर्ट, कागदपत्र, मतें अथवा प्रोसीडिंग इ० याबत कोणाही इसमावर खटला भरतां येणार नाहीं.

(२) इतर बाबतींत प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांचे हक्क प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें वेळोवेळीं ठरविल्याप्रमाणें राहतील; आणि अशा रीतीनें ते ठरले जाईपर्यंत या कायद्याच्या या खंडाची सुरुवात होण्यापूर्वी प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद उपभोगीत असलेले हक्क त्यांना राहतील.

(३) हिंदुस्थानांतील प्रचलित कायद्यापैकीं कोणतेंही कलम आणि ह्या कलमाच्या वरील तरतुदींत कांहींही सांगितलें असलें तरी ह्या कायद्यांतील कोणतेंही कलम, कायदेमंडळाच्या कोणत्याही प्रतिनिधिसभेला अगर एकत्र भरलेल्या त्यांच्या जोडबैठकीला अथवा कोणत्याही कमिटीला अथवा अधिकाऱ्याला कोर्टाचा दर्जा देत आहे अथवा शिक्षा करण्याचे अगर शिस्त लावण्याचे अधिकार देत आहे अगर देण्याची कायदेमंडळाला सत्ता देत आहे असा कोणत्याही कलमाचा अर्थ करितां येणार नाहीं; मात्र नियम किंवा स्टँडिंग ऑर्डरींचें उल्लंघन करणाऱ्या अथवा अन्य तऱ्हेनें गैरशिस्त वर्तन करणाऱ्या इसमांना घालवून देण्याचे अथवा येण्यास बंदी करण्याचे अधिकार कायदेमंडळांना राहतील.

(४) जे इसम कायदेमंडळाच्या कमिटीपुढें त्या कमिटीच्या अध्यक्षानें योग्य तऱ्हेनें पुरावा देण्यास अथवा कागदपत्र हजर करण्यास सांगितले असतां तसें करण्याचे नाकारतील, अशांना कोर्टापुढें गुन्हा शाबीत झाल्यानंतर शिक्षा देण्याबाबत प्रांतिक कायदेमंडळाचा कायदा करून तरतूद करितां येईल.

मात्र हिंदुस्थानांतील माजी अथवा चालू सरकारी नोकरांनीं अशा कमिट्यां-पुढे हजर राहण्याचें नियमन करणाऱ्या आणि गुप्त गोष्टी बाहेर फुटूं नयेत अशी व्यवस्था करणाऱ्या, गव्हर्नरने आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें केलेल्या नियमांना बाध न आणता वरीलप्रमाणे कोणताही कायदा अमलांत येईल.

(५) ज्या इसमांना या कायद्यान्वयें कायदेमंडळांत बोलण्याचा आणि इतर तऱ्हेने त्याच्या कामकाजांत भाग घेण्याचा अधिकार आहे अशांच्या बाबतींत ह्या कलमाच्या (१) व (२) पोटकलमांतील तरतुदी कायदेमंडळाच्या सभा-सदांच्याच प्रमाणें लागूं होतील.

(अ) पहिल्या पोटकलमांत सभासदांच्या सभागृहांतील 'भाषण-स्वातंत्र्या' चा विषय आला आहे. अर्थात् हें स्वातंत्र्य कायदेमंडळ ८४ कलमान्वयें जे नियम किंवा स्टँडिंग ऑर्डरी करील त्यानें मर्यादित असेंच असणार. उदाहरणार्थ, भाषण मुद्द्याला धरून असलें पाहिजे; तसेंच त्यांत सभासदांनीं एकमेकांवर वैयक्तिक आरोप करितां कामा नयेत किंवा भलते

शब्द योजितां कामा नयेत; तसेंच राजा, बादशहा, गव्हर्नर जनरल, न्यायाधीश इ० अधिकाऱ्यांबद्दल राजद्रोह किंवा बेअब्रू होईल असे शिंतोडे उडावितां कामा नयेत; असे कांहीं नियम असणें अपरिहार्य आहे.

स्टँडिंग ऑर्डरी म्हणजे सभागृहांत कोणत्या पद्धतीनें कामकाज चालवावयाचें यासंबंधीं कायम स्वरूपाचे नियम. राज्यघटनेंतच भाषण-स्वातंत्र्य, लेखनस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य इत्यादि नागरिक-हक्क समाविष्ट केलेले असावेत अशी आपल्या राष्ट्राची मागणी आहे. कराची काँग्रेसच्या एत-द्विषयक स्पष्ट ठरावानें त्याची घोषणा केली आहे व तशा तऱ्हेचें स्वातंत्र्य नागरिकांना मिळवून देण्याची खटपट निरनिराळीं काँग्रेस सरकारें करीत आहेत. परंतु प्रस्तुत कायद्यांत 'भाषणस्वातंत्र्या'चा स्पष्ट उल्लेख हा या कलमांत, सभासदांच्यापुरता आणि तोही कायदेमंडळांतूनच, प्रथमच व एकदांच आला आहे. एवढेंही मर्यादेत पण पुरें भाषणस्वातंत्र्य नसेल तर कायदेमंडळाच्या सभासदांकडून नागरिकांचीं दुःखें, तक्रारी, त्यांच्यावर सरकारकडून होणारे अन्याय इत्यादींबद्दल कांहींही कामगिरी होऊं शकणार नाहीं व कायदेमंडळें बोलाविण्याचा मूळ उद्देशच नष्ट झाल्यासारखा होईल. हें स्वातंत्र्य प्राप्त करून घेण्याकरितां अनेक झगडे झाले आहेत. १६८८ च्या इंग्लंडांतील राज्यक्रांतीच्या वेळच्या बिल ऑफ राइट्स (हक्कांची सनद)च्या ९ व्या कलमांत "पार्लमेंटच्या सभासदांनीं त्यांच्या सर्व वादविवादांत भाषणस्वातंत्र्य उपभोगावें म्हणून...." इ० उल्लेख आहे. सभासदांचीं भाषणें अधिकृत रीत्या छापलीं जातात. अर्थात् ज्याप्रमाणें भाषण केल्याबद्दल सभासदांवर खटला होऊं शकत नाहीं त्याप्रमाणें अधिकृत रीत्या छापलेल्या भाषणावरही अर्थात्च खटला होऊं शकत नाहीं. मात्र तेंच भाषण किंवा त्यांतील उतारे हे वर्तमानपत्रांत किंवा पुस्तकरूपानें छापले तर त्याच्या-वर कायद्याप्रमाणें सरकार इलाज करूं शकतें. उदा० मध्यवर्ती असेंब्लींतील सभासद पंडित कृष्णकांत मालवीय यांचें असेंब्लींत केलेलें भाषण अलाहा-बादच्या 'अभ्युदय' पत्रानें छापलें व तें आक्षेपार्ह वाटल्यानें सरकारनें त्या पत्राकडून त्याबद्दल जामीन मागितला. ही भाषणस्वातंत्र्याची एक प्रकारें चांगलीच गळचेपी आहे. जो सभासद आपल्या मतदारांतर्फे असेंब्लीं-त काम करतो त्या सभासदानें आपल्या असेंब्लींतील भाषणाचा प्रचार

पुस्तकद्वारा अगर हस्तपत्रकद्वारा आपल्या मतदारसंघांत केल्यास त्याला जर बंदी केली तर मतदारसंघाची संपूर्ण तऱ्हेनें सेवा करण्याचा सभासदांचा हक्क हिरावून घेतल्यासारखेंच होणार आहे. ज्या देशांत जबाबदार राज्यपद्धति चालू नाहीं तेथें तर या भाषणस्वातंत्र्याच्या हक्काची अत्यंत जरूर आहे.

पार्लमेंटला कांहीं विशिष्ट हक्क प्राप्त झालेले आहेत. तेवढ्यापुरतें पार्लमेंटला काय वाटेल तें ठरविण्याचा हक्क आहे. या हक्करक्षणाकरितां म्हणून एक 'हक्क कमिटी' नेमलेली असते; तिचे सात सभासद असतात. आपल्या प्रांतिक कायदेमंडळांतून अद्याप या कमिट्यांचा उपक्रम झालेला नाहीं. हे हक्क निश्चित ठरले असल्याशिवाय त्यांचा भंग झाला किंवा नाहीं हें ठरवितां येणार नाहीं.

पहिल्या पोटकलमांत 'ह्या कायद्यांतील तरतुदींना बाध न आणतां' हे जे शब्द आहेत ते ८६ व्या कलमांतील 'कायदेमंडळांतील वादविवादांवरील बंधनांना' अनुलक्षून आहेत.

दुसऱ्या पोटकलमान्वयें प्रांतिक कायदेमंडळांना आपल्या सभासदांचे इतर बाबतीबद्दलचे हक्क ठरविण्याचा अधिकार दिलेला आहे. तोंपर्यंत पूर्वी चालू असलेले हक्क अबाधित ठेवले आहेत.

या हक्कांमध्यें सभासदांनीं आपल्या मतदारसंघांतील तक्रारी अधिकाऱ्यांमार्फत दाद लावून घेऊन नाहींशा करण्याचाही हक्क अन्तर्भूत होतो. परंतु मद्रास असेंब्लींत मुख्य प्रधान श्री. राजगोपाळाचार्य यांनीं म्हटल्याप्रमाणें सरकारी नोकरांनीं मंत्र्यांना आणि सरकारलाच जबाबदार राहिलें पाहिजे आणि त्यांनीं सभागृहांतील सभासदांचें गिऱ्हाईक किंवा कूळ होतां कामा नये; म्हणजे अशा तऱ्हेनें सभासदांनीं आपल्या हक्काचा दुरुपयोग करितां कामा नये. संयुक्तप्रांत असेंब्लींत या हक्कांबाबत एका सभासदानें बिल आणलें असून त्यांत पुढील हक्कांचा समावेश करण्यांत आला आहे:—"ज्या मतदारसंघांत सभासद राहत असेल त्यांतील सर्व पोलिस स्टेशनें, दारूचीं दुकानें, सरकारी रुग्णालयें, सरकारी, आणि सरकारी मदत घेणाऱ्या शिक्षणसंस्था, तुरुंग आणि इतर सरकारी संस्था यांची तपासणी करणें; सर्व कागदपत्र आणि जुनें रेकार्ड पहावयास मिळणें; स्थानिक संस्थांच्या कचेऱ्या तपासणें आणि तत्संबंधीं कागदपत्र पहावयास

मिळणें, स्थानिक स्वराज्यसंस्थांतील सभासदांना असणारे सर्व हक्क प्राप्त होणें; अगदीं गुप्त गोष्टीखेरीज इतर सर्व सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्ना-बाबत सरकारी अधिकाऱ्यांकडून माहिती विचारण्याचा हक्क असणें इत्यादि इत्यादि" हें बिल बिनसरकारी सभासदानें आणलें असून अद्याप त्याच्यावर चर्चा झालेली नाहीं.

( आ ) तिसऱ्या पोटकलमानें कायदेमंडळांना न्यायाधीशाचे कोणतेही अधिकार ठेवलेले नाहींत. इंग्लंडांत लाँग पार्लमेंटनें ( १६४०-१६६० ) चार्लस राजावर देशद्रोहाचा खटला चालवून त्याला शिरच्छेदाची शिक्षा दिली होती हें इतिहासाच्या वाचकांस अवगत आहेच; परंतु सध्यांच्या काळीं फरक एवढाच पडला आहे कीं, राजाला आपल्या राज्यत्यागाच्या बिलावर स्वत: मंजुरीची सही करावी लागून राज्य सोडावें लागतें. असें झाल्यानें न्यायाधीशाची भूमिका न स्विकारतां कायदे करणारी संस्था अशी जी पार्लमेंटची भूमिका ती सार्थ रीतीनें टिकून राहिल्याचें समाधान मिळतें एवढेंच.

( इ ) चौथ्या पोटकलमानें कायदेमंडळाच्या कमिटीपुढें पुरावा हजर करण्यास नाकारणाऱ्या इसमास शिक्षा करण्याचा अधिकार, प्रांतिक कायदेमंडळाचा कायदा करून, घेतां येण्याची व्यवस्था केली आहे. याला अनुसरून मध्यप्रांत वऱ्हाड असेंब्लीनें बिल मंजूर केलें असून गव्हर्नरनें त्याला संमति दिली आहे. त्या कायद्याचें नांव "मध्य-प्रांत आणि वऱ्हाड लेजिस्लेटिव्ह असेंब्ली कमिटी समन्स एन्फोर्समेंट ॲक्ट, १९३७" असें आहे. या कायद्यानें एक महिनापर्यंत साधी कैद किंवा रु. ५०० पर्यंत दंड किंवा दोन्ही, अशी शिक्षा ठेवण्यांत आली आहे.

( ई ) चौथ्या पोटकलमांतील शेवटच्या भागांत उल्लेखिलेले नियम 'मुंबई लेजिस्लेटिव्ह कमिटी ( अधिकाऱ्यांचा पुरावा ) नियम, १९३७' म्हणून केले असून ते 'मुंबई असेंब्ली मॅन्युअल'मध्यें ७२–७३ पृष्ठांवर दिलेले आढळून येतील. त्यांतील मुख्य मुख्य नियम पुढीलप्रमाणें आहेत:—

"( क ) गव्हर्नर जादा अगर सर्वसाधारण हुकूम काढून एखाद्या अधिकाऱ्याला कायदेमंडळाच्या कमिटीपुढें पुरावा हजर करण्यास परवानगी देईल; त्यानें आपल्या-

जवळचे जरूर ते कागदपत्रेही हजर करण्यास हरकत नाहीं. असा अधिकार गव्हर्नरनें दिला नसल्यास कोणाही अधिकाऱ्याला कमिटीपुढें हजर राहतां येणार नाहीं किंवा पुरावा सादर करितां येणार नाहीं.

(ख) कमिटीच्या चेअरमननें, एखाद्या अधिकाऱ्यानें कमिटीपुढें पुरावा देण्याबाबत, लिहावयाचें पत्र सरकारच्या चीफ सेक्रेटरीला लिहिलें पाहिजे आणि आपणास नक्की कोणत्या मुद्द्याबद्दल माहिती किंवा पुरावा पाहिजे हें त्या पत्रांत शक्य तितकें स्पष्ट लिहिलें पाहिजे.

(ग) अशा रीतीनें योग्य तो पुरावा बरोबर घेऊन अधिकाऱ्यानें कमिटीपुढें जावें; परंतु त्याला आयत्या वेळीं जर असें आढळून आलें कीं, कमिटीपुढें कांहीं गोष्टी उघड करून सांगणें हें सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें बरोबर होणार नाहीं तर त्यानें कमिटीला तसें स्पष्ट सांगून टाकावें आणि तशाबद्दल हुकूम होण्याकरितां त्यानें ती बाब त्या खात्याच्या प्रधानाला कळवावी व प्रधानानें ती गव्हर्नराला कळवावी.

(घ) मुंबई कायदेमंडळानें ७१ (४) मध्यें उल्लेखिल्याप्रमाणें पुरावा न देणाऱ्या इसमास शिक्षा करण्याबाबतचा कायदा केला आणि त्यांत कैद किंवा दंड अशासारखी कोणतीही शिक्षा ठेविलेली असली तरी त्याचा उपसर्ग वर उल्लेखिलेल्या सरकारी अधिकाऱ्यांना पोंचणार नाहीं.

(ङ) या नियमान्वयें करावयाच्या गोष्टींबाबत गव्हर्नर आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें वर्तन करील.

(च) १९३५ च्या कायद्यांतील ५८ व्या कलमाखालीं केलेल्या नियमांतील ( विशिष्ट माहितीच्या उगमस्थानांची गुप्तता राखण्याबाबतचे ) तरतुदींना बाध न आणतां या नियमांचा अम्मल करण्यांत येईल."

(उ) भाषणस्वातंत्र्य व सभासदांचे जे इतर हक्क (१) व (२) या पोटकलमांत सांगितले आहेत ते बिनसभासद असलेल्या मंत्र्यांना, तसेंच ॲडव्होकेट जनरलला व ५७ (२) कलमान्वयें गव्हर्नरनें नेमलेल्या अधिकाऱ्यालाही अर्थात् प्राप्त होतील हें पांचव्या पोटकलमानें स्पष्ट केलें आहे.

(ऊ) या कलमांतील (२) ऱ्या पोटकलमांत 'हक्क' (प्रिव्हिलेज) हा शब्द आला आहे'. 'हक्क' याला कित्येकदां (राइट) हाही शब्द योजतात. तेव्हां या दोन इंग्रजी शब्दांमधील फरक लक्षांत यावा म्हणून रंगून हायकोर्टच्या रॉबर्टस आणि डंकली या दोघा न्यायमूर्तींनीं या दोन्ही शब्दांच्या दिलेल्या व्याख्या खालीं देत आहे:—

" कायद्यामध्यें साधारण हक्क (राइट) म्हणजे कोर्टामध्यें योग्य इलाज करून अम्मलबजावणी करून घेतां येण्यासारखी कोणतीही फायद्याची गोष्ट आणि विशेष हक्क (प्रिव्हिलेज) म्हणजे विशिष्ट लोकांनीं, सर्वसाधारण लोकांनीं उपभोगिलेल्या हक्कां (राइट) पेक्षां अधिक, उपभोगिलेल्या जादा सवलती. हा विशेष हक्क (प्रिव्हिलेज) सुद्धां कोर्टामध्यें इलाज करून त्याचा अम्मल करून घेतां येण्यासारखा असला पाहिजे किंवा सर्वसाधारण हक्काच्या बजावणीच्या मागणीला, त्यांतून सुटका म्हणून, त्या विशेष हक्कानें संपूर्ण तऱ्हेनें बिनतोड उत्तर दिलें पाहिजे व अशा रीतीनें कायद्याच्या दृष्टीनें आपल्या स्वतःच्या अस्तित्वाचें समर्थन केलें पाहिजे."

या व्याख्येप्रमाणें विचार केल्यास सामान्य नागरिकाला भाषणस्वातंत्र्याबाबत जी कायद्याच्या दृष्टीनें मोकळीक नाहीं ती या कलमान्वयें कायदेमंडळाच्या सभासदांना दिली आहे. म्हणजे हा त्यांचा 'प्रिव्हिलेज' होतो. तसेंच, गव्हर्नरांना राहावयास दिलेले बंगले, त्याचप्रमाणें त्यांनीं हिंदुस्थानांत परदेशांहून आणलेल्या वापरावयाच्या वस्तु, मोटारगाड्या, खाद्यपेय, तंबाखू, फर्निचर इ० पदार्थांवर आयात जकात माफ आहे हा त्यांचा 'प्रिव्हिलेज' म्हणजे विशेष हक्क समजला जातो.

(ए) तिसऱ्या पोटकलमांत 'अन्य तऱ्हेनें गैरशिस्त वर्तन करणाऱ्या इसमांना घालवून देण्याचे अधिकार कायदेमंडळांना राहतील' अशी तरतूद केली आहे. यांतील 'कायदेमंडळांना' याचा अर्थ, त्यांच्या 'स्पीकर' किंवा 'प्रेसिडेंट' या अधिकाऱ्यांना असाही घेण्यास हरकत नाहीं. याचें उदा-

हरण मुंबई कायदेमंडळांतून सभासद श्री. करंदीकर यांना स्पीकर श्री. मावळंकर यांनीं घालवून दिल्याचें देतां येईल. 'प्राथमिक शिक्षण बिला'-वर चर्चा चालू असतांना श्री. करंदीकर कांहीं विसंगत गोष्टी बोलूं लागले; तसें न करण्याबद्दल स्पीकरनें त्यांना इशारा दिला.

**करंदीकर** : " मला आपण नेहमीं सुसंगततेच्या मार्गावर ठेवण्याचे कामीं जें वैयक्तिक लक्ष घालतां त्याबद्दल मी आपला फार ऋणी आहें."

**स्पीकर** : " आपले शब्द परत घ्या."

**करंदीकर** : " माझी खात्री पटली तर माफी मागेन."

**स्पीकर** : " वाद घालायला मी कबूल नाहीं. अध्यक्षाला कोणाच्याही बाबतींत वैयक्तिक लक्ष पुरवावयाचें नाहीं. आपण अध्यक्षावर पक्षपाताचा आरोप करीत आहां."

**करंदीकर** : " माझा मतलब तोच आहे आणि तो तसा असल्यानें मी शब्द परत घेणार नाहीं."

**स्पीकर** : " पुनः विचार करा. आपण जर शब्द परत घेणार नसलां तर मला कडक उपाय योजावा लागेल; म्हणून पुनः एकदां संधि देतों."

**करंदीकर** : " खुलासा करण्यास मला जर परवानगी असेल तर...."

**स्पीकर** : " मला आतां तसें करतां येणार नाहीं. सभासदाच्या मनांत जर स्पीकरबद्दल अनादर नसेल, तर बिनशर्तपणें शब्द परत घेण्यास कां हरकत असावी ? "

**करंदीकर** : " मी जें म्हटलें तें पुनः म्हणतों."

या वेळीं सर्वांनीं करंदीकरांना शब्द परत घेण्याबद्दल गळ घातली; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. म्हणून स्पीकरनें त्यांना एका दिवसापुरतें सभागृहांतून घालवून दिलें व त्यानंतर करंदीकर सभागृहांतून निघून गेले.

सभासदांचे पगार आणि भत्ते

**७२.** प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्या व लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें यांच्या सभासदांना प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें वेळोवेळीं ठरल्याप्रमाणें पगार आणि भत्ते मिळण्याचा हक्क राहील आणि कायद्यानें अशी तरतूद होईपर्यंत ह्या कायद्याच्या या खंडाला सुरवात होण्यापूर्वीं प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलाच्या सभासदांच्या बाबत ज्या

दरांनीं आणि ज्या अटींवर अलावन्स देण्यांत येत असे त्याप्रमाणें सभासदांना देण्यांत देईल.

(अ) असेंब्ली व कौन्सिलच्या सभासदांच्या पगाराबाबत कायदे-मंडळानें कायदा करीपर्यंत जुन्याच नियमाप्रमाणें व्यवस्था केली आहे. मुंबई प्रांतांत अधिवेशन चालू असतांना रोज दहा रु. १० सभासदांना भत्ता म्हणून देण्यांत येत असे व प्रवासभाडें पहिल्या दर्जाच्या सरकारी नोकराला मिळे त्या दराप्रमाणें मिळत असे. ज्या जिल्ह्यांतून अगर जिल्ह्याच्या पोटभागांतून सभासद निवडून आला असेल त्या जिल्ह्याच्या किंवा त्याच्या पोटभागाच्या ठरलेल्या मुख्य ठिकाणापासून अधिवेशनाच्या गांवापर्यंत प्रवासभाडें देण्याची नियमान्वयें व्यवस्था करण्यांत आली आहे.

१९३५ च्या कायद्याच्या या ७२ व्या कलमान्वयें कायदे-मंडळाच्या सभासदांना कायदा करून पगार देण्याची नवी पद्धति चालू करण्यास मुभा ठेवली आहे. त्याचा फायदा घेऊन बहुतेक सर्व प्रांतिक कायदेमंडळांनीं याबाबत कायदे मंजूर केले आहेत. कॉंग्रेस प्रांतांतून कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या ठरावाला अनुसरून दरमहा रु. ७५ पगार ठरविण्यांत आला आहे. बंगालमध्यें हा पगार दरमहा रु. १५० ठरला आहे. पंजाबमध्यें अधिवेशनाच्या दर दिवसाला रु. २० भत्ता ठरविलेला आहे. सॅलरी (पगार) या शब्दांतील मूळ लॅटिन रूप सॅलेरियम (शिपायाच्या मिठाचा पैसा); आणि तो शब्द सॅल = सॉल्ट = मीठ या शब्दापासून झाला आहे. आपण आपल्या भाषेंत 'एखाद्याचें मीठ तोडणें' असें म्हणतों, तेव्हां त्याचा अर्थ एखाद्याचें 'उपजीविकेचें साधन नाहींसें करणें' असाच करितों. शरीरश्रमानें जें वेतन मिळतें त्याला 'वेजिस' किंवा मजुरी असें म्हणतात; व बौद्धिक श्रमानें जें वेतन मिळतें त्याला 'सॅलरी' किंवा पगार असें म्हणण्याचा प्रघात आहे. परंतु हे वर्ग ज्यांना नष्ट करून सर्वत्र समता स्थापावयाची आहे असे "**झाबवाला**" सारखे लोक 'सभासदांची रोजची मजुरी' (डेली वेजिस ऑफ मेंबर्स) असा हास्यलहरी उत्पन्न करणारा शब्दप्रयोग करितात. वास्तविक ही पगाराची जबाबदारी पूर्वी इंग्लंडांत सरकारवर नसून ज्या मतदारसंघानें सभासद निवडून पाठविला असेल त्याच्यावर होती; 'ज्याची करावी चाकरी त्याची खावी

भाकरी' हें तत्त्व योग्य असेंच होतें; अजूनही कायदेशीर जबाबदारी मतदारसंघावरच आहे (अर्स्किन मेकृत पार्लमेंटरी प्रॅक्टिस, पृ० २२); परंतु वहिवाटीनें ती सरकारनें आपल्या शिरावर घेतली आहे. वास्तविक सरकार तरी कराच्या रूपानें प्रजेकडून म्हणजे मतदारांकडून जो पैसा वसूल होतो त्यांतूनच सभासदांना पगार अथवा भत्ता देत असतें; म्हणजे पर्यायानें पूर्वींप्रमाणेंच मतदार आपल्या प्रतिनिधीला कामाकरितां वेतन देतात हें स्पष्ट आहे. हाउस ऑफ कॉमन्सच्या सभासदाला दरसाल ४०० पौंड वेतन १९११ च्या पार्लमेंट कायद्यानें ठरविण्यांत आलें व अलीकडे त्यांत दरसाल १०० पौंडांची वाढ करण्यांत आली आहे. विरोधी पक्षाच्या पुढाऱ्याला जवळ जवळ मंत्र्याइतकेंच काम पडतें व अन्य व्यवसाय करावयास सवड असत नाहीं या कारणास्तव त्याला दरसाल २००० पौंड पगार देण्यांत येतो. सरकारला पद्धतशीर तऱ्हेनें विरोध करण्याकरितां दिलेला हा पगार पाहून अचंबा वाटतो. पुष्कळ वर्षें ज्या सभासदानें पार्लमेंटच्या कामांत घालविलीं आहेत व त्यामुळें ज्याचें उदरनिर्वाहाचें साधन बंद झालें आहे अशा कांहीं थोड्या सभासदांना पेन्शन देण्याची योजना विलायतेंत तयार करण्याचें अलीकडे घाटत आहे, ही ओघानेंच प्राप्त होणारी गोष्ट आहे. आपल्याकडे अद्याप ती परिस्थिति प्राप्त होण्यास बराच कालावधि जावा लागेल. मुंबई कायदेमंडळानें सभासदांच्या पगाराबाबत जो कायदा (मुंबई कायदा ३रा १९३७) केला आहे त्यांत पुढीलप्रमाणें मुख्य कलमें आहेत:—

(क) प्रत्येक सभासदाला दरमहा रु. ७५ पगार दिला जाईल;

(ख) कायदेमंडळाच्या किंवा कमिटीच्या कामाकरितां राहिलेल्या मुदतींत दररोज रु. ३ भत्ता प्रत्येक सभासदास देण्यांत येईल;

(ग) प्रांतिक सरकार ठरवील त्या वर्गाच्या दुप्पटीपेक्षां अधिक प्रवासभाडें मिळणार नाहीं; ज्या ठिकाणीं सभा भरावयाच्या तेथें राहणाऱ्यास प्रवासभाडें मिळणार नाहीं.

(घ) मंत्री, स्पीकर, अध्यक्ष, पार्लमेंटरी सेक्रेटरी हे जरी कायदेमंडळाचे सभासद असले तरी त्यांना दर महिन्याचा सभासदाचा पगार किंवा रोजचा भत्ता किंवा प्रवासभाडें यांपैकीं कांहीं मिळणार नाहीं.

( ङ ) ज्या बाबींत स्पष्ट तरतूद केलेली नसेल त्या बाबींसंबंधीं प्रांतिक सरकारनें नियम करावेत; त्या नियमांचा कायद्याप्रमाणेंच अम्मल होईल.

या कायद्यांतील शेवटच्या ( ङ ) कलमासंबंधीं रावबहादुर चितळे यांनीं असा हरकतीचा मुद्दा उपस्थित केला कीं, सभागृहाला आपले अधिकार सरकाराकडे सोपवितां येणार नाहींत; ७२ व्या कलमांत "कायदेमंडळ ठरवील त्याप्रमाणें" असे स्पष्ट शब्द असल्यामुळें सर्व तरतुदी कायदेमंडळानें आपण होऊनच केल्या पाहिजेत; दुसऱ्या कोणावर आपली जबाबदारी सोपवितां येणार नाहीं. यावर कायदामंत्री नामदार मुनशी यांनीं उत्तर दिलें कीं, "इतरत्र पार्लमेंटरी संस्था असेंच करितात; बारीकसारीक गोष्टी बिलांत सामील करावयाच्या झाल्यास बिल फारच अस्ताव्यस्त व मोठें होईल." स्पिकर ना. मावळंकर यांनीं हरकतीचा मुद्दा मान्य केला नाहीं. ते म्हणाले: "आपल्या स्वतःच्या कमिटीला किंवा सरकारला आपले अधिकार कायदेमंडळांनीं देऊं नयेत असें कायद्यांत (१९३५च्या) कोठेंच स्पष्टपणें उल्लेखिलेलें नसल्यामुळें माझ्या मतें कायदेमंडळानें आपले अधिकार सरकारास देण्यास कांहींच हरकत नाहीं." याच्या उलट मध्यवर्ती असेंब्लींत रामनारायण सिंग (कॉंग्रेस—बिहार) यांनीं सरकारला असलेल्या नियम करण्याच्या अधिकारासंबंधीं अशी उपसूचना दिली कीं, "सदर नियम तयार झाल्यावर एक महिनाभर दोन्ही सभागृहांपुढें ठेवावेत आणि दोघांनीं ते पसंत केल्यावर ते अमलांत यावेत." सरकारतर्फे सर थॉमस स्टेवार्ट यांनीं विरोध केला. कॉंग्रेस पक्षाचे म्हणजे विरोधी पक्षाचे पुढारी श्री. भुलाभाई देसाई यांनीं उपसूचनेवर अनुकूल भाषण करितांना उद्गार काढिले कीं, "लॉर्ड हेवर्टसाहेबांच्या याबाबतच्या प्रख्यात उद्गारांकडे मी सरकारचें व सभागृहाचें लक्ष वेधूं इच्छितों. ते म्हणतात. 'सरकार आणि नोकरवर्ग यांना दिवसेदिवस जास्त जास्त अधिकार बळकावण्याची सवय लागत चालली आहे. ही लोकशाहीच्या विकासाच्या दृष्टीनें चांगली गोष्ट नाहीं.' तेव्हां अशा गोष्टीला आमचा पक्ष विरोध करतो म्हणून आम्ही सरकारला अप्रिय व जे पाठिंबा देतात तेवढे लोक सरकारला प्रिय, अशी स्थिति झाली आहे." नंतर कॉंग्रेसची उपसूचना ४९ विरुद्ध ४४

मतांनीं नामंजूर झाली. यावरून ही गोष्ट स्पष्ट दिसून येते कीं, एकच काँग्रेस पक्ष, परंतु तो सरकार बनला कीं, निराळ्या तऱ्हेनें वागतांना दिसतो आणि तो विरोधी पक्ष म्हणून काम करूं लागला कीं निराळी भूमिका स्वीकारतो. बिगरकाँग्रेस प्रांतांतही काँग्रेसच्या पक्षाची मध्यवर्ती असेंब्लीतील काँग्रेस पक्षासारखीच स्थिति असलेली दिसून येते. जगांत आज कोठेंही गेला तरी तेथील लोकांनीं निवडून दिलेल्या सरकारनेंही बऱ्याच अंशानें कायदे करण्याचें क्षेत्र व अंशतः न्यायदानाचेंही क्षेत्र व्यापिलेलें आहे असें दिसून येईल. सध्यांच्या काळांत असें होणें हें अपरिहार्य होऊन बसलें आहे. त्याला उपाय सनदशीर व सत्याग्रहाच्या परिणामकारक मार्गानें सत्तेचें केन्द्रच काबीज करून तें सतत आपल्या हातीं ठेवून लोककल्याण करावयाचें हाच होय.

मद्रास कायदेमंडळानेंही मद्रास सरकारला नियम करण्याचे अधिकार सुपूर्त केले आहेत. मद्रासच्या कायद्यांत असें एक कलम आहे कीं, ज्या कोणा सभासदाला पगार घ्यावयाचा नसेल त्याला तसें करण्याची मुभा आहे. या कलमाचा उपयोग तेथील असेंब्लीच्या ३५ सभासदांनीं व कौन्सिलच्या १४ सभासदांनीं केलेला दिसून आला आहे. अशा लोकांना रोजचा भत्ता व प्रवासभाडें याबाबत जास्त सवलती दिलेल्या आहेत. मुंबई कौन्सिलचे सभासद श्री. बेहराम करंजिया यांनीं आपल्या मिळणाऱ्या रकमेपैकीं रु. ४१६ + ५६६ रु. प्रधानमंत्र्याकडे खेडेगांवांतील पाणीपुरवठ्याच्या कार्याकडे खर्च करण्याकरितां म्हणून देणगीदाखल दिले. बंगाल, पंजाब इ० बिनकाँग्रेस प्रांतांत सभासदांना रु. ७५ पेक्षां अधिक पगार अथवा भत्ता मिळतो तो सर्वच्या सर्व अधिक मिळणारा पैसा त्या त्या प्रांतांतील काँग्रेस कार्याकरितां म्हणून राखून ठेवण्याचें ठरविण्यांत आलें आहे. सार्वजनिक पैशाच्या योग्य विनियोगाच्या दृष्टीनें हा एक प्रकारें गौण मार्गच होय. जास्त पैसा घेऊन तो स्वपक्षाच्या अगर दुसऱ्या कोणत्या चांगल्या कामाकडे देण्यापेक्षां आपल्या या अत्यंत गरीब देशांतील सरकारच्या तिजोरींतून अत्यन्त अल्प वेतन घेऊन काम करण्याचा धडा घालून देणें हाच उत्तम मार्ग आहे. परंतु तो हळूहळूच व्यवहारांत येणार ही गोष्ट मान्य केली पाहिजे. कराची काँग्रेसनें रु. ५०० ही

पगाराची जास्तींत जास्त मर्यादा ठरविली आहे परंतु आजची परिस्थिति अशी आहे कीं, म. गांधी प्रधानांनीं रु. ७५ पगारावर काम करावें असें म्हणत असले तरी रु. ५०० हीच किमान मर्यादा प्रधान, स्पीकर, अध्यक्ष इ० च्या बाबतींत अमलांत आली आहे.

(आ) सभासदांच्या पगाराबाबतच्या मुंबई ॲक्टांत ( १९३७ चा तिसरा कायदा ) 'ज्या बाबींत स्पष्ट तरतूद केलेली नसेल त्या बाबीसंबंधीं प्रांतिक सरकारनें नियम करावेत' असें म्हटलें आहे. या कलमाच्या आधारें मुंबई सरकारनें केलेले नियम 'मुंबई कायदेमंडळांतील सभासदांच्या पगारा-बाबतचे व भत्त्याबाबतचे नियम, १९३८' या मथळ्याखालीं ५ जानेवारी १९३८ च्या गॅझेटमध्यें जाहीर झाले आहेत; त्यांतील कांहीं महत्त्वाचे खालीं उतरून घेतों:—

" ( २ ) हे नियम १ नोव्हेंबर १९३७ पासून अमलांत आले असें समजलें जाईल.

( ३ ) १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ६८ व्या कलमांतील गणनेप्रमाणें जो सभासद ६० दिवस कायदेमंडळाच्या एकाही बैठकीला परवानगीशिवाय हजर राहिलेला नसेल त्याला गैरहजेरीच्या मुदतीपुरता, १९३७ च्या ३ऱ्या कायद्यांतील ( ३ ) (क) कलमाप्रमाणें मिळावयाचा पगार मिळणार नाहीं.

( ४ ) ( अ ) रेल्वेनें प्रवास केल्यास दुसऱ्या वर्गाचें दीडपट भाडें मिळेल; स्टीमरनें प्रवास केल्यास पहिल्या वर्गाचें दीडपट भाडें मिळेल.

(आ) रस्ता, समुद्र, नदी, कालवा—या मार्गानें प्रवास झाला असल्यास मैलीं पांच आणेप्रमाणें प्रवासखर्च मिळेल. मात्र सभासदानें रस्त्यानें भाड्याच्या गाडीनें प्रवास केला असल्यास त्याला प्रत्यक्ष द्यावें लागलेलें भाडें मिळेल; हें भाडें सुद्धां मैलीं पांच आण्यांपेक्षां जास्त दरानें मिळणार नाहीं.

( इ ) रेल्वेमार्ग हा सर्वांत जवळचा रस्ता मानला जाईल.

( ई ) अधिवेशनाला जातांना एकदां व परत येतांना (संपल्यावर) एकदां—एवढाच प्रवास धरला जाईल.

( ५ ) रोज रु. ३ भत्ता मिळेल. यांत प्रत्यक्ष राहिलेल्या दिवसांचीच गणना करून भत्ता आकारण्यांत येईल. अधिवेशनाच्या पूर्वीचा एक व नंतरचा एक असे दोन दिवस धरण्यांत येतील. मात्र ज्या दिवशीं भत्ता मिळावयाचा त्या दिवशीं सभासद त्या ठिकाणीं कमींत कमी सहा तास तरी हजर असला पाहिजे.

( ६ ) एक संपूर्ण दिवस अधिवेशनाला हजर असल्याशिवाय प्रवासभत्ता मिळणार नाहीं. संपूर्ण दिवस याचा अर्थ निम्म्या दिवसापेक्षां अधिक काळ. निम्मा दिवस तरी हजर असल्याशिवाय रोजचा भत्ता मिळणार नाहीं.

( ७ ) दहा दिवस किंवा त्याहून जास्त दिवस अधिवेशन अगर बैठक तहकूब झाली असल्यास दुसऱ्यांदा प्रवासखर्च मिळेल. अशा वेळीं रोजचा भत्ता मिळणार नाहीं.

( ८ ) दहा दिवसांपेक्षां कमी तहकुबी असल्यास राहिलेल्या दिवसांचा रोजचा भत्ता किंवा प्रवासखर्च यापैकीं जी रक्कम कमी असेल ती मिळेल.

( ९ ) दुसऱ्या कोणत्याही कामाकरितां अलावन्स मिळाला असेल तर वरील अलावन्स घेतां येणार नाहीं.

( १० ) परत जाण्यापूर्वी प्रवासखर्च मागतां येईल व तो मिळेल. रोजचा भत्ता आगाऊ मिळणार नाहीं.

( ११ ) सर्व बिलें अकौंटंट जनरलकडे पाठवावींत. स्वतःच दिलेला दाखला ( सर्टिफिकेट ) चालेल.

( १२ ) कायदेमंडळांच्या सेक्रेटरीनें अकौंटंट जनरलला सभासदाच्या हजेरीसंबंधीं वगैरे माहिती पुरवावी.''

कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें ऑगस्ट १९३७ मध्यें प्रवासखर्च तिसऱ्या वर्गाच्या दुप्पट भाड्यापेक्षां अधिक असूं नये असा ठराव केला होता. मुंबई सरकारनें दुसऱ्या वर्गाचें दीडपट भाडें ठरविलें आहे. विरोधी पक्षांना खूष करण्याकरितां मुंबई सरकारनें वर्किंग कमिटीचा ठराव धाब्यावर बसविला

आहे. सिंध असेंब्लींत सभासदांच्या प्रवासखर्चाबाबतच्या बिलांत दुसऱ्या वर्गाच्या दीडपट भाडें देण्याबद्दल कलम होतें; त्या कलमाला कॉंग्रेस पक्षातर्फे 'तिसऱ्या वर्गाचें दुप्पट भाडें असावें' अशी उपसूचना मांडण्यांत आली; परंतु ती नामंजूर करण्यांत आली. मुंबई व सिंध प्रांतांतील कॉंग्रेस पक्षांच्या धोरणांतील हा फरक नजरेंत भरण्यासारखा नाहीं काय ? बिहार कायदे-मंडळानें सभासदांच्या प्रवासखर्चाकरितां तिसऱ्या वर्गाचें चौपट भाडें, म्हणजे दुसऱ्या वर्गाच्या भाड्यापेक्षां थोडें अधिक, मंजूर केलें आहे.

## कायदे करण्याची रीत

कायदेमंडळापुढे बिलें इ० मांडणें

७३.—(१) या कायद्याच्या या खंडांतील पैशासंबंधीच्या बिलाबाबतच्या विशेष तरतुदी वगळून लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असलेल्या प्रांताच्या कोणत्याही कायदेमंडळांत बिल प्रथम मांडतां येईल.

(२) प्रांताच्या कायदेमंडळांत अनिर्णित स्थितीत असलेलें कोणतेंही बिल त्यांपैकीं कोणत्याही प्रतिनिधिसभेचें अधिवेशन समाप्त झालें एवढ्याच कारणावरून, लुप्त होणार नाहीं.

(३) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांत अनिर्णित स्थितींत असलेलें कोणतेंही बिल जर तें लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें मंजूर केलेलें नसेल तर, असेंब्ली बरखास्त झाली तरी लुप्त होणार नाहीं.

(४) प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत अनिर्णित स्थितींत असलेलें अथवा लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें मंजूर केल्यानंतर लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांत अनिर्णित स्थितींत असलेलें कोणतेंही बिल असेंब्ली बरखास्त झाल्यावर लुप्त होईल.

(अ) पैशासंबंधींच्या बिलासंबंधीं ७३ (१) कलमामध्यें उल्लेखिलेली विशेष तरतूद या कायद्याच्या ८२ व्या कलमांत केलेली आढळून येईल. त्यांत 'कर बसविणें' किंवा 'कर्ज काढणें' याबाबतचीं बिलें लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें प्रथम मांडतां येणार नाहींत असा ब्रिटिश राज्यघटनेनुसार अमलांत असलेला प्रघात स्पष्टपणें मांडला आहे. अर्स्किन मे म्हणतो : "राजा पैसा मागतो; कॉमन्स सभा पैसा देते; लॉर्डांची सभा या देण्याला अनुमति देते." परंतु या पैशासंबंधींच्या बिलाबाबत काय किंवा इतर बिलांबाबत काय, प्रांतिक कायदेमंडळान्तर्गत दोन्हीही प्रतिनिधिसभांना समान अधिकार वरील कलमान्वयें देण्यांत आलेले आहेत. कायदा होण्यास प्रत्येक बिलाला कौन्सिलनें मंजुरी ही दिलीच पाहिजे. एखाद्या

कलमाबाबत अगर उपसूचनेबाबत मतभेद झाल्यास दोन्ही सभांची जोड-बैठक भरवून त्यांत मतभेदाच्या मुद्द्यांबाबत जो बहुमतानें निर्णय केला जाईल तो अखेरचा निर्णय मानला जाण्याची पुढील कलमांतून व्यवस्था करण्यांत आली आहे.

( आ ) 'अनिर्णित स्थितींत असलेलें' ( पेंडिंग ) बिल म्हणजे जें प्रत्यक्ष कायदेमंडळांत मांडलें गेलें आहे अगर ज्याचें पहिलें वाचन मंजूर झालें आहे असें. तेव्हां सर्वसाधारण नियम असा कीं, सर्व पेंडिंग बिलें कायदेमंडळ बरखास्त झाल्यावर लुप्त पावतात. (२)ऱ्या पोटकलमानें केवळ अधिवेशन समाप्त झालें एवढ्या कारणास्तव कोणतेंही बिल लोप पावत नाहीं. (३)ऱ्या पोटकलमांत लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांतच प्रथम मांडलेल्या बिलाबाबत विचार केला आहे. सदर बिल कौन्सिलांतच चालू असून असेंब्लीकडे विचाराकरितां गेलें नसतांना जर असेंब्ली बरखास्त झाली तर तें लुप्त होत नाहीं. ( ४ ) थ्या पोटकलमांत असेंब्लीनें मंजूर केलेलें बिल कौन्सिलमध्यें आपला मार्ग चालत असतांना असेंब्ली जर बरखास्त झाली तर या बरखास्त होण्याचा हिसका असेंब्लीनें मंजूर केलेल्या बिलाला बसून असेंब्लीबरोबर तेंही लयाला जातें; व मग 'नवी असेंब्ली, नवें बिल' असें घडणें ओघानेंच प्राप्त होतें. लेजिस्लेटिव्ह कौन्सिल हें कधींच बरखास्त न होणारें असल्यामुळें बिलांबाबत आणखी गोंधळ किंवा घोटाळा होण्याचें पुष्कळ अंशीं टळलें आहे.

गव्हर्नर ६० ( १ ) या कलमाप्रमाणें कायदेमंडळाचा एक घटक आहे; म्हणून ज्या वेळीं एखादें बिल दोन्ही सभांनीं मंजूर केल्यानंतर गव्हर्नरची अनुमति मिळण्यासाठीं त्याच्याकडे पडून असतें ( तसेंच त्यानें सदर बिल गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां पाठविलें किंवा गव्हर्नर जनरलनें तें राजेसाहेबांच्या मर्जीवर सोपविलें अशा वेळीं ) अशा स्थितींत जर असेंब्ली बरखास्त झाली तर तें बिल, कौन्सिलांत पडून असतांना जसें लोप पावतें तसें, वास्तविक लोप पावावयास पाहिजे; परंतु ७३ ( ४ ) मधील शब्दयोजनेनें तसें तें लोप पावत नाहीं असेंच गृहीत धरलें पाहिजे. ही गोष्ट इंग्रजी पार्लमेंटच्या नियमापेक्षां निराळी आहे. इंग्लंडांत राजाच्या मंजुरीकरितां एखादें बिल वाट पाहत असतांना जर

कॉमन्स सभा बरखास्त झाली तर त्या सभेबरोबरच तें बिल नष्ट होतें. सुकृत अथवा दुष्कृत ज्याच्या त्याच्या बरोबर निघून जावें हें सरळच आहे. पुरुष मेला असतांना त्याच्याबरोबर त्याचें कर्म जातें—धर्मस्तमनुगच्छति—असें उपनिषदांतून व धर्मशास्त्रांतून वर्णन आलें आहे. तशांतलीच ही गोष्ट आहे.

( इ ) आतां मध्यवर्ती कायदेमंडळांतील वरिष्ठ सभा व प्रांतिक वरिष्ठ सभा यांची जातां जातां थोडीशी तुलना करूं. या वरिष्ठ सभांचा मुळांत हेतु असा कीं. कायदे झटपटीनें व अविचारानें मंजूर न होतां जरा संथपणें व धिम्या गतीनें हें कायदे करण्याचें काम चालावें; दोघांमधील फरक असे:—

( १ ) मध्यवर्ती वरिष्ठ सभा व कनिष्ठ सभा यांच्या सभासदांचें प्रमाण २:३ असें आहे तर प्रांतिक वरिष्ठ सभांतील सभासदांची संख्या कनिष्ठ सभांतील सभासदांच्या संख्येच्या $\frac{१}{४}$ किंवा $\frac{१}{५}$ इतकी आहे. म्हणजे जोडबैठकांतून फीडरल क्षेत्रांत वरिष्ठ सभेचा संख्येच्या दृष्टीनें चांगलाच वरचष्मा आहे हें चटदिशीं नजरेंत भरतें.

( २ ) प्रांतिक वरिष्ठ सभांतून. फीडरल वरिष्ठ सभेंत लागतात त्याप्रमाणें. खर्चाच्या मागण्या मंजूर करून घ्याव्या लागत नाहींत.

( ३ ) ७४ ( २ ) कलमाप्रमाणें कौन्सिलांत उगम पावलेलें व मंजूर झालेलें बिल जर असेंब्लीनें नाकारलें तर त्याच्या विचाराकरितां प्रांतिक कायदेमंडळाची जोडबैठक घेतां येत नाहीं; तशी गोष्ट फीडरल कायदेमंडळाबाबत नाहीं.

( ई ) संयुक्त प्रांतांत असेंब्लीनें मंजूर केलेलीं कांहीं बिलें ना. कैलासनाथ कटजू यांनीं कौन्सिलापुढें मांडलीं. सदरहू विचार लांबणीवर टाकण्यांत यावा अशी कौन्सिलांतील कांहीं सभासदांनीं कौन्सिलच्या अध्यक्षांना ( सर सीताराम ) विनंति केली. त्यावर ना. कटजू यांनीं हरकत घेतली कीं, "कनिष्ठ सभेकडून आलेल्या बिलाचा विचार करण्याचें काम लांबणीवर टाकण्याचा हक्क वरिष्ठ सभेला नाहीं; तिला तें बिल सिलेक्ट कमिटीपुढें धाडतां येईल; परंतु बिलाच्या बाबतची सिलेक्ट कमिटीचीही अवस्था असेंब्लींत पार पडली आहे." त्यावर कौन्सिलच्या

अध्यक्षांनीं पुढीलप्रमाणें आपला निर्णय दिला:—" बिलाचा विचार लांबणीवर टाकण्याचा कौन्सिलला पूर्णपणें हक्क आहे. अशा प्रकारचा हक्क कायद्यानें हिरावून घेतल्याचा कोठेंच उल्लेख नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्याच्या उलट तरतुदी कायद्यामध्यें आहेत. म्हणून प्रधानांची हरकत मला मान्य करितां येत नाहीं." संयुक्त प्रांतांतील वरिष्ठ सभेंतही बिहार, बंगाल, आसाम इ० ठिकाणच्या वरिष्ठ सभांप्रमाणें कॉंग्रेस पक्षाचें बहुमत नाहीं. तेव्हां त्या प्रांतांतील कॉंग्रेस सरकारला विरोध करून शक्य तितके आपले हक्क शाबूत राखण्याची बुद्धि कौन्सिलांतील बहुमताला, तसेंच अध्यक्षाला व्हावी हें ठीकच आहे. असें घर्षण असल्याशिवाय परस्परांच्या योग्य हक्कांबाबत वाद उत्पन्न होत नाहीं व तो झाला नाहीं म्हणजे कायदेपांडित्य चालवावयाला अवसर मिळत नाहीं व त्या योगें लोकशाहींतील निरनिराळ्या घटकांचा योग्य व इष्ट दिशेनें विकास होण्यास संधि मिळत नाहीं. बाकी प्रस्तुत बाबींचा विचार केल्यास हीं वरिष्ठ कौन्सिलें लोकांना संपूर्ण तऱ्हेनें नकोशीं अशीं आहेत: व जितक्या लौकर ही अडगळ नाहींशी होईल तितकें चांगलें होईल अशीच जमीनदार इ० वर्गाखेरीज सार्वत्रिक समजूत आहे. कौन्सिलांतील सभासदांनाही ही जाणीव नाहीं असें नाहीं. तेही प्रसंग पाहून नमतें घेतात. याचें उदाहरण संयुक्तप्रांतांतलेंच. स्पीकर, डेप्युटी स्पीकर इ० च्या पगारबिलाबाबतचें देतां येण्यासारखें आहे. असेंब्लीनें डे० स्पीकरचा पगार दरसाल दोन हजार रुपये व डे० प्रेसिडेंटचा दरसाल एक हजार रुपये याप्रमाणें पगार ठरविले. कौन्सिलनें त्यांत अशी दुरुस्ती सुचविली कीं, डे० प्रेसिडेंटप्रमाणें डे० स्पीकरचाही पगार दरसाल एक हजार रुपये असावा. ही दुरुस्ती असेंब्लीकडे विचाराकरितां गेली असतांना असेंब्लीनें ती आपल्या हक्कावर गदा घातल्याचें सांगून, एकमतानें धुडकावून लावली. त्यानंतर कौन्सिलानें मुकाट्यानें असेंब्लीनें केलेली सूचना मान्य केली.

(उ) लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें नसलेल्या मध्यप्रांत वऱ्हाड, ओरिसा, पंजाब, वायव्य सरहद्द. सिंध या पांच प्रांतांत वरील कलमांतील बराचसा भाग लागू पडत नाहीं. पहिलें व तिसरें पोटकलम व चौथ्या

पोटकलमांतील कांहीं भाग अजीबात गाळल्यासारखाच मानला पाहिजे. फक्त 'अधिवेशन समाप्त झालें म्हणजे बिल लोप पावत नाहीं' व 'असेंब्ली बरखास्त झाली म्हणजे कोणतेंही बिल लोप पावतें' एवढ्या दोनच गोष्टी लागू पडतात हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

लेजिस्लेटिव्ह कौन्सिलें असलेल्या प्रांतांतून बिलांचे मंजूर होणें

**७४.**—( १ ) या कलमाच्या तरतुदींना बाध न आणतां एखादें बिल उपसूचना विरहित अथवा फक्त दोन्ही सभागृहांनीं मान्य केलेल्या उपसूचनांसह दोन्ही सभागृहांनीं त्याला मान्यता दिल्याशिवाय लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असलेल्या प्रांताच्या कायदेमंडळाच्या दोन्ही सभांनीं मंजूर केलें असें मानण्यांत येणार नाहीं.

(२) लेजिस्लेटिव्ह असेब्लीनें मंजूर करून लेजिस्लेटिव्ह कौन्सिलकडे पाठविलेले एखादें बिल जर कौन्सिलांत ते आल्यापासून बारा महिने संपण्याच्या पूर्वी गव्हर्नरच्या अनुमतीकरितां ठेवले गेले नाहीं तर गव्हर्नरनें सदर बिलाचा विचार करून त्याच्यावर मतें घेण्याकरितां दोन्ही सभांची एक जोडबैठक बोलवावी.

मात्र सदर बिल पैशासंबंधींचें आहे अगर आपल्या जादा जबाबदारीला स्पर्श करणारें आहे असें गव्हर्नरला आढळून आले तर गव्हर्नरानें वर उल्लेखिलेली बारा महिन्यांची मुदत संपलेली नसली तरी वरील कारणाकरितां दोन्ही सभांची जोड-बैटक बोलवावी.

या पोटकलमांतील वरील तर्जावजीअन्वये करावयाची कामगिरी गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाची आहे.

( ३ ) या कलमाच्या तरतुदींना धरून बोलाविलेल्या दोन्ही सभांच्या जोड-बैठकींत जर एखादें बिल कांहीं उपसूचना असल्यास जोडबैठकींत मंजूर झालेल्या उपसूचनांसहवर्तमान दोन्ही सभागृहांच्या हजर असलेल्या आणि मत देणाऱ्या सभासदांच्या बहु संख्येच्या बहुमतानें मंजूर झालें तर तें या कायद्याच्या हेतूंस्तव दोन्ही सभागृहांनी मंजूर केले असें मानण्यात येईल.

मात्र अशा जोडबैठकीत—

( क ) सदर बिल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलने उपसूचनांसह मंजूर करून असेंब्ली-कडे परत पाठविलेलें नसल्यास सदर बिलाला उपसूचना सुचवितां येणार नाहीत; फक्त बिल मंजूर करण्याच्या कामीं झालेल्या दिरंगाईमुळें आवश्यक असणाऱ्या कांहीं उपसूचना असल्यास त्या सुचवितां येतील.

( ख ) जर सदर बिल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलनें दुरुस्त्यांसह मंजूर करून परत पाठविलें असेल तर फक्त वर सांगितलेल्याच आणि ज्या बाबतींत दोन्ही सभांचें

एकमत झालेलें नाहीं अशा गोष्टींना सुसंगत असणाऱ्या दुसऱ्या कांहीं उपसूचना सुचवितां येतील.

आणि या पोटकलमाखालीं कोणत्या उपसूचनांना परवानगी द्यावी याबाबतचा अखेरचा निकाल जोडबैठकीच्या अध्यक्षानें द्यावयाचा आहे.

(अ) ७४ व्या कलमाच्या (१) ल्या पोटकलमांत सर्वसाधारणपणें कनिष्ठ व वरिष्ठ अशा दोन्ही प्रांतिक कायदेमंडळांना समान अधिकार असल्याचें सांगितलें आहे. दुसऱ्या पोटकलमांत लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें एखादें बिल मंजूर केलें व कौन्सिलकडे पाठविलें आणि कौन्सिलनें त्याचा बारा महिनेपर्यंत विचार केला नाहीं तर गव्हर्नरनें असेंब्ली व कौन्सिल यांची जोडबैठक बोलावलीच पाहिजे. यांतून तर्कानें असा अर्थ निघतो कीं, कौन्सिलनें मंजूर केलेलें बिल जर असेंब्लीनें विचारांत घेतलें नाहीं तर त्याकरितां मात्र जोडबैठक बोलावली पाहिजे, असा बंधनकारक नियम नाहीं. या दृष्टीनें पाहिल्यास असेंब्लीपेक्षां कौन्सिलचे अधिकार मर्यादित करून ठेविले आहेत. पैशाच्या बिलाबाबत किंवा गव्हर्नरच्या जादा जबाबदारीबाबत मात्र हा बारा महिन्यांचा नियम लागू नाहीं. पैशाच्या बिलाबद्दल केलेला अपवाद रास्तच आहे; कारण दरवर्षाला कायदेमंडळापुढें अंदाजपत्रक मांडलेंच पाहिजे असा ७८ ( १ ) कलमान्वयें निर्बंध घातला आहे आणि खर्चाच्या मागण्याही दरसाल मंजूर करून घेतल्या पाहिजेत; खर्च भागविण्याकरितां अर्थात् कर बसविणें हें ओघानेंच प्राप्त होतें. त्यांतील कित्येक करांचीं बिलें दरसाल कायदेमंडळांनीं मंजूर करावीं लागतात. अशा वेळीं असेंब्लीनें मंजूर केलेलें करासंबंधींचें बिल—हा प्रसंग उलट कौन्सिलवर कधींच येणार नाहीं, कारण ८२ ( १ ) कलमाप्रमाणें कौन्सिलांत पैशासंबंधींचें बिल प्रथमतः मांडतांच येणार नाहीं; तेव्हां असेंब्ली अशा बिलाचा विचार करणार नाहीं ही गोष्ट शशविषाणाप्रमाणें असंभाव्य कोटींतली आहे—जर कौन्सिलनें वेळेवर विचारांत घेऊन मंजूर केलें नाहीं तर अनवस्थाप्रसंग ओढवायचा म्हणून वरील अपवाद घातला आहे; त्याच्याच जोडीला गव्हर्नरवर सोपविलेल्या जादा जबाबदारीचा संबंध येणारीं बिलें घातलीं आहेत; उघडच आहे कीं, एकदां जादा जबाबदारीचें तत्त्व मान्य केलें कीं त्याच्या संरक्षणार्थ प्रत्येक ठिकाणीं अपवाद करावे लागतात; त्यांपैकींच ही कायदे

करण्याबाबतची गोष्ट आहे. आणि ५२ कलमांतील या जादा जबाबदाऱ्या इतक्या सर्वंकष व सर्वव्यापी आहेत कीं त्या केव्हां, कोठें व कशा अनपेक्षित तऱ्हेनें आपलें डोकें वर काढतील, याचा कांहींच नेम सांगवत नाहीं. (२) ऱ्या पोटकलमांतील मर्यादात्मक भागांत ज्या गोष्टी गव्हर्नराला कराव्या लागणार त्या त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें कराव्या असें स्वच्छ लिहिलें आहे. वास्तविक ५२ व्या कलमांतील जादा जबाबदाऱ्यांबाबत गव्हर्नरनें **आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें** निर्णय द्यावयाचा असून म्हणजे मंत्र्यांचा सल्ला घेऊन मगच कारण पडलें तर आपलें म्हणणें नाइलाजास्तव अमलांत आणावयाचें अशी कायद्याची स्पष्ट आज्ञा असतांना आणि बजेटांतील असेंब्लीनें कमी केलेल्या खर्चाच्या मागण्या मुळाइतक्या आपल्या मताप्रमाणें चढविण्याबद्दल ८० (१) (ख) कलमांत स्पष्ट उल्लेख असतांना या कलमांत मात्र या दोन्ही गोष्टींबद्दलच्या बिलांस कौन्सिलनें बारा महिन्यांच्या आंत विचारांत न घेतल्यास जोडबैठक भरविण्याचा जो अधिकार गव्हर्नराला देण्यांत आला आहे तो त्यास **आपल्या मर्जीप्रमाणें** गाजवितां यावा हें विसंगत दिसतें. कदाचित् असेंही असेल कीं, **कोणत्या कारणास्तव** जोडबैठक बोलवावयाची यावर भर न देतां **बैठक बोलवावयाची** याच गोष्टीवर भर दिल्यामुळें— आणि कायदेमंडळाची बैठक बोलावण्याचा अधिकार ६२ (२) (क) कलमान्वयें गव्हर्नरनें **आपल्या मर्जीप्रमाणें** वापरावयाचा आहे—गव्हर्नरला आपली मर्जी चालविण्यास वाव देण्यांत आलेला दिसतो.

(आ) प्रांतिक कायदेमंडळाच्या जोडबैठकीबद्दल या कलमांत शेवटीं जो उल्लेख आहे तसाच फीडरल कायदेमंडळाच्या जोडबैठकीबाबत ३१ (४) या कलमांत थोड्याफार फरकानें आलेला आहे. फरक असा कीं, प्रांतिक कायदेमंडळाच्या बाबतींत सदर बिलाचा उगम असेंब्लींत झालेला असला पाहिजे, मग तें कौन्सिलकडे आलेलें असलें पाहिजे आणि कौन्सिलनें दुरुस्त्या सुचवून अगर न सुचवितां पुनः परत असेंब्लीकडे पाठविलेलें असलें पाहिजे— इतकी सर्व परिस्थिति असल्यावर जोडबैठक भरून हजर असलेल्या व मत देणाऱ्या असेंब्ली व कौन्सिलच्या सभासदांच्या बहुमतानें निर्णय ठरावयाचा. हा फरक फीडरल कायदेमंडळाच्या

बाबत केलेला नाहीं. तेथें कोणत्याही सभागृहांत बिल मांडलेलें असलें तरी चालतें आणि दोन्ही सभागृहांत मतभेद झाला म्हणजे जोडबैठक गव्हर्नर जनरलला बोलविनां येते. त्याबाबतचीं कलमें प्रांतिक घटनेंतल्यापेक्षां किंबहुना इतर स्वायत्त वसाहतींच्या घटनेंतल्यापेक्षां अधिक गुंतागुंतीचीं व घोटाळा उत्पन्न करणारीं विनाकारण केलीं गेलीं आहेत. फीडरल व प्रांतिक कायदेमंडळांबाबत वर जो फरक दाखविण्यांत आला आहे तो ८२ ( १ ) कलमांतील 'कराचीं बिलें किंवा कर्ज काढण्याचीं बिलें कौन्सिलमध्यें प्रथम मांडतां येत नाहींत' हा जो कौन्सिलांचा कमीपणा धरण्यांत आला आहे त्याला अनुसरूनच जोड बैठका बोलावण्याबाबत प्रांतिक कौन्सिलांना लागू केलेला दिसून येतो.

८२ ( १ ) कलमासारखा फीडरल वरिष्ठ सभागृहाबाबतचा कमीपणा ३७ ( १ ) या कलमांत आलेला आहे. परंतु जोडबैठका बोलावण्याबाबत फीडरल कायदेमंडळांत परस्परांत समानता धरण्यांत आली आहे. हा विषय समजण्यास क्लिष्ट असला तरी ढोबळ मानानें एवढें सांगतां येईल कीं, फीडरल कायदेमंडळांची रचना, दोन सभागृहांचें संख्याबल, दोघांच्या अधिकारांची समानता आणि सरतेशेवटीं फीडरल सरकारला असलेले सर्वसाधारण अधिकार यांचा व तत्समान सर्व प्रांतिक बाबींचा विचार केला असता प्रांतिक घटनेपेक्षां फीडरल घटना किती तरी प्रतिगामी स्वरूपाची व म्हणून त्याज्य आहे हें तेव्हांच लक्षांत येतें.

( इ ) कलम ८४ ( ४ ) प्रमाणें कायदेमंडळाच्या जोडबैठकीला कौन्सिलच्या अध्यक्षानें अध्यक्षस्थान स्वीकारावयाचें असा नियम आहे. कौन्सिलचा अध्यक्ष हजर नसल्यास ८४ ( २ ) प्रमाणें जोडबैठकांबाबत जे नियम ठरतील त्या नियमांत सांगितलेल्या इसमानें सदर बैठकांचें अध्यक्षस्थान स्वीकारावयाचें. या अध्यक्षाला अगर अध्यक्षाचें काम करणाऱ्या इसमाला कोणत्या उपसूचना ७४ ( ३ ) ( क ) व ( ख ) या कलमांना धरून आहेत अगर अविसंगत नाहींत हें ठरविण्याचा अखत्यार दिला आहे. अद्याप कोणत्याही प्रांतिक कायदेमंडळांच्या जोडबैठका भरण्याचा प्रसंग आलेला नाहीं.

संयुक्तप्रांत कौन्सिलांत असेंब्लीनें विचारार्थ पाठविलेल्या स्टांप

( अमेंडमेंट ) बिलाला, सरकारचा तीव्र विरोध असतांही, पांच उपसूचना मंजूर झाल्या. आतां हें दुरुस्त झालेलें बिल परत असेंब्लीकडे जाईल व असेंब्लीनें जर या दुरुस्त्या मान्य केल्या नाहींत तर, आणि कौन्सिलनें आपलें म्हणणें कायम ठेवलें तर, असेंब्ली आणि कौन्सिल यांची जोड-बैठक भरविण्याचा प्रसंग येणार असा रंग दिसत आहे. असें झाल्यास नवी घटना सुरू झाल्यापासून जोडबैठकीचा हा पहिलाच प्रसंग म्हणून गाजल्याशिवाय राहणार नाहीं. १९१९ च्या कायद्यान्वयें लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल ऑफ स्टेट यांमध्यें मतभेद आल्यास तो सोडविण्याकरितां जोडबैठका भरविण्याचा तोडगा निर्माण करून ठेवला होता [ कलम ६७ (३) ]; फेडरेशन स्थापन होईपर्यंत वरील कलम इतर कित्येक कलमांप्रमाणें जिवंत आहे परंतु गेल्या १७।१८ वर्षांत एकही जोडबैठक भरविण्यांत आलेली नाहीं ही वस्तुस्थिति खरो-खर चिन्तनीय आहे. आपणच बागलबुवा निर्माण करावयाचा आणि मग तो मारायची तयारी करावयास लागावयाचें अशासारखा एकंदरींत हा सर्व प्रकार आहे. बरें, इंग्लंडाप्रमाणें या वरिष्ठ कौन्सिलांना ऐतिहासिक परंपरेचाही बिलकुल पाठिंबा नाहीं. साम्य एवढेंच ठेवलें आहे कीं, लॉर्डांची सभा आणि आमच्याकडील वरिष्ठ कौन्सिलें हीं कधींही बरखास्त केलीं जात नाहींत. मात्र आमच्या कौन्सिलांची स्थिति ज्ञानेश्वरांनीं वर्णिलेल्या संसाररूपी अश्वत्थवृक्षासारखी आहे:—

हा संसारवृक्ष तैसा । मोडतु मांडतु सहसा ।
नेदखौनि लोकु पीसा । अव्ययो मानी ॥
( राजवाडे ) ज्ञानेश्वरी, १५. १३७

म्हणजे दर तीन वर्षांनीं $\frac{1}{3}$ सभासद बदलत असले तरी कौन्सिल हें चिरंतन आहे; संपूर्ण तऱ्हेनें एकदम केव्हांच खलास होत नाहीं. म्हणूनच कीं काय कोण जाणे, या चिरंतन सभेच्या जवळ जवळ चिरंतन अध्यक्षाला जोडबैठकीचें अध्यक्षस्थान दिलें आहे. अशा प्रसंगीं मात्र असेंब्लीच्या अध्यक्षाला म्हणजे स्पीकरला सामान्य सभासदापलीकडे कोणतीही अधिक किंमत नाहीं. सरकारी तऱ्हेनें जी मानाची रांग लावण्यांत

आली आहे त्यांत सुद्धां आरंभीं सर्व मंत्री, मग कौन्सिलचा अध्यक्ष आणि शेवटीं असेंब्लीचा स्पीकर असा क्रम लावण्यांत आलेला आहे.

बिलाना अनुमति

७५.—प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें मंजूर केलेले किंवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असलेल्या प्रांतांच्या बाबतींत प्रांतिक कायदेमंडळाच्या दोन्ही सभागृहांनीं मंजूर केलेलें प्रत्येक बिल गव्हर्नरकडे सादर करण्यांत येईल आणि गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणे राजेसाहेबांच्या नांवानें बिलाला अनुमति तरी देईल किंवा अनुमति देण्याचें नाकारील अथवा गव्हर्नर जनरलच्या विचारार्करितां तें राखून ठेवील.

मात्र गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणे तें बिल कायदेमंडळाकडे परत पाठवूं शकेल व त्याच्याच बरोबर संदेश पाठवून विनंति करील कीं, कायदेमंडळाच्या एका अथवा दोन्ही सभागृहांनीं त्या बिलाचा किंवा त्यांतील विशिष्ट कलमांचा फेरविचार करावा आणि त्यांतल्या त्यांत गव्हर्नरनें आपल्या संदेशांत शिफारस केलेल्या दुरुस्त्या बिलांत प्रविष्ट करण्याच्या इष्टतेबद्दल विचार करावा आणि अशा तऱ्हेने एखादें बिल परत केले असतां एक अथवा दोन्ही सभागृहे त्याअन्वयें त्या बिलाचा फेरविचार करतील.

( अ ) ज्या प्रांतांतून कायदेमंडळाचीं दोन सभागृहें आहेत तेथें दोन्ही सभांनीं बिल मंजूर केल्यानंतरच गव्हर्नरनें त्याला संमति द्यावयाची असते. कोणी म्हणेल कीं ही गोष्ट अगदीं उघड आहे. परंतु कित्येक वेळां सत्यसृष्टि ही कल्पनासृष्टीपेक्षां नवलपूर्ण असते. " टासमानियाच्या ( ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थपैकीं एक घटक संस्थान ) ॲक्टिंग गव्हर्नरनें व गव्हर्नरनें वरिष्ठ कायदेकौन्सिलची संमति न मिळालेली असतांनाच दोन बिलांना राजेसाहेबांच्या नांवानें अनुमति दिल्याचीं " उदाहरणें प्रो. कीथ यांनीं आपल्या 'गव्हर्मेंट्स ऑफ दि ब्रिटिश एंपायर ( पृ. ३०४) ' या पुस्तकांत नमूद केलीं आहेत.

( आ ) ब्रिटिश राज्यघटनेंत सुद्धां राजेसाहेबांना कोणत्याही बिलांना संमति देण्याचा वा न देण्याचा कायदेशीर अधिकार आहे. परंतु इसवी सन १७०७ नंतर सदर अधिकाराचा इंग्लंडच्या राजानें कधींही उपयोग केलेला नाहीं. जी गोष्ट राजाच्या हातचा मळ होती ती आजच्या परिस्थितींत घडून आल्यास उत्पातकारक अथवा प्रचंड क्रांति किंवा उलथापालथ करणारी मानली जाईल यांत शंका नाहीं.

'कालो वा कारणं राज्ञो राजा वा कालकारणम् ।
इति ते संशयो मा भूद् राजा कालस्य कारणम् ॥ '

असा एक महाभारतांत महत्त्वाचा श्लोक आलेला आहे. त्यांत राजा श्रेष्ठ का काल श्रेष्ठ, असा प्रश्न उपस्थित करून राजा श्रेष्ठ, असा निःसंदिग्ध रीतीनें प्रश्नाचें उत्तर म्हणून सिद्धान्त प्रतिपादन केला आहे. परंतु इंग्लंडांतील 'राजा' या संस्थेचा इतिहास पाहिला असतां 'राज्ञः कालो हि कारणम्' असा सिद्धान्त करणें भाग पडतें. यालाच इंग्रजींत 'टाइम स्पिरिट' म्हणजे 'कालमहिमा' असें म्हणतात.

परंतु या ७५ व्या कलमांतील गव्हर्नर किंवा गव्हर्नर जनरल यांना राजेसाहेबांच्या नांवानें उपयोगांत आणण्याकरितां जे अधिकार दिले आहेत ते इंग्लंडच्या राजासारखे नाममात्र नसून प्रसंग पडल्यास गव्हर्नरांनीं किंवा गव्हर्नर जनरलानें ते वापरण्यास मागें पुढें पाहतां कामा नये अशी त्यांना स्पष्ट सूचना देण्यास ब्रिटिश मुत्सद्दी बिलकुल कचरत नाहींत. तसे प्रसंग येऊं द्यावयाचे कीं नाहीं हें हिंदी लोकमताच्या सामर्थ्यावर अवलंबून आहे. प्रबळ लोकमताच्या पाठिंब्यावर काम करीत असलेल्या प्रधानमंडळांना या जादा अधिकारांना भिण्याचें बिलकुल कारण नाहीं. प्रधानांचें तोंड गव्हर्नरांकडे किंवा गव्हर्नर जनरलकडे वळलेलें असतां कामा नये; तर तें आपणास निवडून देणाऱ्या मतदारसंघाकडे व त्याहीपेक्षां विराट् रूपानें पसरलेल्या जनताजनार्दनाकडे सदैव वळलेलें असलें पाहिजे. त्यांच्या जोरावरच स्वातंत्र्याकरितां काय किंवा लहानसहान हक्कांकरितां काय ब्रिटिश सरकारशीं हिंदी लोकांना झगडावयाचें आहे. याबाबत मद्रास कायदेमंडळानें मंजूर केलेल्या 'मद्रास शेतकरी कर्जनिवारण बिला'कडे साहजिकच लक्ष जातें. मद्रास गव्हर्नरनें सदर बिलाला आपण अनुमति न देतां तें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां ठेवून दिलें; बिल कायदेमंडळांत मंजूर होऊन बरेच दिवस लोटले तरी गव्हर्नर जनरलची मंजुरी येईना; गव्हर्नर जनरल त्याला राजेसाहेबांनीं काढलेल्या 'आज्ञापत्रां'तील १२ व्या कलमान्वयें विचार करीत असला पाहिजे, पण वास्तविक त्या कलमांत फीडरल व प्रांतिक विषयांची जी समान यादी आहे, त्या यादींतील

एखाद्या विषयासंबंधानेंच गव्हर्नर जनरलला प्रांतिक कायदेमंडळांनीं मंजूर केलेल्या व गव्हर्नरनें विचाराकरितां ठेवून दिलेल्या बिलाबाबत अधिकार देण्यांत आला आहे. आणि 'शेतकरी' व 'सावकारी' हे विषय प्रांतिक यादींतले आहेत; परंतु हे विषय सर्व प्रांतांमधून सारखेच महत्त्वाचे असल्या-मुळें देशव्यापक दृष्टीनें विचार करून त्यांची युक्तायुक्तता ठरविण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलकडे वरील ७५ व्या कलमान्वयें ठेवलेला दिसतो; याप्रमाणें गव्हर्नर जनरलचा विचार चालू असतांना बिहार-संयुक्तप्रांतांत फेब्रुवारी १९३८ मध्यें प्रधानमंडळांनीं राजबंदींच्या मुक्ततेच्या प्रश्नावर राजीनामे दिले; त्याबरोबर 'शुष्केणार्द्रं दह्यते मिश्रयोगात्' ('वाळल्या-बरोबर ओलेंही जळतें') या म्हणीप्रमाणें मद्रास शेतकरी कर्ज निवारण बिला'ची इतिश्री होते कीं काय अशी शंका उत्पन्न झाली होती. शिवाय आपल्याच लोकांपैकीं कित्येक सावसावकारांनीं गव्हनर जनरलकडे अर्जविनंत्या केल्या होत्या कीं, गव्हर्नर जनरलनें बिलाला संमति देऊं नये. ही कुणकुण लागतांच मुख्य प्रधान श्री. चक्रवर्ती राजगोपाळाचार्य यांनीं जाहीर केलें कीं, गव्हर्नर जनरलची बिल फेटाळून लावण्याची छातीच नाहीं; त्यानें तसें केल्यास तें आव्हान स्वीकारण्या-ची आमची केव्हांही तयारी आहे. परंतु राजबंद्यांबाबतचें राजीनामा-प्रकरण सलोख्यानें मिटलें; व मद्रास शेतकरी कर्ज निवारण बिलाला गव्हर्नर जनरलनें संमति दिली व त्याचें कायद्यांत रीतसर रूपान्तर झालें. अडाणी लोकांना ताबडतोब न उमगणाऱ्या राजकीय प्रश्नांबाबत काय किंवा ताबडतोबीच्या प्रत्यक्ष हिताच्या आर्थिक प्रश्नांबाबत काय 'शक्तीनें मिळतीं राज्यें । युक्तीनें सर्व होतसे ॥' या समर्थोक्तीप्रमाणें यश मिळण्यास शक्ती-युक्तींचा राजकारणांत योग्य मिलाफ झालेला असला पाहिजे. असो. बिलांना संमति देणें अथवा न देणें किंवा गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां ठेवून देणें याबाबत गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें वागावयाचें आहे. म्हणजे याबाबत तो प्रधानांचा सल्ला घेणार नाहीं; मात्र तो गव्हर्नर जनरल व भारतमंत्री यांच्या नियंत्रणाखालीं अशा सर्व बाबींत वागेल असें मागें अनेक-दां सांगितलें आहे. ब्रिटिश प्रघात असा आहे कीं, पार्लमेंटांत मंजूर झालेल्या प्रत्येक बिलाला राजेसाहेबांनीं संमति दिलीच पाहिजे. तेथें

'डिस्क्रीशन' ( स्वतःची ) 'कंट्रोल' ( इतरांचा ) वगैरे कांहीं नाहीं. पुनः वाटल्यास गव्हर्नरनें सदर बिल आपल्या शिफारशीसह कायदेमंडळाकडे पाठवावें व त्यानें त्याप्रमाणें बदल करण्याबाबत कायदेमंडळाला संदेश पाठवावा. या तरतुदीप्रमाणें अद्याप कोणत्याही गव्हर्नरनें कायदेमंडळाकडे संदेश पाठविलेला नाहीं. अशा प्रकारें बिल पुनः कायदेमंडळाकडे पाठविण्यांतील हेतु असा कीं, त्या बिलाला व्हीटो म्हणजे नकार ( लॅटिन भाषेमधील 'व्हीटो' या शब्दाचा अर्थ 'मी बंदी करतों' असा आहे ) देण्याचा प्रसंग येऊं नये. बिलाचा जेवढा भाग फेरविचाराकरितां पाठविलेला असतो तेवढ्यापुरताच विचार करण्याचा अधिकार कायदेमंडळांना असतो. वर लिहिल्याप्रमाणें १९३५ च्या कायद्याखालीं अद्याप 'बिलें परत पाठविण्या'चा प्रसंग आलेला नसला तरी, १९१९ च्या कायद्यान्वयें मद्रास इलाख्यांत याबाबत एक प्रसंग उद्भवला. तो असा:— 'हिंदु धार्मिक देणग्या बिल' कायदेमंडळांत १९२३ सालीं मंजूर होऊन गव्हर्नरकडे संमतीकरितां सादर करण्यांत आलें. गव्हर्नरला त्या बिलांत कांहीं दुरुस्त्या होणें जरूर आहे असें वाटल्यावरून त्यानें तें बिल मद्रास कायदेकौन्सिलकडे परत धाडून दिलें. परंतु तें बिल कौन्सिलकडे परत येईपर्यंत बिल ज्या कौन्सिलनें मंजूर केलें तें कौन्सिल बरखास्त झालें होतें आणि नवीन कौन्सिल निवडून येऊन त्याचें अधिवेशन चालू होतें. सदर अधिवेशनांत गव्हर्नरनें केलेल्या दुरुस्त्या मांडल्या जाऊन त्या मंजूर करण्यांत आल्या ( १९२५ ). परंतु ज्या कौन्सिलनें मुळांत बिलाला मंजुरी दिली होती त्याच्या व्यतिरिक्त दुसऱ्या कौन्सिलला त्या बिलाचा फेरविचार करतां येतो काय हा प्रश्न सदर कायद्याखालीं झालेल्या खटल्यांत उपस्थित केला गेला. या खटल्यांतील निकालाच्या धास्तीनें कीं काय कोण जाणे, मद्रास कौन्सिलनें पुनः याबाबत नवीन कायदा केला (१९२७) व त्याअन्वयें मागील कायद्याप्रमाणें झालेलें सर्व काम कायदेशीर मानलें गेलें. अशीच भानगड १९३५ च्या कायद्यान्वयें निर्माण झाली तर त्याबाबत तरतूद ८७ ( १ ) कलमानें करून ठेवण्यांत आल्याचें दिसून येतें. या कलमान्वयें कायदेमंडळांत घडलेल्या गैरशिस्त गोष्टींची चौकशी कोर्टांत करितां येणार नाहीं.

( इ ) गव्हर्नरनें कायदेमंडळानें मंजूर केलेल्या बिलाला संमति दिली कीं लगेच त्या बिलाचा कायदा होतो. १९१९ च्या कायद्यानें प्रत्येक प्रांतिक बिलाला गव्हर्नर जनरलची संमति ( १९१९ चा कायदा कलम ८१ [३] ) लागत असे. परंतु प्रस्तुतच्या प्रांतिक स्वराज्याच्या काळांत ही आवश्यकता काढून टाकलेली आहे. आतां वरील ७५ व्या कलमांत कोणतीं बिलें गव्हर्नरनें गव्हर्नर जनरलच्या संमतीकरितां ठेवून दिलींच पाहिजेत त्याचा उल्लेख नाहीं. तें काम राजेसाहेबांनीं गव्हर्नरांना दिलेल्या 'आज्ञापत्रा'च्या १७ व्या कलमानें केलें आहे. तें कलम असें:—

" १७ गव्हर्नर जनरलच्या संमतीकरितां बिलें ठेवून देण्याच्या कोणत्याही अधिकाराला बाध न आणतां आमच्या गव्हर्नरनें खालील विषयांसंबंधींच्या बिलांना आमच्या नांवानें संमति देऊं नये, तर तीं आमच्या गव्हर्नर जनरलच्या विचारार्थ पाठवून द्यावींत:—

( क ) ब्रिटिश हिंदुस्थानाला लागू असलेल्या पार्लमेंटच्या कोणत्याही कायद्याला रद्द करणाऱ्या अगर विरोधी असणाऱ्या तरतुदी असणारें कोणतेंही बिल;

( ख ) एखाद्या बिलानें हायकोर्टाच्या अधिकारास धक्का बसून हायकोर्टाला प्रतिष्ठेनें काम करणें अशक्य होत आहे असें गव्हर्नरास वाटत असल्यास तशा तऱ्हेचें बिल;

( ग ) खंड ५ भाग ३ यांतील ( ब्रिटिश व्यापारी, कारखानदार, वैद्य इत्यादींना संरक्षण ) अथवा कलम २९९ यांतील ( सक्तीनें जमीन इत्यादि संपादन करणें ) तरतुदींना विरोधी आहे असें एखाद्या बिलाबद्दल जर गव्हर्नराला वाटलें तर तसलें बिल;

( घ ) कायमधारापद्धतीचें स्वरूप जेणेंकरून बदलेल असें कोणतेंही बिल.

( घ ) पोटकलमांतील विषयासंबंधीं ( कायमधारापद्धति ) च्या बिलास जर कायद्यान्वयें बिल पुढें मांडण्याकरितां गव्हर्नरची संमति लागत असेल तर बिल मांडण्यास गव्हर्नरनें संमति देण्याचें नाकारूं नये." असल्या बिलाची मांडण्याची पूर्वतयारी म्हणून बंगाल मंत्रिमंडळानें

एका ब्रिटिश गृहस्थाच्या अध्यक्षतेखालीं चौकशी करण्याकरितां एक कमिशन नेमल्याचें नुकतेंच जाहीर केलें आहे. या कमिशनच्या रिपोर्टाच्या आधारें कायमधारापद्धतीसंबंधीं बिल तयार होऊन तें गव्हर्नरच्या संमतीनें वरील ( घ ) कलमान्वयें बंगाल कायदेमंडळापुढें योग्य वेळीं मांडलें जाईल.

७५ व्या कलमांतील भाषेवरून हें स्पष्ट लक्षांत येईल कीं गव्हर्नर-ला साक्षात् राजेसाहेबांच्या मर्जीकरितां व अनुमति मिळविण्याकरितां बिल पाठविण्याचा अधिकार नाहीं. तें काम पुढील कलमान्वयें गव्हर्नर जनरलकडे सोपविण्यांत आलें आहे. ऑस्ट्रेलियांतील संस्थानें फेडरेशन स्थापन होण्यापूर्वी स्वतंत्र संस्थानें होतीं व तेथील गव्हर्नर फेडरेशनच्या पूर्वी राजेसाहेबांच्या संमतीकरितां बिलें पाठवीत असत. फेडरेशन झाल्या-नंतरही तीच पूर्वीची पद्धत ऑस्ट्रेलियन संस्थानांतून कायम करण्यांत आली आहे. तेथें मधल्या गव्हर्नर जनरलचें काम लागत नाहीं. हिंदुस्थानांत ऑस्ट्रेलियाच्या विरुद्ध परिस्थिति होती म्हणजे सर्व प्रांतिक गव्हर्नर हे गव्हर्नर जनरलचे केवळ मुनीम होते. आतां कोठें प्रांतिक सरकारांना थोडी फार स्वायत्तता देण्यांत आली असून तेवढ्या प्रमाणांत गव्हर्नरावरील गव्हर्नर जनरलची पक्कड शिथिल करण्यांत आली आहे. बाकी गव्हर्नर जनरलची सत्ता पूर्वीप्रमाणेंच सर्वस्पर्शी आहे.

( ई ) बंगालच्या जमीनदारांनीं बंगाल कायदेमंडळानें मंजूर केलेल्या 'बंगाल टेनन्सी ( अमेंडमेंट ) बिलास' गव्हर्नरनें संमति देऊं नये म्हणून व मध्यप्रांतांतील जमीनदारांनीं मध्यप्रांत कायदेमंडळानें मंजूर केलेल्या 'सी. पी. रिव्हिजन ऑफ लँड रेविन्यू एस्टेट्स बिला'ला गव्हर्नरनें संमति देऊं नये म्हणून अर्ज केला आहे. या प्रांताचे गव्हर्नर सदर बिलें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां धाडून देते झाले आहेत. अशाच स्वरूपाच्या 'मद्रास एस्टेट्स लँड ( ओरिसा अमेंड-मेंट ) बिला'बाबत जमीनदारांच्या विनंतीवरून ओरिसा गव्हर्नरनें तें बिल गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेवलें आहे. 'असें करणें हें मंत्र्यांच्या जबाबदारीवर अतिक्रमण आहे' असें ओरिसा मुख्य प्रधान

ना. विश्वनाथदास यांनीं जाहीर केलें असून गव्हर्नर जनरल लोककल्याणाच्या आड येणार नाहीं अशी आशा त्यांनीं प्रकट केली आहे.

(उ) ३ मे १९३८ रोजीं ओरिसा असेंब्लीनें मंजूर केलेल्या 'ओरिसा स्मॉल होल्डर्स रिलीफ बिला'ला ओरिसा गव्हर्नरनें अनुमति दिली. सरकारी पत्रकांत यासंबंधांत असें जाहीर केलें आहे कीं, "कांहीं सभासदांनीं सदर बिल फेरविचाराकरितां असेंब्लीकडे पाठविण्याबद्दल गव्हर्नरला विनंति केली होती; परंतु सदर बिलांतील योजना तात्पुरती असून आणीबाणीच्या प्रसंगाला तोंड देण्याकरितां करण्यांत आली असल्या-मुळें बिलाचा कायदा होण्यास विलंब लागल्यानें योजिलेला कार्यभाग होणार नाहीं म्हणून त्या विनंतीला मान देणें हें गव्हर्नरसाहेबांना शक्य झालें नाहीं."

विचाराकरितां राखून ठेवलेलीं बिलें

७६. (१) जेव्हां गव्हर्नरकडून एखादें बिल गव्हर्नर जनरलच्या विचारा-करितां राखून ठेवण्यांत येतें तेव्हां गव्हर्नर जनरल आपल्या मर्जीप्रमाणें सदर बिलास राजेसाहेबांच्या नांवें संमति दिल्याचें किंवा संमति नाकारल्याचें अथवा राजेसाहेबांनीं आपली पसंती दर्शविण्याकरितां राखून ठेवल्याचें जाहीर करील.

मात्र आपल्या मर्जीप्रमाणें गव्हर्नर जनरलला योग्य वाटल्यास त्यानें तें बिल कायदेमंडळाच्या एका अथवा दोन्ही सभांकडे (जसें असेल त्याप्रमाणें) परत पाठविण्यास गव्हर्नरास कळवावें आणि लगतच्या मागील कलमांतील शेवटच्या भागांत सांगितल्याप्रमाणें संदेशही पाठविण्यास लिहावें आणि अशा रीतीनें बिल परत आल्यावर कायदेमंडळाच्या एका अथवा दोन्ही सभागृहांनीं त्या बिलाचा त्याप्रमाणें फेरविचार करावा आणि त्यांनीं तें फिरून उपसूचनांसह अथवा उप-सूचनांशिवाय मंजूर केल्यास तें फिरून गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां सादर केलें जाईल.

(२) गव्हर्नराला एखादें बिल सादर केल्या दिवसापासून बारा महिन्यांच्या आंत राजेसाहेबांनीं त्याला संमति दिल्याचें जाहीर खबरेच्या द्वारा गव्हर्नरनें प्रसिद्ध केल्याशिवाय आणि करीपर्यंत राजेसाहेबांची पसंती दर्शविण्याकरितां राखून ठेवलेलें बिल प्रांतिक कायदेमंडळाचा कायदा होणार नाहीं.

(अ) मागील कलमांतील योजनांना धरूनच यांतील योजना आखण्यांत आली आहे. गव्हर्नर, गव्हर्नर जनरल, राजेसाहेब (भारत-मंत्र्याच्या सल्लयानें चालणारे) अशी या संमति देण्याच्या प्रकरणाबाबत

चढती पायरी लावलेली आहे. बिल कायदेमंडळाकडे परत पाठविण्याचें जें काम मागील कलमाप्रमाणें खुद्द गव्हर्नर करीत असे तेंच काम गव्हर्नर जनरल या कलमान्वयें गव्हर्नराकरवीं करवून घेत आहे, इतकाच फरक. गव्हर्नर जनरलनें 'विचार करावयाचा' व राजेसाहेबांनीं आपली 'पसंती व्यक्त करावयाची' हा केवळ भाषेचा फरक आहे. 'हिज एक्सलन्सी' व 'हिज मॅजेस्टी' यापैकींच तो फरक. प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीनें तात्पर्यार्थ एकच. दुसऱ्या पोटकलमांत सांगितल्याप्रमाणें १२ महिन्यांच्या आंत जर राजेसाहेबांकडून बिलाला संमति आली नाहीं तर तें बिल आपोआप गळून पडतें.

( आ ) समजा, एखादें बिल गव्हर्नरानें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून न ठेवतां आपली संमति देऊन त्याचें कायद्यांत रूपान्तर केलें तर गव्हर्नर जनरलला तो कायदा रद्द करण्याचा अधिकार ठेवलेला नाहीं. तो हक्क फक्त राजेसाहेबांना पुढील कलमान्वयें देण्यांत आलेला आहे. परंतु गव्हर्नर हा बिलांना संमति देण्याचें काम 'आपल्या मर्जीप्रमाणें' करितो व अशा सर्व बाबींत ५४ कलमान्वयें तो गव्हर्नर जनरलच्या देखरेखीखालीं वागतो व त्याला गव्हर्नर जनरलनें केलेले हुकूम पाळावे लागतात. अशा अप्रत्यक्ष रीतीनें बिलांना संमति देण्याच्या या प्रकरणाबाबत गव्हर्नर जनरल गव्हर्नरावर सत्ता चालवूं शकतो.

( इ ) गव्हर्नरनें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां कलम ७५ प्रमाणें राखून ठेवलेल्या बिलांना कलम ७६ अन्वयें गव्हर्नर जनरलनें संमति दिल्याचीं मुंबई प्रांतांतील पुढील दोन उदाहरणें लक्षांत घेण्यासारखीं आहेतः—

( १ ) १९३८ चा मुंबई कायदा नं. ७— १९३२ च्या मुंबई फिनान्स ॲक्टांत दुरुस्ती करणारा कायदा.

( २ ) १९३८ चा मुंबई कायदा नं. ८— मुंबई प्रांतांतील किरकोळ जमिनीच्या मालकांना तात्पुरती सवलत देणारा कायदा.

पहिल्या उदाहरणांत 'विजेवरील कर' वाढविण्यांत आला होता. 'वीज' ही बाब 'उभय यादींत' ३१व्या अनुक्रमांत दिली आहे.

अर्थात् याबाबत प्रांतिक व फीडरल अशा दोन्ही कायदेमंडळांना कायदे करण्याचा अधिकार आहे. परंतु आतांपर्यंत 'खर्च होणाऱ्या विजेवरील कर' ही बाब सर्वस्वी प्रांतिक होती. नव्या घटनेप्रमाणें ती 'उभय' होणार, ही चूक लक्षांत आल्यामुळें पार्लमेंटांत उपभारतमंत्री लॉर्ड स्टॅनले यांनीं कायद्यांत तसा लवकरच बदल करण्यांत येईल असें आश्वासन दिलें. तथापि अशी दुरुस्ती होईपर्यंत गव्हर्नरनें या 'उभय यादीं'तील विषयांपैकीं कोणत्याही विषयासंबंधींचें बिल गव्हर्नर जनरलकडे विचाराकरितां राखून ठेवल्यास तें कृत्य कायद्यांतील कलमांना व 'आज्ञापत्रां'तील एतद्विषयक सूचनांना धरूनच होणारें आहे. दुसरें बिल शेतकऱ्यांना कर्जाबाबत सवलती देण्यासंबंधींचें. सर्व प्रांतांत सारखा कायदा ठेवण्याच्या दृष्टीनें अशा बिला-संबंधीं संमतीचा अधिकार गव्हर्नर जनरलकडे ठेवण्यांत आला आहे. मुंबई प्रांतांतील अशाच स्वरूपाचीं आणखी कांहीं उदाहरणें:—१९३८ फेब्रुवारींत मुंबई कायदेमंडळानें मंजूर केलेल्या 'स्माल होल्डर्स रिलीफ बिला'ला गव्हर्नर जनरलनें मे १९३८ मध्यें संमति दिली; १९३८ जानेवारी-मध्यें मुंबई कायदेमंडळानें मंजूर केलेल्या 'हरिजनमंदिरपूजा बिला'ला १९३८ च्या मे महिन्यांत गव्हर्नर जनरलनें संमति दिली. 'सिटी ऑफ बॉंबे पोलिस (अमेंडमेंट) बिलाला' जून १९३८ मध्यें गव्हर्नर जनरलनें संमति दिली.

कायदे नामंजूर करण्याबाबत राजेसाहेबांचा अधिकार

७७.—(१) गव्हर्नरनें किंवा गव्हर्नर जनरलने संमति दिलेला कोणताही कायदा संमतीच्या तारखेपासून बारा महिन्यांच्या आंत राजेसाहेबांकडून नामंजूर करतां येईल आणि एखादा कायदा अशा तऱ्हेनें नामंजूर केला असतां गव्हर्नरनें तावडतोब ही नामंजुरी जाहीर खबरद्वारा प्रसिद्ध केली पाहिजे आणि या खबरेच्या तारखेपासून सदर कायदा रद्बातल समजण्यांत येईल.

(अ) आतांपर्यंत बिलांची मंजुरी नामंजुरी याबद्दल वाटाघाट चालू होती. परंतु या कलमांत जीं बिलें रीतसर कायद्याचें स्वरूप पावलीं त्या कायद्यांना नामंजुरी देण्याचा अधिकार राजेसाहेबांना देण्यांत आला आहे. गव्हर्मेंट ऑफ इंडिया बिलाची कॉमन्स सभेच्या कमिटींत चर्चा चालू असतां या कलमावर आक्षेप घेण्यांत आला कीं, "गव्हर्नर, गव्हर्नर

जनरल, राजेसाहेब यांना बिलांना मंजुरी न देण्याबाबत इतके भरीव अधिकार दिले असतांना आणखी कायद्यांना नामंजूर करण्याचा अधिकार जो राजेसाहेबांना देण्यांत आला आहे तो अनावश्यक अतएव निरुपयोगी आहे.'' यावर उत्तर देतांना भारतमंत्री सॅम्युअल होअर यांनीं या अधिकाराचें पुढीलप्रमाणें समर्थन केलें :—'' ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व घटना-कायद्यांतून अशासारखी तरतूद करून ठेविली आहे. राजेसाहेबांच्या राजपदाच्या खास हक्कांच्या दृष्टीनें ( प्रिरॉगेटिव्ह ) सदर कलमाची जरूरी आहे. हें कलम जर ठेविलें नाहीं तर, दुय्यम दर्जाच्या कायदेमंडळांनीं केलेल्या कायद्यांना नामंजुरी देण्याचा राजाचा खास अधिकार ( प्रिरॉगेटिव्ह ) नष्ट केल्याप्रमाणें होईल आणि हिंदुस्थानांतील कायदेमंडळें हीं पार्लमेंटच्या कायद्यानें अस्तित्वांत आलेलीं असल्यामुळें हीन दर्जाचीं आहेत; आपल्या पार्लमेंटप्रमाणें स्वयंभू व स्वतंत्र नाहींत. म्हणून सदर कलमाची जरूरी आहे. त्यानें बिचकून जाण्याचें कारण नाहीं. प्रत्यक्ष व्यवहारांत त्यानें अडचणी उत्पन्न होतील असें वाटत नाहीं.''

( आ ) हा नामंजूर केलेला कायदा तसें जाहीर केल्या दिवसापासून रद्द होतो. परंतु दरम्यानच्या काळांत त्या कायद्यानें कायदेशीरपणें उत्पन्न झालेल्या परिस्थितीची वाट काय? समजा, अशा एखाद्या कायद्याप्रमाणें एखाद्या इसमाला जमिनीच्या बाबत कांहीं हक्क निर्माण झाले तर कायदा रद्द झाल्याबरोबर ते हक्क नष्ट झाले काय? परंतु या संशयाचें निराकरण ज्युडिशियल कमिटीचे जस्टिस डफ यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे:—'' कायद्यांतिल कलमाच्या स्वच्छ व निःसंदिग्ध भाषेवरून कायदा करण्याचा असा स्पष्ट हेतु दिसतो कीं, दरम्यानच्या काळांत घडलेल्या सर्व खासगी हक्कांच्या व्यवहारांबाबत मागून राजानें नामंजूर केलेल्या कायद्याची कांहींच मात्रा चालूं शकत नाहीं; म्हणजे दरम्यानचे निर्णय अबाधित राहतात.'' 'जाहीर खबर' म्हणजे प्रांतांच्या सरकारी गॅझेटमध्यें दिलेली खबर [ कलम ३११ (२) ].

( इ ) अशा कायद्यांना जी नामंजुरी राजेसाहेबांकडून दिली जाते ती ऑर्डर इन कौन्सिल काढून व्यक्त केली जाते [पहा कलम ३०९(१)].

## अर्थविषयक बाबींतील रीत (प्रोसीजर)

वार्षिक अर्थविषयक पत्रक

**७८.**—(१) गव्हर्नर प्रत्येक जमाखर्ची वर्षाबाबत कायदेमंडळाच्या एका अथवा दोन्ही सभागृहांपुढें त्या वर्षाकरितां प्रांताच्या जमेच्या आणि खर्चाच्या अंदाजाचें एक पत्रक मांडावयास लावील; ह्या कायद्याच्या या खंडांत वरील पत्रकाचा 'वार्षिक अर्थविषयक पत्रक' असा उल्लेख करण्यांत आला आहे.

(२) वार्षिक अर्थविषयक पत्रकांत खर्चाचे अंदाज पुढीलप्रमाणें वेगवेगळे दाखविले जातील:—

(क) प्रांताच्या उत्पन्नावर बोजा (चार्ज) असलेला खर्च म्हणून या कायद्यानें सांगितलेला खर्च भागविण्याकरितां लागणाऱ्या रकमा आणि

(ख) प्रांताच्या उत्पन्नांतून करावयाचा म्हणून योजिलेला इतर खर्च भागविण्याकरितां लागणाऱ्या रकमा,

आणि या अंदाजांत उत्पन्न वसूल करण्याकरितां लागलेला खर्च आणि इतर खर्च हे वेगवेगळे दाखविले जातील आणि गव्हर्नरच्या खास जबाबदाऱ्यांपैकीं कोणतीही जबाबदारी योग्य रीतीनें पार पाडण्याकरितां आवश्यक म्हणून अन्तर्भूत करण्यास गव्हर्नरनें सांगितल्या म्हणूनच केवळ ज्यांचा अन्तर्भाव केला आहे अशा कांहीं रकमा असल्यास त्या दाखविल्या जातील.

(३) पुढील खर्च प्रत्येक प्रांताच्या उत्पन्नावर बोजा (चार्ज) असलेला खर्च म्हणून मानला जाईल--

(क) गव्हर्नरचा पगार आणि अलावन्स आणि ऑर्डर इन कौन्सिलनें तरतूद करण्यास लावलेला त्याच्या अधिकारपदाबाबतचा इतर खर्च;

(ख) ज्याच्याबद्दल प्रांत जिम्मेदार आहे अशा कर्जाबाबतचा खर्च—यांत व्याज, सिंकिंग फंडाच्या (सरकारी कर्ज फेडण्याकरितां म्हणून वेळोवेळीं बाजूला काढून ठेवलेला निधि) रकमा, सरकारी मालमत्ता परत आपलीशी करण्याकरितां लागणाऱ्या खर्चाच्या रकमा, कर्जउभारणी करणें व कर्जखातें चालविणें, तसेंच कर्जाची परतफेड करणें यासंबंधीं लागणारा इतर खर्च;

(ग) प्रधान आणि ॲडव्होकेट जनरल यांचे पगार आणि अलावन्स (भत्ते);

(घ) कोणत्याही हायकोर्टाच्या न्यायाधीशांचे पगार आणि अलावन्स याबाबतचा खर्च;

(ङ) त्या त्या वेळीं 'वगळलेल्या' प्रदेशांच्या राजकारभाराबाबत लागणारा खर्च;

(च) कोणत्याही कोर्टाचा निर्णय अगर हुकुमनामा अथवा लवादाचें अवार्ड भागविण्याकरितां लागणाऱ्या रकमा;

(छ) ह्या कायद्यानें अगर प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही कायद्यानें 'चार्ज्ड' म्हणजे 'प्रांताच्या उत्पन्नावर बोजा असलेला' असा ठरविलेला दुसरा कोणताही खर्च.

(४) एखादा योजिलेला खर्च प्रांताच्या उत्पन्नावर बोजा (चार्ज) असलेल्या खर्चांच्या वर्गांत पडतो अगर नाहीं हें गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणें निर्णित करील.

(अ) 'अंदाजपत्रक मांडावयास लावील' यावरून तें गव्हर्नरनें स्वतः मांडावयाचें नाहीं, एवढी गोष्ट निश्चित ठरते. मग तो अर्थमंत्र्यास मांडावयास सांगो, अगर ९३ (१) (ख) कलमाप्रमाणें, 'सनदशीर राज्यपद्धति बंद पडली' असें जाहीर करण्याचा प्रसंग आला असतां, 'प्रधानमंडळा'नें (अर्थात् अर्थमंत्री हा त्यांत येतोच) चालविलेले अधिकार, सर्वच्या सर्व किंवा त्यांपैकीं कांहीं, स्वतःकडे अगर स्वतः नेमलेल्या अधिकाऱ्याकडे देतां येतात, अशा प्रसंगीं गव्हर्नरनें नेमलेला मनुष्य, कायद्याच्या कलमाच्या अर्थाच्या दृष्टीनें, कायदेमंडळापुढें अंदाजपत्रक पाहिजे तर मांडो. परंतु अशी अर्धवट परिस्थिति प्रत्यक्ष व्यवहारांत उत्पन्न होणें कठीण आहे. एक प्रधानमंडळाचा तरी कारभार चालू राहील; नाहीं तर गव्हर्नराचा सुलतानशाही कारभार चालू होईल.

अंदाजपत्रक मांडावयाचे वेळीं अर्थमंत्री आपलें भाषण तयार करून आणून वाचतो. कायदेमंडळांतून भाषणें वाचावयाचीं नसतात तर करावयाचीं असतात अशी प्रथा आहे. तेव्हां कित्येक कायदेमंडळांतून अर्थमंत्री ज्या वेळीं भाषणें वाचूं लागले त्या वेळीं विरोधी पक्षांतील सभासदांनीं वरील प्रथेच्या आधारानें अशा भाषणांना हरकत केली. मुंबई असेंब्लींत ना० लठ्ठे यांच्या भाषणवाचनास अशी हरकत घेण्यांत आली असतां स्पीकर ना० मावळणकर यांनीं त्या हरकतीचें असें निरसन केलें कीं, " सदर भाषण हें नेहमींचें मामुली भाषण नसून मंत्रिमंडळानें मंजूर



पुण्यांतील कौन्सिलहॉल्मध्यें ऑगस्ट (१९३७) महिन्यांत मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचें अधिवेशन भरलें होतें त्याचें छायाचित्र. अर्थमंत्री लठ्ठे आपलें भाषण वाचीत आहेत.

(पृ० २६४)

केलेल्या सरकारी धोरणाचा अधिकृत खुलासा होय आणि तो वाचण्यांत अर्थमंत्री आपलें भाषण 'वाचीत' आहेत असा अर्थ होत नाहीं."

वार्षिक अंदाजपत्रक हें वर्षांतून एकदांच कायदेमंडळापुढें मांडलें पाहिजे हें उघड आहे; परंतु सप्टेंबर १९३७ मध्यें सरहद्दप्रांतांत दोनदां अंदाजपत्रक मांडण्याचा प्रसंग आला. पहिल्या मंत्रिमंडळांतील अर्थमंत्री ना. मेहेरचंद खन्ना यांनीं आपल्या मंत्रिमंडळाचें अंदाजपत्रक सरहद्द असेंब्लीपुढें मांडलें. त्यानंतर लगेच विरोधी पक्षाचे पुढारी डॉ. खान-साहेब यांनीं मंत्रिमंडळावर 'अविश्वासा'चा ठराव मांडला. स्पीकरनें त्या ठरावाच्या चर्चेची तारीख तिसऱ्या दिवशीं ठेविली. दरम्यान दुसऱ्या दिवशीं अंदाजपत्रकावरील सर्वसाधारण चर्चेवर सुरवात व्हावयाची होती. परंतु डॉ. खानसाहेब यांनीं स्पीकरच्या निदर्शनास आणून दिलें कीं, असेंब्लीच्या बहु-संख्याक सभासदांनीं मंत्रिमंडळावर 'अविश्वासा'चा ठराव दिला असल्यामुळें व तो मंजूर होण्याची खात्री दिसत असतांना जाणाऱ्या मंत्रिमंडळानें तयार केलेल्या अंदाजपत्रकावर चर्चा करण्यांत वेळ घालविणें हें निरर्थक आहे. स्पीकरला हा मुद्दा पटला आणि त्यानें बजेटवरील चर्चा तहकूब केली. त्यानंतर 'अविश्वासा'चा ठराव मंजूर होऊन जुन्या मंत्रिमंडळाच्या जागीं डॉ. खानसाहेबांचें नवें मंत्रिमंडळ आलें. आणि त्यांनीं आपलें स्वतःचें अंदाजपत्रक तयार करून तें फिरून सभागृहापुढें सादर केलें. त्या वेळीं मि. झियाउद्दीन या सभासदानें हरकत घेतली कीं, "चालू असलेली कार्यपद्धति बेकायदेशीर आहे, कारण अंदाजपत्रक वर्षांतून एकदांच सादर करतां येतें." ॲडव्होकेट जनरलनें सरकारी कृत्याचें समर्थन केलें. यानंतर बराच वादविवाद होऊन स्पीकरनें हरकतीचा मुद्दा नामंजूर केला. ८१ कलमांत पुरवणी अंदाजपत्रकाबाबत नेहमींच्या अंदाजपत्रकाला लागू असणारी व्यवस्थाच लागू करण्याबाबत तरतूद आहे. तेव्हां वर वर्णिलेल्या अपवादात्मक परिस्थितींत मि. झियाउद्दीन यांनीं काढलेली हरकत बाजूला सारण्याखेरीज स्पीकरला कांहींच करतां येणें शक्य नव्हतें. व असें करण्यांत स्पीकरनें कायद्याच्या कोणत्याच कलमाचें उल्लंघन केल्याचें दिसून येत नाहीं.

(आ) दुसऱ्या पोटकलमांत जमाखर्चाचा अंदाज कशा तऱ्हेनें

फोड करून सांगावा हें सुचविलें आहे. प्रथम त्यांत प्रत्येक उत्पन्नाच्या बाबीचा अंदाज द्यावयास पाहिजे. 'रिसीट्स' या शब्दानें 'रेव्हिन्यू' आणि इतर कर्जाबाबतच्या व भांडवली खात्याच्या जमेचाही अन्तर्भाव करावयास पाहिजे. तसेंच खर्चाच्या बाबतही मानलें पाहिजे. परंतु अंदाजपत्रकांत ठोकळ मानानें प्रत्यक्ष जमा व प्रत्यक्ष खर्च एवढाच भाग उल्लेखण्याची वहिवाट पडून गेली आहे. खर्चाच्या तपशिलांत खातेवार दोन विभाग पाडले असले पाहिजेत. एक 'चार्ज्ड' रकमांचा व दुसरा 'व्होटेड' रकमांचा. 'चार्ज्ड' रकमांवर असेंब्लीला मत देतां येत नाहीं; 'व्होटेड' रकमांवर देतां येतें, त्याचा अर्थच मुळीं 'ज्या रकमांवर मत देतां येतें अशा' असा आहे [ क ७९ ( २ ) ]. खर्चाच्याबाबत दुसरी एक विभागणी दाखवावयास पाहिजे ती म्हणजे कर, सारा, फी इ० जमेच्या मुख्य बाबी वसूल करावयास किती खर्च लागला व इतर खर्च ( शिक्षण, पोलिस, न्यायदान, उद्योगधंदे इ० ) किती लागला ही होय. आणि तिसरी एक गोष्ट, असल्यास, स्पष्ट करावयाची म्हणजे गव्हर्नरनें, आपल्या खास जबाबदाऱ्या पार पाडण्याकरितां आवश्यक म्हणून, कांहीं रकमा अंदाजपत्रकांत घालावयास सांगितल्या तर त्या घातलेल्या असल्या पाहिजेत. ही शेवटची बाब विचाराकरितां आधीं घेऊं. साधारणपणें मंत्रिमंडळांचा व गव्हर्नरांचा उघड रीतीनें व्यक्त होईल असा मतभेद दिसूं न देण्याची खबरदारी घेण्यांत येईल. मतभेद बेताचा असल्यास गव्हर्नरनें किंवा मंत्रिमंडळानें कोणी तरी पड घेतली पाहिजे. मतभेद महत्त्वाचा व मूलभूत असल्यास आणि गव्हर्नर ऐकत नसल्यास मंत्रिमंडळानें राजीनामा द्यावयास पाहिजे; पण याहीपेक्षां निराळा व तिसरा एक मार्ग कायदेपंडितांनीं सुचविला आहे; व तो या ( २ ) ऱ्या पोटकलमांत घातला आहे. तो म्हणजे गव्हर्नरचें म्हणणें मंत्रिमंडळाला मान्य नसल्यास त्याला म्हणजे गव्हर्नरला आपल्या जादा अधिकारांचा उपयोग करूं देणें व आपण आपले अधिकार मर्यादित आहेत अशी मनाची समजूत घालून मर्यादित क्षेत्रांत बाकीचा राज्यकारभार पाहणें हा होय. सत्ताविभागणीचा हा स्पष्ट प्रकार या ( २ ) ऱ्या पोटकलमांत उघड रीतीनें सांगितला आहे. एकट्या आसाम प्रांताखेरीज इतरत्र अशा तऱ्हेनें गव्हर्नरनें

आपले अधिकार उपयोगांत आणलेले नाहींत. त्या प्रांतांत आरंभापासूनच 'कमिशनरां'च्या जागांबाबत तंटा उत्पन्न झाला. इतर प्रांतांतही 'कमिशनरां'-च्या जागा लोकप्रिय आहेत असें नाहीं; उलट निरुपयोगी, अडगळ, खर्चिक व कामास दिरंगाई लावणाऱ्या म्हणून त्या अप्रियच आहेत. परंतु आसामखेरीज हा प्रश्न धसास लागला नाहीं. वास्तविक जिल्हाधिकारी व सेक्रेटरिएट (सरकारी मुख्य कचेरी) यांच्यामध्यें साक्षात् संबंध पाहिजे. मधल्या कमिशनरांची बिलकुल आवश्यकता नाहीं. आसाममध्यें असे दोन डिव्हिजनल कमिशनर आहेत (मुंबई प्रांतांत जसे उत्तर, मध्य व दक्षिण असे तीन विभागांचे तीन कमिशनर आहेत तसे); त्यांचे पगार 'चार्ज्ड' आहेत म्हणजे त्या पगाराबाबत असेंब्लीला मताचा अधिकार नाहीं. परंतु त्यांचे कारकून, पट्टेवाले, कचेरीला लागणारा सादिलवार इत्यादि बाबतचा खर्च असेंब्लीला मंजूर करतां येतो, कमी करतां येतो किंवा अजीबात नामंजूर करतां येतो. तेव्हां आसाम असेंब्लीनें ऑगस्ट १९३७ मध्यें ७९ कलमाच्या दुसऱ्या पोटकलमांतील अधिकारान्वयें रु. ७८४४६ इतकी रक्कम नामंजूर केली. म्हणजे याचा अर्थ असा कीं, सदरहू दोन कमिशनरांनीं कचेरींत येऊन माशा मारीत बसावें अगर घरीं राहून खुशाल महिन्याच्या महिना काम न करितां लठ्ठ पगार खात बसावें. अशी चमत्कारिक परिस्थिति निर्माण झाल्यावर मंत्रिमंडळ बुचकळ्यांत पडलें. त्यांनीं ॲडव्होकेट जनरलला कलकत्त्याहून बोलावून आणून (बंगाल व आसाम या दोन प्रांतांना मिळून एकच ॲडव्होकेट जनरल आहे) त्याचें मत काय पडतें तें पाहण्याकरितां स्पीकरकडे, वरील नामंजूर झालेल्या मागणीबाबतचा आपला अखेरचा निर्णय देण्याचें तहकूब करावें, अशी विनंति केली. ॲडव्होकेट जनरल आल्यावर त्यानें आसाम असेंब्लींत आपलें मत जाहीर केलें कीं, "कपातीचा ठराव जरी योग्य नमुन्याबरहुकूम मांडलेला नाहीं तरी तो बेकायदा नाहीं. स्पीकरनें ठरावाला योग्य तऱ्हेनें परवानगी दिलेली आहे आणि ठरावावर भाषणें होऊन संपूर्ण तऱ्हेनें शहानिशा झालेली आहे आणि इतकें सर्व झाल्यानंतर असेंब्लीनें आपलें मत निःसंदिग्धपणें प्रकट केलेलें आहे." यावर स्पीकरनें आपला निर्णय जाहीर केला कीं, "असेंब्लीनें मागणीला जो नकार दिला आहे तो

पूर्णपणें कायदेशीर असून सरकारवर बंधनकारक आहे." त्यानंतर १७ डिसेंबरला मुख्य प्रधान सर महमद सादुल्ला यांनीं सप्टेंबर ते डिसेंबर अखेरपर्यंतच्या चार महिन्यांकरितां कमिशनरांच्या कचेरीचा खर्च म्हणून रु. २५३०० ची मागणी केली. एप्रिल ते सप्टेंबरचा खर्च करण्याचा अधिकार गव्हर्नरला ऑर्डर इन कौन्सिलनें दिला होता त्याअन्वयें त्यानें तो मंजूर केला असला पाहिजे. या पुरवणीमागणीचे वेळीं असा एक हरकतीचा मुद्दा निघाला कीं, 'सभागृहानें नामंजूर केलेल्या बाबी-संबंधीं फिरून पुरवणीमागणी करितां येते अगर येत नाहीं ?' रायबहादुर प्रमोदचन्द्र दत्त, कॉंग्रेस पक्षाचे पुढारी गापेनिाथ बरदोलोई, कामिनी-मोहन सेन, वैद्यनाथ मुकर्जी वगैरे सभासदांनीं हरकतीच्या मुद्द्याला उचलून धरिलें व खानसाहेब मुदब्बिर हुसेन चौधरी, मौलवी अबदुल मातीन चौधरी यांनीं मूळ 'पुरवणीमागणी'च्या ठरावाचें समर्थन केलें. स्पीकरनें ८१ कलमाधारें "खर्चाची आणखी तरतूद करणें जरूर झालें आहे" याकरितां केलेली पुरवणीमागणी कायदेशीर आहे असें जाहीर केलें. आणि नंतर असेंब्लीनें सदर मागणी मंजूर केली. परंतु याच्या पाठीमागें १ जानेवारी १९३८ पासून "कमिशनरांच्या जागा निश्चित नाहींशा करूं" अशा प्रकारचें मुख्य प्रधान सर सादुल्ला यांनीं दिलेलें निश्चित आश्वासन होतें म्हणूनच ही मागणी मान्य करण्यांत आली. चार महिने विलंब लावण्याचें कारण नोकरांना कमी करण्यापूर्वीं सरकारी नोकरीबाबतच्या नियमाप्रमाणें तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे व त्यांत आणखी एक महिन्याची वाढ असेंब्ली लवकर भरूं न शकल्यामुळें करावी लागली हें होय, असा खुलासा मुख्य प्रधान सर महमद सादुल्ला यांनीं केला.

पुढें ३१ डिसेंबरला गव्हर्नरनें सदर 'कमिशनरांच्या कचेरी'करितां १ जानेवारी १९३८ ते ३१ मार्च १९३८ या मुदतीपुरती पुरवणी-मागणी करणारा एक संदेश असेंब्लीकडे धाडला. ६३ (२) कलमा-प्रमाणें अशा प्रकारचा संदेश पाठविण्याचा गव्हर्नरला हक्क आहे व तो संदेश शक्य तितक्या लवकर कायदेमंडळानें विचारांत घेतला पाहिजे असें त्या कलमांत पुढें लिहिलें आहे. त्या संदेशांत जानेवारी ते मार्च (१९३८)

या तीन महिन्यांकरितां रु. १५१६४ ची गव्हर्नरनें मागणी केली होती. त्याबाबत रायबहादूर दत्तांनीं हरकतीचा मुद्दा उपस्थित केल्यावरून स्पीकरनें निर्णय दिला कीं, " कोणी प्रधानानें रीतसर ठराव मांडलेला नसल्यामुळें संदेशावर चर्चा किंवा मतमोजणी होऊं शकणार नाहीं आणि नुसता संदेश सभागृहापुढें सादर केला ही गोष्ट त्यावर चर्चा करूं देण्यास पुरेशी नाहीं." त्यानंतर पूर्वीप्रमाणेंच (परंतु पूर्वीची आपआपसांतील समजूत अथवा करार मोडून ) मार्च १९३८ मध्यें प्रधानमंडळानें कमिशनरांच्या कचेरीकरितां १४००० रुपयांची पुरवणीमागणी असेंब्लीपुढें मांडली. ही मागणी गव्हर्नरनें ७८ ( २ ) कलमान्वयें आपल्या जादा अधिकारांत मांडावयास सांगितली होती. एका वेळीं प्रधानमंडळ मागणीच मांडावयास तयार नव्हतें; पुढें मध्यंतरींच्या काळांत प्रधानमंडळांत बदलाबदल झाली व प्रधानमंडळानें आपल्या पूर्वींच्या धोरणांत फरक केला. तो असा कीं, " प्रांतिक कायद्यांत कमिशनराच्या अधिकाराबाबत अनेक ठिकाणीं उल्लेख असल्यामुळें व सगळ्या कायद्यांतून एकदम जरूर ते बदल करून घेणें अव्यवहार्य असल्यामुळें दोन्हींपैकीं एका कमिशनराची जागा कायम ठेवावी." या निर्णयास आसाम गव्हर्नराचीही अनुमति मिळाली असून तें प्रकरण गव्हर्नर जनरलमार्फत भारतमंत्र्याकडे रवाना झालें आहे. परंतु भारतमंत्र्यानें निकाल देण्यास अळंटळं चालवली आहे. तोंपर्यंत कायदेमंडळाच्या विरोधास भिक न घालतां गव्हर्नराला हुकूम सोडण्यास भारतमंत्र्यानें गव्हर्नर जनरलला फर्माविलें आहे. आपल्यावरील जबाबदारी नाहींशी करण्याकरितां जरी प्रधानमंडळानें गव्हर्नराला आपला जादा अधिकार वापरूं दिला तरी असेंब्लीनें फिरून ही मागणी फेटाळून दिली. परंतु ८० ( १ ) (ख) या कलमांतील शेवटच्या भागांतील अधिकारान्वयें गव्हर्नरनें या फेटाळलेल्या मागणीस जीवदान दिलें व दुसरे दिवशीं ८० ( २ ) कलमाप्रमाणें शिक्कामोर्तब केलेलें शेड्यूल असेंब्लीपुढें ठेवलें गेलें. अशा प्रकारें अनेकदां असेंब्लीच्या ठरावांना धाब्यावर बसविण्यांत आलेलें पाहून काँग्रेसपक्षानें संताप व्यक्त करण्याकरितां सभागृहत्याग केला. अशा तऱ्हेनें हें कमिशनर प्रकरण येथपर्यंत आलें आहे. यांत असेंब्लीनें एकदां केलेला निर्णय अखेरपर्यंत कायम ठेविला, प्रधानमंडळानें गव्हर्नरास जादा

अधिकार वापरूं दिला व तें आपल्या स्थानास चिकटून राहिलें, गव्हर्नरालाही जादा अधिकार वापरावे लागण्यास असें काय मोठें संकट आलें होतें हें बरोबर आणि सयुक्तिकपणें मांडतां आलें नाहीं, आणि अशा सर्व प्रकारांनीं १९३५ च्या कायद्याचा, लोकांच्या आकांक्षा पूर्ण करण्याच्या दृष्टीनें, फोलपणा स्पष्टपणें सोदाहरण नजरेस आला.

(इ) स्पष्ट कल्पना येण्याकरितां मुंबई प्रांताचें १९३८-३९ सालचें जमाखर्चपत्रक (अंदाज) कायद्यांत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें मांडून दाखवितों; चालू सालच्या मागच्या सालचे पक्के हिशेब, चालू सालचा अंदाज, चालू सालचा दुरुस्त अंदाज व पुढील सालचा अंदाज इतके चार आंकडे तुलनेकरितां देण्याची वहिवाट आहे. परंतु येथें फक्त १९३८-३९ सालचे अंदाजच दिले आहेत:—

## जमा (१९३८–३९) अंदाज

| उत्पन्नाच्या मुख्य बाबी | | (आंकडे हजारांचे) |
|---|---|---|
| IV | प्राप्तीवरील कर | २५,०० |
| V | मीठ | १ |
| VII | जमीनमहसूल | ३,३९,८४ |
| VIII | अबकारी | २,९८,०० |
| IX | स्टांप | |
| | (क) बिगरज्युडिशिअल | ७१,१८ |
| | (ख) ज्युडिशियल | ७१,३२ |
| X | जंगल | ४०,३८ |
| XI | नोंदणी | १५,०३ |
| XII | मोटर वाहनांच्या कायद्याबाबतची वसुली | ४१,४९ |
| XIII | इतर कर व पट्टया | ४७,९३ |
| | (करमणूक, जुगार, वीज, तंबाकू) | |
| | | ९,५०,१८ |

| | | |
|---|---|---|
| **कालवे इ०** | | |
| XVII | कालव्याचीं कामें ( भांडवली हिशेब ) | १६,९५ |
| XVIII | ,, ( बिगरभांडवली हिशेब ) | ७,०३ |
| **कर्जवाम खातें** | | |
| XX | व्याज | ७३,१५ |
| **राज्यकारभार** | | |
| XXI | न्यायदान | १५,४९ |
| XXII | तुरुंग इ० | ४,३१ |
| XXIII | पोलिस | १०,१४ |
| XXVI | शिक्षण | १४,०५ |
| XXVII | वैद्यक | १४,०० |
| XXVIII | सार्वजनिक आरोग्य | १९,०४ |
| XXIX | शेतकी | ३,४० |
| XXX | पशुवैद्यक | ३० |
| XXXI | सहकारी पतपेढ्या | २,५२ |
| XXXII | उद्योगधंदे | ४,२१ |
| XXXVI | किरकोळ खातीं | १,८२ |
| | | ८९,२८ |
| **इमारती इ० खातें** | | ५१,९६ |
| **किरकोळ खातीं** | | २०,०६ |
| **जादा बाबी** | | ४२ |
| | एकूण | १२,०९,०३ |

## खर्च ( १९३८–३९ ) अंदाज

**उत्पन्न मिळविण्याकरितां करावा लागणारा साक्षात् खर्च** ( आंकडे हजारांचे )

| | चार्ज्ड | व्होटेड | एकूण |
|---|---|---|---|
| ७ जमीनमहसूल | ५,६४ | ६०,१४ | ६५,७८ |

| | चार्ज्ड | व्होटेड | एकूण |
|---|---|---|---|
| ८ अबकारी | ७,२२ | ३४,०५ | ४१,२७ |
| ९ स्टांप | .... | १,९७ | १,९७ |
| १० जंगल | ४,४६ | २२,५६ | २७,०२ |
| ११ नोंदणी | .... | ५,६१ | ५,६१ |
| १२ मोटार वाहन कायद्याबाबत खर्च | १५,७८ | २,४२ | १८,२० |
| १३ इतर कर व पट्ट्या | .... | १२,३९ | १२,३९ |
| | ३३,१० | १,३९,१४ | १,७२,२४ |
| **कालवे रेविन्यू हिशेब** | ४२,६९ | २३,६० | ६६,२९ |
| १७,१८,१८ ( १ ) | | | |
| **कालवे इ० भांडवली हिशेब** | | १ | १ |
| १९ | | | |
| **कर्जवाम इ०** | | | |
| २२ कर्ज इ० वरील व्याज | १,२०,०८ | .... | १,२०,०८ |
| २३ कर्जफेड | ६,३२ | .... | ६,३२ |
| | १,२६,४० | | १,२६,४० |
| **राज्यकारभार** | | | |
| २५ सर्वसाधारण राज्यकारभार | १९,४४ | ६१,०६ | ८०,५० |
| २७ न्यायदान | २०,३९ | ४६,७८ | ६७,१७ |
| २८ तुरुंग इ० | १.२६ | १५,३३ | १६,५९ |
| २९ पोलिस | ९.२२ | १,३२,६६ | १.४१.८८ |
| ३० बंदरें इ० | ४ | १ | ५ |
| ३६ शास्त्रीय खातीं | .... | १,०३ | १,०३ |
| ३७ शिक्षण | ६,९३ | १,८४,२२ | १,९१,१५ |
| ३८ वैद्यक | ५,१० | ४०,८१ | ४५,९१ |
| ३९ सार्वजनिक आरोग्य | १,९७ | ३०,०६ | ३२,०३ |
| ४० शेतकी | १,२८ | १३,५५ | १४,८३ |
| ४१ पशुवैद्यक | २८ | ३,८३ | ४,११ |
| ४२ सहकारी पतपेढ्या | ५१ | ६,३९ | ६,९० |

| | | | |
|---|---|---|---|
| ४३ उद्योगधंदे | .... | ११,६३ | ११,६३ |
| ४७ किरकोळ खातीं | ९८ | ७,२८ | ८,२६ |
| | ६७,४० | ५,५४,६४ | ६,२२,०४ |
| ५० इमारती इ० | ६,३३ | १,०६,७५ | १,१३,०८ |
| ५१ मुंबई डेव्हलपमेंट योजना | १४ | ५,८५ | ५,९९ |
| | ६,४७ | १.१२,६० | १,१९,०७ |
| ५४ दुष्काळ | २,४८ | ३.३४ | ५,८२ |
| ५५ पेन्शन इ० | २८,६४ | ८७,५६ | १,१६,२० |
| ५५ (अ) पेन्शनऐवजीं वट्ट रक्कम घेणें | २ | ६ | ८ |
| ५६ सादिल, छपाई | .... | १२,१४ | १२,१४ |
| ५७ किरकोळ | .... | ९,५१ | ९,५१ |
| | ३१,१४ | १,१२.६१ | १,४३,७५ |
| ६३ जादा आकार | .... | ४ | ४ |
| एकूण | ३,०७,२० | ९,४२,६४ | १२,४९,८४ |

वरील आंकड्यांवरून लक्षांत येईल कीं एकूण खर्चाच्या सुमारें $\frac{1}{4}$ म्ह० शेंकडा २५ टक्के रक्कम चार्ज्ड म्हणजे असेंब्लीला त्याबाबत मत देतां न येणारी अशी आहे. तसेंच उत्पन्न वसूल करण्याकरितां ( रेव्हिन्यू अकौंट ) येणारा खर्च,

| चार्ज्ड | व्होटेड | एकूण |
|---|---|---|
| ३३,१० | १,३९,१४ | १,७२,२४ |
| ४२,६९ | २३,६० | ६६,२९ |
| ७५,७९ | १,६२,७४ | २,३८,५३ |

इतका अनुक्रमें येत आहे; एकूण खर्चातून हा खर्च वगळल्यास बाकीचा खर्च अनुक्रमें,

| | | |
|---|---|---|
| २,३१,४१ | ७,७९,९० | १०,११,३१ |

इतका होत आहे हें दिसून येईल.

आतां कर्ज, ठेवी, आगाऊ दिलेल्या रकमा इ० सर्व व्यवहार एकत्र करून पाहिलें असतां प्रांताची जमाखर्चाची स्थिति पुढीलप्रमाणें दिसून येईल:—

| जमा | (आंकडे हजारांचे) | | खर्च |
|---|---|---|---|
| १२,०९,०३ | उत्पन्नाच्या बाबी | १२,४९,८४ | एकूण खर्च |
| ३६,९१,३८ | कर्ज, ठेवी इ० बाबी | ३६,९३,२३ | कर्ज, ठेवी इ० व्यवहार |
| १,१४,६७ | मागील शिल्लक | ७२,०१ | पुढील सालाकरितां शिल्लक |
| ५०,१५,०८ | | ५०,१५,०८ | |

या ७२,०१ शिल्केशिवाय पुढील रकमा आहेत त्या वेगळ्याचः—

| | |
|---|---|
| ६२,०० | दुष्काळनिवारण फंड |
| १२,५० | नाशिक दारू गाळण्याची भट्टी घसाराफंड |
| ९,०० | प्रांतिक रस्ता फंड |
| ८३,५० | |

मुंबई प्रांताचें खास स्वतः द्यावें लागणारें असें कर्ज ( ४½% दराचें) १८·४२ कोटी रुपये आहे व तें ४५ वर्षांत फेडावयाचें आहे. याकरिता दरवर्षी जवळ जवळ रु. १ कोट व्याजादाखल खर्च करावे लागतात; म्हणजे याचा अर्थ असा कीं, वार्षिक प्रांतिक उत्पन्नाच्या ( रु. १२ कोट ) दीड-पट कर्ज आहे ( रु. १८ कोटी ) आणि व्याजाची रक्कम उत्पन्नाच्या जवळ जवळ शेंकडा ९ या प्रमाणांत आहे. १८·४२ कोटी रुपये कर्ज पुढील गोष्टींकरितां काढलेलें होतें:—

| कोटी रुपये | |
|---|---|
| ७·४४ | मुंबई डेव्हलपमेंट योजना ( ही अत्यंत अव्यवहार्य व संपूर्ण तोट्याची ठरली ). |
| ४·६२ | कालवे, पाटबंधारे इ० ( व्याज देण्याइतकी सुद्धां पाणीपट्टी वसूल होत नाहीं ). |
| ४·८९ | सरकारी इमारती इ० करितां. |
| १·४७ | शेतकरी, पतपेढ्या संस्था, स्थानिक स्वराज्य, इ० करितां कर्जे. |
| १८·४२ | |

१९३७–३८ सालच्या अंदाजपत्रकांत 'चार्ज्ड' रकम ३,१६,८२ इतकी होती; म्ह० १९३८-३९ सालाच्या मानानें (३,०७,२०) ९,६२

इतकी जास्त होती. याचें कारण 'इनामदार व वतनदार' यांना द्यावयाच्या नेमणुका सर्वच्या सर्व मागील वर्षाच्या (१९३७-३८) बजेटांत 'चार्ज्ड' धरल्या गेल्या होत्या; परंतु चालू सालीं (१९३८-३९) त्यांपैकीं 'इनामदारां'ना द्यावयाच्या रकमा 'चार्ज्ड' धरण्यांत आल्या असून बाकीच्या म्हणजे गांवकामगार, महार, देवस्थानें, भिल्ल, नुकसान-भरपाई इत्यादि सर्व नेमणुका 'व्होटेड' म्हणजे कायदेमंडळाच्या ताब्यांत आणलेल्या आहेत, ही गोष्ट विशेष नमूद करण्यासारखी आहे. या फरकाचें कारण मागील वर्षीं तशी व्यवस्था चुकून झाली असली पाहिजे, याशिवाय दुसरें कांहीं दिसत नाहीं.

एखाद्या प्रांताच्या बजेटाच्या गुणावगुणाविषयीं चर्चा करण्याचें हें स्थळ नव्हे. साधारण स्थूल मानानें कल्पना यावी एवढ्यासाठीं वर मुंबई प्रांताच्या जमाखर्चाची स्थिति मांडली आहे. जो न्याय घरगुती किंवा एखाद्या खासगी संस्थेच्या हिशेबांना लागू आहे तोच 'सरकार' या मोठ्या संस्थेच्या आर्थिक स्थितीला, फार मोठ्या अर्थानें, लागू पडतो. एखादें कुटुंब आर्थिक हलाखीमुळें रसातळाला गेलें तर त्याचा परिणाम फार तर दहापांच लोकांना भोगावा लागतो. परंतु राष्ट्राची आर्थिक परिस्थिति दीन झाल्यास कोट्यवधि लोकांना त्याचे चटके पिढ्यानूपिढ्या बसल्याशिवाय राहणार नाहींत. एखाद्या माणसानें हिशेब बिनचूक व प्रामाणिकपणें ठेवले असल्यास केवळ त्याच्या हिशेबावरून त्या माणसाच्या वर्तना-संबंधानें व त्याच्या हालचाली, आवडीनिवडी इत्यादि गोष्टींबद्दल चांगलाच अंदाज ज्याप्रमाणें बांधतां येईल, तशीच गोष्ट राष्ट्रीय वा प्रांतिक वार्षिक अंदाजपत्रकासंबंधींची होय. प्रख्यात ब्रिटिश मुत्सद्दी मि. ग्लॅडस्टन बजेट-विषयीं म्हणतो : "बजेट हा कांहीं केवळ अंकगणिताचा विषय नव्हे. व्यक्तिमात्राच्या अभ्युदयाला, वर्गावर्गांमधील परस्पर संबंधाला व सामुदायिक बलावबलाला तें हजारों तऱ्हेनें कारणीभूत होत असतें, इतकें त्याचें महत्त्व आहे." या बजेटासंबंधीं अनेक तऱ्हेनें लिहितां येण्यासारखें आहे. परंतु तो विषय अगदीं स्वतंत्रपणेंच चर्चिला पाहिजे. परिस्थितीप्रमाणें त्यां-तील मूलभूत सिद्धांतांतही फरक पडण्याचा संभव आहे. साधारणतः कोणीही समंजस माणूस म्हणेल कीं, जमेइतकाच किंबहुना त्याच्यापेक्षां थोडासा

कमीच खर्च धरला पाहिजे. म्हणजे बजेट तुटीचें न धरतां शिलकी होईल असें करावयास हवें. उत्पन्नांत वाढ करण्याकरितां योग्य प्रमाणांत करांची वाढ केली पाहिजे किंवा नवीन कर बसविले पाहिजेत. या दृष्टीनें शेतीबाबतच्या प्राप्तीवरील कर ( बिहार ), धंदेवाल्या लोकांवरील कर (मध्यप्रांत), विजेच्या व तंबाकूच्या करावरील वाढ (मुंबई) इत्यादि करांचा उल्लेख करावयास हवा. तसेंच, खर्चांत काटकसरही केली पाहिजे. याबाबत संयुक्तप्रांताचे अर्थमंत्री पंडित गोविंद वल्लभ पंत यांनीं घालून दिलेला दंडक गिरविण्यासारखा आहे यांत शंका नाहीं. ते म्हणतात, " माझ्या बजेटांत मी मुद्दामच थोडीशी तूट दाखविली आहे; असें करण्यांत महत्त्वाचा फायदा हा असतो कीं, खर्च करतांना जरा हात आवरून धरला पाहिजे ही जाणीव सदोदित अधिकाऱ्यांपुढें राहते आणि गैरवाजवी होणारा खर्च त्यामुळें होण्याचें टळतें." या काटकसरीच्या दृष्टीनें अनेक प्रांतांतून कमिट्या नेमल्या गेल्या आहेत; परंतु १९३५ च्या कायद्यानें हातपाय जखडले गेल्यामुळें या दिशेनें विशेष कांहीं त्वरितपणें करितां येईल असें दिसत नाहीं. नोकरांच्या पगाराबाबत आपण मुंबई प्रांताचेंच उदाहरण घेऊं. मुंबईचे अर्थमंत्री ना. लठ्ठे यांनीं आपल्या १९३८-३९ च्या बजेटच्या भाषणांत नोकरवर्गाचें पगाराच्या दृष्टीनें पुढीलप्रमाणें पृथक्करण केलें आहे:—

| दरमहा | एकूण रक्कम ( लाख रु. ) |
|---|---|
| ( १ ) ६० रु. पगाराखालील | १५० |
| ( २ ) ६० रु. ते १९९ रु. | ११३ |
| ( ३ ) २०० ते ४९९ रु. | ६१ |
| ( ४ ) ५०० ते ९९९ रु. | ३१ |
| ( ५ ) १००० रु. वरील | ६३ |
| | ४१८ लाख |

म्हणजे ४ कोटी १८ लाख

यापैकीं इंडियन सिव्हिल सर्व्हिस, इंडियन पोलिस, इंडियन मेडिकल सर्व्हिस इ. सेक्रेटरी ऑफ स्टेटनें ( भारतमंत्री ) नेमलेल्या नोकरांचा तर प्रश्न दूरच राहो; परंतु इतर जुन्या नोकरांच्या पगारांतही कायदेशीरपणानें कपात करितां येणार नाहीं; बरें, स्वेच्छेनें पगारकपात करून घेण्य स

नोकरवर्ग पुढें येईल हें मनुष्यस्वभावाच्या दृष्टीनें जवळ जवळ अशक्यच आहे. तेव्हां प्रस्तुतचा कायदा आमूलाग्र बदलून नोकरवर्गावरील ही सत्ता प्रधानमंडळाकडे आल्याशिवाय या बाबतींत कांहींही सुधारणा करतां येणें शक्य नाहीं. राहतां राहिला नवीन नेमावयाच्या नोकरांच्या पगाराचा प्रश्न. याबाबत कांहींसा उपक्रम करण्यास जागा आहे, परंतु यामुळें बचत फारच अल्प होऊन तिचा पुरा परिणाम दिसून येण्यास दीर्घकाल लागणार. यांतलें एक उदाहरण म्हणून नवीन सबजजांच्या पगारांचें स्केल २५५ कलमांतील अधिकारान्वयें मुंबई सरकारनें पुढीलप्रमाणें बदलण्याचें ठरविलें आहे. यापूर्वी हें स्केल ( रु. २०० ते १२०० दरमहा ) असें होतें तें आतां (रु. २५० ते ८५०) असें बदलण्यांत आलें आहे. परंतु याचा परिणाम उशीरा दिसून येईल; आरंभीं तर उलटाच परिणाम दिसून येईल. समतेचा जर प्रत्यक्ष व्यवहारांत कोठें ताबडतोब प्रयोग करावयास हवा असेल, तर तो या नोकरवर्गाच्या पगाराच्या क्षेत्रांत. समता म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नसून वरच्यांना खालीं आणणें व खालच्यांना वर उचलणें. सर्वांत कमी व सर्वांत जास्त या पगारांतील अंतर हिंदुस्थानाइतकें जगाच्या पाठीवर दुसऱ्या कोणत्याही देशांत दिसून येणार नाहीं. मुंबई प्रांतांतिलच 'राज्यकारभाराचे प्रमुख' या बजेटाच्या सदरांतील पगार उदाहरणाकरितां घेऊं. गव्हर्नरला दरमहा पगार दहा हजार रुपये व चीफ सेक्रेटरीला साडेतीन हजार रुपये; प्रधानाला दरमहा पांचशें रुपये व त्याच्या पार्लमेंटरी सेक्रेटरीला दरमहा अडीचशें रुपये; प्रधानांचे खासगी चिटणीस व टाइपिस्ट इत्यादींना दरमहा पन्नास रुपयांपासून तीनशें रुपयांपर्यंत; आणि सर्वांत खालच्या शिपायांना व चपराश्यांना दरमहा एकोणीस ते अठ्ठावीस रुपयांपर्यंत. अशा परिस्थितींत गव्हर्नर, सेक्रेटरी, कमिशनर, कलेक्टर, न्यायाधीश इत्यादींच्या पगारांत काट झाल्याशिवाय गरीब नोकरवर्गाला अधिक पगार देतां येणें शक्य नाहीं.

( ई ) आतां तिसऱ्या पोटकलमांतील प्रांताच्या उत्पन्नावर बोजाभूत असलेल्या ( चार्ज्ड ) खर्चाचा क्रमशः विचार करूं ( प्रांताचें उत्पन्न म्हणजे प्रांताला मिळालेला अथवा प्रांतानें उभारलेला सर्व वसूल व सार्वजनिक पैसा; कलम १३६ ). त्यांतील ( क ) सदरांत गव्हर्नराचा पगार,

अलावन्स व इतर खर्चाचा उल्लेख आहे. ४८ (२) या कलमांत गव्हर्नरांचे पगार तिसऱ्या शेड्यूलमध्यें सांगितल्याप्रमाणें असावेत असें म्हटलें असून त्यांना रुबाबानें व इतमामानें राहतां यावें याकरितां योग्य व्यवस्था केली जाईल असें म्हटलें आहे. ही व्यवस्था १८ डिसेंबर १९३६ रोजीं काढलेल्या " गव्हर्मेंट ऑफ इंडिया ( गव्हर्नरांचे अलावन्स आणि हक्क ) ऑर्डर, १९३६ " या ऑर्डर इन कौन्सिलनें केली आहे. ह्या ऑर्डरींत नऊ कलमें असून तिला चार शेड्युलें जोडलेलीं आहेत. पहिल्या शेड्यूल-मध्यें गव्हर्नरांचीं सरकारीरीत्या राहण्याचीं ठिकाणें दिलीं आहेत तीं अशीं:—

| प्रांत | ठिकाणें |
|---|---|
| १ मद्रास | १ मद्रास |
| | २ गिंडी |
| | ३ उटकमंड |
| २ मुंबई | १ मुंबई |
| | २ महाबळेश्वर |
| | ३ गणेशखिंड ( पुणें ) |
| ३ बंगाल | १ कलकत्ता |
| | २ डाक्का |
| | ३ दार्जिलिंग |
| | ४ बराकपूर |
| ४ संयुक्तप्रांत | १ अलाहाबाद |
| | २ लखनौ |
| | ३ नैनीताल |
| ५ पंजाब | १ लाहोर |
| | २ सिमला |
| ६ बिहार | १ पाटणा |
| | २ रांची |
| | ३ नेटारहाट |
| ७ मध्यप्रांत, वऱ्हाड | १ नागपूर |
| | २ पचमढी |
| | ३ जबलपूर |

| | | |
|---|---|---|
| ८ | आसाम | १ शिलांग |
| ९ | वायव्य सरहद्द प्रांत | १ पेशावर |
| | | २ नाथियागली |
| १० | सिंध | १ कराची |
| ११ | ओरिसा | १ पुरी |
| | | २ (नवीन राजधानी ठरेल त्या ठिकाणीं बांधावयाचें) |

बंगालच्या गव्हर्नराला चार सरकारी वाडे आहेत; मद्रास, मुंबई, संयुक्तप्रांत, बिहार व मध्यप्रांत, वऱ्हाड या पांच गव्हर्नरांना तीन; पंजाब वायव्यसरहद्द व ओरिसा यांना दोन व बाकीच्या म्हणजे आसाम व सिंध या गव्हर्नरांना एक याप्रमाणें राहत्या वाड्यांची सोय करण्यांत आली आहे. त्यांपैकीं उटकमंड, महाबळेश्वर, दार्जिलिंग, नैनीताल, सिमला, रांची, पचमढी आणि नाथियागली हीं ठिकाणें उन्हाळ्याच्या दिवसांत थड हवा व आराम याकरितां प्रसिद्ध आहेत. बंगालमधील बराकपूर हें ठिकाण कलकत्त्याहून थोड्या मैलांच्या अंतरावर असून त्या ठिकाणीं १९११ पूर्वी गव्हर्नर जनरलचें वास्तव्य घडत असे; याच ठिकाणीं हिंदुस्थानचें भवितव्य अनेकदां निर्णीत झालेलें आहे. १९३७ च्या नोव्हेंबर महिन्यांत राजबंद्यांच्या मुक्ततेबाबत गव्हर्नर अंडरसन व महात्मा गांधी यांची मुलाखत याच ठिकाणीं झाली होती. अलीकडे या हवेच्या ठिकाणीं जरी कांहीं वेळां गव्हर्नर जात असला तरी सिमला, दार्जिलिंग या ठिकाणांखेरीज सबंधच्या सबंध सरकार तत्त्व आणि खर्चाची काटकसर या दृष्टीनें जाईनासें झालें आहे, त्यामुळें त्या ठिकाणांचें महत्त्व साहजिकच कमी झालें आहे. दुसऱ्या शेड्यूलमध्यें नेमणूक झाल्याबरोबर तयारी व प्रवास याकरितां १२०० पौंड ते २००० पौंडांपर्यंत कमी जास्त प्रमाणांत निरनिराळ्या प्रांतिक गव्हर्नरांना तनखा देण्याची व्यवस्था सांगितली आहे. तिसऱ्या शेड्यूलमध्यें मोटारी व सरकारी वाडे फर्निचर इ० नीं सुसज्ज करण्याकारितां एक हजारापासून चौदा हजारांपर्यंत (रुपये) निरनिराळ्या गव्हर्नरांना देण्यांत येणार असल्याबद्दल लिहिलें आहे.

'गव्हमेंट ऑफ इंडिया ( गव्हर्नरांचे भत्ते आणि हक्क ) ऑर्डर, १९३६, च्या चौथ्या शेड्यूलमध्यें प्रांताच्या उत्पन्नावर बोजा म्हणून गव्हर्नरांच्या खर्चाच्या कांहीं बाबतींसंबंधीं जास्तींत जास्त किती रकम घालतां येईल त्याचा तपशील पुढील-प्रमाणें दिला आहे:—

| | मद्रास | मुंबई | बंगाल | संयुक्त प्रांत | पंजाब | बिहार | मध्यप्रांत वऱ्हाड | आसाम | वायव्य सरहद्द प्रांत | सिंध | ओरिसा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ सम्प्च्युअरी अलावन्स | १८००० | २५००० | २५००० | १५००० | १२००० | ६००० | ६००० | ६००० | ६००० | ८००० | ६००० |
| २ चाकरनोकर व गृहव्यवस्था— | | | | | | | | | | | |
| (१) मिलिटरी सेक्रेटरी (ए.डी.सी.) व त्याची कचेरी इ० | ११२००० | १३६००० | १२१००० | ११६००० | ८८००० | ७५००० | ६१००० | ६३००० | ६८००० | ५९००० | ४०००० |
| (२) बँड | ४३००० | ४५००० | ५०००० | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |

| | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (३) बॉडी गार्ड (शरीरसंरक्षक) | १२६००० | ७८००० | १००००० | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| (४) सर्जन आणि कचेरी | ३६००० | ३३००० | ३४८०० | ... | ... | ... | ... | ... | ... | ... | ... |
| (५) सरकारी वाडा दुरुस्ती इ० | २१५०० | २५००० | ३४००० | १४५०० | १०५०० | १३००० | ९८०० | ४००० | ५००० | ४००० | ८००० |
| ३कॉन्ट्रॅक्ट अलावन्स म्हणजे मोटार-गाड्यांबद्दल इ० | ९२००० | १०८००० | १००००० | २३००० | २१७०० | २१७०० | १६६०० | १४१०० | १४१०० | १७८०० | ११५०० |
| ४ प्रवास-खर्च | ११३००० | ६५००० | १२२००० | १२५००० | ६०००० | ६०००० | २६००० | ५५००० | १८००० | ३०००० | ३५००० |
| एकूण... | ५६१५०० | ५१५६०० | ५८६८०० | २९३५०० | १९२२०० | १७५७०० | ११९४०० | १४२१०० | ११११०० | ११८८०० | १००५०० |

वरील कोष्टकांवरून दिसून येईल कीं, ओरिसा गव्हर्नराला कमींत कमी म्हणजे १ लाख रुपये व बंगाल गव्हर्नराला जास्तींत जास्त म्हणजे जवळ जवळ ६ लाख रुपये अशा नेमणुका लावून दिल्या आहेत. यांपैकीं दरवर्षाच्या बजेटमध्यें किती व कोणत्या रकमा घालावयाच्या हें गव्हर्नरनें आपण होऊनच ठरवावयाचें आहे. या ७८ (३) (क) कलमांतील रकमेबाबत कायदेमंडळांत चर्चाही करतां येणार नाहीं [पहा, कलम ७९ (१)]. या गव्हर्नराच्या पायीं मुंबई प्रांतांत १९३८-३९ च्या अंदाजपत्रकांत पुढीलप्रमाणें रकमा धरल्या आहेत:—

| | |
|---|---|
| १ गव्हर्नराचा पगार | १,२०,००० |
| २ संपच्युअरी भत्ता | २५,००० |
| ३ नोकरचाकर व गृहव्यवस्था | ४,३२,७०० |
| ४ गव्हर्नरचा सेक्रेटरी व त्याची कचेरी | १,०१,३०० |
| ५ कॉंट्रॅक्ट अलावन्स | १,०८,००० |
| ६ प्रवास-खर्च | ९२,२०० |
| | ८,७९,२०० |

वरील तपशिलावरून समजून येईल कीं गव्हर्नराच्या पगाराच्या सहापट त्याच्याकरितां होणारा इतर खर्च आहे. बरें, याबद्दल बोलायची मुद्धां सोय नाहीं. मुंबई असेंब्लीच्या पहिल्या बजेट अधिवेशनांत मि. नरिमन यांनीं गव्हर्नरचे गालिचे, फर्निचर इत्यादीबद्दल कडक टीका केली होती. अर्थात् ही टीका तशीच खपून गेली. सर्वांचें एकमत असल्या-मुळें (युरोपियन व इंग्रजाळलेले सभासद कसे गप्प राहिले याचें आश्चर्य वाटतें) व कोणी मुद्दा उपस्थित करीपर्यंत स्पीकरनें सुद्धां त्याबद्दल हरकत घेतली नाहीं. गव्हर्नरला स्पीकरकडे हुकूम पाठवून आक्षिप्त भाग काढून टाकण्याचा अधिकार आहे. या विषयाला लागू असणारें एक उदाहरण अर्स्किन मेनें आपल्या पार्लमेंटरी प्रॅक्टिस (पृ. ९६) मध्यें हॅक्सले या सभासदाचें दिलें आहे. राजाच्या खासगी खर्चांत कपात सुचविणारें एक बिल या हॅक्सलेनें पार्लमेंटपुढें आणल्यामुळें त्याच्यावर राजाची इतराजी झाली होती व त्याबाबत पार्लमेंटनें त्याला राजद्रोही ठरविलें होतें; परंतु पुढें हा निकाल फिरून रद्दही करण्यांत आला. सध्यां राजाच एकंदरींत

देशाची परिस्थिति पाहून आपल्या नेमणुकींत कपात करून जनतेला उदाहरण घालून देतो अशी त्याची स्थिति झाली आहे. लोकशाहीचा महिमा ! गव्हर्नराच्या या भरमसाट खर्चाच्या नेमणुकीबाबत पार्लमेंट-मधील बिलावरील वादविवादांत खूप टीका झाली होती. टीकाकारांचें म्हणणें असें पडलें कीं, "आजपर्यंत झालेलें कांहीं असो; आतां तरी आपण लोकशाही स्वराज्याच्या नव्या मनूस प्रारंभ करीत आहोंत अशा वेळीं हा गव्हर्नरांचा इतमाम व थाटमाट अगदीं अस्थानीं असून त्यामुळें फसून जाणारे व डोळे दिपणारे आतां हिंदुस्थानांत कोणि राहिले असतील असें वाटत नाहीं." वर सांगितल्याप्रमाणें पार्लमेंटनें जरी तरतूद करून ठेवली असली व बजेटांत जरी खूप रकमा घालणें अर्थमंत्र्याला प्राप्त असलें तरी गव्हर्नरांनीं मनाची, निदान जनाची (जनतेच्या दारि-द्र्याची) तरी लाज धरली पाहिजे व आपला खर्च आवरतां घेतला पाहिजे. गव्हर्नरनें दिलेल्या खान्यापायीं, नाचरंगापायीं व आतिथ्यापायीं गरीब जनतेचे लाखों रुपये खर्च होत आहेत. स्पेशल ट्रेनऐवजीं आतां कित्येक गव्हर्नर फक्त सलून (खास डबा) वापरूं लागले आहेत हा फरक इष्ट दिशेनेंच आहे असें म्हणतां येईल.

आतां (ख) सदरांतील 'कर्जाबाबत द्यावयाच्या रकमा म्हणजे व्याज, सिंकिंग फंड इ०'बद्दल असेंब्लीला मत देतां येत नाहीं. देशाची पत राहण्याच्या दृष्टीनें कोणतेंही राष्ट्र नाइलाज झाल्याशिवाय कर्ज बुडवीत नाहीं. १९१४-१८ च्या महायुद्धानंतर जर्मनीवर जबरदस्त खंडणी लादण्यांत आली. निरुपाय झाल्यावर जर्मनीनें खाका वर केल्या. त्या-बरोबर इंग्लंड, फ्रान्स या राष्ट्रांनीं अमेरिकेला सांगितलें कीं, "आपणाला खंडणीचें द्रव्य आल्याशिवाय कर्ज फेडतां येणार नाहीं." ही जर या श्रीमान् व उद्योगधंद्यांनीं गजबजलेल्या प्रबळ युरोपियन राष्ट्रांची स्थिति तर हिंदुस्थानसारख्या गरीब राष्ट्राची हलाखी काय विचारावी ? रशियानें, झारनें केलेलें कर्ज ज्याप्रमाणें नाकारलें किंवा 'ॲनश्लुस' (ऑस्ट्रो-जर्मन एकी) होऊं न देण्याकरितां पूर्वींच्या ऑस्ट्रियन सरकारनें काढलेलीं परदेशीय कर्जें देण्याला आपण बिलकुल बांधलेलों नाहीं असें ज्याप्रमाणें नाझी जर्मन सरकार जाहीर करीत आहे, त्याप्रमाणें हिंदुस्थानांत १९२२

सालीं गया काँग्रेसनें या सरकारी कर्जाबाबत जाहीर घोषणा केली कीं, तें आमच्या हितास्तव काढलेलें नसल्यामुळें आम्ही तें फेडणार नाहीं. त्या वेळीं या ठरावाकडे सहसा कोणाचें लक्ष गेलें नाहीं. परंतु मध्यंतरींच्या काळांत राष्ट्राचें बळ वाढल्याकारणानें १९२९ सालीं लाहोरास काँग्रेसनें ज्या वेळीं स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर करून कायदेभंग, करबंदी, बहिष्कार इ० मार्गांचा अवलंब करण्याचें ठरविलें त्या वेळीं गया काँग्रेसचाच ठराव थोड्या निराळ्या रूपानें पुनः घोषित केला. त्या ठरावांत असें स्वच्छ म्हटलें होतें कीं, "ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानकरितां केलेल्या कर्जाची व सर्व आर्थिक व्यवहारांची छाननी एका स्वतंत्र पंचमंडळाकडून करवून घ्यावी व तें मंडळ ठरवील त्याप्रमाणें कर्जाची वाटणी इंग्लंड व हिंदुस्थान यांच्या वाट्याला जशी येईल तशी त्यापैकीं प्रत्येकानें उचलावी." यांत सावकारांना बुडविण्याचा हेतु बिलकुल नव्हता. सावकारांचें कर्ज हिंदुस्थाननें फेडावयाचें का ब्रिटननें फेडावयाचें एवढाच काय तो प्रश्न होता. स्वराज्याच्या प्रश्नाच्या मुकाबल्याबरोबर याही प्रश्नाचा मुकाबला व्हावयाचा आहे. परंतु काँग्रेसच्या, या कर्जाबाबत लवादमंडळाच्या मागणीनें ब्रिटिश सरकारनें व ब्रिटिश सावकारांनीं धास्ती खाल्ली आहे व त्याचा परिणाम म्हणजे १९३५ च्या कायद्यांत कर्ज, हिंदुस्थानची आर्थिक पत संभाळणें इ० संरक्षक बंधनें घटनेंत अंतर्भूत करण्यांत आलीं आहेत. आपल्या हातांत संपूर्ण सत्ता असती तर बॅकबेचा खळगा भरण्याकरितां जो कर्जाचा डोंगर आमच्या शिरावर घालण्यांत आला आहे व ज्याच्या व्याजापायीं दरवर्षीं लाखों रुपये द्यावे लागत आहेत तें कर्ज आम्ही कधींही मान्य केलें नसतें. कालवे, पाटबंधारे, धरणें इ० बाबत कर्जें काढलीं आहेत, त्याबाबत कितीही गैरव्यवस्था व उधळपट्टीचा कारभार झाला असला तरी तीं निदान लोकांच्या हिताकरितां काढलीं असल्यामुळें तीं आपल्या अंगावर घेणें जरूर आहे. अशी वास्तविक परिस्थिति असल्यामुळें हिंदी राजकारणांत या कर्जाच्या प्रश्नाला एक प्रकारचें विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे.

मागें मंत्र्यांना गव्हर्नरांनीं बडतर्फ करावें का मंत्र्यांनीं राजीनामा द्यावा या प्रकरणांत ऑस्ट्रेलियांतील गव्हर्नरानें न्यू साउथ वेल्सचा मुख्य प्रधान व खजीनदार जॉन थॉमस लांग याला बडतर्फ केल्याचें सांगितलें

आहे. या बडतर्फीचें कारण त्यानें परदेशीय कर्ज फेडण्याचें नाकारलें हें होतें. तेव्हां ब्रिटिश सरकार व कॉंग्रेस यांच्यामधील चालू असलेल्या लढ्यांत हा कर्जाचा प्रश्न महत्त्वाचा आहे हें विसरून भागणार नाहीं.

'कर्ज' या शब्दांत वर्षासनांच्या (ॲन्युइटी) मार्गानें भांडवली रकमा परत फेडण्याच्या जबाबदारीसंबंधांत लागणारी कोणतीही द्रव्याची तोशीस आणि कोणत्याही हमीबाबत लागणारी कोणतीही तोशीस यांचा अन्तर्भाव होतो [ कलम ३११ (२) ].

(ग) सदरांतील प्रधानमंडळ व ॲडव्होकेट जनरल यांचे पगार हे 'व्होटेड' नाहींत; तर 'चार्ज्ड' आहेत. प्रधानांच्या पगाराबद्दल कायदा करण्याचा अधिकार कायदेमंडळाला आहे, तसेंच एकदां केलेला कायदा रीतसर बदलण्याचाही हक्क आहे; परंतु जोंपर्यंत कायदा आहे तसाच आहे तोंपर्यंत दरवर्षी प्रधानांचे पगार कायदेमंडळापुढें मताकरितां येणार नाहींत. प्रधानमंडळ उलथून टाकण्याचे अन्य किती तरी साधे व सोपे मार्ग आहेत. सिंधमध्यें प्रधानांनीं मागितलेली सर्वसाधारण राज्यव्यवस्थे-बाबतची मागणी कायदेमंडळानें फेटाळून लावल्याबरोबर तें प्रधानमंडळ गडगडलें. तेव्हां गव्हर्नरप्रमाणें 'राज्यकारभाराचे प्रमुख अधिकारी' म्हणून प्रधानांच्या पगाराला व भत्त्याला वगळण्यांत आलें असावें.

या प्रधानांच्या भत्त्याबाबत कांहीं कल्पना यावी म्हणून मुंबई असेंब्लींत सभासद श्री. वामन मुकादम यांनीं हंगामी मंत्रिमंडळानें प्रवास-भत्ता किती घेतला असा प्रश्न विचारला. त्याला मुख्य प्रधान श्री. बाळा-साहेब खेर यांनीं तुलनात्मक, सविस्तर असें पुढीलप्रमाणें उत्तर दिलें:—

"हंगामी मंत्री पहिल्या वर्गांतून किंवा सलूनमधून (स्वतंत्र डब्यांतून) प्रवास करीत. १ एप्रिल १९३७ पासून १८ जुलै १९३७ अखेर प्रत्येक मंत्र्याच्या मागें पुढीलप्रमाणें प्रवासभत्ता खर्च झाला:—

| | रु. आ. |
|---|---|
| १ जमनादास मेथा | ३८४४—६ |
| २ धनजीशहा कूपर | १६६३—२ |
| ३ सिद्दप्पा कंबळी | ३१७५—१० |

पंचमहालांतील दुष्काळी भागास श्री. जमनादास मेथा यांनीं एप्रिल १९३७ मध्यें दोन दिवस भेट दिली. या दोन दिवसांकरितां ८८१ रु. ४ आ. प्रवासभत्त्यादाखल खर्च पडले. १ एप्रिल १९३६ ते ३१ मार्च १९३७ अखेर धनजीशहा कूपर यांना एक्झिक्यूटिव्ह कौन्सिल-चे सभासद म्हणून व सिद्दप्पा कंबळी यांस प्रधान म्हणून अनुक्रमें ७७२२ रु. १२ आ. ६ पै व ५७४८ रु. १३ आ. भत्त्यादाखल मिळाले.

कॉंग्रेसमंत्र्यांनीं १९ जुलै १९३७ ते २८ फेब्रुवारी १९३८ अखेर पुढीलप्रमाणें प्रवासभत्ते घेतले:—

| | रु. आ. |
|---|---|
| १ मुख्य प्रधान | ९७५– ७ |
| २ अर्थमंत्री | ३८९– ८ |
| ३ गृहमंत्री | १४२९–१५ |
| ४ आरोग्यमंत्री | ११०–१० |
| ५ जमीनमहसूल मंत्री | ७२२–१२ |
| ६ पब्लिक वर्क्स मंत्री | २१२३–१५ |
| ७ स्थानिक स्वराज्य मंत्री | ८२५–१४ |

आतां ॲडव्होकेट जनरल, त्याची नेमणूक व त्याचा पगार, हा गव्हर्नरनें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें ठरविण्याचा असल्यामुळें त्याचा पगार व भत्ता हाही कायदेमंडळाच्या अधिकाराच्या कक्षेबाहेर नेऊन ठेविला आहे. मुंबई प्रांताच्या पहिल्या ॲडव्होकेट जनरलला ( मि. केनेथ केंप ) रु. २००० दरमहा पगार होता. परंतु दुसऱ्या ॲडव्होकेट जनरलची ( मि० सेटलवाड ) नेमणूक कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या शिफारसीनें झाली असून सुद्धां त्याच्या पगारांत योग्य दिशेनें ( रु. ५०० दरमहा ) कपात न होतां उलट त्याचा पगार दरमहा रु. ६०० वाढला आहे म्हणजे दरमहा रु. २६०० करण्यांत आला आहे, ही एक महदाश्चर्याची व खेद करण्यासारखी गोष्ट आहे. यामुळें न कळत १९३७-३८ साला-पेक्षां १९३८-३९ सालांतील 'चार्ज्ड' रक्कम रु. ७२०० नीं वाढविल्याचें पातक कॉंग्रेस मंत्रिमंडळावर आलें आहे.

(घ) पोटसदरांत कोणत्याही हायकोर्ट न्यायाधीशांच्या पगाराबाबत व अलावन्सबाबत होणारा खर्च प्रांतिक कायदेमंडळाच्या कक्षेंतून काढला आहे. 'त्या त्या प्रांताच्या' अशी शब्दयोजना करण्याऐवजीं 'कोणत्याही' असें म्हणण्याचें कारण ओरिसा आणि आसाम या दोन प्रांतांना स्वतंत्र हायकोर्ट अगर ज्युडिशिअल कमिशनरचें कोर्ट नाहीं. ओरिसा प्रांत याकरितां पाटणा हायकोर्टाच्या व आसाम प्रांत कलकत्ता हायकोर्टाच्या कक्षेंत येतो. कायद्याच्या २२१ व्या कलमांत या न्यायाधीशांच्या पगार इत्यादीबद्दल व्यवस्था ऑर्डर इन कौन्सिलनें ठरविण्यांत येईल असें म्हटलें आहे. सदर ऑर्डर १८ मार्च १९३७ रोजीं 'गव्हमेंट ऑफ इंडिया (हायकोर्ट न्यायाधिश) ऑर्डर, १९३७' या नांवानें काढली असून त्यांत न्यायाधीशांची कमाल संख्या, त्यांच्या तयारीकरितां व प्रवासाकरितां खर्चाची तजवीज, पगार, रजा, रजेच्या मुदतींतील परदेशप्रवासाची सोय, पेन्शन, प्रवासभत्ता इ० बद्दल तजवजि करण्यांत आली आहे. या ऑर्डरीला चार शेड्युलें जोडण्यांत आलीं आहेत. त्यांतील न्यायाधीशांची संख्या व त्यांचे वार्षिक पगार याबद्दलची माहिती उतरून घेतों:—

१ लें शेड्यूल (न्यायाधीशांची संख्या) (यांत चीफ जस्टिस, चीफ जज किंवा ज्युडीशियल कमिशनर धरलेले नाहींत पण ॲडिशनल जज्ज अथवा ॲडिशनल असिस्टंट ज्युडिशिअल कमिशनर धरलेले आहेत).

| कोर्ट | कमाल संख्या |
|---|---|
| १ मद्रासचें हायकोर्ट | १५ न्यायाधीश |
| २ मुंबईचें हायकोर्ट | १३ ,, |
| ३ कलकत्त्याचें हायकोर्ट | १९ ,, |
| ४ अलाहाबादचें हायकोर्ट | १२ ,, |
| ५ लाहोरचें हायकोर्ट | १५ ,, |
| ६ पाटण्याचें हायकोर्ट | ११ ,, |
| ७ नागपूरचें हायकोर्ट | ७ ,, |
| ८ औधचें चीफकोर्ट | ५ ,, |
| ९ सिंधच्या ज्यु. क. चें कोर्ट | ५ असिस्टंट ज्यु. क. |
| १० वायव्य सरहद्दप्रांताच्या ज्यु. क. चें कोर्ट | २ ,, ,, ,, |

( यावरून लक्षांत येईल कीं, संयुक्तप्रांतांत अलाहाबाद हायकोर्ट व औंध [ अयोध्या ] चीफ कोर्ट अशीं दोन वरिष्ठ कोर्टें आहेत. एकूण सरन्यायाधीश व इतर न्यायाधीश इ० मिळून जास्तींत जास्त ११४ इतकी संख्या भरते. अयोध्या, सिंध व सरहद्दप्रांत या तिघांखेरीज बाकीच्या सात हायकोर्टांना प्रांतांच्या राजधानीवरून नांवें दिलेलीं आहेत, प्रांतांच्या नांवांवरून दिलेलीं नाहींत. हें कलकत्ता, अलाहाबाद, लाहोर, पाटणा, नागपूर या नांवांवरून स्पष्टपणें दिसून येतें; मुंबई, मद्रास यावरून 'तितकें चटदिशीं लक्षांत भरत नाहीं. )

२ रें शेड्यूल ( न्यायाधीशांचे वार्षिक ) पगार

| | | |
|---|---|---|
| १ | कलकत्ता हायकोर्टचा सरन्यायाधीश | रु. ७२,००० |
| २ | मद्रास, मुंबई, अलाहाबाद, पाटणा, लाहोर येथील हायकोर्टांचे सरन्यायाधीश | रु. ६०,००० |
| ३ | नागपूर हायकोर्टचा सरन्यायाधीश | रु. ५०,००० |
| ४ | कलकत्ता, मद्रास, मुंबई, अलाहाबाद, पाटणा व लाहोर येथील हायकोर्टांचे न्यायाधीश; औंध चीफकोर्टाचा चीफ जज | रु. ४८,००० |
| ५ | औंध चीफकोर्टाचे जज; सिंधचा ज्युडिशियल कमिशनर | रु. ४२,००० |
| ६ | नागपूर हायकोर्टाचे न्यायाधीश | रु. ४०,००० |
| ७ | वायव्य सरहद्द प्रांताचा ज्युडिशिअल कमिशनर | रु. ३९,००० |
| ८ | सिंध अथवा वायव्य सरहद्दप्रांताचे असिस्टंट ज्युडिशिअल कमिशनर | रु. ३६,००० |

यावरून दिसून येईल कीं, दरमहा कमींत कमी तीन हजारांपासून जास्तींत जास्त दरमहा सहा हजार रुपयांपर्यंत या हायकोर्टाच्या न्यायाधीशांचे पगार ठरविले आहेत. न्यायदानाच्या कामांत कोर्टांना स्वतंत्रता वाटावी, एवढ्याकरितां त्यांचे पगार कायदेमंडळ अगर गव्हर्नर किंवा मंत्रिमंडळ यांच्या सत्तेच्या कक्षेंतून बाजूला काढले आहेत. इतकेंच नव्हे तर हायकोर्टचा सर्वच्या सर्व खर्च २२८ कलमान्वयें 'चार्ज्ड'

मानला आहे हें पुढें येणारच आहे. हायकोर्ट जजांचीं पेन्शनें मात्र फीडरल सरकारनें द्यावयाचीं आहेत व कलम ३३ (३) (घ) अन्वयें ही पेन्शनची रक्कम फीडरल उत्पन्नावर 'चार्ज्ड' आहे. अर्थात् कलम १५६ अन्वयें प्रांतिक सरकारें व फीडरल सरकार यांच्यामध्यें या पेन्शनच्या रकमेबाबत वाटाघाट होऊन जी रक्कम ठरेल ती प्रांतिक सरकारांनीं फीडरल सरकारास देणेची आहे. मतभेद झाल्यास 'हिंदुस्थानचा सरन्यायाधीश' जो निकाल देईल तो दोघांनींही अखेरचा मानला पाहिजे.

( ङ ) कलमांतील 'वगळलेल्या' प्रदेशांच्या राज्यकारभाराचा खर्चही असाच कायदेमंडळाच्या कक्षेंतून काढून घेतला आहे. या प्रदेशांच्या राज्यव्यवस्थेबाबत कलम ९१ व ९२ यांत तरतूद केलेली असून त्याबद्दल सविस्तर विवेचन पुढें येणारच आहे. ही एक प्रकारची द्विदळ राज्यपद्धतीच आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. या ( ङ ) कलमांत 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांचा समावेश केलेला नाहीं व मुंबई प्रांतांत 'वगळलेला' प्रदेश मुळींच नसल्यामुळें त्या ठिकाणीं हें ( ङ ) कलम असून नसल्यासारखेंच आहे; या कारणास्तव मुंबई बजेटमध्यें या 'वगळलेल्या' प्रदेशाकरितां म्हणून रक्कम 'चार्ज्ड' या सदरांत दाखविलेली नाहीं, हें रास्तच आहे. हे 'वगळलेले' अथवा 'वर्जित' प्रदेश फक्त मद्रास, बंगाल, पंजाब, वायव्यसरहद्द आणि आसाम या पांच प्रांतांत आहेत.

( च ) सदरांत कोर्टाचा एखादा निर्णय किंवा डिक्री भागविण्याकरितां किंवा लवादानें दिलेलें अवार्ड अमलांत आणण्याकरितां लागणारी रक्कम 'चार्ज्ड' धरलेली आहे. याचें उदाहरण म्हणून मुंबई प्रांताच्या १९३७-३८ सालच्या अंदाजपत्रकांत सरदार बिवलकर यांना द्यावयाच्या रु. २८००० चा 'डिक्रीटल व्हॅल्यू' म्हणून निर्देश केला आहे हें देण्यासारखें आहे. सरदार बिवलकर यांनीं मुंबई हायकोर्टाच्या निकालावर मुंबई सरकारविरुद्ध प्रिव्ही कौन्सिलकडे अपील केलें होतें, तें अपील सरदार बिवलकरांच्या तर्फेनें निकालांत निघाल्यानें मुंबई सरकारला बिवलकरांना सदर रक्कम द्यावी लागली. कोर्टाच्या निर्णयांना प्रामाण्य मानण्याचे दृष्टीनें अशा रकमा 'चार्ज्ड' समजल्या गेल्या आहेत हें उघड आहे. याच सदरांत 'पाणीपुरवठ्याबाबतचा अडथळा' यासंबंधींच्या १३० व १३१ कलमांत

ज्या तक्रारींचा उल्लेख केलेला आहे त्याच्या निकालानें जर एखाद्या प्रांताला कमिशनच्या खर्चाची रक्कम द्यावी लागली तर ती देण्यास गव्हर्नर जनरलला, जणूं काय तो फीडरल कोर्टाचाच हुकूम आहे अशा पद्धतीनें, प्रांतांना भाग पाडण्याचा हक्क देण्यांत आला आहे ( पोटकलम ८ ) आणि म्हणून सदर रक्कम ही 'चार्ज्ड' मानलेली आहे.

( छ ) सदर हें अतिशय व्यापक आहे. त्यांत दोन विभाग पडतात. त्यांपैकीं पहिला म्हणजे वरीलखेरीज १९३५ च्या कायद्यानेंच ज्या खर्चाच्या रकमा 'चार्ज्ड' ठरविल्या आहेत त्यांचा; व दुसरा म्हणजे प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें 'चार्ज्ड' ठरविलेल्या रकमांचा. 'प्रांतिक कायदेमंडळाचा कायदा' या शब्दसमूहाच्या अर्थात ३११ (६) कलमाप्रमाणें 'गव्हर्नराचा वटहुकूम' आणि 'गव्हर्नराचा कायदा' या दोहोंचाही समावेश होतो (कायद्याचीं ८८, ८९ व ९० हीं कलमें पहा). या दुसऱ्या विभागांत जुन्या प्रांतिक कायद्यांचा व नवीन कायदेमंडळांनीं केलेल्या कायद्यांचा समावेश होतो.

प्रथमत: पहिल्या विभागांतील 'चार्ज्ड' रकमा कोणकोणत्या त्याचा कलमवार विचार करूं.

१४८. संस्थानिकांच्या हक्कांबाबत करारनाम्याअन्वयें प्रांतिक सरकारें संस्थानिकांना ज्या रकमा देतात त्या. उ० यांत 'अबकारी उत्पन्ना'-बाबत मुंबई सरकार १९३८-३९ या सालांत पांच लाख अडतीस हजार अडीचशें रुपये इतकी रक्कम आसपासच्या संस्थानांना देणार, ती प्रांताच्या उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजली जाणार.

१६७. सध्यां सर्व प्रांतांच्या हिशेबतपासणीचें काम हिंदुस्थानचा ऑडिटर जनरल हा आपल्या हाताखालच्या अकौंटंट जनरल इ० अधिकाऱ्यांमार्फत करीत असतो. १ एप्रिल १९३९ नंतर प्रांतिक कायदेमंडळांना आपल्या प्रांतांकरितां स्वतंत्र ऑडिटर जनरल नेमण्याबद्दल कायदा मंजूर करण्याचा हक्क दिला आहे. हा कायदा मंजूर झाल्यानंतर तीन वर्षांनीं त्या कायद्यान्वयें प्रांतिक ऑडिटर जनरल नेमतां येईल. असा ऑडिटर जनरल नेमला गेल्यास त्याचा खर्च प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड'

मानला जाईल. सध्यां यासंबंधीं कांहींच प्रश्न उपस्थित होण्याचें प्रयोजन नाहीं. भावी काळांतील फक्त संभव या ठिकाणीं दिग्दर्शित केला आहे.

२२८ ( १ ) व ( २ ). हायकोर्टाबाबत होणारा सर्व खर्च—मग त्यांत न्यायाधीशांचे पगार व भत्ते एवढेच नव्हेत [ त्यांचा उल्लेख वर ७८ ( ३ ) (घ) मध्यें आलाच आहे ]—तर सर्व अधिकारी व नोकर यांचा पगार इत्यादि सहवर्तमान प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज' म्हणून घातला आहे. न्यायखात्याच्या स्वातंत्र्यरक्षणाची ही काळजी परमावधीला पोंचलेली दिसते; कारण साध्या चपराश्यांच्या किंवा कारकुनांच्या पगाराबाबतही कायदेमंडळांना सत्ता नाहीं. इतकेंच नव्हे तर बजेटांत या खातीं किती रक्कम खर्ची घालावयाची त्याबाबतही अखेरचा अधिकार मंत्रिमंडळाला नसून तो गव्हर्नरकडे ठेवण्यांत आला आहे.

२४७ ( ४ ) व ( ५ ).<br>२४८ ( ४ ).<br>२४९ ( १ ). } या सर्व कलमांतून भारतमंत्र्यानें नेमलेल्या सिव्हिल सर्व्हंटांच्या पगाराची, भत्त्याची, पेन्शनची वगैरे सर्व तरतूद पक्क्या बंदोबस्तानें केलेली आहे. भावी स्वराज्याची भीति सिव्हिल सर्व्हंटांना वाटूं नये ही दखलगिरी या कलमांनीं घेतली आहे. पगार भलतेच जास्त आहेत हें या काळजीवरून उघडच दिसून येत आहे. या नोकरांच्या बाबत जो जो खर्च येईल, मग तो क्षुल्लक का असेना, उदाहरणार्थ, प्रवासखर्च, घरभाडें, जादा कामाबद्दल पगार, कोणी परीक्षक असल्यास त्याची फी, बिलायतेच्या प्रवासाचा खर्च, हिंदुस्थानांत नोकरीला येण्याच्या तयारीचा खर्च—असे सर्व खर्च प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज' म्हणून घातले आहेत. कांहीं कारणानें अशा नोकरांना नुकसानभरपाई देण्याचा प्रसंग आल्यास तीही रक्कम 'चार्ज्ड'च समजावयाची.

२५९ ( १ ). १९२४ च्या पूर्वी भारतमंत्र्यांनीं न नेमलेल्या नोकरांचा पगार व भत्ता हीं सुद्धां प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज' म्हणून घातलीं गेलीं आहेत. त्यांतल्या त्यांत जुन्या नोकरांना आश्वासन !

२६८. प्रांतांच्या पब्लिक सर्व्हिस कमिशनचा सर्व खर्च—सभासद व इतर नोकर यांचा पगार, भत्ता इ०—प्रांताच्या उत्पन्नावर 'चार्ज' घातला गेला आहे. या कमिशनकडे नोकरवर्ग नेमणें, त्यांच्या परीक्षा घेणें

इ० कामें दिलेलीं आहेत. पब्लिक सर्व्हिस कमिशनचा अध्यक्ष, सभासद, चिटणीस वगैरेंच्या नेमणुकी गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाच्या आहेत. कायद्यानें दोन अथवा अधिक प्रांतांकरितां एकच प० स० क० नेमण्याची मुभा ठेवण्यांत आली आहे. त्याअन्वयें मुंबई-सिंध या प्रांतांचें जोडकमिशन नेमण्यांत आलें आहे. १९३८-३९ सालाकरितां कमिशनचा खर्च रु. १,२१,२०० अंदाजण्यांत आला आहे. त्यापैकीं सिंध प्रांतानें आपल्या वाट्याचे रु. २५००० द्यावयाचे, बाकीचे रु. ९६,२०० मुंबई-प्रांताच्या डोक्यावर बसविण्यांत आले आहेत. चेअरमनसुद्धां तीन सभा-सदांपैकीं एक सभासद शहानवाज भुट्टो हे सिंधी गृहस्थ आहेत. त्यांचा वार्षिक पगारच मुळीं रु. २४००० आहे. यावरून सिंध प्रांतानें आपलें काम भरपूर व योग्य मोबदला न देतां मुंबई प्रांताकडून करून घेण्याचें ठरविलेलें दिसतें. कदाचित् वेगळ्या झालेल्या छोट्या भावास ही जादा सवलत दिलेली दिसते!

२७० (२). २७१ (३). सरकारी नोकरी करीत असतांना एखाद्या नोकरावर दिवाणी किंवा फौजदारी खटला झाल्यास त्याबाबत झालेला खर्च त्या नोकरानें स्वतः न देतां तो प्रांतिक तिजोरींतून करावयाचा व असा खर्च 'चार्ज्ड' समजावयाचा; तसेंच दिवाणी दाव्यांत खटला विरुद्ध होऊन सरकारी नोकरांना जर दाव्याचा खर्च, शिवाय नुकसानभरपाई म्हणून इतर रक्कम जर कोर्टानें द्यावयास लावली तर ती रक्कम प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजावयाची!

३०० (२). राजकीय कारणास्तव अगर भूतदयेखातर जें पेन्शन किंवा इतर देणगी दिलेली असेल ती 'चार्ज्ड' समजावयाची. नुकतेंच सोलापूरच्या रानड्यांना मार्शल लॉच्या काळांत त्यांचा मुलगा विनाकारण मारला गेला, त्याच्या भरपाईदाखल मुंबई सरकारनें तीन हजार रुपयांची रक्कम दिली ती या कलमान्वयें दिलेली असून ती प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' म्हणून घातली जाईल.

३०५ (२). प्रत्येक प्रांतिक गव्हर्नरानें आपल्या स्वतःचा सेक्रेटरी व त्याच्या हाताखालील नोकरलोक आपल्या मर्जीप्रमाणें नेमावयाचे आहेत; त्यांचा पगारही त्यानेंच ठरवावयाचा आहे. १९३८-३९ सालांत या

सेक्रेटरीकरितां रु. १,०१,३०० इतका खर्च पडला आहे. १ एप्रिल १९३७ ला मि. ब्रिस्टो यांची 'गव्हर्नराचा सेक्रेटरी' म्हणून दरमहा तीन हजार रुपये पगारावर नेमणूक झाली होती; परंतु १९३८-३९ सालच्या बजेटांत या सेक्रेटरीचा पगार दरमहा रु. ३५०० धरला आहे; व मि. ब्रिस्टो यांच्या जागीं मि. आयर्विन यांची नेमणूक करण्यांत आली आहे. म्हणजे वर्षाला रु. ६००० ची रकम 'चार्ज्ड' खर्चांत वाढली आहे. या एक लाख रकमेंत घरभाड्याकरितां म्हणून रु. ६००० रक्कम खर्चांत दाखविण्यांत आली आहे.

शेड्यूल ३ (६). ४८ कलमाबाबत (म्हणजे गव्हर्नराच्या पगाराबाबत व इतर भत्ता, इतमाम् इत्यादि बाबतच्या तरतुदींसंबंधींचें कलम) या शेड्यूलची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. त्यांतील शेवटच्या म्हणजे सहाव्या कलमांत म्हटलें आहे कीं, शेड्यूलमधील गव्हर्नराबाबत व्यवस्था अमलांत आणण्याकरितां लागणारी सर्व रक्कम प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजली जाईल.

आतां दुसऱ्या विभागांतील म्हणजे प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें ज्या रकमा 'चार्ज्ड' मानलेल्या असतील त्यांचा उल्लेख करावयाचा. १९३५ च्या कायद्याच्या २९२ कलमान्वयें सध्यां चालू असलेले कायदे त्या त्या प्रांतिक अगर मध्यवर्ती कायदेमंडळांनीं बदलेपर्यंत अगर रद्द करीपर्यंत अगर दुरुस्त करीपर्यंत चालू रहावयाचे आहेत. सदर कायद्यांतील खर्चाच्या रकमा 'इंडिया आणि बर्मा (तात्पुरत्या तरतुदी) ऑर्डर, १९३६' कलम ४ (आ) प्रमाणें १ एप्रिल १९३७ पासून दोन वर्षेंपर्यंत म्हणजे ३१ मार्च १९३९ अखेर प्रांताच्या उत्पन्नावर बोजा (चार्ज) म्हणून समजाव्यात असें ठरविण्यांत आलें आहे. त्यानंतर त्याबाबत योग्य ती दुरुस्ती प्रांतिक कायदेमंडळांनीं करावी अगर न करावी. कायद्यांत सांगितल्यामुळें ज्या रकमा प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' मानल्या गेल्या आहेत त्यांचा त्या कायद्यासह पुढीलप्रमाणें थोडक्यांत उल्लेख करतां येईल:—

**१ सरकारसारामाफीचे कायदे** ( १८६३ )

या कायद्यांन्वयें इनामदारांना द्यावयाच्या रकमा ( मुंबई प्रांतांत तीन लाख सत्तावीस हजार ) 'चार्ज्ड' आहेत.

**२ मुंबई अबकारी कायदा** ( १८७८ )

या कायद्यान्वयें संस्थानिकांना व मुंबई म्युनिसिपालिटीला द्यावयाच्या रकमा 'चार्ज्ड' आहेत ( अनुक्रमें रु. ५,३८,२५०, व रु. १,४३,७५० )

**३ मुंबई विद्यापीठाचा कायदा** ( १९२८ )

रु. १,१७,००० ची वार्षिक ग्रँट मुंबई युनिव्हर्सिटीला देणेची ती 'चार्ज्ड' आहे: बाकीची रुपये ३३४४० ही 'व्होटेड' आहे ( १९३८-३९ सालचें अंदाजपत्रक ).

**४ मोटार गाड्यांच्या करावाबतचा कायदा** ( १९३५ )

या कायद्याच्या ९ (१) (अ) कलमान्वयें लोकल बोर्डांना जी सात लाख रुपये रक्कम ग्रँट म्हणून द्यावयाची ती 'चार्ज्ड' आहे. ९ ( ४ ) कलमान्वयें पांच लाख रुपयांचा प्रांतिक रस्ता फंड हाही 'चार्ज्ड' रकमांत समाविष्ट केलेला आहे.

आतां प्रांतिक स्वराज्याच्या पहिल्या वर्षाच्या काळांत ( म्हणजे १९३७-३८ या सालांत ) कायदेमंडळांच्या कक्षेंतून खर्चाच्या रकमा काढून घेऊन त्या 'चार्ज्ड' ठरविण्याचा प्रयत्न फारसा कोठें झालेला दिसत नाहीं. असें करणें म्हणजे एका अर्थानें प्रांतिक कायदेमंडळांचें स्वातंत्र्य खच्ची करण्यासारखें आहे. " पंजाबमधील स्पीकर इ० चा पगार 'चार्ज्ड' केला पाहिजे, कारण तसें न झालें तर स्पीकरच्या पगाराबाबत दरसाल ऊहापोह, चर्चा वगैरे करणें प्राप्त होऊन त्याच्या स्वतंत्र दर्जास त्यामुळें धोका पोंचण्याचा संभव आहे " या सबबीवर पंजाबचे मुख्य प्रधान सर शिकंदर हयातखान यांनीं पंजाब असेंब्लींत आपले प्रतिगामी विचार प्रकट केले होते; परंतु त्यांनीं याबाबत अद्याप पाऊल टाकलेलें दिसत नाहीं. बिहारमध्यें 'दुष्काळ निवारण खर्चाबाबतचा कायदा' बिहार कायदेमंडळाने मंजूर केला असून त्याअन्वयें 'दुष्काळ-निवारणा'बद्दल लागणाऱ्या रकमा 'चार्ज्ड' ठरविण्यांत आल्या आहेत. ही बाब व त्यांतील

हेतु कितीही उच्च असले तरी अशा खर्चावरील लोकसभेचें नियंत्रण कमी करण्याचें कांहींच प्रयोजन नाहीं. ८२ (१) कलमाप्रमाणें 'व्होटेड' रकमा 'चार्ज्ड' ठरविणाऱ्या बिलाला अथवा बिलाच्या दुरुस्तीला कायदेमंडळापुढें येण्याला गव्हर्नरची म्हणजे मंत्रिमंडळाच्या सल्लयाप्रमाणें चालणाऱ्या गव्हर्नराची शिफारस लागते व तें बिल अगर बिलाची दुरुस्ती प्रांतिक लेजिस्लेटिव्ह कौन्सिलपुढें प्रथम मांडतां येत नाहीं अशी तरतूद करून ठेवण्यांत आली आहे. 'व्होटेड' रकमा 'चार्ज्ड' करणें किंवा 'चार्ज्ड' रकमांत वाढ करणें या गोष्टी लोकशाहीच्या प्रगतीच्या दृष्टीनें निःसंशय हानिकारक आहेत.

(उ) १९३७ च्या पावसाळ्यांत बंगाल प्रांतिक असेंब्लीच्या अधिवेशनांत प्रेसिडेंट आणि स्पीकर यांच्या पगाराचें बिल मंजूर झालें. सदर पगार कायदा करून ठरविण्याचा अधिकार ६५ (४) कलमाप्रमाणें कायदेमंडळाला आहे. १९३५ च्या कायद्यानें स्पीकर किंवा प्रेसिडेंट यांचा पगार 'चार्ज्ड, ठरविलेला नाहीं. परंतु ७८ (३) (छ) सदराप्रमाणें कायदेमंडळाला कायदा करून कोणताही खर्च 'व्होटेड' यादींतून काढून 'चार्ज्ड' यादींत ढकलतां येतो. या कलमाचा फायदा घेऊन बंगाल मंत्रिमंडळानें कायदेमंडळाकडून त्या अर्थाचें कलम बिलांत घालून तें मंजूर करवून घेतलें. त्याच वेळीं १९३७-३८ सालच्या बजेटमधील खर्चाच्या मागण्या मंजूर होत होत्या. 'लेजिस्लेटिव्ह बॉडीज'करितां कांहीं 'चार्ज्ड' व कांहीं 'व्होटेड' अशी मिश्र मागणी असेंब्लीपुढें ठेवण्यांत आली. कॉंग्रेस पक्षाचे डॉ. संन्याल यांनीं सदर मागणीला आक्षेप घेतला. स्पीकरनें संन्याल यांच्या म्हणण्याला पाठिंबा देऊन सरकारपक्षाला विचारलें, "कायद्यानें तसें जाहीर झाल्याशिवाय या असेंब्लीला एखादा खर्च 'चार्ज्ड' असल्याची दखलगिरी घेतां येईल काय? अद्याप स्पीकर-प्रेसिडेंटच्या पगाराचें बिल कौन्सिलनें मंजूर केलेलें नाहीं; निदान एवढें तरी खास कीं, त्या बिलाला गव्हर्नरची मंजुरी मिळालेली नाहीं. तोंपर्यंत त्या बिलाला कायद्याचें स्वरूप येऊं शकत नाहीं. म्हणून संन्याल यांनीं घेतलेल्या आक्षेपास मी मान्यता देतों." ना. नाझीमुद्दिन व ना. नलिनीरंजन सरकार यांच्यामध्यें वाटाघाट होऊन ना. सरकारनीं स्पीकरच्या

सांगण्याप्रमाणें स्पीकरप्रेसिडेंटच्या पगाराची रक्कम 'चार्ज्ड' सदरांतून काढून 'व्होटेड' सदरांत घातली व त्यावर असेंब्लीचें मत घेतलें. अशा रीतीनें हा प्रयत्न तात्पुरता फसला. तरी नंतर गव्हर्नरची मंजुरी मिळून सदर बिलाचा कायदा झाल्यापासून त्यांच्या पगारावर मत देण्याचा बंगाल असेंब्लीचा अधिकार नष्ट झाला आहे.

( ऊ ) ७८ ( ४ ) कलमांत सांगितलें आहे कीं गव्हर्नरनें आपला निर्णय आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचा आहे. " त्याच्या निर्णयांत जर कांहीं चूक झालेली असली तर ती दुरुस्त करितां येणार नाहीं किंवा तिच्याबद्दल तक्रार करितां येणार नाहीं आणि गव्हर्नरची चूक दुरुस्त करण्याचा सल्ला देणें हें प्रधानांच्या अधिकार कक्षेंत येत नाहीं " अशा डॉ. संन्याल यांनीं बंगाल असेंब्लींत केलेल्या विधानास स्पीकरनें उचलून धरिलें ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

अंदाजपत्रकाबाबत कायदेमंडळांतील कार्यपद्धति

७९.—( १ ) प्रांताच्या उत्पन्नावर बोजा असलेल्या खर्चाचें अंदाजपत्रक तेवढें लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या मताला घातलें जाणार नाहीं, परंतु याचा अर्थ कायदेमंडळांतून त्या अंदाजपत्रकावरील चर्चाही बंद केली जाईल असा कधींही केला जाणार नाहीं; मात्र लगतच्या मागील कलमांतील तिसऱ्या पोटकलमाच्या ( क ) सदरांत उल्लेखिलेल्या खर्चाच्या अंदाजाबाबत चर्चाही करितां येणार नाहीं.

( २ ) वरील अंदाजपत्रकापैकीं जेवढा भाग इतर खर्चाबाबत असेल तेवढा लेजिस्लेटिव्ह असेंब्लीला खर्चाकरितां लागणाऱ्या रकमांच्या मागणीच्या रूपानें सादर करण्यांत येईल आणि एखाद्या मागणीला संमति देणें अथवा संमति देण्याचें नाकारणें अथवा मागणींत निर्दिष्ट केलेली रक्कम कमी करून मागणीला संमति देणें याबाबतचे अधिकार लेजिस्लेटिव्ह असेंब्लीला राहतील.

( ३ ) गव्हर्नरची शिफारस असल्याखेरीज खर्चाकरितां कोणतीही मागणी करतां येणार नाहीं.

( अ ) गव्हर्नराचा पगार आणि भत्ता आणि इतर खर्च याबाबत कायदेमंडळांत चर्चाही करितां येणार नाहीं, याबद्दल मागील कलमावरील विवरणांत उल्लेख येऊन गेलाच आहे. तसेंच, असेंब्लीला खर्चाची एखादी मागणी संपूर्णपणें नाकारण्याचा या कलमान्वयें हक्क आहे तो हक्क आसाम असेंब्लीनें डिव्हिजनल कमिशनरांच्या नोकरवर्गाच्या पगाराबाबत

बजावल्याबद्दल व गव्हर्नरनें आपले जादा अधिकार अमलांत आणल्याबद्दल मागें वर्णन केलेंच आहे. तसेंच सिंध असेंब्लीनें 'राज्यकारभारा'बाबतची मागणी फेटाळून लावून हिदायतुल्ला मंत्रिमंडळ उलथून पाडल्याचें मागें सांगितलेंच आहे. अशा वेळीं व जुनें मंत्रिमंडळ टिकविण्याकरितां आपल्या जादा अधिकारांचा उपयोग करूं नये, असें गव्हर्नराला दिलेल्या 'आज्ञापत्रां'त स्पष्ट सांगितलें आहे, इतकेंच नव्हे तर सदर 'आज्ञा' ही सर्व कायदा कळण्याची व तो अमलांत आणण्याची गुरुकिल्ली आहे असें लॉर्ड झेटलंड यांनीं पार्लमेंटांत त्याचें वर्णन केलें आहे.

दुसऱ्या पोटकलमांत 'मागणींत निर्दिष्ट केलेली रक्कम कमी करून' असा उल्लेख आहे. १९१९ च्या कायद्यांत 'खर्चाच्या ज्या वेगवेगळ्या सदरांनीं मिळून एखादी मागणी मांडलेली असते त्या सदरांपैकीं कांहीं रक्कम कमी करून' असा जरा वेगळा उल्लेख आहे. म्हणजे १९१९ च्या कायद्याप्रमाणें एखाद्या मागणीच्या पोटहिश्शांत कपात सुचवितां येत असे किंवा तेवढाच पोटहिस्सा काढून टाकतां येत असे. नवीन कायद्याप्रमाणें वट्ट मागणींत कपात सुचवावी अगर वट्ट मागणीच्या मागणीच फेटाळून द्यावी, यांपैकीं कोणत्या तरी मार्गाचा आश्रय करावा लागेल. यामुळें एखाद्या विशिष्ट व मर्यादित गोष्टीविषयीं जरी आमदाराला चर्चा उपस्थित करावयाची असली तरी त्याला सर्वमागणीविषयक कपातसूचना द्यावी लागते व 'अमक्या अमक्या कारणाकरितां' असें आपल्या उद्देशाचें स्पष्टीकरण करावें लागतें. याबाबतचा हरकतीचा मुद्दा प्यारीशंकर रॉय यांनीं ओरिसा असेंब्लींत आणला होता. ओरिसा स्पीकरनें 'सदर बाबीचा निकाल करणें अवघड आहे; व तसा प्रसंग उत्पन्न झाल्यास आपण जरूर निर्णय देऊं व प्रस्तुत प्रसंगीं सभागृहापुढें त्याचा विचार कर्तव्य नाहीं' असें सांगितलें.

१९१९ च्या कायद्यान्वयें कित्येकदां सरकारतर्फे पूर्ण खर्चाची मागणी मागितली न जातां फक्त खूण मागणी ( टोकन डिमांड ) मागितली जाई. तीच पद्धत मुंबई असेंब्लींत प्रधान मि. नुरी यांनीं रु. २,७०,४८९ च्या मागणीऐवजीं रु. ७० मागितले तेव्हां व मद्रास असेंब्लींत मुख्य प्रधान व अर्थमंत्री ना. राजगोपाळाचार्य यांनीं स्पीकरच्या परदेशप्रवासाबाबत रु. ५००० ऐवजीं रु. १०० मागितले तेव्हां

त्या दोघांकडून अनुसरली गेली. मुंबई असेंब्ली स्पीकर यांनीं नव्या कायद्याप्रमाणें अशा तऱ्हेनें मागण्या करण्याची जरूरी नाहीं, असें प्रतिपादल्यामुळें व विरोधी पक्षाचे पुढारी सर देहलवी यांनीं स्पीकर-च्या म्हणण्याला दुजोरा दिल्यामुळें सर्वच्या सर्व रक्कम मागण्यांत आली. हा किरकोळ फरक जातां जातां लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

या कलमांत लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्याच अधिकाराचा उल्लेख आहे त्यावरून 'खर्चाच्या मागण्या' लेजिस्लेटिव्ह कौन्सिलपुढें सादर करण्याचें किंवा त्याची मंजुरी घेण्याचें कांहींही कारण नाहीं. असेंब्ली आणि कौन्सिल यांच्या बजेटसंबंधींच्या अधिकारांत हा फारच मोठा फरक आहे. पहिल्या पोटकलमांतील 'कायदेमंडळांतील या अंदाजपत्रकाची चर्चा थांबविणें' इत्यादि उल्लेखावरून चर्चा करण्याचा अधिकार दोन्ही सभागृहांना आहे (फक्त तो गव्हर्नराच्या पगाराबाबत व खर्चाबाबत कोणत्याही सभागृहाला नाहीं); असेंब्लीला 'चार्ज्ड' खेरीजकरून इतर खर्चावर मत देण्याचा अधिकार आहे; म्हणजे कोणताही खर्च मंजूर करणें, कमी करणें वा नामंजूर करणें हे सर्व अधिकार असेंब्लीला आहेत. फीडरल कौन्सिल ऑफ स्टेटला मात्र फीडरल असेंब्लीइतकेच खर्चाच्या मागण्याविषयीं हक्क ठेवण्यांत आले आहेत.

कोणतीही खर्चाची मागणी करण्याचा अधिकार गव्हर्नरला आहे म्हणजे मंत्र्यांना आहे; कारण या (३) ऱ्या पोटकलमांत 'गव्हर्नर' शब्दाला 'आपल्या मर्जीप्रमाणें' किंवा 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' हीं विशेषणें लागलेलीं नाहींत. आणि कारण उघडच आहे कीं, प्रांताच्या कारभाराची ज्यांनीं आपल्या शिरावर जबाबदारी घेतली त्यांनाच कोणत्या खात्याला किती खर्च लागणार हें बरोबर कळणार; कायदेमंडळाचें काम फक्त संमति देण्याचें अथवा न देण्याचें अथवा रक्कम कमी करण्याचें असतें. कायदेमंडळांतील एखाद्या सभासदाला जरी एखाद्या खात्याला जास्त रक्कम द्यावी अशी सूचना करावयाची असली तरी त्याला ती सदर खर्चाच्या मागणींत कपात सुचवूनच करावी लागते ही एक नवलाची गोष्ट आहे!

१९१९ च्या कायद्यानें ज्यावर मध्यवर्ती असेंब्लीला मत देतां येत नाहीं अशा गोष्टींची (लष्कर, परराष्ट्र इ०) चर्चाही गव्हर्नर

जनरलच्या परवानगीशिवाय करतां येत नसे. आजपर्यंत गव्हर्नर जनरलनें चर्चेला परवानगी देण्याची रूढि पाडली आहे, इतकेंच नव्हे तर वरील खात्यांपैकीं कांहीं क्षुल्लक रकमांवर असेंब्लीचें मतही घेण्यांत येत असे. परंतु प्रांतिक स्वराज्याला १ एप्रिल १९३७ ला सुरवात झाल्यानंतर दरम्यानच्या काळांत फेडरेशनची छाया मध्यवर्ती सरकार व कायदेमंडळ यांवर पडत असल्याचें एक गमक म्हणजे १९३८ च्या मार्चमध्यें दिल्लीच्या असेंब्लींत गव्हर्नर जनरलनें आजपर्यंत रूढीनें ज्या मागण्यांवर असेंब्लीचें मत घेण्यांत येत असे त्यांच्या रकमा लष्कर, परदेशसंबंध इ० खर्चांत घालून असेंब्लीचा रूढीनें मिळालेला हक्क हिरावून घेतला. याचा निषेध सर्व लोकनियुक्त सभासदांनीं केला; परंतु त्याचा तिळमात्रही उपयोग झाला नाहीं.

मागें सांगितलेंच आहे कीं, प्रांतांतून 'चार्ज्ड' रक्कम एकंदर खर्चाच्या शेंकडा २५ टक्के आहे. मध्यवर्ती सत्तेंत ती शेंकडा ९० टक्के आहे. आम्हांला वाटतें कीं यामुळें स्वायत्ततेला फार मोठा बाध येतो. परंतु जॉइंट पार्लमेंटरी कमिटी म्हणते कीं, अशी योजना इंग्लंडांत सुद्धां आहे आणि तेथेंही दरवर्षी सर्वच रकमांवर मत घेतलें जात नाहीं; परंतु जॉइंट पार्लमेंटरी कमिटीला हें समजत नाहीं कीं, किंवा समजूनही ती मुद्दाम हिंदी लोकांपासून ही गोष्ट छपवून ठेवूं इच्छिते कीं, पार्लमेंटनें मनांत आणल्यास त्याला 'कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं' असे सर्व अष्टाधिकार आहेत. हिंदी कायदेमंडळें मात्र परतंत्र आहेत आणि दुसऱ्याच्या म्हणजे पार्लमेंटच्या ओंजळीनें पाणी पिणारीं आहेत.

अधिकृत खर्चाच्या पत्रकावर शिक्का-मोर्तब करणें

८०.—(१) गव्हर्नर आपल्या सहीनें खर्चाच्या पत्रकाला प्रामाण्य आणून देईल; त्या पत्रकांत पुढील गोष्टींचा निर्देश असेल—

(क) लगतच्या मागील कलमान्वयें असेंब्लीनें मंजूर केलेल्या खर्चाच्या रकमा;

(ख) प्रांताच्या उत्पन्नावर बोजा (चार्ज) असलेल्या खर्चाचा भाग पुरा पाडण्याकरितां लागणाऱ्या अनेक रकमा; परंतु एखाद्या रकमेच्या बाबतींत एका अथवा दोन्ही सभागृहांपुढें पूर्वी ठेवलेल्या पत्रकांत दाखविलेल्या रकमेपेक्षां कधींही जास्ती आंकडा असणार नाहीं.

याला फक्त एक अपवाद; तो असा कीं, जर असेंब्लीनें एखादी खर्चाची मागणी मान्य करण्याचें नाकारलें किंवा त्या मागणींत निर्दिष्ट केलेली रक्कम कमी

करून ती मागणी मान्य केली तर गव्हर्नरनें त्याच्या मतानें त्याला सदर नाकारण्यानें वा कमी करण्यानें आपल्या जादा जबाबदाऱ्यांपैकीं एखादी योग्य तऱ्हेनें पार पाडण्यास धोका पोंचत आहे असें वाटल्यास, त्या पत्रकांत ती जबाबदारी पार पाडण्यास जरूर अशी एखादी अधिक रक्कम असल्यास, ती अन्तर्भूत करावी; मात्र ती नाकारलेल्या रकमेपेक्षां किंवा रकमेच्या कमी केलेल्या भागापेक्षां, जसें असेल त्याप्रमाणें, कधींही जास्त असतां कामा नये.

(२) अशा तऱ्हेनें प्रामाण्य दिलें गेलेलें खर्चाचें पत्रक असेंब्लीपुढें ठेवण्यांत येईल, परंतु कायदेमंडळांत त्याच्यावर चर्चा होऊं दिली जाणार नाहीं किंवा त्याच्यावर मतही घेतलें जाणार नाहीं.

(३) याच्याच पुढील कलमांतील तरतुदींना बाध न आणतां, वरीलप्रमाणें प्रामाण्य मिळालेल्या खर्चाच्या पत्रकांत स्पष्टपणें निर्देश असल्याशिवाय एखादी रक्कम प्रांताच्या उत्पन्नांतून खर्च करण्यास योग्य अधिकाराप्रमाणें मिळाली असें मानण्यांत येणार नाही.

(अ) १९३७ सालीं कायदेमंडळाच्या पहिल्या अधिवेशनाच्या वेळीं मुंबई कौन्सिलांत फार उशीरानें म्हणजे असेंब्लीनें बजेटवर चर्चा करून कित्येक खर्चाच्या मागण्यांना मंजुरीही दिल्यानंतर ना. लठ्ठे यांनीं १९३७-३८ सालचें अंदाजपत्रक मांडलें. त्यावर मजुरांचे प्रतिनिधी म्हणून नेमले गेलेले सभासद रा. एस्. सी. जोशी यांनीं असा हरकतीचा मुद्दा उपस्थित केला कीं, 'अशा स्थितींत कौन्सिलपुढें बजेट मांडणें म्हणजे कौन्सिलच्या अधिकाराची निवळ थट्टा करण्यासारखें आहे.' त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणें असें होणें हें एका अर्थानें अपरिहार्य होतें; परंतु या कलमांतील तिसऱ्या पोटकलमाच्या आधारें ना. लठ्ठे यांनीं या हरकतीस असें उत्तर दिलें कीं, असेंब्लीनें जरी कांहीं मागण्यांना मंजुरी दिलेली असली तरी सर्व मागण्यांना अद्याप दिलेली नाहीं; शिवाय गव्हर्नरची सही झाल्याशिवाय बजेट संपूर्णपणें व अधिकृतपणें मंजूर झालें असें कदापिही म्हणतां येणार नाहीं. हें उत्तर जरी कायद्याच्या कलमाच्या शब्दार्थाला धरून असलें तरी रा. जोशी यांच्या आक्षेपांत बरेंच तथ्य होतें. परंतु त्याला, एकाच वेळीं दोन्ही सभागृहांपुढें बजेट मांडावयास हवें होतें, या दृष्टीनें जरी महत्त्व असलें तरी घटनेनें बजेटमंजुरीबाबत कौन्सिलचे अधिकारच अत्यंत मर्यादित स्वरूपाचे ठेवले आहेत, ही गोष्ट डोळ्याआड करितां येणार नाहीं.

पुढील कलमांत वर्णिलेल्या पुरवणीमागण्यांच्या पत्रकालाही हाच न्याय लागू आहे.

जुनी राजवटी संपून नवीन प्रांतिक स्वराज्यांला सुरवात होत असतांना जो मध्यंतरींचा संक्रमणावस्थेचा काळ होता त्याबाबत व्यवस्था ऑर्डर इन कौन्सिलनें करण्यांत आली होती. १ एप्रिल १९३७ पासून सहा महिनेपर्यंत प्रांताच्या मागील वर्षाच्या खर्चाच्या निम्म्या रकमेइतका खर्च करण्याची मुभा गव्हर्नरांना देण्यांत आली होती. त्या काळांत प्रांतिक असेंब्लीचें अधिवेशन भरून बजेट मंजूर झाल्यास प्रश्नच मिटला; नाहीं तर ही सत्ता गव्हर्नरनें वापरावयाची होती. आश्वासनमागणीनें निर्माण झालेला पेचप्रसंग वेळींच सुटल्यामुळें ६ महिन्यांच्या मुदतीच्या आंत कायदेमंडळांचीं अधिवेशनें भरून बजेटें मंजूर झालीं. परंतु ज्या वेळीं हीं बजेटें मंजूर झालीं त्या वेळीं प्रांताचा जवळ जवळ निम्मा खर्च होऊन चुकला होता; तो जमेस धरून बाकीच्या सहा महिन्यांच्या खर्चाची तरतूद करावयाची होती. म्हणून कित्येक प्रांतांतून १९३७-३८ सालचीं जीं बजेटें सादर करण्यांत आलीं तीं गव्हर्नर व अर्थमंत्री यांच्या मताच्या मिश्रणाचीं झालीं होतीं असें म्हटल्यास तें वर्णन यथार्थच होणारें आहे.

७८ ( २ ) कलमांत बजेट मांडावयाचे वेळींच आपल्या खास जबाबदारीकरितां कांहीं रक्कम स्वतंत्र निर्दिष्ट करण्याचा गव्हर्नराला अधिकार आहे; परंतु ८० ( १ ) मध्यें दिलेला अधिकार हा असेंब्लीनें मागणी नाकारल्यास अथवा कमी केल्यासच व गव्हर्नराला तसें करणें जरूर वाटल्यासच त्यानें खर्चाचें अधिकृत पत्रक तयार करण्याचे वेळीं वापरावयाचा आहे, हा फरक लक्षांत ठेवला पाहिजे. खर्चाचें अधिकृत पत्रक कायदेमंडळापुढें ठेवण्याचा उद्देश दुसरा तिसरा कांहीं नसून फक्त सभागृहांत त्याची नोंद करून ठेवणें एवढाच होय ( बंगाल असेंब्ली स्पीकर ).

( आ ) नमुन्याकरितां गव्हर्नरनें सही केलेलें मुंबई प्रांताचें अधिकृत खर्चाचें पत्रक ( १९३८-३९ सालचें ) उतरून घेतों:—

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ८० व्या कलमांतील (१) पोटकलमान्वयें दिलेल्या अधिकारान्वयें मी, लॉरेन्स रॉजर लमली, मुंबईचा गव्हर्नर, १९३८-३९ सालाकरितां पुढील अधिकृत खर्चाच्या पत्रकावर सही करून तें प्रमाणभूत करितों:—

## पत्रक

| खर्चाचीं सदरें | मुंबई ले. अ.नें मंजूर केलेल्या रकमा | उत्पन्नावर चार्ज असलेला खर्च भागविणेकरितां रकमा | एकूण |
|---|---|---|---|
| ७ जमीनमहसूल | ६०१४००० | ५६४००० | ६५७८००० |
| ८ प्रांतिक एक्साइज (अबकारी) | ३४०५००० | ७२२००० | ४१२७००० |
| ९ स्टांप | १९७००० | .... | १९७००० |
| १० जंगल | २२५६००० | ४४६००० | २७०२००० |
| ११ नोंदणी | ५६१००० | .... | ५६१००० |
| १२ मोटारगाड्यांच्या कायद्याबाबत खर्च | २४२००० | १५७८००० | १८२०००० |
| १३ इतर कर व ड्यूटी | १२३९००० | .... | १२३९००० |
| १७ इरिगेशनच्या भांडवली कामावरील व्याज | .... | ४१७८००० | ४१७८००० |

| | | | |
|---|---|---|---|
| XVII चालू खर्च वजा करा | | | |
| १८ नित्याच्या उत्पन्नांतून केलेला खर्च | ३२५१००० | ८२००० | ३३३३००० |
| १९. कालव्याचीं कामें करणें | | | |
| २२ कर्ज आणि इतर बोजावरील व्याज | .... | १२००८००० | १२००८००० |
| २३ कर्ज कमी करण्याकरितां किंवा टाळण्याकरितां केलेली तरतूद | .... | ६३२००० | ६३२००० |
| २५ सर्वसाधारण राज्यकारभार | ६१०६००० | १९४४००० | ८०५०००० |
| २७ न्यायदान | ४६७८००० | २०३९००० | ६७१७००० |
| २८ तुरुंग इ० | १५३३००० | १२६००० | १६५९००० |
| २९ पोलिस | १३२६६००० | ९२२००० | १४१८८००० |
| ३० बंदरें इ० | १००० | ४००० | ५००० |

| | | | |
|---|---|---|---|
| ३६ शास्त्रविषयक खार्ती | १०३००० | .... | १०३००० |
| ३७ शिक्षण | १९३१४००० | ६९३००० | २०००७००० |
| ३८ वैद्यक | ४१०१००० | ५१०००० | ४६११००० |
| ३९ सार्वजनिक आरोग्य | ३००६००० | १९७००० | ३२०३००० |
| ४० शेतकी | १५०७५०० | १२८००० | १६३५५०० |
| ४१ पशुवैद्यक | ३८३००० | २८००० | ४११००० |
| ४२ सहकारी पतपेढ्या | ६६६५०० | ५१००० | ७१७५०० |
| ४३ उद्योगधंदे | ११२०००० | .... | ११२०००० |
| ४७ किरकोळ खातीं | ७३३६०० | ९८००० | ८३१६०० |
| ५० इमारतकामें वगैरे | १११८६००० | ७४३००० | ११९२९००० |
| ५२ मुंबई-सुधारणा योजना | ९७५००० | .... | ९७५००० |
| ५४ दुष्काळनिवारण | ३३४००० | २४८००० | ५८२००० |

| | | | |
|---|---|---|---|
| ५५ सुपरॲन्युएशन अलावन्स व पेन्शनें | ८७५६००० | २८६४००० | ११६२०००० |
| ५५ (अ) पेन्शनचें कॉम्युटेशन (एकदम रक्कम घेणें) | ६००० | २००० | ८,००० |
| ५६ स्टेशनरी व छपाई | १२१४००० | .... | १२१४००० |
| ५७ किरकोळ | ९५१००० | .... | ९५१००० |
| ६३ जादा खर्च | ४००० | .... | ४००० |
| उत्पन्नावर घातलेला वट्टखर्च | ९७१०९६०० | ३०८०७००० | १२७९१६६०० |

| खर्चाचीं सदरें | मुं. ले. अ. नें मंजूर केलेल्या रकमा | उत्पन्नावर 'चार्ज' असलेला खर्च भागविण्या-करितां रकमा | एकूण |
|---|---|---|---|
| ६८ कालवे खोदणें | २३६००० | २००० | २३८००० |
| ७० सार्वजनिक आरोग्य सुधारण्या-करितां भांडवली खर्च | १५८००० | ५००० | १६३००० |
| ८० मुंबई सुधारणा योजना | ४७३००० | ४००० | ४७७००० |
| ८३ पेन्शन कॉम्यु-टेशनकरितां दिलेल्या रकमा | ४११००० | ३८००० | ४४९००० |
| एकूण भांडवली सदरें | १२७८००० | ४९००० | १३२७००० |
| परत करावयाच्या ॲडव्हान्स रकमा | २८४००० | १४१६००० | १७००००० |
| प्रांतिक सरकारा-कडील कर्जे आणि आगाऊ रकमा | १५९१००० | .... | १५९१००० |

| | | | |
|---|---|---|---|
| कायम कर्ज | .... | .... | .... |
| तरतें कर्ज | .... | १५०००००० | १५०००००० |
| मध्यवर्ती सरकारा-कडून कर्जें | .... | ६०१३००० | ६०१३००० |
| स्टेट प्रॉविडंट फंड | .... | ३५०००००० | ३५०००००० |
| दुष्काळ निवारण फंड | .... | ४५६००० | ४५६००० |
| प्रांतिक रस्ता फंड | .... | १६४०००० | १६४०००० |
| घसारा रिझर्व फंड सरकारी छापखाने | .... | ५०००० | ५०००० |
| नाशिक डिस्टिलरी डेपॉझिट | .... | ७००० | ७००० |
| लोकल फंड डेपॉझिट | .... | ३०००००० | ३०००००० |
| सिव्हिल डेपॉझिट | .... | ४३४५४००० | ४३४५४००० |
| इतर खातीं | .... | ३९७४००० | ३९७४००० |
| कायम ॲडव्हान्स रकमा | .... | ४००० | ४००० |

| | | | |
|---|---|---|---|
| सस्पेन्स अकौंट ( तसलमात ) | .... | १४७००००० | १४७००००० |
| चेक आणि बिलें | .... | २८६००००० | २८६००००० |
| निरनिराळ्या खात्याचे व तत्सम हिशेब | .... | १५०००० | १५०००० |
| ब्रह्मी सरकारशीं असलेला हिशेब | .... | ३०००० | ३०००० |
| रिझर्व बँकेशीं असलेला हिशेब | .... | १२०००० | १२०००० |
| किरकोळ सरकारी हिशेब | .... | १०२९००० | १०२९,००० |
| एकाच सरहिशेबनिसाला दिलेला, निरनिराळ्या अधिकाऱ्यांमधील रोख बटवडा | .... | १३१९,००००० | १३१९,००००० |
| बिलांच्या द्वारा बटवडा | .... | ४२१००००० | ४२१००००० |
| मध्यवर्ती व प्रांतिक सरकारामधील हिशेबाची जुळवाजुळव | .... | ४०३००००० | ४०३००००० |

| | | | |
|---|---|---|---|
| आन्तरप्रांतीय तसलमाती | .... | १६००००० | १६००००० |
| एकूण कर्ज सदरें | १८७५००० | ३६६०४३००० | ३६७९१८००० |
| वट्ट बेरीज | १००२६२६०० | २९६८९९००० | ४९७१६१६०० |

ता. २९ मार्च.
१९३८

रॉजर लमली.
मुंबईचा गव्हर्नर.

यानंतर नमुन्याकरितां दुसऱ्या एका प्रांताचें ( उ० आसाम ) गव्हर्नरनें ८० ( १ ) कलमान्वयें अधिकृत केलेलें खर्चाचें पत्रक, त्यांतील भिन्न भिन्न सदरें दर्शविण्याकरितां, देतों. त्यांत 'वगळलेल्या' प्रदेशांच्या खर्चाची स्वतंत्र तजवीज व गव्हर्नरनें ५२ ( १ ) ( छ ) कलमाच्या आधारें गव्हर्नर जनरलचा हुकूम पाळण्याबद्दलची जादा जबाबदारी पार पाडण्याकरितां घातलेला खर्च, हीं दोन्ही पहावयास मिळतील:—

## आसाम—खर्चाचें अधिकृत पत्रक (१९३८–३९)

| खर्चाची मागणी क्रमांक | वर्णन | 'चार्ज्ड' म्हणजे असेंब्लीला मत देण्याचा अधिकार नसलेला खर्च | | | 'व्होटेड' म्हणजे असेंब्लीला मत देण्याचा अधिकार असलेला खर्च | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | बिगर वगळलेला प्रदेश | वगळलेला प्रदेश | एकूण | मांडलेली मागणी | कपातीची रक्कम | गव्हर्नरनें घातलेली रक्कम | एकूण |
| | | ४०७३०९०० | १४०९८०० | ४२१४०७०० | २१८४३८२५ | –७८०२३ | +७८०२३ | २१८४३८२५ |

रॉबर्ट रीड,
आसामचा गव्हर्नर.

८१.—जर एखाद्या जमाखर्ची वर्षाच्या बाबतींत त्या वर्षाकरितां अधिकृत केलेल्या खर्चापेक्षां अधिक खर्च प्रांताच्या उत्पन्नांतून करणें जरूर झालें तर त्या खर्चाची अंदाजी रक्कम दाखविणारें पुरवणीपत्रक एका अथवा दोन्ही सभागृहांपुढें ठेवविण्याची गव्हर्नर व्यवस्था करील; आणि मागील कलमांतील तरतुदी जशा वार्षिक अंदाजपत्रकाला आणि त्यांत सांगितलेल्या खर्चाला लागू पडतात तशाच याही पुरवणीपत्रकाला व खर्चाला लागू पडतील.

खर्चाची पुरवणीपत्रकें

( अ ) पार्लमेंटनें मंजूर करावयाच्या खर्चाच्या रकमांबद्दल कर्नल डुरेल म्हणतो : " राष्ट्रीय जमाखर्चाचें एकच एक अंदाजपत्रक पार्लमेंटपुढें दरवर्षी ठेविलें पाहिजे. कारण पार्लमेंटचा जमाखर्चावरील ताबा जर परिणामकारक ठरावयाचा झाला तर अंदाजपत्रक एकदांच व एकत्रित करून पार्लमेंटपुढें ठेवण्यांत आलें पाहिजे." भागशः मांडलें असतां राष्ट्रीय जमाखर्चाबद्दल जी एकदम कल्पना यावयास पाहिजे ती तितकीशी चांगली येत नाहीं. " लोकशाहींतील कायदेमंडळांना या पुरवणीखर्चाच्या मागण्यांचें नेहमीं वावडें असतें. कारण त्यामुळें कायदेमंडळांचा सरकारी खर्चावरील ताबा कमी होण्याकडे प्रवृत्ति होते." " कोणत्याही सरकारच्या चिलखतांतील नाजुक किंवा कमकुवत सांधा " असें या पुरवणीअंदाजपत्रकांचें मि० ऑस्टिन चेंबरलेन यांनीं १९२१ सालीं कॉमन्स सभेंत वर्णन केलें होतें तें अगदीं यथार्थ होय. परंतु कित्येक वेळां परिस्थिति अशी उत्पन्न होते कीं पुरवणीअंदाजपत्रकाशिवाय काम भागत नाहीं.

( आ ) १७ जानेवारी १९३८ ला पंजाब असेंब्लींत अर्थमंत्री ना. मनोहरलाल यांनीं १९३७-३८ सालाकरितां तेरा पुरवणीमागण्या मागितल्या. या मागण्यांतील रकमा सरकारनें आधींच खर्चून टाकल्या होत्या. कॉंग्रेसतर्फे दिवाण चमनलाल यांनीं या मागण्यांच्या कायदेशीरपणाबद्दल आक्षेप घेतला कीं, " सदर खर्च हा जादा खर्च होय. त्यांना पुरवणीमागण्यांचें स्वरूप येऊं शकत नाहीं." परंतु अध्यक्षांनीं हा आक्षेप अमान्य केला. त्यानंतर दिवाण चमनलाल व मलिक बरकत अली यांनीं या मागण्यांवर असा दुसरा आक्षेप घेतला कीं, " कायदेमंडळाची आगाऊ मंजुरी घेतल्याशिवाय सरकारला सार्वजनिक पैसा खर्चितां येतो काय ? सरकारी मागण्या ८१ कलमांतील तरतुदींना धरून नाहींत आणि त्यामुळें सभागृहाच्या अधिकारा-

वर आक्रमण होत आहे." स्पीकरनें उत्तर दिलें:—"५४ व्या कलमाप्रमाणें गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें व वैयक्तिक मताप्रमाणें केलेल्या गोष्टीबद्दल सभागृहाला विचारतां येणार नाहीं आणि जमाखर्चाबाबत जे नियम केलेले आहेत त्यांचा अर्थ करण्याचा अधिकार एकट्या गव्हर्नरला आहे." त्यानंतर ५५ लाख रुपये 'स्पेशल डेव्हलपमेंट फंड' म्हणून बाजूला काढून ठेवण्याचा प्रश्न विचारार्थ पुढें आला. दिवाण चमनलाल यांनीं असा हरकतीचा मुद्दा उपस्थित केला कीं, "स्पेशल डेव्हलपमेंट फंड निर्माण करण्याकरितां योजिलेला खर्च हा पुरवणीमागणीच्या व्याख्येच्या चौकटींत बसत नाहीं; आणि म्हणून ५५ लाखांची पुरवणीमागणी सभागृहापुढें ठेवतां येणार नाहीं." अर्थमंत्री ना. मनोहरलाल यांनीं आक्षेपास उत्तर देतांना सांगितलें कीं, "या बाबतींत अनेक तज्ज्ञांचा मी सल्ला घेतला आहे आणि त्यावरून असें आढळून आलें आहे कीं, पुरवणीमागणीखेरीज स्पेशल फंड निर्माण करण्याचा दुसरा मार्ग आम्हांला मोकळा नाहीं." स्पीकरनें असा निर्णय दिला कीं, "ही मागणी पुरवणीमागणी म्हणून मांडतां येईल; परंतु तशी ती मानली जाण्यास चालू वर्षांतच ती खर्च करून टाकली पाहिजे; अर्थात् माझ्या या मतानें मी सरकारचे हातपाय बांधूं इच्छीत नाहीं." मुख्य प्रधान ना. शिकंदर हयातखान यांनीं खुलासा केला कीं, "कायदे; शीर दृष्टीनें काटेकोरपणानें पाहिल्यास मागणी मांडतां येत नाहीं हें कबूल. जरी सदर फंड पुढल्या वर्षापासून उपयोगावयाचा आहे तरी चालू वर्षाची उरलेली शिल्लक या दृष्टीनें विचार केल्यास त्या फंडाची रकम खर्ची पडली असें कायद्याच्या भाषेंत म्हणतां येण्यासारखें आहे."

(इ) मागें आसाममधील कमिशनरांच्या नोकरवर्गाच्या पगाराच्या मागणीबद्दल झालेलें सर्व प्रकरण सविस्तर दिलेंच आहे. त्यांत असेंब्लीनें एकदां फेटाळलेली मागणी फिरून असेंब्लीपुढें पुरवणीमागणीच्या स्वरूपांत येऊं शकते काय असा प्रश्न निघाला होता. त्यावर आसाम असेंब्ली स्पीकरनें असा निर्णय दिला कीं, "८१ व्या कलमांतील 'आणखी खर्चाची आवश्यकता उत्पन्न झाल्यास' यांतील 'आणखी खर्चांत' ही पुरवणीमागणी बसत असल्यामुळें ती मी कायदेशीरपणें मांडली गेली असें मानतों." या कमिशनरांच्या प्रश्नाबाबत विरोधी पक्ष, सरकार पक्ष

इ० चें एकमत असल्यामुळें व ही मागणी त्या वेळीं दोन महिन्यांपुरतीच पुढें आल्यामुळें व त्यानंतर कमिशनरांच्या जागा रद्द करण्याचें खासगी आश्वासन मिळाल्यामुळें ती असेंब्लीनें मंजूर केली. स्पीकरच्या निर्णयावर वरील परिस्थितीचा परिणाम झाला असल्यास नवल नाहीं.

( ई ) 'जमाखर्ची वर्ष' म्हणजे १ एप्रिलपासून ३१ मार्च अखेर-पर्यंतचे बारा महिने. 'जरूर झालें' याचा अर्थ 'जरूरीची आगाऊ अट-कळ बांधतां आली' असा बंगाल असेंब्ली स्पीकरनें केला आहे. त्याच्या मतें 'जादा खर्च झाला असतां त्या जादा खर्चाच्या मागण्या आणि पुरवणी मागण्या या एकमेकाहून अगदीं वेगवेगळ्या' आहेत.

पैशाच्या बिलांबाबत खास तरतुदी

८२.—( १ ) पुढील गोष्टींबद्दल तरतूद करणारें बिल अथवा उपसूचना—

( क ) कोणताही कर बसविणें अथवा वाढविणें; अथवा

( ख ) कर्जाऊ रकमा काढणें किंवा प्रांतानें हमी देणें या गोष्टीचें नियमन करणें; प्रांतानें अंगावर घेतलेल्या अथवा घ्यावयाच्या एखाद्या आर्थिक व्यवहाराबाबतच्या कायद्यांत दुरुस्त्या करणें; अथवा

( ग ) एखादी खर्चाची रक्कम प्रांतिक उत्पन्नावर बोजा ( चार्ज ) म्हणून व्हावयाचा खर्च असें जाहीर करणें अथवा अशा एखाद्या खर्चाची रक्कम वाढविणें—

गव्हर्नराच्या शिफारशीव्यतिरिक्त असेंब्लींत प्रविष्ट करितां येणार नाहीं किंवा मांडतां येणार नाहीं; आणि वरील तरतूद करणारें बिल प्रथमतः कौन्सिलांत आरंभितां येणार नाहीं.

( २ ) एखाद्या बिलांत अथवा उपसूचनेंत धनदंड अथवा इतर आर्थिक शिक्षा लादण्याची अथवा परवाना-फी किंवा केलेल्या कामाकरितां फी मागणें आणि देणें यांची तरतूद केलेली आहे, एवढ्याच केवळ कारणास्तव तें बिल अगर ती उपसूचना वर उल्लेखिलेल्या प्रयोजनांची तरतूद करणारी आहे असें समजण्यांत येणार नाहीं.

( ३ ) ज्या बिलाचें कायद्यांत रूपांतर झाल्यास व तो अमलांत आणला गेल्यास प्रांतिक उत्पन्नांतून कांहीं रक्कम खर्च होण्याचा प्रसंग गुदरेल असें कोणतेंही बिल गव्हर्नरनें त्याचा विचार करण्याची कायदेमंडळाच्या सभागृहांना शिफारस केलेली असल्याखेरीज सभागृहांना मंजूर करितां येणार नाहीं.

( अ ) या कलमांत ग्रथित केलेलें तत्त्व कॉमन्स सभेच्या ६६ व्या स्टँडिंग ऑर्डरमध्यें पुढीलप्रमाणें दिलेलें आढळून येतें:—" सरकारी कामाकरितां अमुक रक्कम खर्च करावी अशा अर्थाच्या अर्जाचा सभा-

गृहाला विचार करितां येणार नाहीं; तसेंच राजाची शिफारस असल्याशिवाय सार्वजनिक तिजोरींतून एखादी रक्कम खर्च करण्याबाबतचा ठराव अगर बिल सभागृहानें विचारांत घेतां कामा नये." ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत देशांतून ज्या घटना नांदत आहेत अशा सर्व घटनांच्या कायद्यांत वरील तत्त्व गोविलें गेलें आहे.

जर एखाद्या सभासदानें वरील तत्त्वाचा भंग करून ठराव, बिल अगर उपसूचना मांडलीच तर स्पीकर त्याला तसें करूं देत नाहीं.

या कलमांतील 'गव्हर्नर' शब्दाचा अर्थ त्याच्या पाठीमागें अगर पुढें 'आपल्या मर्जीप्रमाणें' किंवा 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' या उपाधी नसल्यामुळें, 'मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें वागणारा गव्हर्नर' म्हणजेच 'मंत्रिमंडळ' असा होतो. संयुक्तप्रांत लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे अध्यक्ष सर सीताराम यांनीं यासंबंधीं दिलेला निर्णय महत्त्वाचा व निःसंदिग्ध असा आहे. मंत्र्यांच्या पगारबिलाबाबत कौन्सिलांत चर्चा चालू असतांना डॉ. राम उग्रहसिंग यांनीं विचारणा केली कीं, " ८२ कलमाच्या ( ३ ) पोटकलमान्वयें असें बिल विचारांत घेण्यासाठीं नामदार गव्हर्नरसाहेबांची शिफारस आवश्यक आहे काय ?" हा हरकतीचा मुद्दा बाजूला सारतांना सर सीताराम म्हणाले, " मी छातीठोकपणानें सांगतों कीं, गव्हर्नर म्हणजे गव्हर्मेंट ( सरकार ); म्हणजे याचा अर्थ असा कीं, याबाबत गव्हर्नरनें मंत्र्यांच्या सल्ल्यानेंच चाललें पाहिजे. तेव्हां हें बिल सरकारनें आणलें आहे त्या अर्थी गव्हर्नरची संमति त्यांत गृहीतच धरली पाहिजे. हेंच बिल जर एखाद्या बिनसरकारी सभासदानें मांडलें असतें तर त्याला बंदी करावी लागली असती; तसें या बिलाबाबत नाहीं. म्हणून तें पूर्णपणें कायदेशीर रीत्या मांडलें गेलें आहे असा मी निर्णय देतों."

बंगाल असेंब्लींत करासंबंधींचा कायदा रद्द करण्याच्या बिलाला ८२ ( १ ) पोटकलमान्वयें गव्हर्नरची आगाऊ संमति लागते अगर नाहीं या मुद्द्यावर बंगाल असेंब्लीचे स्पीकर यांनीं पुढील उत्तर दिलें " ज्या बिलानें अगर उपसूचनेनें कर बसवावयाचा असतो अगर वाढवावयाचा असतो तेवढ्यांनाच गव्हर्नरची आगाऊ संमति लागते. प्रस्तुत तंबाखूकर

रद्द करण्याच्या बिलाला गव्हर्नरच्या आगाऊ संमतीची आवश्यकता नाहीं असा मी निर्णय देतों."

( आ ) पैशाचीं सर्व बिलें प्रांतिक कौन्सिलांतून आरंभितां येणार नाहींत म्हणजे तीं असेंब्लींतच प्रथम मांडलीं पाहिजेत. पार्लमेंटमधील प्रघाताचाच हा अनुवाद आहे. या ठिकाणीं 'बिला'बरोबर 'उपसूचने'चा उल्लेख केलेला नाहीं त्या अर्थी तसें एखादें बिल विचाराकरितां खालून वरती आल्यास त्या बिलांतील कलमांना उपसूचना सुचविण्याचा अधिकार कौन्सिलांना आहे, हें अनुमानानें सिद्ध होतें.

( इ ) पहिल्या पोटकलमांतील ( क ) मध्यें 'कर बसविणें अथवा तो वाढविणें' याबद्दलचा उल्लेख आहे. प्रांतिक स्वराज्याच्या सुरवातीच्या काळापुरती तजवीज म्हणून 'गव्हर्मेंट ऑफ इंडिया ( सुरवात व तात्पुरती तरतूद ) १९३६' या ऑर्डरीच्या ६ व्या नियमानें गव्हर्नराला आपल्या मर्जीप्रमाणें एखादा कर, त्याची मुदत संपत असल्यास, १ एप्रिल १९३७ पासून एक वर्षपर्यंत चालू ठेवण्याचा अधिकार देण्यांत आला आहे; अर्थात् या अधिकारामुळें प्रांतिक कायदेमंडळाच्या 'कर बसविणें किंवा वाढविणें किंवा कमी करणें अथवा रद्द करणें' याबाबतच्या हक्कास कोणत्याही प्रकारें बाध येणार नाहीं असें त्या ऑर्डरींत स्वच्छ म्हटलें आहे. प्रांतिक लेजिस्लेटिव्ह यादी (नं. २) तपासली असतां दिसून येईल कीं त्या यादींत ३९ पासून ५४ अखेर करांच्या बाबींचा समावेश करण्यांत आलेला आहे. मागें सविस्तर दिलेल्या यादींतून तेवढाच भाग येथें प्रस्तुत म्हणून—पुनरुक्तीचा दोष पत्करूनही—उतरून घेतों:—

३९ जमीनमहसूल.
४० निर्माण झालेल्या मालावर एक्साइज कर ( दारू, अफू इ० ).
४१ शेतीच्या उत्पन्नावरील कर.
४२ जमिनी व इमारती, स्वयंपाकघरें व खिडक्या यांवरील कर.
४३ शेतजमिनीच्या वारसदारीबद्दल कर.
४४ खनिज हक्कांवरील कर.
४५ डोईपट्टी.
४६ धंदे, व्यापार, उद्योग, नोकऱ्या यांवरील कर.

४७ पशु, नावा यांवरील कर.

४८ मालाची विक्री व जाहिराती यांवरील कर.

४९ स्थानिक संस्थेच्या टापूंत येणाऱ्या मालावर कर.

५० चैनीच्या पदार्थांवर कर—यांत करमणुकी, मौजेच्या गोष्टी, शर्यती, जुगार इ० कर येतात.

५१ स्टांपड्यूटी

५२ अन्तर्गत जलमार्गानें जाणाऱ्या उतारूंवर व मालावर कर.

५३ टोल अथवा जकात.

५४ प्रांतिक यादींतील कोणत्याही बाबीबाबत घेतलेली फी.

'उभय यादी' (नं. ३) मध्यें ८ दस्तैवज नोंदणी व ३१ वीज या दोन बाबीही कर बसाविण्याच्या लायकीच्या आहेत; तेव्हां प्रांताच्या करांसंबंधीं विचार करीत असतांना त्यांचाही त्यांत समावेश करावयास हवा. मुंबई प्रांताच्या १९३८–३९ मधील अंदाजपत्रकांतलि जमेची बाजू पाहिल्यास असें दिसून येईल कीं,

( १ ) जमीनमहसूल ( २ ) अबकारी वसूल ( ३ ) स्टांपड्यूटी ( ४ ) नोंदणी फी ( ५ ) मोटार लायसेन्स फी ( ६ ) करमणुकीवरील कर ( ७ ) शर्यतीवरील कर ( ८ ) विजेवरील कर ( ९ ) तंबाखू कर

एवढ्याच कराच्या मुख्य बाबी आहेत. वरील प्रांतिक यादींत अद्याप बऱ्याच गोष्टी अशा आहेत कीं, त्यांवर कर बसवितां येण्यासारखा आहे. बिहार प्रांतांत शेती उत्पन्नावर कर बसविण्याचा कायदा मंजूर झाला आहे; व मध्यप्रांत वऱ्हाडमध्यें कांहीं विशिष्ट धंदेवाल्यांवर कर बसविण्यांत आला आहे. शेतजमिनींच्या वारसदारीवर व मालाच्या विक्रीवर कर बसवितां येण्यासारखे आहेत. या शेवटच्या बाबीसंबंधीं ती प्रांतिक आहे का फीडरल आहे, प्रांतिक असल्यास कर बसविण्याला कांहीं मर्यादा आहेत किंवा कसें यासंबंधीं मध्यवर्ती सरकार व प्रांतिक सरकारें यांमध्यें तंटयाचे प्रसंग निर्माण झाले आहेत. गव्हर्नर जनरलनें याबाबत फीडरल कोर्टाकडून मत मागविलें आहे. वास्तविक 'प्राप्तीवरील कर' हा प्रांतिक असावयास पाहिजे, परंतु तो फीडरल सरकारकडे दिला आहे. यांतील अन्याय लक्षांत येऊनच प्राप्तीवरील करापैकीं कांहीं वाटा ठराविक

प्रमाणांत देण्याची व्यवस्था नेमियर अवार्डनें केलेली आहे. ही एक प्रकारची देणगी असल्यानें त्यांत परावलंबित्व आलें व कर बसविण्याचें सामर्थ्य नष्ट झालें; तेव्हां हा अन्याय दूर झालाच पाहिजे.

( ई ) आजपर्यंत प्रांतिक सरकाराकरितां कर्ज काढण्याचें झाल्यास तें भारतमंत्री काढीत असे; परंतु १ एप्रिल १९३७ पासून ही सत्ता, कांहीं अटी व मर्यादा घालून, प्रांतिक कायदेमंडळें व सरकारें यांना देण्यांत आली आहे ( कलमें १६१, १६२, १६३ पहा ); १६३ ( १ ) कलमांत स्वच्छ लिहिलें आहे कीं, " प्रांतांच्या उत्पन्नाला तारण लावून, प्रांतिक कायदेमंडळ वेळोवेळीं कायद्यानें ठरवील त्या मर्यादेंत प्रांतिक सरकारला कर्ज काढण्याचा अधिकार आहे; तसेंच कोणत्याही आर्थिक व्यवहाराबाबत हमीही प्रांतिक सरकारला देतां येईल." या कलमाच्या आधारें १९३७ सालांत निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं विविध कारणां-करितां एकाच वेळीं पुढीलप्रमाणें कर्जे उभारलीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मद्रास | १५८ | लाख |
| २ | पंजाब | १०० | " |
| ३ | संयुक्तप्रांत | १०० | " |
| ४ | मध्यप्रांत | ५० | " |
| ५ | वायव्यसरहद्द | ६० | " |

रु. १०० च्या दर्शनी कर्जरोख्यास रु. ९९ द्यावे लागले व व्याजाचा दर ३ टक्के होता. कायदेमंडळांच्या संमतीची जरूरी न पडतां प्रांतिक सरकारांनींच आपल्या अखत्यारींत हें कर्ज उभारण्याचें काम केलेलें आढळून येतें.

( उ ) दुसऱ्या पोटकलमांत, दंडाबद्दल अथवा लायसेन्स फी इ० केवळ पैशाचा उल्लेख आहे एवढ्या कारणास्तव एखादें बिल फिनन्शियल म्हणजे पैशासंबंधींचें बिल होत नाहीं असें सांगण्याचा हेतु आहे. नाहीं तर ७१ ( ४ ) कलमान्वयें मध्यप्रांत कायदेमंडळानें रु. ५०० शिक्षा ठेवणारें बिल जें मंजूर केलें त्या बिलालाही या जादा तरतुदी लागल्या असत्या पण तसें करण्याचा उद्देश नसल्याचें या दुसऱ्या पोटकलमानें स्पष्ट केलें आहे.

( ऊ ) १९३७ च्या सप्टेंबर महिन्यांत मुंबई प्रांतिक असेंब्लींत सभासदांच्या पगाराच्या बिलाचा विचार चालू होता; त्या वेळीं दरमहा रु. ७५ पगाराऐवजीं दरमहा रु. १५० पगार असावा अशी आमदार चित्रे यांनीं उपसूचना मांडली. " सदर उपसूचना मंजूर झाली असती तर प्रांतावर खर्चाचा भार अधिक पडला असता; अशा तऱ्हेचें बिल ८२ (३) कलमान्वयें गव्हर्नरनें विचारार्थ शिफारसलेलें असल्याशिवाय कायदेमंडळाला मंजूर करितां येत नाहीं " अशा अर्थाचा हरकतीचा मुद्दा आमदार रावबहादुर चितळे यांनीं उपस्थित केला. त्यावर झालेला वादविवाद सभासदांचें ज्ञान वा अज्ञान प्रकट करणारा असल्यामुळें पाल्हाळ न लावतां सारांशरूपानें उतरून घेतों:—

**स्पीकर:**—अशासारखा मुद्दा उपस्थित केला जाईल हें मी भाकित केलेंच होतें; आणि जुने निर्णयही मी चाळले. याबाबत मी जो निर्णय देईन त्याचा परिणाम दूरवर पोंचणारा असल्यामुळें प्रस्तुत मुद्द्याबाबत मला सभासदांचीं मतें ऐकावयाचीं आहेत.

**चितळे:**—१९१९ च्या कायद्याप्रमाणें गव्हर्नरची आगाऊ संमति किंवा शिफारस लागत असे. सध्यांच्या राजवटींत गव्हर्नरचे अधिकार पुष्कळच कमी झाले आहेत, तथापि ते अधिकार प्रधानमंडळाकडे गेले आहेत. म्हणून वरीलसारखी उपसूचना मांडण्यापूर्वी सभासदानें प्रधान-मंडळाची आगाऊ संमति घेतलेली असावयास पाहिजे.

**स्पीकर:**—कलमाच्या (२) पोटकलमांत "बिल अथवा उपसूचना" असा निर्देश आहे व एका पोटकलमांत नुसता 'बिल' असा निर्देश आहे ही गोष्ट मी सभागृहाच्या निदर्शनास आणतों.

**परीरा:**—उपसूचना मांडण्याचा सभासदांना हक्कच आहे.

**जोग:**—७२ व्या कलमाप्रमाणें सभासदांचे पगार ठरविण्याचा अधिकार कायदेमंडळाचा आहे. तेव्हां गव्हर्नरच्या संमतीची जरूर नाहीं. ८२ कलम या पगार बिलाला लागू पडत नाहीं.

**जमनादास मेथा:**—उपस्थित झालेला मुद्दा फार महत्त्वाचा आहे. उपसूचनांना गव्हर्नरच्या आगाऊ संमतीची जरूरी नाहीं असें माझें

मत आहे; कारण ७५ कलमाप्रमाणें त्याला बिल नामंजूर करण्याचा शेवटचा अधिकार आहेच.

**इस्माईल चुन्द्रीगर:**—जमनादास मेथांच्याप्रमाणेंच माझें मत आहे. सभागृहाचे अधिकार वाढतील असेच निर्णय स्पीकरनें द्यावेत.

**स्पीकर:**—सभासदांचे किंवा सभागृहाचे अधिकार मर्यादित करणें कायद्याच्या कलमानें भाग पडल्याशिवाय मी तसें कधींही करणार नाहीं. नेहमीं असेच निर्णय देण्याचा प्रयत्न करीन कीं, त्या योगें अधिकार विस्तृत व्हावेत.

**अलिबहादुरखान:**—हा प्रश्न तिसऱ्या वाचनाच्या वेळीं निकालांत काढावा; तोंपर्यंत कायद्यानें उपसूचनेस बंदी करितां यावयाची नाहीं.

**नरिमन:**—सभासदांच्या पगाराबाबतची व्यवस्था ७२ व्या कलमानें मुद्दाम व स्वतंत्र केलेली आहे; म्हणून ७२ वें कलम हें ८२ कलमाला अपवादरूप मानलें पाहिजे; नाहींपेक्षां ७२ वें कलम निरर्थक मानलें जाईल.

**मुनशी:**—७२ व्या कलमांत 'कायदा' असा शब्द आला आहे, 'बिल' असा नाहीं. म्हणून तें कलम प्रस्तुत बाबींत उपयोगी पडत नाहीं. 'कायद्या'ला गव्हर्नरच्या शेवटच्या संमतीसह सर्व अवस्थांतून पार पडावें लागतें. माझें असें मत आहे कीं, दुसऱ्या वाचनाच्या वेळीं उपसूचनेला परवानगी देण्यास हरकत नसावी, कारण त्या वेळीं गव्हर्नरची आगाऊ परवानगी लागत नाहीं. परंतु तिसऱ्या वाचनाच्या पूर्वीं दुरुस्त बिलाला गव्हर्नरची संमति अगर मंजुरी मिळावयास हवी. जमनादास मेथा म्हणतात त्याप्रमाणें ७५ व्या कलमावर विसंबून राहणें बरोबर होणार नाहीं; कारण त्या कलमान्वयें गव्हर्नर जो निर्णय करतो तो 'आपल्या मर्जीप्रमाणें' करितो; परंतु बिल मंजूर होण्यापूर्वीं त्याची संमति घेण्याचा प्रश्न निघाल्यास त्याला मंत्र्यांची सल्लामसलत घ्यावी लागेल.

**स्पीकर:**—याच घटकेला निर्णय देण्याचें कारण दिसत नाहीं; उपसूचना मांडूं द्यावी व तिच्यावर चर्चा करावी असें मी ठरवितों. बिलाच्या तिसऱ्या वाचनाच्या वेळीं प्रश्न उपस्थित झाल्यास त्या वेळीं मी माझा निर्णय देईन.

वर उद्धृत केलेला वादविवाद लक्षांत घेऊन व ८२ व्या कलमाच्या निरनिराळ्या पोटकलमांच्या मागील हेतु डोळ्यांपुढें ठेवून उपस्थित झालेल्या मुद्द्यासंबंधीं पुढीलप्रमाणें विवरण करून निकाल देतां येईल:—

आमदार चित्रे यांच्या उपसूचनेचा संबंध ८२ कलमांतील (३) ऱ्या पोटकलमाशीं आहे; (१) व (२) या पोटकलमांशीं नाहीं. (१) ल्या पोटकलमांत 'कर बसविणें अथवा वाढविणें', 'कर्जाची उभारणी करणें' किंवा 'एखादा खर्च प्रांतिक उत्पन्नावर चार्ज्ड म्हणून जाहीर करणें किंवा अशा 'चार्ज्ड' खर्चाची रक्कम वाढविणें' यासंबंधींची तरतूद करणारें बिल किंवा उपसूचना याबाबतचा प्रश्न आहे. (२) ऱ्या पोटकलमांत 'धनदंड' इत्यादीबद्दलचा उल्लेख आहे. या दोन्ही कलमांतील गोष्टींचा 'कायदेमंडळांच्या सभासदांचा पगार वाढविणाऱ्या उपसूचनेशीं' कांहीं-ही संबंध नाहीं. ( ३ ) ऱ्या पोटकलमाचा हेतु बिनसरकारी सभासदां-नीं मांडलेल्या विशिष्ट बिलासंबंधीं तरतूद करण्याचा दिसतो. नाहीं तर 'गव्हर्नर' म्हणजे 'गव्हमेंट' म्हणजे सरकार यांच्या शिफारशीची अपेक्षा धरण्याचें कारण नव्हतें. परंतु प्रस्तुत ज्या बिलासंबंधीं व त्यावर आलेल्या उपसूचनेसंबंधीं चर्चा चालू आहे तें ( सभासदांच्या पगाराचें बिल ) सरकारतर्फे मांडण्यांत आलेलें होतें. त्यांत 'उपसूचने'-चा शब्दानें उल्लेख नाहीं; परंतु 'उपसूचना' मंजूर झाल्यास बिलाला जें स्वरूप येईल त्याला 'दुरुस्त झालेलें ( अमेंडेड ) बिल' असेंच नांव देतां येईल. तेव्हां अशा तऱ्हेनें ही, 'उपसूचना' या शब्दाच्या अभावाची अडचण, नाहींशी करितां येईल. ' शिवाय या पोटकलमांत सदर बिल **'मंजूर'** करितां येणार नाहीं असें म्हटलें आहे. बिल **प्रवेशितां** येणार नाहीं किंवा उपसूचना **मांडतां** येणार नाहीं असें पोट-कलम ( १ ) प्रमाणें म्हटलेलें नाहीं. तेव्हां 'मंजूर' होण्याच्या अवस्थे-पर्यंत म्हणजे तिसऱ्या वाचनापर्यंत बिलाची नेहमींप्रमाणें गति चालू राहा-वयास कांहीं हरकत नाहीं. या वेळीं मात्र 'गव्हर्नर'ची म्हणजे 'मंत्रिमंडळा-च्या सल्ल्यानें चालणाऱ्या गव्हर्नराची' बिलाचा विचार करण्याबद्दल शिफारस असल्याशिवाय बिलाची गति कुंठित होईल. पैशाच्या नवीन खर्चाबद्दल या ( ३ ) ऱ्या पोटकलमांत तरतूद केलेली आहे. परंतु प्रस्तुत

बिलांत मुळांत पैशाची कांहीं तरतूद आहेच; उपसूचना मंजूर झाल्यास मूळची खर्चाची तरतूद जरा वाढवावयास पाहिजे. तेव्हां 'खर्चाचा प्रसंग निर्माण होणें' याचा अर्थ 'मुळांतील योजिलेल्या खर्चांत वाढ होण्याची आपत्ति उत्पन्न होणें' इतका व्यापक करावयास पाहिजे हें जातां जातां चांगलें ध्यानांत घेतलें पाहिजे. तेव्हां या बिलाच्या तिसऱ्या वाचनापूर्वी सरकारला नवीन खर्च अथवा खर्चांत जादा वाढ झेपेल कीं नाहीं हें ठरविण्याचा विशेष हक्क या पोटकलमानें ठेवलेला आहे; आणि तें सयुक्तिकही आहे. आमदार चित्रे यांची पगारवाढीची उपसूचना नामंजूर झाल्यामुळें पुढचा प्रश्नच उद्भवला नाहीं. जर ती मंजूर झाली असती तर सरकारनें तो अविश्वासाचा ठराव समजून राजीनामाच दिला असता व नवीन मंत्रिमंडळ अस्तित्वांत येऊन त्यानें गव्हर्नराला या दुरुस्त बिलाला शिफारस देण्याचा सल्ला दिला असता व अशा तऱ्हेनें बिल मंजूर झालें असतें. सरकारनें सदर दुरुस्तीला किंवा उपसूचनेला अविश्वासात्मक ठराव असें मानलेंच नाहीं तर मुळांतच ती उपसूचना मान्य करण्यासारखेंच सदर कृत्य होईल. तरीही त्यांत गव्हर्नराच्या म्हणजे सरकारच्या शिफारसीचा प्रश्न उद्भवत नाहीं. एतावता, प्रस्तुत उत्पन्न झालेल्या प्रश्नाला तिसरें पोटकलम सर्वस्वी लागू पडत नाहीं. खासगी सभासदानें आणलेल्या विशिष्ट बिलास त्याच्या बाजूला सभागृहाचें मताधिक्य असलें तरी त्या बिलाची गति खुंटवून त्याला नामशेष करण्याचा भस्मासुरी अधिकार गव्हर्नरला म्हणजे सरकारला देऊन ठेवण्यांत आला आहे. परंतु हा भस्मासुर असें करण्यानें सरकारच्याच डोक्यावर हात ठेवल्याशिवाय राहणार नाहीं व मग अर्थातूच सरकारचा नाश झाल्याशिवाय राहणार नाहीं. जोग, नरिमनप्रभृति सभासदांनीं ७२ व्या कलमाचा जो उल्लेख केला तोही लागू पडत नाहीं. त्या कलमांत सभासदांचा पगार कायदा करून ठरविण्याचा कायदेमंडळाला अधिकार आहे या गोष्टीवर मुख्य भर आहे; नहून ८२ व्या कलमांत सांगितलेल्या पैशाबाबत बिलासंबंधींच्या खास तरतुदीच्या पकडींतून सभासदांच्या पगाराच्या बिलाची सुटका करण्याचा बिलकुल हेतु दिसून येत नाहीं. तात्पर्य, आमदार चित्रे यांच्या उपसूचनेमुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितींत रावबहादुर चितळे, अली बहादुरखान,

नामदार मुनशी व स्पीकर मावळणकर यांनीं या कलमाबाबत अर्थ करण्याचें जें धोरण स्वीकारलें तें, प्रत्येकाची कांहीं अप्रासंगिक विधानें ( ऑबिटर डिक्टा ) वगळल्यास, बरोबर होतें असें धरून चालण्यास हरकत नाहीं.

मुंबई असेंब्लींत एप्रिल १९३८ मध्यें रेस कोर्सिस लायसेन्सिंग बिल आलें होतें. त्या बिलाला आमदार भोळे (स्वतंत्र मजूर पक्ष ) यांनीं उपसूचना दिली होती. त्या उपसूनेंत परदेशी खर्ची केलेल्या घोड्यावर, अरबी घोड्यांच्या शर्यतीवर, जॉकींच्या उत्पन्नावर, तसेंच रेसकोर्सवर जाणाऱ्या लोकांच्या प्रवेशतिकिटावर कर बसविण्याची व्यवस्था सुचविली होती. उपसूचना मांडणारानें गव्हर्नरची आगाऊ संमति मिळविली नाहीं ( ८२ [ १ ] ) या मुद्द्यावर स्पीकरनें सदर उपसूचना मांडण्यास परवानगी दिली नाहीं.

संयुक्तप्रांतीय कौन्सिलांत ना. डॉ. कटजू यांनीं मांडलेल्या 'कायदेमंडळाच्या सभासदांच्या पगाराच्या' बिलांत 'इंटर वर्गाच्या दुप्पट भाड्या' ऐवजीं 'दुसऱ्या वर्गाचें दुप्पट भाडें' अशी उपसूचना सुचविली गेली. ना. कटजू यांनीं हरकत घेतली कीं, " ८२ ( ३ ) कलमाप्रमाणें गव्हर्नरची परवानगी असल्याशिवाय उपसूचना मांडतां येणार नाहीं." गव्हर्नराचा सेक्रेटरी डोनाल्डसन याचेकडून एका सभासदाला आलेलें पत्र वाचून दाखविण्यांत आलें. त्यांतील मजकूर:—" मंत्र्यांच्या सल्ल्यानेंच गव्हर्नरनें शिफारस करावयाची असते. आणि अशा शिफारशीची आवश्यकता असेल तर योग्य त्या मंत्र्याकडे विनंतिअर्ज केला पाहिजे.... ........८२ वें कलम वाचून असें वाटत नाहीं कीं, अशासारख्या उपसूचनांना आगाऊ शिफारशीची जरूरी आहे. कारण त्या उपसूचनांमुळें, ७८ व्या कलमाखालीं ज्यांचे पगार 'चार्ज्ड' आहेत त्यांना कोणताच धक्का पोंचत नाहीं." अध्यक्ष सर सीताराम यांनीं विरोधी पक्षाच्या बाजूनें निकाल देतांना सांगितलें कीं, " ना. कटजूंचें म्हणणें मान्य करणें म्हणजे बिनसरकारी सभासदांचें स्वातंत्र्य संपुष्टांत आणण्यापैकींच आहे." बिलाच्या तिसऱ्या वाचनाचे वेळेपर्यंत उपसूचना मांडण्यास हरकत नाहीं असें या कलमाबाबत मागें सांगितलेंच आहे.

(ए) ८२ (१) (ख) मध्यें 'कर्ज काढणें' आणि 'हमी' असे जे दोन शब्द आले आहेत त्यांचें स्पष्टीकरण ३११ (२) पोटकलमांत पुढीलप्रमाणें आहे:—

(१) 'कर्ज काढणें' या शब्दांत ॲन्युइटी (वर्षासन) देऊन उभारलेल्या पैशाचाही अंतर्भाव होतो. ॲन्युइटी म्हणजे सावकाराकडून सरकारनें एकदम रक्कम घेणें व दरसाल ठराविक रक्कम त्याला कांहीं वर्षांपर्यंत देण्याचें वचन देणें; या ठराविक रकमेला 'वर्षासन' असें अन्वर्थक नांव देण्यास हरकत नाहीं.

(२) 'हमी' या शब्दांत, एखाद्या उद्योगांत ठराविक रकमेपेक्षां कमी नफा आल्यास कमी पडलेली रक्कम देण्याच्या बोजाचाही अंतर्भाव होतो. ही हमी १ एप्रिल १९३७च्या पूर्वीच्या घेतलेल्या जबाबदाऱ्यांना लागू आहे. 'गॅरंटीड रेलवे कंपन्या' हिंदुस्थानांत सर्वांच्या परिचयाच्याच आहेत. त्यांना रेलवे बांधण्याकरितां जमीन फुकट देण्यांत आली होती; शिवाय या कंपन्यांनीं रेलवेच्या धंद्यांत घातलेल्या भांडवलावर शेंकडा ५ हें व्याज न पडल्यास, कमी पडलेल्या व्याजाच्या रकमेची जबाबदारी हिंदुस्थान सरकारनें घेतलेली होती हें प्रसिद्धच आहे.

. तसेंच ८२ (१) (क) मध्यें जो 'कर' शब्द आला आहे त्यांत 'कोणत्याही सर्वसामान्य, स्थानिक अथवा जादा कराचा अगर आकारलेल्या पट्टीचा' अंतर्भाव होतो (कलम ३११ [२]).

कांही शैक्षणिक देणग्या-बाबत तरतुदी

८३.—(१) ह्या कायद्याच्या या खंडास सुरवात होण्यापूर्वीच्या सबंध जमाखर्ची वर्षांत जर ॲंग्लो-इंडियन आणि युरोपियन जातींच्या अथवा दोहोंपैकीं एखाद्या जातीच्या फायद्याकरितां एखादी देणगी कोणत्याही प्रांतांतील शिक्षणविषयक खर्चांत खर्ची पडलेली असेल तर त्याच्या पुढील प्रत्येक जमाखर्ची वर्षांत—प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें असेंब्लीच्या सभासदांच्या किमान तीनचतुर्थांश बहुमतानें सदर वर्षांत विरुद्ध ठराव केला नसल्यास— वरील जातीच्या अथवा जातींच्या फायद्याकरितां, ३१ मार्च १९३३ रोजीं पुऱ्या होणाऱ्या दहा जमाखर्ची वर्षांतील तिच्या अथवा त्यांच्या फायद्याकरितां दिलेल्या देणग्यांच्या सरासरी रकमेपेक्षां कमी नाहीं इतकी देणगी दिली जाईल.

मात्र जर एखाद्या जमाखर्ची वर्षांत प्रांतांतील शिक्षणाकरितां खर्ची पडलेली एकूण रक्कम वरील दहा जमाखर्ची वर्षांत प्रांतांतील शिक्षणाकरितां वट्ट खर्ची पडलेल्या रकमांच्या सरासरीपेक्षां कमी असेल तर पहिली रक्कम दुसरीचा कोणताही अंश असला तरी वरील जातीच्या अथवा जातींच्या फायद्याकरितां त्या जमाखर्ची वर्षांकरितां ह्या पोटकलमान्वयें दिलेली कोणतीही देणगी वरील दहा जमाखर्ची वर्षांतील तिच्या अथवा त्यांच्या फायद्याकरितां दिलेल्या देणग्यांच्या सरासरीच्या त्या विशिष्ट अंशापेक्षां जास्त असण्याचें कारण नाहीं.

ह्या पोटकलमांतील हेतूस्तव कोणत्याही देणग्यांची रक्कम मोजतांना तींत भांडवली कामाकरितां दिलेल्या देणग्यांचा अंतर्भाव करण्यांत येईल.

( २ ) जर केव्हांही प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें असेंब्लीच्या सभासदांच्या किमान तीनचतुर्थांश बहुमतानें 'या कलमांतील तरतुदी रद्द व्हाव्यात' असा ठराव केला तर त्या प्रांतांत त्या रद्द समजल्या जातील.

( ३ ) अल्पसंख्याक जमातींच्या न्याय्य हितसंबंधाचें संरक्षण करण्याबाबत प्रांताच्या गव्हर्नरवर असलेल्या जादा जबाबदारीला या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें बाध येणार नाहीं.

**( अ ) प्रत्येक प्रांतांतून अँग्लोइंडियन व युरोपियन जातींच्या मुलामुलींप्रीत्यर्थ १९३७ एप्रिलपूर्वीच्या अमदानींत जो खर्च होत असे तो चालू ठेवण्याकरितां या कलमाची योजना केलेली दिसते. रेल्वेमध्यें जशी या अर्धवट गोऱ्यांची सोय केलेली आहे त्याचप्रमाणें शिक्षणासारख्या बाबतींतही सोय लावलेली आहे. १९२३ एप्रिल ते १९३३ एप्रिल पर्यंतच्या दहा वर्षांतील याबाबत झालेल्या खर्चाची सरासरी काढून त्याच्यापेक्षां कमी तरतूद कोणत्याही वर्षांत करतां येणार नाहीं. अर्थात् सर्वसाधारण शिक्षण खात्यावरचा खर्चच कमी झाला तर अँग्लोइंडियन व युरोपियन शिक्षणावर त्या प्रमाणांत खर्च कमी करावयास हरकत नाहीं.**

**दुसऱ्या पोटकलमांत सदर खास सवलती रद्द करण्याचा अधिकार प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्यांना दिला आहे; परंतु त्यालाही बंधन घातलें आहे. तें असें कीं, इतर कोणताही ठराव, बिल इत्यादी हजर असलेल्या सभासदांच्या बहुमतानें [ ६५ (१) कलमांतील स्पीकरला काढून टाकण्याला असेंब्लीच्या सर्व सभासदांचें सार्धे बहुमत लागतें या बाबीखेरीज ] निकालांत काढलें जातें ,तर या कलमांतील खास तरतुदी असेंब्लीच्या**

सर्व सभासदांच्या $\frac{३}{४}$ इतक्या प्रचंड बहुमतानें काढून घेतल्या जातील. म्हणजे जें एका हातानें दिलें तें दुसऱ्या हातानें हिसकावून घेतल्यापैकींच आहे. याबाबत कौन्सिलांना कांहींही अधिकार देण्यांत आलेला नाहीं. निरनिराळ्या असेंब्ल्यांतून हें $\frac{३}{४}$ प्रमाण पुढीलप्रमाणें पडतें:—

| | प्रांत | सभासदांची एकूण संख्या (असेंब्ली) | $\frac{३}{४}$ प्रमाण |
|---|---|---|---|
| १ | मद्रास | २१५ | १६१ |
| २ | मुंबई | १७५ | १३१ |
| ३ | बंगाल | २५० | १८८ |
| ४ | संयुक्तप्रांत | २२८ | १७१ |
| ५ | पंजाब | १७५ | १३१ |
| ६ | बिहार | १५२ | ११४ |
| ७ | मध्यप्रांत, वऱ्हाड | ११२ | ८४ |
| ८ | आसाम | १०८ | ८१ |
| ९ | वायव्य सरहद्द | ५० | ३८ |
| १० | ओरिसा | ६० | ४५ |
| ११ | सिंध | ६० | ४५ |

या आंकड्यांवरून दिसून येईल कीं, एकट्या मद्रास प्रांतांत कॉंग्रेस-पक्षाच्या मनांत आल्यास आपल्या बहुमताच्या जोरावर अँग्लोइंडियन व युरो-पियन यांना या कलमांत दिलेल्या खास सवलती ठराव करून काढून घेतां येतील; बाकी कोणत्याही प्रांतांत इतर पक्षांची या कामीं मदत मिळाल्याशिवाय वरील गोष्ट साध्य होणार नाहीं. यामुळेंच एकट्या मद्रास प्रांतांत तेथील अँग्लो-इंडियन व युरोपियन पुढारी— त्यांतल्या त्यांत अँग्लोइंडियन— जरा नरमाईनें वागतात, कॉंग्रेस-मंत्र्यांना आपल्या शाळांच्या वगैरे समारंभांना बोलावतात व 'अहो रूपं अहो ध्वनिः' अशासारखा कांहींसा प्रकार घडून येतो. इतर प्रांतांतून त्यांना वरील कायद्याच्या कलमाचें संरक्षण आहे आणि सर्व प्रांतांतील असेंब्ल्यांनीं एकजात विरोध कधीं नाहीं तो केलाच तर सर्व शक्तिमान् गव्हर्नर सर्व 'रंजल्या गांजल्यां'चें त्राण करावयास तिसऱ्या

पोटकलमाच्या आधारें तयार आहेच. या कलमांतील 'ॲंग्लोइंडियन' व 'युरोपियन' ह्या शब्दांच्या व्याख्या १९३५ च्या कायद्याच्या पहिल्या शेड्यूलच्या पहिल्या खंडाच्या २६ व्या परिच्छेदांतील पहिल्या पोटकलमांत पुढीलप्रमाणें दिल्या आहेतः—

(१) ज्या इसमाचा बाप अगर पितरांपैकीं कोणीही पुरुष युरोपियन वंशांतला आहे अगर होता; आणि जो हिंदुस्थानचा रहिवाशी नाहीं अशा इसमास 'युरोपियन' म्हणावें;

(२) ज्या इसमाचा बाप अगर पितरांपैकीं कोणीही पुरुष युरोपियन वंशांतला आहे अगर होता पण जो हिंदुस्थानचा रहिवाशी आहे अशा इसमास 'ॲंग्लो-इंडियन' म्हणावें.

प्रांतिक आणि फीडरल असेंब्लींत स्वतंत्र मतदारसंघातर्फे निवडून द्यावयाच्या जागा; रेल्वे, कस्टम, तारखातें इ० खात्यांत नोकरांच्या शेंकडा ८ राखीव जागा; या कलमांत सांगितलेल्या शिक्षण देणग्यांबाबतच्या तरतुदी इ० नाना प्रकारांनीं ॲंग्लो-इंडियन जमातीचें संरक्षण करण्यांत आलें आहे. इंग्रजांवर चिरंतन काळपर्यंत विसंबून राहण्यापेक्षां हिंदी लोकांची मर्जी संपादावी व त्यांच्याशीं अधिक मिसळून राहावें अशा प्रकारचे वारे त्या समाजांत अलीकडे वाहूं लागले आहेत.

मुंबई प्रांताच्या १९३८-३९ सालच्या अंदाजपत्रकांत ॲंग्लो-इंडियन व युरोपियन शिक्षणविषयक पुढील तरतूद करण्यांत आली आहे; ती विस्ताराचा दोष पत्करूनही देत आहे. या शिक्षणावर देखरेख ठेवण्याकरितां ६ डिसेंबर १९३७ पासून ३ वर्षें मुदतीपर्यंतचें एक बोर्ड मुंबई प्रांतांत नेमण्यांत आलें आहे. त्यांतील सभासदांचीं नांवें:—

(१) रॉयल (४) ग्रेटर
(२) कॉइन (५) गिलेस्पी (ॲंग्लो इंडियन)
(३) डूव्ह (६) गिडनी

(७) हॅमंड (१०) हॅम्पटन
(८) बिगवुड
(९) मिस् ग्रीन

| | | |
|---|---|---|
| १ दुय्यम शिक्षण | | ४,४०,००० |
| (१) वार्षिक | | |
| नेहमींच्या देणग्या | ३११०२० | |
| जादा देणग्या | | |
| ॲंग्लोइंडियन | १०७३४० | |
| सोल्जरांचीं मुलें | २५०० | |
| (२) इतर | | |
| इमारतींकरितां मदत | १८००० | |
| किरकोळ | ११४० | |
| | ४,४०,००० | |
| २ स्पेशल शिक्षण | | १८,००० |
| (१) वार्षिक | | |
| (अ) नेहमींच्या देणग्या | | |
| (१) स्पेशल शाळा | २००० | |
| (२) ट्रेनिंग संस्था | १०००० | |
| (आ) उमेदवार गृहांना देणग्या | ६००० | |
| | १८,००० | |
| ३ शाळा-तपासणी | | २१,००० |
| (१) इन्स्पेक्टरचा पगार (१०००—५०—१२००) | ११४०० | |
| (२) कारकून (४) (४५—१९०) | ४७५६ | |
| (३) शिपाई (२) (१६—१९) | ४४४ | |
| (४) प्रवासभत्ता | ३४०० | |
| (५) इतर खर्च | १२०० | |
| | २११२०० | |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ **शिष्यवृत्त्या** | | | १९,००० |
| | महाविद्यालय | ५२२० | |
| | दुय्यम शाळा | २८०८ | |
| | स्पेशल शाळा | १२८४० | |
| | संभवनीय बचत | -१८६८ | |
| | | १९,००० | |
| ५ **किरकोळ** | | | ४००० |
| ६ **इंग्लंडमधील खर्च** | | | ४८०० |
| | **एकूण** | | ५,०७,००० |

एकूण पांच लाख सात हजार रु. इतका खर्च १९३८-३९ सालांत मुंबई प्रांतांत या जमातीकरितां मुंबई प्रांतानें सोसावयाचा आहे. आधीं या जाती धनसंपन्न, त्यांतच सरकारचा हा प्रचंड पाठिंबा! मग लोणावळें, पांचगणी इ० ठिकाणीं हवाशीर बंगल्यांतून शाळा न थाटायला काय झालें! वरीलपैकीं **एकोणीस हजार** रुपये या चिमुकल्या जातींतिल मुला-मुलींना शिष्यवृत्त्यांकरितां राखून ठेविले आहेत. आणि अशिक्षित, निर्धन, समाजबाह्य अशा प्रचंड संख्येच्या हरिजन जातींच्या मुलांमुलींना केवळ **पस्तीस हजार** रुपये शिष्यवृत्त्यांसाठीं राखून ठेवण्यांत आले आहेत आणि तेंही हरिजनांच्या उद्धाराचें कंकण बांधून आलेल्या कॉंग्रेस सरकारच्या अमदानींत पहिल्या प्रथमच हरिजनांना शिक्षणाप्रीत्यर्थ जादा सवलती देण्यांत येऊं लागल्यापासून. आतां वेळ अशी आली आहे कीं पुढारलेल्या व सर-कारपुष्ट जमातींच्या शिक्षणाप्रीत्यर्थ होणाऱ्या गैरवाजवी खर्चांत काट मारून तो सर्व हरिजनांसारख्या सर्व बाजूंनीं मागासलेल्या जातींच्या शिक्षणाप्रीत्यर्थ खर्च व्हावयास हवा. ज्यांना वास्तविक संरक्षण हवें त्यांना मुळींच नाहीं; इतरांना भरपूर! हा उलटा न्याय आहे!!

## सर्वसाधारण काम करण्याची पद्धत

कामाच्या पद्धतीचे नियम

**८४.**—(१) ह्या कायद्यांतील तरतुदींची मर्यादा लक्षांत घेऊन आपली कामकाजाची पद्धति व काम चालविणें यांचें नियंत्रण करण्या-साठीं प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही सभागृहानें नियम बनवावेत.

मात्र लेजिस्लेटिव्ह असेंब्ली किंवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिल यांबाबत अनुक्रमें स्पीकर किंवा अध्यक्ष यांच्याशीं वाटाघाट करून गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें पुढील गोष्टींसंबंधीं नियम बनवावेत—

(क) ज्या बाबीसंबंधीं आपलें काम करीत असतांना ह्या कायद्यान्वयें गव्हर्नरला आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें वागणें भाग आहे अशा बाबीबाबत सभागृहाची कामकाजाची पद्धति आणि सभागृहांतील काम चालविणें यांचें नियमन करणें;

(ख) जमाखर्च, अंदाजपत्रक इ० बद्दलचें काम वेळेवर पुरें करून घेण्याची व्यवस्था करणें;

(ग) कोणत्याही हिंदी संस्थानाशीं संबंध असलेल्या एखाद्या बाबीची चर्चा किंवा त्याबद्दल प्रश्न विचारणें या गोष्टींना बंदी करणें— पण त्या गोष्टीचा प्रांतिक सरकारशीं अगर त्या प्रांतात नेहमींवास करणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनाशीं संबंध पोंचत आहे अशी गव्हर्नरची स्वतःची पुरी खात्री झाली तर त्यानें त्या गोष्टीची चर्चा करण्यास अगर त्याबाबत प्रश्न विचारण्यास संमति दिल्यास वरील नियम अमलांत येणार नाहीं;

(घ) गव्हर्नरनें स्वतःच्या मर्जीप्रमाणें संमति दिल्याशिवाय पुढील गोष्टींना बंदी करणें—

(i) राजेसाहेब किंवा गव्हर्नर जनरल आणि कोणतेंही परकीय राज्य अगर राजा यांच्यामधील संबंधाबाबत कोणत्याही गोष्टीची चर्चा करणें अगर त्यासंबंधीं प्रश्न विचारणें; किंवा

(ii) रानटी टोळयांच्या प्रदेशासंबंधाच्या, अथवा वगळलेल्या प्रदेशाच्या राज्यकारभारांतून उत्पन्न होणाऱ्या अगर राज्यकारभाराला स्पर्श करणाऱ्या, कोणत्याही गोष्टीबाबत खर्चाच्या अंदाजपत्रकाच्या चर्चेव्यतिरिक्त चर्चा करणें अथवा त्यासंबंधीं प्रश्न विचारणें; किंवा

(iii) कोणत्याही हिंदी संस्थानाच्या राजाच्या अगर त्यांतील राजघराण्यांतील इसमाच्या वैयक्तिक वागणुकीची चर्चा करणें किंवा त्यासंबंधीं प्रश्न विचारणें;

आणि जर आणि जेवढ्या मर्यादेपर्यंत गव्हर्नरनें वरील तऱ्हेनें केलेला कोणताही नियम सभागृहानें केलेल्या एखाद्या नियमाशीं विसंगत असेल तर आणि तितक्यापुरता गव्हर्नरनें केलेला नियम प्रभावी ठरेल.

(२) लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असणाऱ्या प्रांतांत स्पीकर आणि प्रेसिडेंट यांच्याशीं वाटाघाट करून गव्हर्नरनें दोन्ही सभागृहांच्या जोडबैठका आणि त्यांच्यामधील दळणवळण याबाबतच्या कामाच्या पद्धतीसंबंधीं नियम बनवावेत.

वरील नियमांत मागील पोटकलमांतील मर्यादात्मक भागांत निर्दिष्ट केलेल्या कामाकरितां गव्हर्नराच्या मर्जीस येईल तशी तरतूद करण्यांत येईल.

(३) ह्या कलमान्वयें नियम तयार होईपर्यंत ह्या कायद्याच्या या खंडाच्या सुरवातीच्या लगेच पूर्वी प्रांताच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलाबाबत जारी असणारे कामकाजाच्या पद्धतीचे नियम व स्टँडिंग ऑर्डरी प्रांताच्या कायदेमंडळाबाबत लागू होतील; मात्र त्यांत जरूर वाटणारे योग्य ते फेरबदल गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचे आहेत.

(४) दोन्ही सभागृहांच्या जोडबैठकीला लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचा प्रेसिडेंट अथवा त्याच्या गैरहजेरींत या कलमान्वयें केलेल्या कामकाजाच्या नियमांत ठरविण्यांत आलेला इसम अध्यक्षाचें काम करील.

(अ) 'ह्या कायद्यांतील तरतुदींची मर्यादा' लक्षांत घेऊन असेंब्लीनें अथवा कौन्सिलनें आपले कामकाजाचे नियम बनवावयाचे आहेत. वर उल्लेखिलेल्या 'ह्या कायद्याच्या कांहीं तरतुदी' पुढें दिल्या आहेत; त्या जमेला धरून व त्यांना बाध न आणतां सदर नियम तयार करावयाचे आहेतः—

| | |
|---|---|
| ६५ (२) | स्पीकरला अथवा प्रेसिडेंटला काढून टाकण्याचा ठराव. |
| ६५ (३) | स्पीकर किंवा डेप्युटी स्पीकर, अथवा प्रेसिडेंट किंवा डे० प्रेसिडेंट नसतांना त्यांचें काम चालविण्याकरितां गव्हर्नरनें नेमलेला इसम. |
| ६६ (३) | सभेचा ठरलेला कोरम नसतांना बैठकीची तहकुबी. |
| ६७ | शपथविधि. |
| ६८ | ओळीनें ६० दिवसपर्यंत सभासदांची कायदेमंडळांतील गैरहजेरी. |
| ७२ | कायदेमंडळाचा कायदा होईपर्यंत सभासदांचा भत्ता, प्रवासखर्च इ० बाबतची व्यवस्था. |
| ७५, ७६ | गव्हर्नरनें बिलाचा फेरविचार करण्यासाठीं कायदेमंडळांना पाठविलेला संदेश. |
| ७८ (३) | (क) गव्हर्नरचा पगार, भत्ता इ० बाबत कायदेमंडळांनीं चर्चा न करणें. |
| ८० (२) | मंजूर झालेलें खर्चाचें अधिकृत अंदाजपत्रक कायदेमंडळापुढें ठेवणें. |

८४ कामकाजाचे नियम नवीन होईपर्यंत १९१९ च्या कायद्याच्या ७२ डी ( ६ ) कलमाखालीं तयार झालेले नियम चालू ठेवणें; त्या नियमांत केलेली 'नियम' शब्दाची व्याख्या.

८६ ( २ ) कायदेमंडळांतील चर्चेवर गव्हर्नरच्या हुकमान्वयें आलेलें नियंत्रण.

८८ ( १ ) गव्हर्नरनें काढलेल्या वटहुकमावर चर्चा.

९० ( २ ) गव्हर्नरनें करावयाच्या कायद्याच्या मसुद्याबरोबर संदेश पाठविणें.

सदर नियम तयार करण्याच्या अधिकारान्वयें प्रांतांतील असेंब्ल्यांनीं व कौन्सिलांनीं आपापल्या कमिट्या नेमल्या; कित्येक कमिट्यांचे अहवाल प्रसिद्ध होऊन त्यांवर असेंब्ली व कौन्सिल यांतून चर्चा होऊन नियम कलमवार मंजूर झाले आहेत. आपल्या मुंबई प्रांतांतील नेमलेल्या कमिट्यांचे रिपोर्ट प्रसिद्ध झाले आहेत; परंतु अद्याप कायदेमंडळांत चर्चा होऊन ते नियम मंजूर झालेले नाहींत. तोंपर्यंत ८४ ( ३ ) पोटकलमान्वयें गव्हर्नरनें 'आपल्या मर्जीप्रमाणें' केलेले नियम सध्यां अमलांत आहेत. असेंब्ली व कौन्सिल या दोघांचे नियम मंजूर झाल्यावर मग ८४ ( २ ) पोटकलमान्वयें जोडबैठकांसंबंधींचे नियम गव्हर्नर करणार हें उघड आहे. दरम्यानच्या काळांत जोडबैठकीबाबतचे नियम, तात्पुरते का होईनात, अद्याप प्रसिद्ध केलेले नाहींत व अद्याप मुंबई प्रांतांत जोडबैठकीचा एकही प्रसंग आलेला नाहीं.

( आ ) १९३५ च्या कायद्यान्वयें गव्हर्नरवर पुष्कळच अधिकार व जादा जबाबदाऱ्या लादल्या असल्यामुळें त्या पार पाडण्याच्या दृष्टीनें या नियम बनविण्याच्या बाबतही ८४ ( १ ) कलमांत अनेक गोष्टींसंबंधीं गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें नियम करावेत असें म्हटलें आहे. ५९ व्या कलमांत प्रधानमंडळाच्या बैठकीसंबंधीं ज्याप्रमाणें गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला घेऊन मग नियम करावयाचे आहेत त्याचप्रमाणें असेंब्ली व कौन्सिल यांमधील कामकाजाच्या नियमांबाबत गव्हर्नरनें स्पीकर आणि प्रेसिडेंट यांची सल्लामसलत घेऊनच मग तत्संबंधीं नियम बनवावयाचे आहेत.

ज्यांचा ज्या गोष्टींशीं नेहमीं संबंध येणार त्यांची सल्लामसलत घेऊनच नंतर गव्हर्नरनें काय करावयाचें तें करावें हें बंधन अगदीं वाजवी असेंच आहे. जानेवारी १९३८ मध्यें दिल्ली येथें मध्यवर्ती असेंब्लीचे अध्यक्ष सर अब्दुर रहिम यांचे अध्यक्षतेखालीं प्रांतिक असेंब्ल्यांचे स्पीकर व कौन्सिलांचे प्रेसिडेंट यांची एक सभा भरली होती; त्या सभेंत झालेले ठराव गुप्त राखण्यांत आलेले आहेत; तथापि असें ठरल्याचें समजतें कीं, "राज्यकारभाराच्या कक्षेंत येणाऱ्या सर्व विषयांसंबंधीं नियम करण्याचा अधिकार कायदेमंडळांना असला पाहिजे. गव्हर्नराला जरी कायद्याप्रमाणें नियम करण्याचा अधिकार असला तरी नित्याच्या कामकाजांत गव्हर्नरानें त्याचा उपयोग करून ढवळाढवळ करूं नये. त्यानें फार झालें तर सर्वसाधारण धोरण आंखून द्यावें; पण एखाद्या प्रश्नावरची चर्चाच मुळांत बंद करण्याचा प्रसंग त्यानें आणूं देऊं नये." तसेंच "ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सच्या हक्कांच्या धर्तीवर आपल्या इकडील कायदेमंडळांच्या सभासदांच्या हक्कांसंबंधीं योजना तयार करावी आणि जरूर वाटल्यास १९३५ च्या कायद्याच्या ७१ व्या कलमांत दुरुस्ती करवून घ्यावी," असेंही ठरल्याचें समजतें. वर उल्लेख आलेल्या दोन गोष्टींपैकीं पहिल्या गोष्टींतील मागणी ही काँग्रेसनें सरकारकडे केलेल्या आश्वासनमागणीसारखीच आहे. मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्याचा ठराव उंदरांच्या सभेंत झाला; परंतु शेवटीं प्रश्न येऊन पडला कीं, घांट कोणी बांधावी; त्यापैकींच वरील बैठकीचा प्रकार झाला. कांहीं उंदरांनीं आपला उंदिरपणा सोडून मांजराशीं झुंजावयाचें ठरविल्याशिवाय मांजराचा उंदिरखाऊपणा नाहींसा करितां येणार नाहीं. दुसऱ्या भागासंबंधीं एवढेंच म्हणावयाचें कीं, त्याकरितां पार्लमेंटांत कायद्यांत बदल करून घेण्याची जरूरी नाहीं. कारण ७१ (२) कलमान्वयें प्रांतिक कायदेमंडळांना सभासदांचे हक्क निश्चित ठरविण्याचा अधिकार दिलेला आहे. यासंबंधीं एका सभासदानें मद्रास असेंब्लींत उपस्थित केलेल्या प्रश्नाचें उत्तर देतांना मुख्य प्रधान ना. राजगोपाळाचार्य म्हणाले कीं, "एखादा कायदा करून सभासदांचे हक्क मर्यादित करून घेण्यापेक्षां सभासदांच्या हक्कांची रूढीनें वा प्रघातानें वाढ करूं देणें हें जास्त शहाणपणाचें आहे. तथापि पुष्कळ सभासदांना जर कायदा होणें अगत्याचें वाटत असेल तर

कायद्याचा मसुदा तयार करितां येईल आणि तो सभागृहापुढें मंजुरीसाठीं ठेवितांही येईल, परंतु तसें करणें मला अनिष्ट वाटतें." इतर अनेक गोष्टी निकालांत निघण्याची वाट पहात असल्यामुळें व अद्याप सर्व प्रांतांतून या ८४ कलमांत उल्लेखिलेले नियमही नवीन तऱ्हेनें बनविलेले नसल्यामुळें ७१ व्या कलमान्वयें देण्यांत आलेल्या अधिकाराला अनुसरून कोठल्याही प्रांतांत कायदेमंडळांच्या सभासदांच्या हक्कांबाबत कायदा करण्यांत आलेला नाहीं. तथापि याबाबत रूढीनें होवो वा कायद्यानें होवो, कांहीं तरी व्यवस्था होणें अगत्याचें होऊन बसतें. मध्यप्रांत-वऱ्हाड असेंब्लींत रेव्हरेंड रॉजर्स या सभासदाचा पोलिस अधिकाऱ्यांनीं अपमान केल्याबाबत श्री. खापर्डे यांनीं प्रश्न उपस्थित केला होता. स्पीकरनें यावर उत्तर दिलें कीं, " मला याबाबत आतांपर्यंत कांहींच माहिती नाहीं. तेव्हां माझ्या कचेरींत येऊन जर रॉजर्ससाहेब सर्व हकीगत कानावर घालतील तर त्याचा मला योग्य तो विचार करितां येईल." नामदार खरे यांनीं सरकारतर्फे खुलासा केला कीं, " शिष्टमंडळाची मी भेट घेत असतांना इतकी गर्दी लोटली होती कीं, लोकांची गर्दी पातळ करण्याचें काम मला पोलिसांना सांगावें लागलें. सभागृहाच्या व्हरांड्यांतून लोकांना घालवून देतांना दंडुक्याचा उपयोग करण्यास मी पोलिसांना कधींच सांगितलें नाहीं." राजर्ससाहेबांचें या खुलाशानें समाधान होऊन हें प्रकरण मिटलें. दुसरी एक अगदीं साधी गोष्ट. बंगाल कौन्सिलच्या सभासदांना पुस्तकें ग्रंथालयांतून मिळण्याबाबत गैरसोय, पिण्याचें पाणीही मिळण्याची पंचाईत, याबाबत कौन्सिलच्या अध्यक्षांनीं सरकारला तंबी देऊन सभासदांनाही आपल्या हक्कांबाबत जागृत राहण्याविषयीं इशारा दिला. ते म्हणाले:—" सभासदांच्या गैरसोयी जर लौकर दूर झाल्या नाहींत तर मला वेळोवेळीं सभागृहाचें काम लांबणीवर टाकणें भाग पडेल. प्रधानांकडे याबाबत भीक मागण्याऐवजीं कोणी तरी सभासदानें ठराव मांडावा आणि या गोष्टीचा एकदांचा निकाल लावून घ्यावा." नामदार मुश्रफ हुसेन यांनीं गाऱ्हाणीं ताबडतोब नाहींशीं करण्याचें आश्वासन दिलें.

वरती उल्लेख आलेल्या स्पीकर आणि प्रेसिडेंट यांच्या दिल्ली

येथें जानेवारी १९३८ मध्यें भरलेल्या सभेंत पुढील सर्वसाधारण विषयांची चर्चा झाली:—

( १ ) सर्व स्पीकर व सर्व प्रेसिडेंट यांची एक 'इंडियन पार्लमेंटरी ॲसोसिएशन' या नांवानें संस्था स्थापन करणें;

( २ ) असेंब्ली आणि कौन्सिल मिळून सध्यां एकच खातें आहे, तर तीं दोन निरनिराळीं खातीं करून तीं अनुक्रमें स्पीकर आणि प्रेसिडेंट यांच्या ताब्यांत देणें;

( ३ ) कायदेमंडळांतील 'प्रार्थनां'संबंधीं निश्चित धोरण ठरविणें ( मद्रास असेंब्लींत या प्रश्नाला बरेंच उग्र स्वरूप प्राप्त झालें आहे. );

( ४ ) एकाच मुद्द्यावर जर स्पीकर आणि प्रेसिडेंट यांनीं परस्पर-विरुद्ध निर्णय दिले तर अशा प्रसंगीं काय करावें ? तसेंच एका सभा-गृहांत अध्यक्षानें दिलेला निर्णय दुसऱ्या सभागृहांत चर्चिला जावा काय ?

( ५ ) अध्यक्षाच्या जागीं निवडणूक झाल्यावर प्रेसिडेंट आणि स्पीकर यांनीं आपापल्या पक्षाशीं चिकटून राहावें काय ? ( या प्रश्नाला संयुक्त-प्रांतांत स्पीकर टंडन यांच्या निश्चयी धोरणानें बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे.)

( ६ ) अध्यक्षांच्या वर्तनावर वर्तमानपत्रांतून अथवा सभांतून गैर-वाजवी वा भलती टीका न होऊं देण्याकरितां कायदा करावा काय ?

( ७ ) बिनसरकारी सभासदानें आणलेलें बिल आपली वाट हळू-हळू चालत असतां त्याच बाबीसंबंधीं सरकारनें आपण स्वत: बिल तयार करून मांडल्यास तें बरोबर होईल काय ?

( ८ ) प्रेक्षकांना अधिवेशन संपेपर्यंत एकदमच तिकिटें देण्याची व्यवस्था करावी काय ?

( ९ ) नियमाबरहुकूम बिलांचा मसुदा करण्याच्या कामीं बिन-सरकारी सभासदांना साहाय्य देण्याकरितां एखादी कमिटी नेमणें;

( १० ) चर्चा होण्यापूर्वींच अध्यक्षानें मान्यता दिलेले किंवा न दिलेले प्रश्न, ठराव व बिलें वर्तमानपत्रांना छापूं द्यावीं काय ?

( ११ ) प्रश्नांची संख्या नियमित करावी काय ?

( १२ ) पुरवणीप्रश्नांची संख्या सुद्धां नियमित करावी काय ?

( १३ ) देशी भाषांतून बोलण्याची सवलत कोणाकोणास द्यावी ?

या यादीवरून परिषदेच्या कार्याच्या व्यापकपणाची कल्पना येईल. सध्यांचें युग संघानें काम करण्याचें आहे. त्याप्रमाणें स्पीकर आणि प्रेसिडेंट यांचा संघ बनून त्यांनीं आपल्यापुढें नित्य उत्पन्न होणाऱ्या अडचणींचा एकत्र बसून विचार करावा व एकमेकांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा लाभ करून घ्यावा हें युक्तच आहे.

( इ ) ८४ (१) ( क ) कलमाप्रमाणें आपल्या खास अधिकारांच्या बाबींसंबंधीं कायदेमंडळांतील कामकाजाचे नियम गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचे आहेत. अर्थात्‌च त्यांत ठरावांना बंदी करण्याच्या नियमांचाही अन्तर्भाव होतो. सिंध असेंब्लींत कॉंग्रेसपक्षीय सभासद श्री. सिध्वा यांनीं पुढील ठराव मांडण्याबद्दलची सूचना दिली होतीः—" मध्यवर्ती सरकाराकडून सिंध सरकाराकडे जी देणगी आली आहे तिच्यापैकीं कांहीं रकमेचा विनियोग गव्हर्नरच्या बंगल्याकरितां न करतां सिंध असेंब्ली हॉल बांधण्याकरितां करण्यांत यावा." या ठरावास स्पीकरनें परवानगी दिली; तथापि गव्हर्नरनें " सदर ठरावांतील बाब 'इंडिया आणि बर्मा ऑर्डरी'च्या ६ ( १ ) कलमाधारें आपल्या वैयक्तिक मतांतली आहे असें सांगून " वरील कलमाच्या आधारें ठरावाला बंदी केली. बिहार कौन्सिलांतील एक सभासद सय्यद मुबारक अल्ली यांनीं पाठविलेल्या पुढील ठरावाला—" कौन्सिलांतील गव्हर्नरनें नेमलेल्या सभासदांच्या नेमणुकीनें निरनिराळ्या जातींच्या व हितसंबंधांच्या प्रमाणांत बिघाड झाला आहे. याबाबत हें कौन्सिल गव्हर्नरसाहेबांचें लक्ष वेधूं इच्छितें "—या कलमांतील अधिकारान्वयें गव्हर्नरनें बंदी केली. कारण कौन्सिलांतील सभासदांची नेमणूक ही गव्हर्नरानें 'आपल्या मर्जीप्रमाणें' करावयाची गोष्ट आहे [ पांचवें शेड्यूल : नियम १४ (घ) ].

'वेळेवर अंदाजपत्रक मंजूर करवून घेण्याची व्यवस्था करणें' याबाबतही गव्हर्नरनें नियम करावयाचे आहेत. 'पैसा' ही तर कोणत्याही राज्याची मुख्य गुरुकिल्ली आहे. त्याच्यावर ज्याचा ताबा तो खरा मालक. मागील दोन चार कलमांतून बजेटबाबत प्रधानमंडळावर व कायदेमंडळावर किती बन्धनें आहेत याचें सविस्तर विवरण आलेंच आहे. स्वतःचा व इतर सनदी नोकरांचा पगार, सावकाराचें व्याज इ. किती तरी

गोष्टी गव्हर्नराच्या अत्यन्त जिव्हाळ्याच्या आहेत. तेव्हां त्यांची व्यवस्था आपल्या मनाप्रमाणें करण्याकरविण्यास नियम करण्याची सत्ता त्याला या कलमान्वयें देण्यांत आली असल्यास नवल नाहीं. ७८ ( १ ) व ८० ( १ ) या कलमांचा वरील कलम हा परिपाक होय असें मानण्यास कोणतीच हरकत नाहीं.

हिंदी संस्थानांशीं संबद्ध असलेल्या कोणत्याही गोष्टीसंबंधीं ठराव मांडणें अगर प्रश्न विचारणें अगर त्यावर वादविवाद करणें या गोष्टी बंद करणें याबाबत गव्हर्नरनें नियम बनवावयाचे आहेत. ५२ ( १ ) ( च ) या कलमांत गव्हर्नरवर हिंदी संस्थानिकांचें हितसंरक्षण करण्याची जादा जबाबदारी टाकण्यांत आलेली असल्यामुळें त्याकरितां नियम करणें हें ओघानेंच प्राप्त झालें आहे. याला अपवाद एवढाच कीं प्रांतिक सरकारच्या हितसंबंधास अथवा प्रांतांत राहणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनांच्या हितसंबंधास बाध येत असल्यास व म्हणून गव्हर्नरनें परवानगी दिल्यास प्रश्न विचारतां येतील व ठरावावर चर्चा करितां येईल. हिंदी संस्थानिकांना फेडरेशनमध्यें गोवण्याकरितां चुचकारण्याचे हे सर्व प्रयत्न आहेत यांत संशय नाहीं. संस्थानिकांना असें वाटत राहिलें पाहिजे कीं, आपलें आधिराज्य अबाधित राखलें गेलें आहे व आपण आपल्या प्रजेशीं कोणत्याही तऱ्हेचें वर्तन केलें तरी कुणाचीही कोठेंही ब्र काढण्याची प्राज्ञा नाहीं. संयुक्तप्रांत असेंब्लींत सप्टेंबर १९३७ मध्यें अझीझ अहमद-खान यांनीं रामपूर संस्थानासंबंधीं चर्चा करण्याकरितां एक तहकुबीची सूचना आणली होती; ती मांडण्याला त्यांनीं स्पीकरची परवानगी मागितली असतां स्पीकरनें याबाबत गव्हर्नरला असलेल्या अधिकाराकडे बोट दाखविलें. गव्हर्नरनें संमति देण्याचें नाकारल्यामुळें तहकुबीची सूचना मांडतां आली नाहीं; व रामपुरास घडत असलेल्या अन्यायांना तोंड फुटलें नाहीं. 'परंतु रामपूरच्या राज्यांत कांहीं तरी बिघाड आहे' एवढी सर्वांची खात्री पटण्यास वरील तहकुबीची सूचना पुरेशी झाली. दुसरी एक गोष्ट. जानेवारी १९३८ मध्यें पंजाब असेंब्लींत चौधरी कर्तारसिंगांचा पुढील प्रश्न गव्हर्नरनें विचारण्यास परवानगी दिली नाहीं. प्रश्न असा—" अमुक एक पार्लमेंटरी सेक्रेटरी एकाच वेळीं नरेन्द्रमंडळाचा कायदेशीर सल्लागार,

पतियाळा दरबारचा कायदेशीर सल्लागार आणि पंजाब सरकारचा पूर्ण-पगारी पार्लमेंटरी सेक्रेटरी या तीन अधिकारांच्या जागांवर काम करीत आहे त्याला सरकारची परवानगी आहे काय?" ही जर विचारलेली गोष्ट खरी असेल तर ती गैरवाजवी असून तावडतोब बंद करावयास हवी; परंतु गव्हर्नरनें ८४ ( १ ) ( ग ) कलमाचा आधार घेऊन प्रश्नाची मुस्कटदाबी केली. लाला देशबंधु यांनीं गव्हर्नरकडून सभागृहाच्या अधिकारांची पायमल्ली होत असल्याची तक्रार केली व स्पीकरनें वरीलप्रमाणें सभागृहाचें मत असल्यास तें गव्हर्नराच्या कानावर घालण्याचें आश्वासन दिलें.

'ब्रिटिश प्रजाजन' यांत 'हिंदी' व 'युरोपियन' अशा दोघांही ब्रिटिश प्रजाजनांचा अन्तर्भाव होतो. आपल्या हिंदी राष्ट्राला स्वतंत्र अस्तित्व या पृथ्वीच्या पाठीवर नसल्यामुळें परदेशांत आपण कोठेंही गेलों तरी आपल्या कपाळावरचा 'ब्रिटिश' किंवा संस्थानी प्रजाजन असल्यास 'ब्रिटिश संरक्षित' हा शिक्का कांहीं सुटत नाहीं.

या ठिकाणीं बंगाल असेंब्लींत गव्हर्नरनें आपला अधिकार चालवून १९३५ च्या घटनेच्या निषेधाच्या ठरावास बंदी केली या गोष्टीची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. या घटनेचा निषेध हिंदुस्थानांत सर्वत्र व सर्व पक्षांकडून एकसारखा चालूच आहे; असें असतांना तो बंगाल असेंब्लींत पुनः एकदां रीतसर ठराव मंजूर होऊन झाला असता तर असा कोणता अनर्थ कोसळून पडला असता कोणास ठाऊक? पुढें कांहीं महिन्यांनीं अशा आशयाचे ठराव सर्व प्रांतिक कायदेमंडळांतून मंजूर झाले व अजूनही कोठें कोठें होत आहेत. परंतु बंगालमध्येंच ही गव्हर्नराची अरेरावी चालू शकली. त्याला वाटलें असावें कीं, घटनेचा निषेध म्हणजे मुख्यतः गव्हर्नरांना व गव्हर्नर जनरलला दिलेल्या जादा अधिकारांचाच निषेध. आणि असा कोण मायेचा पूत सापडणार कीं, जो आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा पाडून घेईल? या कलमांत 'प्रश्न विचारण्या'बाबत जो उल्लेख आहे त्याच्या पाठीमागें बराच इतिहास आहे. ही 'प्रश्नोत्तरा'ची प्रथा लोकशाही राज्यांतून आतां सर्रास इतकी रूढ झाली आहे कीं, त्या प्रथेला उगम असा नसून ती अनादीच आहे असें वाटतें. अर्स्किन मे आपल्या पुस्तकांत म्हणतोः— " पहिला प्रश्न

विचारला आणि त्याचें उत्तर देण्यांत आलें तें ब्रिटिश पार्लमेंटांत ९ फेब्रुवारी १७२१ या रोजीं" (पृ० २५०). लॉर्डांच्या सभागृहांत या प्रश्नोत्तरांवर चर्चाही करण्यांत येतें (पृ० १९६). सार्वजनिक हिताला बाध येण्याचा संभव म्हणून मंत्र्यांना प्रश्नाचें उत्तर देण्याचें नाकारण्याचा हक्क आहे (पृ० २२२). प्रश्नोत्तरांबाबत या ठिकाणीं अधिक लिहीत नाहीं. प्रथमतःच 'प्रश्नां'चा उल्लेख आला म्हणून जातां जातां त्यांची पीठिका तपासली इतकेंच.

(घ) पोटविभागाप्रमाणें गव्हर्नरची संमति असल्याशिवाय तीन गोष्टींबद्दल चर्चाही करतां येणार नाहीं व प्रश्नही विचारतां येणार नाहींत. राजेसाहेब किंवा गव्हर्नर जनरल आणि कोणतेंही परकीय सरकार किंवा राजा यांच्यामधील परस्परसंबंधाची बाब ही खास गव्हर्नर जनरलच्या अखत्यारींतील असल्यामुळें व त्याबद्दल तो हिंदी कायदेमंडळांना तिळमात्र जबाबदार नसल्यामुळें व भारतमंत्री, ब्रिटिश मंत्रिमंडळ व ब्रिटिश पार्लमेंट या प्रणालीला तो जबाबदार असल्यामुळें साहजिकच प्रश्न विचारण्याचा व ठराव मांडण्याचा हक्क तितक्या अंशानें मर्यादितच झाला आहे. मुळांतच कीड असल्यामुळें ती शाखापल्लवादिकांत पसरावी हें क्रमप्राप्त आहे. 'रानटी टोळ्यांचा प्रदेश' ही बाब कलम ११ (१) प्रमाणें केवळ गव्हर्नर जनरलच्या अधिकारांतली आहे. ३११ (१) कलमामध्यें 'रानटी टोळ्यांचा प्रदेश' याची पुढीलप्रमाणें व्याख्या केली आहे:—"ब्रिटिश हिंदुस्थान किंवा ब्रह्मदेश यांचा भाग नसणारा, अथवा कोणतेंही हिंदी संस्थान किंवा कोणतेंही परकीय राज्य यांचा भाग नसणारा, हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील अथवा बलुचिस्थानांतील प्रदेश." त्यामुळें या प्रदेशांच्या राज्यव्यवस्थेबाबत जेथें फीडरल कायदेमंडळांत प्रश्न विचारतां येणार नाहींत किंवा ठराव मांडतां येणार नाहींत तेथें प्रांतिक कायदेमंडळांची काय अवस्था असणार हें दिसतच आहे! ही 'रानटी टोळ्यांची बाब' इतर प्रांतांत उपस्थित होणारी नसून फक्त वायव्यसरहद्दप्रांतालाच लागू होणारी आहे. त्याकरितां तेथल्या गव्हर्नरवर जादा जबाबदारीही 'आज्ञापत्रां'तील १५ (अ) या कलमानें सोपविण्यांत आलेली आहे. हा कारभार गव्हर्नर, गव्हर्नर जनरलचा एजंट म्हणून, पाहणार. त्याकरितां अंदाज-

पत्रकांत जी रक्कम खर्ची घालावी लागेल ती जरी मध्यवर्ती सरकाराकडून मिळावयाची असली तरी त्यावर चर्चा करण्याचा अधिकार या ( घ ) ( ii ) कलमानें शाबूत ठेवला आहे ही मोठी खैरच म्हणावयाची ! तसेंच 'वगळलेल्या' प्रदेशाबाबत प्रश्न विचारतां येणार नाहींत व ठराव मांडतां येणार नाहींत. परंतु त्या प्रदेशावर होणाऱ्या खर्चाबाबत चर्चा करण्याचा हक्क शिल्लक ठेवण्यांत आला आहे. कलम ७८ ( ३ ) ( ङ ) अन्वयें 'वगळलेल्या' प्रदेशाबाबत होणारा खर्च हा 'चार्ज्ड' असल्यामुळें व एकट्या गव्हर्नरवर होणाऱ्या 'चार्ज्ड' खर्चाखेरीज बाकीच्या सर्व 'चार्ज्ड' खर्चावर चर्चा करण्याची मुभा ठेवण्यांत आली असल्यामुळें वरील कलमांत सदर अपवाद घालण्यांत आला आहे. मुंबई प्रांतापुरता व वऱ्हाड-मध्यप्रांतापुरता विचार केल्यास या दोहोंतही 'रानटी टोळ्यांचा प्रदेश' नाहीं किंवा 'वगळलेला प्रदेश'ही नाहीं; तेव्हां या कलमाचा उपसर्ग त्यांना पोंचूंच शकत नाहीं. गव्हमेंट ऑफ इंडिया बिलांत 'वगळलेल्या प्रदेशा'बरोबर 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांचाही समावेश वरील ( घ ) ( ii ) पोटकलमांत करण्यांत आला होता; परंतु मागाहून सर सॅम्युअल होअर यांनीं दुरुस्ती सुचवून निदान 'अंशतः वगळलेले' प्रदेश अंशतः तरी कायदेमंडळांच्या अधिकाराच्या कक्षेंत आणून ठेवले आहेत. 'बिला'चा 'कायदा' होत असतांना हिंदी लोकांना अनुकूल अशी एवढीच दुरुस्ती सुचविलेली दिसते. बाकीच्या सर्व दुरुस्त्या ( उ० आसाम प्रांतांत वरिष्ठ सभागृहाची स्थापना ) हिंदी लोकांच्या दृष्टीनें प्रतिगामी स्वरूपाच्याच आहेत.

शेवटीं हिंदी संस्थानाधिपतीच्या अगर त्याच्या घराण्यांतील माणसाच्या वर्तनाबद्दल प्रश्न विचारण्याची व चर्चा करण्याची बंदी करण्यांत आली आहे. ३११ ( १ ) कलमांत 'हिंदी संस्थान' व 'अधिपति' यांचें स्पष्टीकरण आलें आहे. 'हिंदी संस्थान' म्हणजे 'ब्रिटिश राजेसाहेबांच्या आधिराज्याखालीं असलेल्या कोणत्याही राजाचा अथवा राजाच्या प्रभुत्वाखालीं असलेला कोणताही प्रदेश– मग त्याला स्टेट म्हणा, इस्टेट म्हणा अथवा जहागीर म्हणा अथवा दुसरें कोणतेंही नांव द्या–तो ब्रिटिश हिंदुस्थानांत समाविष्ट झालेला भाग असतां कामा

नये' आणि 'अधिपति' म्हणजे 'त्या विशिष्ट संस्थानाबाबत, ब्रिटिश राजेसाहेबांनीं संस्थानाधिपति म्हणून मान्यता दिलेला प्रिन्स, चीफ किंवा दुसरा कोणीही इसम.' ( ग ) पोटकलमांत संस्थानासंबंधींच्या कोणत्याही गोष्टीबाबत प्रश्न विचारण्याची बंदी करण्याचा हक्क गव्हर्नरला दिला आहे; परंतु या ( घ ) (iii ) कलमांत संस्थानिक किंवा त्याच्या घराण्यांतील माणसें, यांचें वैयक्तिक दृष्टचा संरक्षण करण्याची व्यवस्था केलेली आहे. ५२ ( १ ) ( च ) कलमांत वरील दोन्हींचा समावेश एकत्र करण्यांत आला आहे; परंतु या कलमांत तीच गोष्ट 'विभज्य योगः' या न्यायानें उल्लेखिलेली आहे. आतां राजाच्या किंवा संस्थानिकाच्या घराण्यांतील माणसें किती व कोणतीं हा एक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. माजी निजामासंबंधीं असें ऐकिवांत होतें कीं, त्याच्या जनानखान्यांत तीनशें राण्या होत्या. तितक्यांचीं अपत्यें, त्यांचे नातेवाईक इत्यादि मंडळींचा अन्तर्भाव या कलमांत केला गेला तर मोठा कठीण प्रसंग यावयाचा. कांहींनीं यांतून व्यवहार्य तोड म्हणून अशी सूचना केली आहे कीं, राजा आणि त्याचे जवळची एक दोन कायदेशीर कुटुंबीय मंडळी असा अर्थ घ्यावा. 'कायदेशीर' या शब्दानें हिंदी राजेरजवाड्यांची या पार्लमेंटच्या सभासदानें चांगलीच फजिती केली म्हणावयाची ! परंतु ती वस्तुस्थितिनिदर्शक असल्यामुळें मान खालीं घालून सहन करण्याशिवाय अगर 'जशास तसें' या न्यायानें इंग्रजी बादशहाचीं उणीं काढून इंग्रजांच्या तोंडावर तीं उलट फेकण्याखेरीज गत्यंतर नव्हतें.

पहिल्या पोटकलमाची समाप्ति करतांना सांगितलें आहे कीं कायदेमंडळाचा नियम व गव्हर्नरनें केलेला नियम यांत विरोध आला तर गव्हर्नरनें केलेला नियम अमलांत यावयाचा. १९३५ च्या कायद्याचें हें सूत्रच आहे कीं, हिंदी कायदेमंडळांना व मंत्रिमंडळांना कमींत कमी सत्ता कशी देतां येईल याची विवंचना करून त्याबाबत तरतूद करून ठेवावयाची. अशा तऱ्हेनें ठिकठिकाणीं तंट्याचे व भांडणाचे प्रसंग निर्माण होण्याची संधि पदोपदीं करून ठेवलेली आढळून येते.

(ई) दुसऱ्या पोटकलमांत 'गव्हर्नरनें कायदेमंडळांच्या जोडबैठकांबाबत स्पीकर व प्रेसिडेंट यांचा सल्ला घेऊन कामाच्या पद्धतीसंबंधीं व परस्परांतील दळणवळणासंबंधीं नियम करावेत' असें म्हटलें आहे. ८४ (१) कलमांतील 'मर्यादात्मक भागां'त सांगितलेलीं सर्व पथ्यें या जोडबैठकांबाबतच्या नियमासंबंधींही पाळावयाचीं आहेत असें या (२) ऱ्या पोटकलमांत स्वच्छ सांगितलें आहे. असेंब्ली वा कौन्सिल यांच्या आडांत जें पाणी गढूळ वा स्वच्छ स्वरूपांत असणार तेंच पाणी जोडबैठकीच्या पोहऱ्यांत त्याच स्वरूपांत आढळावयाचें यांत आश्चर्य तें कसलें? मुंबई प्रांतांत अद्याप हे जोडबैठकीचे नियम गव्हर्नरनें प्रसिद्ध केलेले नाहींत. आसाम प्रांतांत गव्हर्नरनें केलेले हे नियम गव्हर्नरच्या सेक्रेटरीच्या सहीनें प्रसिद्ध झाले आहेत ते पुढीलप्रमाणें:—

"(१) जाहीर सूचना देऊन म्हणजे आसाम गॅझेटमध्यें जाहीर करून [ कलम ३११ (२) ] गव्हर्नरकडून जोडबैठक बोलावली जाईल आणि कौन्सिलचा सेक्रेटरी प्राथमिक तयारीची आणि बैठकीचें कामकाज प्रसिद्ध करण्याची तजवीज करील; असेंब्लीच्या सेक्रेटरीकडे बैठकीच्या झालेल्या कामकाजाच्या कागदांच्या नकला पाठवील. जोडबैठकीबद्दलची आगाऊ सूचना असेंब्लीच्या व कौन्सिलच्या सेक्रेटरींकडून त्या त्या सभासदांकडे पाठविली जाईल.

(२) सभासदांचा कोरम २८ असेल; त्यांपैकीं १८ सभासद असेंब्लींतील व १० सभासद कौन्सिलांतील असले पाहिजेत. जें बिल निकालांत काढण्याकरितां जोडबैठक भरविण्यांत आली असेल तें बिल त्या ठरलेल्या दिवशीं जर संपलें नाहीं तर ती बैठक तशीच पुढें चालू राहावी म्हणून गव्हर्नर एक किंवा अधिक दिवस मुक्रर करील. प्रेसिडेंट नसला तर स्पीकर, आणि डेप्युटी स्पीकर नसला तर डेप्युटी प्रेसिडेंट आणि तोही हजर नसला तर हजर असलेल्या सभासदांनीं निवडलेला सभासद जोडबैठकीचें अध्यक्षस्थान स्वीकारील. जोडबैठकीकरितां मुक्रर केलेल्या दिवसापूर्वीं तीन पूर्ण दिवसांच्या आंत कौन्सिलच्या सेक्रेटरीकडे पोंचतील अशा बेतानें बिलांना उपसूचना पाठविल्या पाहिजेत. कांहीं उपसूचना असल्यास

त्यांचा निकाल लागल्यावर बिलाच्या पुरस्कर्त्या सभासदानें 'जोडबैठकींत केलेल्या उपसूचनांसह बिल मंजूर करावे' अशी सूचना मांडावी.

( ३ ) ज्या ज्या वेळीं दोन्ही सभागृहांना भेट द्यावी असा गव्हर्नराचा मानस असेल त्या त्या वेळीं त्यानें कौन्सिलच्या प्रेसिडेंटाला व असेंब्लीच्या स्पीकरला आपण येत असल्याबद्दल संदेश पाठवावा आणि याप्रमाणें आलेले संदेश दोन्ही सभागृहांना जाहीर करावेत किंवा सभासदांकडे पत्रानें पाठवावेत."

वरील नियमांवरून दिसून येईल कीं, वरिष्ठ सभा म्हणून कौन्सिलच्या सेक्रेटरीकडे जोडबैठकीची व्यवस्था ठेवण्याचें काम दिलें आहे. जोडबैठकीचा कोरम म्हणजे सभेचें रीतसर काम सुरू होण्यास लागणारी सभासदांची संख्या २८ आहे. असेंब्लीचा कोरम ६६ ( ३ ) कलमाप्रमाणें $\frac{१}{६}$ आहे. आसाम असेंब्लींत १०८ सभासद आहेत. त्यांतील $\frac{१}{६}$ म्हणजे १८; आणि कौन्सिलचा कोरम १०, मग त्या कौन्सिलांत कितीही सभासद असोत. तेव्हां १८ + १० = २८ इतक्या सभासदांचा कोरम धरला आहे. जोडबैठकीचे एकंदर सभासद १०८ + २२ = १३०; त्यांपैकीं २८ सभासद वर सांगितलेल्या प्रमाणांत हजर असले पाहिजेत म्हणजे $\frac{१}{६}$ पेक्षां जास्त व $\frac{१}{४}$ पेक्षां कमी इतका कोरम होतो. त्याशिवाय सभेचें काम चालू होत नाहीं.

८४ ( ४ ) या पोटकलमाप्रमाणें प्रेसिडेंट हाच जोडबैठकीचा अध्यक्ष असला पाहिजे. तो हजर नसला तर कोणाला नेमावयाचें तें वरील नियमांत ठरविलें आहे. प्रेसिडेंट नसला तर त्याच्या दर्जाचा स्पीकर हा अध्यक्ष व्हावा हें ठीकच आहे. परंतु तोही नसला तर डेप्युटी प्रेसिडेंट व त्यामागून डेप्युटी स्पीकर असा क्रम वास्तविक असावयास पाहिजे. परंतु असेंब्लीला थोडें चुचकारण्याकरितांच म्हणून कीं काय, डेप्युटी प्रेसिडेंटच्या आधीं डेप्युटी स्पीकरचा नंबर घालण्यांत आला आहे. गव्हर्नरनें संदेश पाठवावयाचे ते प्रेसिडेंट स्पीकर यांच्याकडे, त्यांच्या सेक्रेटरींकडे नव्हे.

( उ ) या ८४ कलमांत गव्हर्नरनें कांहीं विशिष्ट बाबीपुरते आपल्या मर्जीप्रमाणें नियम करावेत असें म्हटलें आहे. १९३५च्या गव्हर्मेंट ऑफ बर्मा ॲक्टमध्यें हुबेहुब याच कलमाची नक्कल केली आहे. ब्रह्मी कायदेमंडळा-

च्या 'सीनेट' (वरिष्ठ सभा) व 'हौस ऑफ रिप्रेझेंटेटिव्हूज' (कनिष्ठ सभा) या नांवाच्या दोन प्रतिनिधिसभा आहेत. या 'सीनेट' सभेच्या कामकाजाचे नियम २५ फेब्रुवारी १९३८ या दिवशीं सीनेटनें मंजूर केले. त्या नियमांत गव्हर्नरनें केलेल्या नियमांचाही मागून अंतर्भाव करण्यांत आला. बाकीचे नियम न देतां गव्हर्नरनें केलेल्या नियमांचा थोडक्यांत सारांश देतों:—

१९ " स्वतःच्या मर्जीप्रमाणें अथवा वैयक्तिक मताप्रमाणें करावयाच्या गोष्टीबाबत कांहीं काम निघाल्यास गव्हर्नरानें त्याकरितां एक अथवा अधिक दिवस नेमून द्यावेत; त्या दिवशीं असलें कामकाज सर्वांच्या आधीं उरकण्यांत येईल.

३० जी बाब सीनेटमध्यें उपस्थित करण्याला अगर चर्चिण्याला गव्हर्नरची आगाऊ मंजुरी लागते अशा बाबीसंबंधींच्या कोणत्याही बिलास, ठरावास, उपसूचनेस अगर प्रश्नास, गव्हर्नरची लेखी मंजुरी अगर अशा मंजुरीची नक्कल हजर केल्याशिवाय, अध्यक्षाला परवानगी देतां येणार नाहीं.

एखाद्या ठरावाबाबत, दुरुस्तीबाबत अगर प्रश्नाबाबत गव्हर्नरच्या आगाऊ मंजुरीची आवश्यकता आहे किंवा नाहीं असा प्रश्न उपस्थित झाल्यास अध्यक्षानें तो गव्हर्नरकडे सोपवावा आणि गव्हर्नरनें दिलेला निकाल अखेरचा मानला जावा.

३१ गव्हर्नरची शिफारस आहे असें गव्हर्नरतर्फे दिग्दर्शित केलेलें असल्याशिवाय ६३ कलमांत निर्दिष्ट केलेल्या गोष्टीबाबत अध्यक्षानें ठराव इत्यादि मांडूं देतां कामा नये.

एखाद्या ठरावाला अगर दुरुस्तीला गव्हर्नरची शिफारस लागते अगर नाहीं असा प्रश्न उपस्थित झाल्यास अध्यक्षानें तो प्रश्न गव्हर्नरकडे न्यावा व त्यानें दिलेला निकाल अखेरचा मानला जावा.

३९ वादविवादांत भाग घेणें, ठराव मांडणें, प्रश्न विचारणें इत्यादि कामास्तव बोलत असतांना सभासदानें—

(१) कायद्यानें चर्चा करण्याची मनाई केलेल्या गोष्टीचा उल्लेख करतां कामा नये;

( २ ) गव्हर्नरच्या संमतीशिवाय, कायद्याच्या २९ (१) (ग) कलमांत सांगितलेल्या बाबींचा उल्लेख करतां कामा नये;

( ३ ) एखाद्या गोष्टीची चर्चा करण्यास अगर त्यासंबंधीं प्रश्न विचारण्यास गव्हर्नरनें अनुमति दिली नाहीं किंवा मनाई केली तर गव्हर्नरच्या या निकालाची चर्चा करतां कामा नये.

४० गव्हर्नरानें आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें करावयाच्या गोष्टींशीं संबंध असणाऱ्या बाबीवर [ कायद्याच्या २९ (१) (ग) कलमांत सांगितलेल्या बाबी वगळून ] चर्चा करण्यास अगर तत्संबंधीं प्रश्न विचारण्यास, गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें बंदी केली नसल्यास, मुभा आहे.

५७ कायद्याच्या १९ कलमान्वयें गव्हर्नर सीनेटबरोबर पुढील-पैकीं कोणत्याही तऱ्हेनें दळणवळण ठेवील:—

( क ) गव्हर्नर सभासदांना हजर राहण्यास भाग पडेल त्या वेळीं भाषण करून;

( ख ) प्रधानानें अध्यक्षाकडे दिलेल्या व अध्यक्षानें सीनेटला वाचून दाखविलेल्या लेखी संदेशाच्या द्वारा;

( ग ) प्रधानामार्फत तोंडी निरोप पाठवून.

## जोडबैठकीबाबत कामकाजाची पद्धत

६० गॅझेटमध्यें जाहीर खबर देऊन गव्हर्नरकडून प्रतिनिधि-सभांची जोडबैठक बोलावण्यांत येईल. या खबरेंत पहिल्या बैठकीची वेळ व स्थळ आणि कार्यक्रमपत्रिका हें सर्व नमूद केलेलें असेल. गव्हर्नर-ची संमति असल्याशिवाय, या जोडबैठकींत निमंत्रणपत्रिकेंतील कामा-खेरीज इतर कामांचा विचार केला जाणार नाहीं.

६१ अध्यक्ष धरून एकंदर ३४ सभासद हजर असल्याखेरीज जोडबैठकीचें काम सुरू होणार नाहीं. ( सीनेटचे सभासद ३६ असून तिचा कोरम १२ आहे. हाउस ऑफ रिप्रेझेंटेटिव्ह्जचे सभासद १३२ असून तिचा कोरम त्या संख्येचा एकषष्ठांश म्हणजे २२ आहे. या

दोन्ही कोरमांची बेरीज केल्यास १२+२२=३४ ही संख्या जोडबैठकीचा कोरम ठरविण्यांत आला आहे हें योग्यच आहे. मात्र हे ३४ सभासद कोणत्याही प्रतिनिधिसभेंतले असले तरी चालतील. उदाहरणार्थ, सगळेच्या सगळे ३४ सभासद सीनेटचे किंवा कनिष्ठ सभेचे असले तरी जोडबैठकीच्या कामास बेकायदेशीरपणा येणार नाहीं. आसाम व ब्रह्मदेश या दोघांतील हा फरक लक्षांत घेण्यासारखा आहे.)

६२ सीनेटचा अध्यक्ष, किंवा तो नसल्यास कनिष्ठ सभेचा स्पीकर, किंवा तोही नसल्यास हजर असलेल्या सभासदांनीं निवडलेला कोणीही सभासद जोडबैठकीचा अध्यक्ष होईल. सीनेटचा सेक्रेटरी हा जोडबैठकीचा सेक्रेटरी होईल.

६३ जोडबैठकीचें कामकाज इंग्रजी भाषेंत चालेल. इंग्रजी भाषेचें अज्ञान अथवा अपुरें ज्ञान असलेल्या सभासदानें ब्रह्मी भाषेंत बोललें तरी चालेल.

६४ सीनेटचा अध्यक्ष ठरवील त्या क्रमानें सभासदांनीं बसलें पाहिजे.

६५ हजर असून मत देणाऱ्या सभासदांच्या बहुसंख्येनें एखादें बिल मंजूर झाल्यास दोन्ही प्रतिनिधिसभांकडून तें मंजूर झालें असें मानण्यांत येईल.

६६ जोडबैठकींत एखादें बिल मंजूर झाल्यास त्याची एक प्रत सीनेटच्या अध्यक्षानें गव्हर्नरकडे पाठवावी. सदर बिल जोडबैठकींत नामंजूर झाल्यास तसें गव्हर्नरकडे चेअरमननें कळवावें.

६७ जोडबैठकींत बंदोबस्त राखण्याबाबतचे सर्व अधिकार चेअरमनला राहतील; आणि सीनेटचे कामकाजाचे नियम जोडबैठकींना लागू करण्यांत येतील.

## कायद्याच्या ३१, ३८, ४३ कलमान्वयें गव्हर्नरनें योजिलेले उपाय

१४४ एखाद्या बिलाची अगर त्यांतील विशिष्ट कलमाची अगर त्यावरील उपसूचनेची चर्चा ब्रह्मदेश अगर त्याचा कोणताही भाग यांच्या शांततेस गंभीर स्वरूपाचा धोका उत्पन्न करणारी आहे असें गव्हर्नरनें शिफारसपत्र दिल्यास आणि सदर चर्चा ताबडतोब थांबवावी असा हुकूम

दिल्यास बिलाबाबतचें सर्व काम जेथल्या तेथेंच थांबलें पाहिजे अशी सीनेट-च्या अध्यक्षानें सीनेटला सूचना दिल्यावर लगेच सीनेटनें कार्यक्रम-पत्रिकेंतील दुसऱ्या कामाकडे वळलें पाहिजे.

१४५ एखाद्या बिलाचा फेरविचार करण्याकरितां गव्हर्नरनें सीनेटकडे बिल परत पाठविलें असल्यास त्या बिलाचा पुनः पहिल्या-पासून पद्धतशीर विचार केला पाहिजे.

१४७ गव्हर्नरानें स्वतःच्या अखत्यारींत कायदे करावयाचें मनांत आणल्यास व कायद्याच्या बिलाचा मसुदा कायदेमंडळाकडे विचारार्थ पाठविण्याचें ठरविल्यास सदर बिलाचा मसुदा अध्यक्ष सीनेटला विदित करवील आणि गव्हर्नरच्या संदेशासह सदर मसुदा सीनेटपुढें ठेवला जाईल. सदर बिल सीनेटच्या पांच सभासदांच्या एका स्पेशल कमिटीकडे सोप-विण्यांत येईल. या कमिटीनें बिलाचा विचार करून आपला रिपोर्ट दोन आठवड्यांत सादर करावा. त्या बिलाबाबत गव्हर्नरला विनंतिअर्ज करावा अगर न करावा हें कमिटीनें सुचवावें. तसें करण्याचें ठरल्यास विनंति-अर्जाचा मसुदा सीनेटपुढें मांडावा. त्याला उपसूचनाही मांडतां येतील. गव्हर्नरचा संदेश आणि बिलाचा मसुदा यांत उपस्थित केल्या बाबी-संबंधींच विनंतिअर्जात उल्लेख असावयास पाहिजे.

## बजेटविषयक कामकाज

१४८ गव्हर्नर ठरवील त्या दिवशीं जमाखर्चाचें अंदाजपत्रक सादर केलें जाईल.

१५१ गव्हर्नरचा पगार इ० बाबतच्या खर्चाखेरीज बाकीच्या 'चार्ज्ड' खर्चावर चर्चा करण्यास हरकत नाहीं. अर्थमंत्री व गव्हर्नरनें नेमलेला कौन्सेलर हे आपापल्या खात्यांच्या खर्चाच्या रकमेबाबत चर्चेला उत्तर देतील ( हिंदी फीडरल घटनेंत अशीच तऱ्हा योजण्यांत आली आहे ).

१५२, १५३ पुरवणीमागण्या व जास्त झालेला खर्च याबाबत वार्षिक अंदाजपत्रकाबाबतचे नियम लागू केले जातील."

बंगाल असेंब्लीनें नेमलेल्या कमिटीनें आपला रिपोर्ट प्रसिद्ध केला आहे. त्यांत ब्रह्मदेशांतल्या सीनेटप्रमाणेंच, गव्हर्नरनें केलेल्या नियमांचा

समावेश केल्याचें दाखविण्यांत आलें आहे. तसें स्पष्ट दिसण्याकरितां मूळ नियम 'क' 'ख' 'ग' इ० उपनियमांनीं वाढविण्यांत आले आहेत.

( ऊ ) कायदेमंडळांनीं नवीन नियम तयार केले नाहींत तोंपर्यंत गव्हर्नरनें बनविलेल्या नियमांप्रमाणें कायदेमंडळांचें कामकाज चालेल असें ८४ ( ३ ) कलमांत सांगितलें आहे. मुंबई प्रांतापुरता विचार केल्यास, सदर नियम पूर्वींच्या कौन्सिलच्या नियमांत केलेल्या दुरुस्त्यांसह १५ एप्रिल १९३७ च्या मुंबई गॅझेटमध्यें प्रसिद्ध केले आहेत; व शिवाय 'बॉंबे लेजिस्लेटिव्ह कौन्सिल मॅन्युअल भाग १ ला' व 'बॉंबे लेजिस्लेटिव्ह असेंब्ली मॅन्युअल भाग १ ला' या नांवानें ते पुस्तकरूपानेंही प्रसिद्ध झाले आहेत. नियम, स्टँडिंग ऑर्डरी व सरक्युलरें इतके तीन भाग त्यांत आले आहेत. नियमांतील मुख्य मुख्य प्रकरणें पुढीलप्रमाणें देतां येतील:—

१ स्पीकर, प्रेसिडेंट यांची निवडणूक

२ गव्हर्नरचे अधिकार

३ प्रधानमंडळ किंवा स्पीकर प्रेसिडेंट यांच्याविरुद्ध अविश्वासाचा अगर काढून टाकण्याबद्दलचा ठराव

४ असेंब्ली व कौन्सिल यांत चालणाऱ्या भाषा

५ सभागृहांतील व्यवस्था, हरकतीचे मुद्दे इ०

६ बिलें प्रसिद्ध करणें, बिलांचीं तीन वाचनें, सिलेक्ट कमिट्या, असेंब्लींतून कौन्सिलाकडे अगर कौन्सिलांतून असेंब्लींकडे बिलें पाठविणें, जोडकमिट्या, ठराव इ०

७ अंदाजपत्रक सादर करणें; असेंब्लींत खर्चाच्या रकमांची मागणी करणें; जादा रकमा, पुरवणीरकमा इ० ची मागणी; अधिकृत खर्चाचें शेड्यूल

८ पब्लिक अकौंट्स कमिटीची रचना, इ०.

स्टँडिंग ऑर्डरींत पुढील बाबींसंबंधींच्या तरतुदींचा समावेश होतो:—

१ अधिवेशनें

२ असेंब्ली व कौन्सिल यांचा अधिकारीवर्ग

३ कामकाजाची व्यवस्था, क्रम इ०

४ कामकाजाचे सर्वसाधारण नियम
५ प्रश्नोत्तरें
६ वादविवादाकरितां तहकुबीच्या सूचना
७ कायदे करणें– त्यांतील निरनिराळ्या अवस्था
८ ठराव
९ बजेटाबाबत नियम
१० किरकोळ.

हे जुने नियम किंवा स्टँडिंग ऑर्डरी अमलांत असतांना किती तरी वादग्रस्त मुद्दे निरनिराळ्या प्रांतांतून निर्माण झाले आहेत. त्या सर्वांचा सामग्र्यानें विचार करावयाचा म्हटल्यास एक स्वतंत्र उपग्रंथच लिहावा लागेल. प्रस्तुत स्थळीं त्या मुद्दयांचें केवळ दिग्दर्शन करितों:—

(१) सभागृहाचें काम सुरू होण्यापूर्वी सर्वांनीं उभे राहून प्रार्थना म्हणावी किंवा नाहीं? म्हणावयाची ठरल्यास कोणती म्हणावी? निरनिराळ्या धर्मग्रंथांतून प्रार्थना काढून एकत्र म्हणाव्या का स्वतंत्र रचना करावी? 'वंदे मातरम्' ही राष्ट्रीय प्रार्थना सर्व धर्मांना मान्य आहे काय? नसल्यास त्यांत दुरुस्ती सुचविणें इष्ट व आवश्यक आहे काय? का हिंदुस्थानची विचित्र परिस्थिति लक्षांत घेतां जातीजातींतील वा धर्माधर्मांतील तेढ वाढूं देण्यास कारणीभूत होणारें हें प्रार्थनेचें खूळच अजीबात नष्ट करावें? या बाबतींत मद्रासचे स्पीकर बळसू सांबमूर्ति यांनीं बराच पुढाकार व परिश्रम घेतले आहेत. त्यांनीं यासंबंधीं इतर देशांतील पार्लमेंटसभांबरोबर पत्रव्यवहार केला असून बरीच माहिती एकत्रित केली आहे. ते परदेशांतही याकरितां प्रवास करून येणार होते; परंतु काँग्रेस वर्किंग कमिटीच्या सूचनेवरून त्यांनीं आपला बेत रद्द केला आहे. या प्रश्नाचा देशांतील सर्वसाधारण जातीय सख्याच्या प्रश्नाशीं निगडित संबंध असल्यामुळें तो महाप्रश्न सुटल्याखेरीज वरीलसारख्या उपप्रश्नांना कांहीं काळ जागच्या जागीं तिष्ठतच बसावें लागणार.

(२) बहुतेक दुहेरी कायदेमंडळांच्या प्रांतांतून सर्व प्रधान असेंब्लीचेच सभासद आहेत. डॉ. राजन् (मद्रास) खेरीज कोणीही

प्रधान कौन्सिलांचे सभासद नाहींत. तेव्हां अशा ठिकाणीं 'सभागृहाचा पुढारी (लीडर ऑफ दि हाउस)' कोण ? ज्याला मताचा अधिकार नाहीं तो सभागृहाचा पुढारी कसा होऊं शकेल ? मद्रास असेंब्लीच्या नियमांमध्यें 'लीडर ऑफ दि हाउस'संबंधीं स्पष्ट उल्लेख केलेला आढळून येतो.

( ३ ) स्पीकर अथवा प्रेसिडेंट हा ज्या पक्षाचा मुळांत सभासद असेल त्या पक्षाचें सभासदत्व त्यानें निवडणूक झाल्यावर सोडावयास पाहिजे काय ? या प्रश्नाबाबत अनेक मतमतांतरें आहेत. बहुतेक कल, स्पीकरनें किंवा प्रेसिडेंटानें पक्षातीत राहावें, इकडे दिसतो. या प्रश्नासंबंधीं संयुक्तप्रांत असेंब्लीचे स्पीकर पुरुषोत्तमदास तंडन यांनीं आपलें निश्चित मत जाहीर करून तोंड पाडलें आहे हें मागें सांगितलेंच आहे.

( ४ ) मानसन्मानाच्या पौर्वापर्याबाबत स्पीकरचें व प्रेसिडेंटचें स्थान कोणतें ? मुख्य प्रधानाच्या खालोखाल आपलें मानाचें स्थान असावें अशी मागणी स्पीकर प्रेसिडेंटांच्या दिल्लीस भरलेल्या परिषदेनें केल्याचें ऐकिवांत आहे. हें मानाचें प्रस्थ अधिकारीवर्गांत बरेंच आहे. नवीन घटना १ एप्रिल १९३७ ला अमलांत आल्यानंतर, गॅझेट ऑफ इंडिया द्वारा 'वॉरंट ऑफ प्रिसीडिन्स' ( पौर्वापर्यक्रम ) पुढीलप्रमाणें जाहीर करण्यांत आलें आहे. त्यांतील कांहीं भाग लोकांच्या कुतूहलपूर्तीस्तव उतरून घेतों:—

१ गव्हर्नर जनरल आणि व्हाइसरॉय.
२ प्रांतिक गव्हर्नर ( आपापल्या प्रांतांत असेपर्यंत ).
३ मद्रास, मुंबई, बंगाल या प्रांतांतील गव्हर्नर.
४ कमांडर इन चीफ ( सरसेनापति ).
५ संयुक्तप्रांत व पंजाब येथील गव्हर्नर.
६ बिहार, मध्यप्रांत व वऱ्हाड येथील गव्हर्नर.
७ आसाम, सरहद्दप्रांत, सिंध व ओरिसा या प्रांतांचे गव्हर्नर.
८ हिंदुस्थानचे चीफ जस्टिस ( सरन्यायाधीश ).
९ गव्हर्नर जनरलाच्या कार्यकारी मंडळाचे सभासद.
१० कमांडर इन चीफ ( आरमार ).
११ कौन्सिल ऑफ स्टेटचा प्रेसिडेंट.

१२ हिंदी लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचा प्रेसिडेंट.

१३ फीडरल कोर्टाचे न्यायाधीश.

१४ हायकोर्टांचे चीफ जस्टिस ( सरन्यायाधीश ).

१५ बलुचिस्तानांतील गव्हर्नर जनरलचा एजंट, गव्हर्नरांचे प्रधान*, पहिल्या वर्गाचे रेसिडेंट } आपापल्या अधिकारक्षेत्रांत असतांना

१६ रेलवेचा चीफ कमिशनर, जनरल ऑफिसर कमांडिंग (उत्तर, दक्षिण, पूर्व, पश्चिम), 'जनरल'च्या हुद्द्याचे अधिकारी.

१७ चीफ ऑफ जनरल स्टाफ. मद्रास, मुंबई व बंगाल या प्रांतांतील प्रधान.

१८ एअर ऑफिसर कमांडिंग (विमानदळ प्रमुख), संयुक्तप्रांत व पंजाब या प्रांतांतील प्रधान.

१९ बिहार आणि मध्यप्रांत वऱ्हाड यांतील प्रधान

२० बलुचिस्तानमधील गव्हर्नर जनरलचा एजंट; आसाम, सरहद्द-प्रांत, सिंध, ओरिसा या प्रांतांतील प्रधान; पहिल्या वर्गाचे रेसिडेंट.

२१ लेजिस्लेटिव्ह कौन्सिलांचे प्रेसिडेंट.

२२ लेजिस्लेटिव्ह असेंब्ल्यांचे स्पीकर.

२३ चीफ कोर्टाचे सरन्यायाधीश; हायकोर्टांचे न्यायाधीश.

२८ चेअरमन, पब्लिक सर्व्हिस कमिशन—मद्रास, मुंबई-सिंध, बंगाल; मद्रास, मुंबई, बंगाल सरकारचे चीफ सेक्रेटरी.

२९ मुंबई रेव्हिन्यू आणि अबकारी कमिशनर; मुंबई, मद्रास, बंगाल या प्रांतांतील गव्हर्नरांचे सेक्रेटरी.
सर्जनजनरल.

३० हिंदी विद्यापीठांचे कुलगुरु; रेव्हिन्यू कमिशनर ( आपापल्या टापूंत असतांना ).

३३ ॲडव्होकेट जनरल—मद्रास, मुंबई, बंगाल.

३५ इन्स्पेक्टर जनरल ऑफ पोलिस.

---

( *मुख्यप्रधान व प्रधान एकाच दर्जाचे; त्यांतल्या त्यांत मुख्यप्रधान आधीं)

३६ रेव्हिन्यू कमिशनर.
३७ मुंबईचा मेयर ( मुंबईमध्यें ); सरकारचे सेक्रेटरी.
३८ अकौंटंट जनरल, डायरेक्टर ऑफ ऑडिट.
ऑडिशनल आणि जॉइंट सेक्रेटरी.
चीफ कांझर्वेटर ऑफ फारेस्ट.
चीफ एंजिनियर.
पोलिस कमिशनर, मुंबई.
डायरेक्टर—शेती, सार्वजनिक आरोग्य, शिक्षण.
तुरंगाचा इन्स्पेक्टर जनरल.
सेटलमेंट कमिशनर.
मुंबईचा शेरीफ.
३९ लीगल रिमेंब्रन्सर.
४३ चेअरमन, पोर्ट ट्रस्ट आणि इंप्रुव्हमेंट ट्रस्ट, मुंबई.
म्युनिसिपल कमिशनर, मुंबई.
कलेक्टर व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, } आपापल्या जिल्ह्यांतून
सेशन जज्ज }
४५ पब्लिक सर्व्हिस कमिशनचे सभासद.
४७ कॉंझर्वेटर ऑफ फॉरेस्ट.
४८ स्मॉल कॉज कोर्टाचे चीफ जज.
५६ प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कौन्सिल यांचे सेक्रेटरी.

वरील यादीवरून स्पीकर किंवा प्रेसिडेंट हे प्रधानांच्या खालीं किती दूरवर आहेत हें समजून येईल व या नव्या राजवटींत प्रधानांना काय महत्त्व दिलें जाणार याचीही बरीचशी कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं.

( ५ ) पुरवणीप्रश्न किती विचारावे, त्यांची व्याप्ति अथवा मर्यादा काय असावी ? याबाबत कौन्सिल ऑफ स्टेटचे प्रेसिडेंट सर माणिकजी दादाभाई यांनीं २ मार्च १९३८ला जो महत्त्वाचा निर्णय दिला तो बराच मार्गदर्शक असल्यामुळें त्यांतील कांहीं भाग उद्धृत करतों:—

" हिंदुस्थानांतील कौन्सिलें किंवा असेंब्ल्या अगदीं अलीकडे निर्माण झाल्या असल्यामुळें प्रस्तुत विषयाबद्दल योग्य उत्तर अथवा मार्ग-दर्शन पाहिजे असल्यास आपणास ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सकडेच वळलें पाहिजे. कॉमन्स सभेचे सध्यांचे विख्यात स्पीकर कॅ. फिट्झरॉय यांनीं आपलें मत असें दिलें आहे कीं, 'ऑर्डरपेपरवर प्रत्येक सभासदाला तीन प्रश्न विचारण्याचा हक्क आहे. चौथा किंवा पांचवा प्रश्न असल्यास स्पीकर तो सहसा विचारूं देत नाहीं. पुरवणीप्रश्न किती विचारावेत याला कांहीं मर्यादा घालतां येत नाहीं; परंतु किती पुरवणीप्रश्नांना परवानगी द्यावयाची हें सर्वस्वी स्पीकरच्या तारतम्यबुद्धीवर अव-लंबून आहे. तसेंच पुरवणीप्रश्न विचारण्याचा हेतु हा असला पाहिजे कीं, दिलेल्या उत्तरांतील मोघमपणा नाहींसा करावयाचा अथवा मूळ प्रश्नांच्या विषयाबाबत अधिक माहिती काढावयाची. पुरवणीप्रश्नांचा मूळ प्रश्नांच्या बाबीशीं चांगला संबंध असावयास पाहिजे.' या पुरवणी-प्रश्नांच्या व्यापकतेबद्दल अथवा मर्यादेबद्दल कॅप्टन फिट्झरॉय म्हणतात : 'हें निश्चित सांगतां येणार नाहीं. विषयाचें महत्त्व अथवा तातडी आणि त्या दिवशीं किती प्रश्न ऑर्डरपेपरवर आहेत त्यांची संख्या इत्यादि गोष्टी लक्षांत घेऊन स्पीकरनें सारासारबुद्धि चालवून ठरविलें पाहिजे. मूळ प्रश्नाबाबत लागू होणाऱ्या नियमांना धरूनच पुरवणीप्रश्न असले पाहिजेत.'

लंडनच्या एम्पायर पार्लमेंटरी ॲसोसिएशनचे सेक्रेटरी सर हॉवर्ड डी एगव्हिल यांना याबाबत विचारलें असतांना त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, 'मी आजपर्यंत अनुभव घेतला आहे त्यावरून सांगूं शकतों कीं, पुरवणीप्रश्न मूळ प्रश्नाच्या विषयापासून जरा इकडे का तिकडे जाऊं न देण्याबाबत स्पीकर अतिशय खबरदारी घेतो.' सर थॉमस अर्स्किन मे आपल्या प्रसिद्ध पुस्तकांत या विषयासंबंधीं लिहितात:—'अलीकडील प्रघात निश्चित स्वरूपांत लिहिलेला कोठेंही सापडणार नाहीं. कॉमन्स सभेच्या जर्नलमध्यें किंवा प्रसिद्ध झालेल्या वादविवादांत तो आढळणार नाहीं. प्रत्यक्ष अनुभवाशिवाय किंवा पार्लमेंटांतील कामकाजाच्या सूक्ष्म अवलोकना-खेरीज याबाबत कांहींही ध्यानांत येणार नाहीं. वादविवाद किंवा टीका न करितां योग्य मर्यादेंत प्रधानांना पुरवणीप्रश्न विचारण्यास हरकत नाहीं.

त्यांचा उद्देश, उत्तर संदिग्ध असल्यास तें जास्त स्पष्ट करून घेणें, एवढाच असला पाहिजे.' अशीं किती तरी उदाहरणें दाखवितां येतील कीं, ज्यामध्यें स्पीकरनें पुरवणीप्रश्न विचारण्यास बंदी केली आहे. त्या मार्गाचें हिंदी कायदेमंडळांतून अवलंबन केलें गेल्यास कायदेमंडळाच्या सभासदांना राग आणि संताप उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. परंतु एखाद्या सभासदानें गैरलागू आणि पुनरुक्तीच्या दोषानें युक्त असे प्रश्न विचारण्याचा सपाटा चालविल्यास अध्यक्षानें त्याला जर थांबविलें नाहीं तर तो आपलें कर्तव्यकर्म करण्यास चुकला असेंच मानलें पाहिजे. मला खात्री आहे कीं, वर सांगितलेलीं तत्त्वें लक्षांत घेऊनच मी माझा निर्णय दिला आहे व यथामति मी तो अमलांत आणणारच."

(६) दोन विरुद्ध पक्षांच्या सभासदांमध्यें कित्येक वेळां शब्दाशब्दी होते. अशा वेळीं सभा आवरतां न आल्यास स्पीकर सभा कांहीं काळपर्यंत तहकूब करितो. बंगाल असेंब्लींत एकदां एक प्रधानपक्षीय सभासद वादाच्या ऐन भरांत असें बोलून चुकला कीं, 'काँग्रेस प्रांतांत काँग्रेस-प्रधानांनीं लोककल्याणाकरितां कांहींही केलें नाहीं.' त्याबरोबर एका काँग्रेस सभासदानें मोठ्यांदा 'वाहवा !' असे आश्चर्योद्गार काढले. त्याबरोबर मुख्य प्रधान दटावून म्हणाले:—'चूप रहा !' विरोधी पक्षवाल्यांनीं गिल्ला केला कीं, 'जरा सभ्यतेनें वागायला शिका.' आणि यानंतर जो गोंधळ झाला त्यामुळें सभेचें काम नीट चालण्याचा रंग दिसेनासा झाल्यामुळें स्पीकरनें सभा अर्धा तास तहकूब केली. तसेंच एखादा सभासद जर भलभलतें बोलूं लागला तर त्याला तें परत घेण्याची स्पीकर किंवा प्रेसिडेंट आज्ञा करितो. त्यानें तसें करण्याचें नाकारल्यास त्याला कांहीं काळ सभागृहाबाहेर घालविलें जातें. मध्यप्रांत असेंब्लींत एका सरकारपक्षीय सभासदानें प्रश्न विचारला कीं, "कायदेमंडळाच्या सभासदांना माहिती पुरविण्याच्या बाबींसंबंधीं १९३५ सालीं मॉंटेग्यु बटलरच्या सरकारानें जिल्हाधिकाऱ्यांना ज्याप्रमाणें एक सर्क्युलर काढलें होतें तसें सध्यांचें सरकार करणार आहे काय ?" यावर मध्येंच डॉ. राघवेन्द्र राव बरळले:— "अरे, सर मॉंटेग्यु बटलरसाहेबाचें उदार धोरण आणि व्यापक दृष्टिकोन कोणीकडे ? आणि सध्यांचें सरकार म्हणजे एक दुखावलेला व नाराज

झालेला माजी असिस्टंट सर्जन याची गुलामगिरीची मनोवृत्ति कोणीकडे?" हा उल्लेख डॉ. खेर, मुख्य प्रधान, यांना उद्देशून होता हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. यावर स्पीकरनें डॉ. राघवेन्द्र राव यांनीं आपलें म्हणणें परत न घेतल्यामुळें त्यांना एक दिवसभर सभागृहांतून घालवून दिलें. या प्रकारचेंच एक उदाहरण नुकतेंच विलायतेंतील कॉमन्स सभेंत घडून आलें. पार्लमेंटचे एक सभासद मि० कर्कवुड हे मुख्य प्रधान मि० चेंबरलेन यांनीं दिलेल्या उत्तरावर नाराज होऊन त्यांच्याकडे अंगुलि-निर्देश करून कांहीं तरी पुटपुटूं लागले. योग्य तऱ्हेनें वागण्यास स्पीकरनें त्यांना सांगितलें परंतु मि० कर्कवुड यांनीं तें न ऐकिल्यामुळें स्पीकरनें त्यांना सभागृहांतून चालतें होण्यास सांगितलें, मि० कर्कवुड म्हणाले—"मला त्याची पर्वा नाहीं." स्पीकर म्हणाले—"हे शब्द परत घ्या." मि० कर्कवुड म्हणाले—"मी ते परत घेणार नाहीं." थोडा वेळ थांबून स्पीकरनें कर्कवुडचें 'नांव घेतलें' म्हणजे त्यांना सभागृहांतून बाहेर जाण्यास आज्ञापिलें. मि० कर्क-वुड आपल्या जागेवरून उठून चालते झाले. पण जातां जातां म्हणाले:— "आपलें व्याख्यान पुरें करा. मला काय एखाद्या पोराप्रमाणें वागवितां? मी त्याला कांहीं किंमत देत नाहीं." कर्कवुडचें सभासदत्व तहकूब कर-ण्याचा ठराव मि० चेंबरलेन यांनीं मांडला. विरोधी पक्षाचे पुढारी मि० अटली यांनीं सुचविलें कीं, "ज्या अर्थी कर्कवुड हे निघून गेले आहेत त्या अर्थी मुख्य प्रधानाना ठराव मांडण्याचें कारण राहिलेलें नाहीं." परंतु स्पीकरनें एकदम मतें घेण्याच्या खोल्या मोकळ्या करण्यास फर्मा-विलें आणि मतें घेतलीं असता १७८ विरुद्ध १०४ मतांनीं कर्कवुडचें सभासदत्व कांहीं काळपर्यंत तहकूब झालें. त्याच दिवशीं रात्रीं कर्कवुड ग्लासगोला गेले आणि त्यांनीं स्पीकरच्या वरील कृत्याबद्दल पुढील शब्दांत तीव्र निषेध व्यक्त केला:— "म्हातारेकोतारे आणि गोरगरीब यांची वरिष्ठ वर्गाकडून जी पिळणूक होत आहे तिला आळा घालणें एवढेंच माझें पार्लमेंटांत काम आहे; आणि मी तें सतत करीत राहणार. मला सभागृहांतून हाकलून लावणें एवढाच जर मुख्य प्रधानांच्याजवळ उपाय शिल्लक असेल तर मला पुनः पुनः तेंच करावें लागणार. माझा क्रोध अनावर होणार आणि मला सभागृहाबाहेर

यावें लागणार. अन्न आणि कोळसा यांच्या किंमती वाढायला लागल्या आहेत; तेव्हां विधवा आणि पोरकीं पोरें यांनीं हिवाळा कसा काढावा बरें ? उगीच मी बघतों आहे, तों मला असें दिसतें कीं, प्रत्येक मुत्सद्दी हा परराष्ट्रीय राजकारणांत निष्णात आहो अशी ऐट मारतो. परंतु परराष्ट्रीय राजकारणावर ब्रिटिश जनता कांहीं पोट भरूं शकणार नाहीं. जो उठतो तो पृथ्वीच्या निरनिराळ्या अंतांना काय चाललें आहे याचीच चिकित्सा करतांना दिसतो. परंतु देशांतल्या लोकांच्या आर्थिक स्थितीकडे मला सगळ्यांचें लक्ष वेधावयाचें आहे म्हणून मी माझा प्रश्न विचारला. पूर्वीचे मुख्य प्रधान बाल्डविन कोणीकडे आणि सध्यांचे चेंबरलेन कोणीकडे ? चेंबरलेनसाहेब सहानुभूतीपूर्वक विचार करूं शकत तर नाहींतच आणि उलट मलाच सभागृहांतून बाहेर घालवितात. आहे कीं नाहीं खासा न्याय ! "

( ७ ) दुखवट्याचा ठराव कोणाही सभासदानें स्पीकरच्या किंवा प्रेसिडेंटाच्या परवानगीनें मांडावा अशी आजपर्यंतची वहिवाट आहे. हा नियम कायदेमंडळांच्या सभासदांबाबतही वरीलप्रमाणेंच लागू आहे. परंतु कॉमन्स सभेनें नुकताच असा ठराव केला आहे कीं, " हाउस ऑफ कॉमन्सचा कोणीही सभासद मयत झाल्यास त्याची दखलगिरी स्पीकरनेंच घेतली पाहिजे व त्यानेंच सदर ठराव मांडला पाहिजे." हा नवीन प्रघात माजी मुख्य प्रधान मि. रामसे मॅक्डोनाल्ड यांच्या मृत्यूच्या प्रसंगीं प्रथम अमलांत आणिला गेला.

( ८ ) एखाद्या सभासदास बोलतांना एकसारखा व्यत्यय आणला गेला तर त्यानें आपलें आपण रक्षण करावें का स्पीकरनें त्याचें रक्षण करावें यासंबंधीं मुंबई असेंब्लींत घडलेल्या पुढील प्रकारावरून वा संवादावरून कांहींसा बोध होतो:-

ना. मावळणकर:—आपण अडथळ्याकडे लक्ष देऊं नका. भाषण पुढें चालवा.

श्री. जमनादास मेथा:—असें आपणच म्हणूं लागलां तर मला योग्य संरक्षण मिळणार नाहीं.

ना. मावळणकर:—आपल्या भाषणांत एकसारखे व्यत्यय आल्यास आपण अध्यक्षांकडे संरक्षण मागा; मग अध्यक्ष सभासदांना व्यत्यय न करण्याबद्दल समजावितील.

श्री. मेथा:—माझें संरक्षण करण्याचा मला हक्क आहे व तो हक्क गमावण्याची माझी इच्छा नाहीं.

ना. मावळणकर:—आपण आपलें मत ज्या तऱ्हेनें व्यक्त करीत आहांत त्याबद्दल मी माझी पूर्ण नापसंती दर्शवीत आहे.

श्री. मेथा:—मला एवढेंच म्हणावयाचें आहे कीं, आत्मरक्षण करण्याचा मला हक्क आहे. गोंधळ व्हावा आणि मग स्पीकरनें तो शांत करावा हें मला संमत नाहीं. परंतु उत्तराला प्रत्युत्तर देऊं नये असेंच जर आपलें म्हणणें असेल तर आपलें म्हणणें (निर्णय) मला शिरसावंद्य केलेंच पाहिजे.

ना. मावळणकर:—तसा निर्णय देण्याचा प्रसंगच उद्भवलेला नाहीं."

(९) सभागृहांत मताकरितां खटपट (कॅनव्हसिंग) करितां येते अगर नाहीं याबद्दल अनेक वेळां मोठे गमतीदार प्रसंग उत्पन्न होतात. एखाद्याला आपल्या बाजूनें मत देण्याबद्दल शांतपणें व नम्रपणानें आणि सभ्यतेनें विनवणी करणें निराळें आणि आपल्या बाजूला धक्काबुक्की करून खेचून नेणें हें निराळें. सप्टेंबर १९३७ मध्यें बंगाल असेंब्लींत बंगाल टेनन्सी दुरुस्ती बिलावर वाद चालू होता. सरकारी बिलांतील सूचना व्याजाचा दर १२½% वरून ६¼% करावा अशी होती. कॉंग्रेसपक्षानें सदर व्याजाचा दर ५ करावा अशी उपसूचना आणली. ती ६९ विरुद्ध ११६ मतांनीं नामंजूर झाली. हा निकाल जाहीर करण्यापूर्वी सभासदांना स्पीकरनें कळविलें कीं, " कांहीं सभासदांची वागणूक अतिशय गैरशिस्तीची होत आहे. एका सभासदाला सरकार पक्षाच्या खोलींत ओढलें जात आहे असें जेव्हां माझ्या निदर्शनास आलें तेव्हां दरदर ओढत नेणाऱ्या एका सभासदाला मी तंबी दिली व तसें त्यानें करण्याचें थांबवावें म्हणून मी सेक्रेटरीला त्याच्याकडे पाठविलें. तथापि त्या सभासदानें आपलें कृत्य तसेंच चालू ठेविलें ही अत्यंत गर्ह्य गोष्ट होय. अशा तऱ्हेनें ओढत नेलेल्या सभासदाचें मत मी वगळलें आहे हें मी जाहीर

करितों." मध्यप्रांत-वऱ्हाड असेंब्लींत स्पीकर ना. घनःश्यामसिंग गुप्त यांनीं या प्रकाराबाबत पुढीलप्रमाणें निर्णय दिला:– "विनवणी करणें आणि वजन पाडणें यामधील अंतर कित्येक वेळां अतिशय सूक्ष्म असतें. म्हणून सभागृहांत असतांना मतयाचनेबाबत खटपट करतां कामा नये असा मी निर्णय देतों. अर्थात् हा माझा निर्णय सभागृहाबाहेर लागू नाहीं हें उघड आहे."

( १० ) तहकुबीच्या सूचना आणून एखाद्या विशिष्ट तातडीच्या व सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नावर चर्चा करणें हा कोणत्याही कायदे-मंडळाचा एक मोठा हक्क मानला गेला आहे. सरकारच्या अम्मलबजा-वणीच्या अधिकारासंबंधीं आपलें मत ताबडतोबीनें प्रदर्शित करण्यास या तहकुबीच्या सूचनांसारखा दुसरा चांगला मार्ग नाहीं. मुंबई असेंब्लींतील अलीकडील उदाहरणें 'लोकशक्ति सर्क्युलर' व 'दोन सटोडियांची शिक्षा पंधरा दिवस तहकूब करणें' हीं देतां येतील.

( ११ ) खर्चाच्या मागण्यांना कपातसूचना आणण्याबाबत संयुक्तप्रांत असेंब्लीच्या स्पीकरनें निर्णय दिला कीं, "कपातसूचनांवर भाषण करणाऱ्या सभासदानें 'आपण सदर सूचनेला अनुकूल आहोंत अगर प्रतिकूल आहोंत' हें स्पष्टपणें सांगावयास पाहिजे. नुसतें मोघम मोघम बोलून भागणार नाहीं." हॉस्पिटलमधील गरीब रोग्यांशीं हॉस्पिटल अधिकाऱ्यांचें वर्तन मगरूरपणाचें असतें, त्याचा निषेध करणें हा विरोधी पक्षानें आणलेल्या कपातसूचनेचा रोख होता. महावीर त्यागी या कॉंग्रेस-पक्षीय सभासदास या कपातसूचनेंतील तत्त्व मान्य होतें. परंतु आपल्याच पक्षाच्या सरकारास कसा विरोध करावा यामुळें तो बुचकळ्यांत पडला. त्यानें स्पिकरला सल्ला विचारला असतां स्पीकर ना. पुरुषोत्तमदास टंडन म्हणाले : "आपण पक्षाची शिस्त पाळावी अगर न पाळावी हें मी सांगू शकत नाहीं. हा आपला प्रश्न आहे." 'कपातसूचनेला विरोधही नाहीं व आनुकूल्यही नाहीं' अशी सुरवात करून महावीर त्यागी यांनीं वेळ मारून नेली.

( १२ ) मध्यवर्ती असेंब्लीचे एक सभासद प्रो. रंगा हे पंजाबमध्यें एका किसानपरिषदेचे अध्यक्ष होण्याकरितां जाणार होते. पंजाब सरकारनें

त्यांच्या आगमनास बंदी करणारा हुकूम काढला. या हुकमावर चर्चा करण्याकरितां सरदार संतसिंग यांनीं मध्यवर्ती असेंब्लींत तहकुबीची सूचना आणली. सरदार संतसिंग यांचें असें म्हणणें पडलें कीं, "हिंदुस्थानांतील कोणत्याही भागांत सनदशीर चळवळ चालविण्याचा व लोकमत तयार करून संघटित करण्याचा, असेंब्लीच्या प्रत्येक सभासदाचा हक्क सदर बंदीहुकमानें हिरावून घेतला जात आहे." अध्यक्षांनीं विचारणा केली, "आपण ज्या हक्काचा उल्लेख केला आहे तो फक्त असेंब्लीच्या सभासदांचाच आहे अगर देशांतील प्रत्येक नागरिकाचा आहे?" सदर हक्क प्रत्येक नागरिकाचा आहे हें सरदारसाहेबांनीं कबूल केलें; "परंतु तो हक्क लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधीबाबत विशेष तऱ्हेनें मानला गेला पाहिजे" असेंही त्यांचें म्हणणें पडलें. अध्यक्षांनीं निर्णय दिला कीं, "हक्कासंबंधींच्या कोणत्याही प्रश्नावी चर्चा तहकुबीची सूचना आणून करितां येणार नाहीं; सबब या सूचनेला मला परवानगी देतां येत नाहीं."

( १३ ) एखाद्या कराच्या बिलाच्या चर्चेच्या वेळीं सर्वसाधारण गाऱ्हाण्यांबद्दल बोलतां येतें कीं नाहीं यासंबंधीं चर्चा मुंबई असेंब्लींत तंबाखू बिलाच्या पहिल्या वाचनाच्या वेळीं झाली. श्री. जमनादास मेथांचें असें मत पडलें कीं, "एखादा कर सरकारनें बसवावा अगर नाहीं याबद्दल तीन प्रसंगीं सभासदाला आपलें मत प्रगट करितां येईल. प्रथमतः अंदाजपत्रकावरील सर्वसाधारण चर्चेच्या वेळीं, दुसऱ्यांदां कराच्या बिलाचा विचार चालू असतांना; आणि शेवटीं खर्चाच्या मागण्या मंजूर करण्याच्या वेळीं. सरकारनें फिनान्स बिल विभागून त्याचीं दोन निरनिराळीं बिलें असेंब्लीपुढें मांडलीं आहेत. त्यांपैकीं एकांत स्टांप, कोर्ट-फी, विजेवरील जादा कर; आणि दुसऱ्यांत तंबाखू-कर अशी विभागणी केली आहे. खर्च भागविण्याकरितां उत्पन्न उभारण्याबाबत या सर्वांचा संबंध आहे; म्हणून आपण सरकारला पैसा देणार कीं नाहीं हें म्हणण्याचा सनदशीर हक्क सभागृहाला आहे." याला उत्तर म्हणून सरकारतर्फे नामदार खेर यांनीं असें सांगितलें कीं, "वीज किंवा इतर बाबी यांच्यावरील कराबाबतच्या बिलासंबंधीं ज्या वेळीं असेंब्लीपुढें

प्रश्न होता त्या वेळीं सरकारच्या सर्वसाधारण धोरणाबद्दल असेंब्लीनें चर्चा केलेली नाहीं. आतां तंबाखूकराचा प्रश्न चालू असतांना ती चर्चा उकरून काढणें हें थोडेंसें दिरंगाईचें व अप्रासंगिक होत नाहीं काय ? असेंब्लीला हक्क असला तरी तो आपण विशिष्ट बाबींत गाजवणार नाहीं असें असेंब्लीला म्हणतां येणार नाहीं काय ?" डॉ. अंबेडकर म्हणाले कीं, "एकदां जरी असेंब्लीला वाटलें कीं, सरकारला कर उभारूं देण्यास विरोध करूं नये तरी दुसऱ्या खेपेला तोच न्याय लागू केला पाहिजे असें कांहीं नाहीं." प्रश्न महत्त्वाचा असल्यामुळें त्याच्यावर नामदार मावळणकर (स्पीकर) यांनीं तात्पुरता निर्णय सरकारतर्फे देऊन अखेरचा निर्णय देण्याचें काम पुढें ढकललें.

(१४) मद्रास असेंब्लींतील एक हिंदी ख्रिस्ती सभासद व माजी मंत्री सर पन्नीरसेलवम् यांनीं अबकारी खात्यासंबंधींच्या मागणीवर आणलेल्या कपातसूचनेवर बोलतांना 'मद्यपानबंदीच्या कायद्यांत दुरुस्ती केली पाहिजे' असें प्रतिपादिलें. कॅथॉलिक भटजींना यज्ञयागाकरितां किंवा विधिविधानाकरितां लागणारी दारू कायद्याच्या कचाटींतून मोकळी करावी अशा आशयाच्या कायद्यांतील दुरुस्तीबद्दल त्यांनीं प्रश्न उपस्थित केला. त्यावर स्पीकर सांबमूर्ति यांनीं असा निर्णय दिला कीं, "चालू असलेल्या कायद्यांतील एखादें कलम दुरुस्त करण्याचा प्रश्न कपातसूचनेच्या निमित्तानें उपस्थित करितां येणार नाहीं; परंतु त्या त्या खात्याचें सर्वसाधारण धोरण व राज्यकारभाराच्या तपशिलाच्या बाबी यासंबंधीं चर्चा करण्यास प्रत्यवाय नाहीं. या माझ्या निर्णयाला मध्यवर्ती असेंब्लींत अध्यक्ष सर षण्मुखं चेट्टी यांनीं मागें एकदां दिलेल्या निर्णयाचा दुजोरा आहे." तात्पर्य, कपातसूचना मांडतांना कोणताही कायदा दुरुस्त करण्याचा प्रश्न उपस्थित करतां येत नाहीं. प्रश्न विचारणें, पुरवणीप्रश्न विचारणें, ठराव मांडणें, तहकुबीसूचना आणणें, खर्चाच्या मागणींत कपात सुचविणें यांपैकीं प्रत्येक गोष्टीचें स्वारस्य व तिची मर्यादा हीं ठरविलीं गेलीं आहेत. त्यांचें उल्लंघन झाल्यास त्याला योग्य वेळीं आळा घातला गेला पाहिजे. नाहींपेक्षां वाटेल त्या वेळीं वाटेल तें बोलण्यास परवानगी मिळून सर्वत्र अव्यवस्था माजल्याशिवाय राहणार नाहीं.

( १५ ) मद्रास कौन्सिलांत बजेटच्या सर्वसाधारण चर्चेच्या वेळीं विरोधी पक्षांतील एक सभासद माजी मुख्य मंत्री व एका काळचे ॲक्टिंग गव्हर्नर सर कूर्म व्यंकट रेड्डी यांनीं आपल्या भाषणांत जून १९३७ मध्यें तात्पुरत्या प्रधानमंडळानें जमीनमहसूल माफ करण्याकरितां आंखलेल्या, परंतु कांहीं कारणानें सरकारी हुकूम म्हणून प्रसिद्ध न झालेल्या, योजनेचा उल्लेख केला. परंतु मुख्य प्रधान ना० राजगोपाळाचारी यांनीं हरकतीचा मुद्दा उपस्थित केल्यावरून कौन्सिलचे अध्यक्ष नामदार रामराव यांनीं पुढीलप्रमाणें निर्णय दिलाः– 'सध्यां कौन्सिलचे सभासद असलेल्या सरकारच्या माजी घटकांनीं– मग ते तात्पुरत्या मंत्रिमंडळांत असोत अथवा त्याच्या पूर्वीच्या राजवटींत मंत्री वा कार्यकारी मंडळाचे सदस्य असोत,— आपल्या कारकीर्दींत केलेल्या निर्णयांचा— ते जर कोणत्याही कारणानें गुलदस्तांत राहिले व सरकारी हुकूम म्हणून प्रसिद्ध झाले नाहींत तर,—आपल्या भाषणांत उल्लेख करितां कामा नये; त्यांना तसा हक्क पोंचत नाहीं.'

( १६ ) कांहीं शब्द वा शब्दसमुच्चय पार्लमेंटांत उच्चारणें शिष्ट-सांप्रदायाला सोडून आहे असें वहिवाटीनें मानण्यांत आलें आहे. त्याचीं बरींच उदाहरणें अर्स्किन मे यानें आपल्या ग्रंथांत ( पृ० २९७ टीपा ) दिलेलीं आहेत. हिंदी कायदेमंडळांचें काम अधिकृत रीत्या इंग्रजी भाषेंत चालत असल्यामुळें व त्याही बाबत ब्रिटिश पार्लमेंटांतील रिवाजांचें अनु-करण कळत वा न कळत होत असल्यामुळें कांहीं अशिष्ट (अनूपार्लमेंटरी) शब्द खालीं जसेच्या तसे म्हणजे मराठी पेहराव न देतां उतरून घेतों:—

१ डॉज् २ फॅक्शस ऑपोझिशन ३ जॉकीड ४ हैपॉक्रिटिकल लव्हर्स ऑफ लिबर्टी ५ व्हिलन्स ६ इंपर्टिनन्स ७ रूड रिमार्क्स ८ ग्रॉस कॅलम्नी ९ इंप्यूडन्स १० रफिॲनिझम् ११ वुइंड बॅग १२ हैपॉक्रिट्स्, फॅरिसीज् १३ स्लॅंडरर १४ ट्रेटर १५ कॉवर्डली १६ ऑफेन्सिव्ह १७ नॉट कन्सोनंट वुइथ परसनल ऑनर १८ मॅलिग्नंट स्लॅंडर १९ स्करिलस २० डिझॉनेस्ट २१ स्कॅंडल २२ व्हिशस, व्हल्गर २३ इन्सल्टिंग २४ मॅलिग्नंट ॲटॅक २५ शॅबी ( ॲक्शन ) २६ डर्टी ट्रिक २७ क्रिमिनल २८ डिस्ग्रेसफुल २९ करप्ट ३० डेलिबरेट्ली रेज्ड ए फॉल्स इश्यू

३१ गेरीमँडर्ड ३२ ए मेंबर रिटर्न्ड बाय रिफ्यूज ऑफ ए लार्ज कॉन्स्टिटयुअन्सी इ०.

१९१९ च्या कायद्यानें अस्तित्वांत आलेल्या मुंबई लेजिस्लेटिव्ह कौन्सिलाच्या अध्यक्षांनीं निरनिराळ्या प्रसंगीं दिलेल्या निर्णयांचें (रूलिंग) एक पुस्तक मुंबई सरकारनें प्रसिद्ध केलें आहे. त्यांत कांहीं शब्द व वाक्प्रचार अशिष्ट ठरविले आहेत. त्यांपैकीं कांहीं भाषांतरासह देतों:—

१ ब्लेसेड ( धन्य, भाग्यशाली ).
२ ब्लेसेड ( एखाद्या बिलाबद्दल शब्द लावणें निषिद्ध आहे ).
३ करप्शन ( लाचलुचपत ) ( सावळागोंधळ ).
४ डॅबलिंग ( विनाकारण एकाद्या गोष्टींत तोंड घालणें ).
५ डच्यूप्ड ( सभागृहाला 'फशिवलें' असें म्हणणें ).
६ फ्रॉडच्युलंट ( सरकारी योजना 'कपटयुक्त' आहे ).
७ सरकारचे बूट चाटणें.
८ एखादा सभासद 'नीच' आणि 'स्वार्थी' आहे असें म्हणणें.
९ मिस्चीफ ( एखाद्या सभासदाला 'चावटपणा' करावयाचा आहे असें म्हणणें ).
१० 'पैसा मिळण्याकरितां हा सभासद धडपडतो.'
११ 'नेमलेला सभासद हा साहजिकच सरकारला पाठिंबा देणार.'
१२ 'सभासद सभागृहाचा वेळ खातो आणि व्यत्यय आणतो.'
१३ 'सोकॉल्ड लीडर' ( पुढारीभ्रुव ).
१४ 'सोमरसॉल्ट' ( कोलांटी उडी ).
१५ अध्यक्षाच्या निर्णयाबाबत अगर हुकमाबाबत 'सॉरी' म्हणणें.
१६ 'सभासदांच्या डोळ्यांत धूळ फेकणें.'
१७ 'टंग डायरीया' ( जिभेला रेच होणें ).
१८ 'ट्रेचरी' ( विश्वासघात ).
१९ 'ट्यूटर्ड' ( पढविलेला ).
२० 'कॉवर्ड' ( भेकड, भेदरट ).
२१ 'डिव्हाइन ज्युएल' ( दिव्यरत्न ).

२२ 'एखाद्या सभासदाची इडीओसिंक्रसी ( तऱ्हेवाईकपणा )'.

× × ×

२३ 'बगर' ( सभासदाला दिलेली शिवी ) आसाम असेंब्ली.

२४ 'अशेम्ड' ( लाज वाटली पाहिजे ) मुंबई असेंब्ली.

२५ 'पोज' ( देखावा करणें, ढोंग करणें ) पंजाब असेंब्ली.

२६ 'मी काय **यंत्र** आहे? मी **लाउड स्पीकर** होणार नाहीं.' सुंदरसिंग मजीथिया—पंजाब असेंब्ली.

( १७ ) सभागृहांत भाषणें चालू असतांना योग्य ठिकाणीं अडथळा करणें कित्येक वेळां जरूर वा इष्ट असतें. पार्लमेंटरी अथवा शिष्टसंमत अडथळ्यांचीं उदाहरणें:—

१ क्वेश्चन्.

२ ऑर्डर, ऑर्डर.

३ हियर, हियर.

४ डिव्हाइड, डिव्हाइड.

याच्या उलट म्हणजे अन्पार्लमेंटरी अथवा शिष्टांना असंमत असें उदाहरण:—

१ शेम् शेम्

( ऊ ) असेंब्ली किंवा कौन्सिल यांतील नेहमींच्या कामकाजासंबंधीं जे नियम चालू आहेत त्यांचा विस्तारानें विचार करण्यास हें योग्य स्थळ नाहीं असें मागें सांगितलेंच आहे. तथापि त्या नियमांतून उपस्थित होणाऱ्या कांहीं महत्त्वाच्या मुद्द्यांचा वरील टिपणींत कांहींसा ऊहापोह केला आहे. मुंबई असेंब्लीनें नियम बनविण्याकरितां नेमलेल्या कमिटीनें आपला अहवाल सादर केला असून अद्याप त्याच्यावर असेंब्लींत चर्चा झालेली नाहीं. तीच स्थिति कौन्सिलनें नेमलेल्या कमिटीची आहे. अशा परिस्थितींत या कमिटयांच्या अहवालांचा थोडक्यांत परामर्श घेणें अयुक्त ठरणार नाहीं. दोन्ही कमिटयांनीं झपाटयाला असें सांगून टाकिलें आहे कीं " ज्या अर्थी ८४ ( १ ) कलमांत नियम ( रूल्स ) करण्याचाच " उल्लेख आहे त्या अर्थी आम्ही नियम आणि स्टँडिंग ऑर्डरी असा मागील काळापासून चालत आलेला भेद काढून टाकीत आहोंत.

८४ ( १ ) या कलमांत जरी केवळ नियमांचाच उल्लेख आहे असें म्हणणें बरोबर असलें तरी त्याच्या मागील ७१ ( १ ) कलमांत 'या कायद्यांतील तरतुदी व कायदेमंडळाच्या कामकाजाच्या पद्धतीचें नियंत्रण करणारे नियम व स्टँडिंग ऑर्डरी यांना बाध न आणतां' असा स्पष्ट उल्लेख असून त्यावरून हा १९३५ चा कायदा घडविणाऱ्याच्या मनांत पूर्वीप्रमाणें नियम व स्टँडिंग ऑर्डरी हा भेद चालू राहावा असेंच दिसून येतें. अर्थात् तो भेद कायम राखलाच पाहिजे असें कायदेमंडळावर बंधन घालतां येणार नाहीं हें उघड आहे. परंतु त्याला कमिटीनें जें कारण दिलें आहे तें बरोबर नाहीं. सोयीच्या दृष्टीनें सर्वांनाच 'नियम' ( रूलस ) म्हणणें हें ठीक आहे. या नियमांची एकंदर पंधरा प्रकरणें असून नियमांची संख्या दीडशेंच्या घरांत गेली आहे. पूर्वीच्या नियमांत नसणाऱ्या कांहीं तरतुदी किंवा जास्त स्पष्टता कोठें कोठें आहे तें जरा विस्तारानें पुढें देतों:—

## प्रास्ताविक ( व्याख्या )

२ ( ङ ) 'फिनान्स मिनिस्टर'........यांत ज्या कोणा सभासदाकडे 'अर्थसचिवा'चे अधिकार दिले असतील त्याचाही अन्तर्भाव होतो.

( छ ) 'सरकारी कामकाज' यांत खासगी किंवा बिनसरकारी सभासदांच्या कामकाजाव्यतिरिक्त सर्व कामांचा समावेश होतो.

( ज ) 'सभासद' म्हणजे असेंब्लीचा सभासद.

मात्र कायद्यांतील ६४ व्या कलमाप्रमाणें जो प्रधान असेंब्लीचा सभासद नाहीं तो, ॲडव्होकेट जनरल आणि ५७ (२) कलमाप्रमाणें गव्हर्नरनें नेमलेला अधिकारी इतक्यांना असेंब्लींत हजर राहून बोलणें, ठराव इत्यादि मांडणें, व इतर तऱ्हेनें कामकाजांत भाग घेणें यापुरतें सभासद मानलें जाईल; परंतु या नियमाच्या आधारें त्यांना मत देण्याचा हक्क मात्र प्राप्त होणार नाहीं.

(ड) 'खासगी सभासद' म्हणजे मिनिस्टर (प्रधान), पार्लमेंटरी सेक्रेटरी, ॲडव्होकेट जनरल किंवा ५७ (२) कलमाधारें गव्हर्नरनें नेमलेला अधिकारी, यांच्याखेरीज कोणताही सभासद.

(ण) 'मान्य भाषा' यांत खालील भाषांचा अन्तर्भाव होतो:— १ गुजराथी, २ मराठी, ३ कानडी, ४ उर्दू अथवा हिंदी-हिंदुस्थानी [पूर्वीच्या नियमांत ४ था ठिकाणीं फक्त 'उर्दू' असें होतें. महात्मा गांधींनीं उत्तर हिंदुस्थानचे लोक जी भाषा बोलतात—मग ते धर्मानें हिंदु असोत वा मुसलमान असोत— त्या भाषेला हिंदीहिंदुस्थानी (हिंदी म्हणजेच हिंदुस्थानी) असें नांव दिलें आहे; त्याचा या ठिकाणीं उपयोग करण्यांत आलेला दिसतो. कॉंग्रेसच्या घटनेंत ज्या ठिकाणीं भाषेचा संबंध आला आहे तेथें सर्वत्र 'हिंदुस्थानी' असाच उल्लेख आला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. तेव्हां एका बाजूला 'हिंदी' किंवा दुसऱ्या टोकाला 'उर्दू' अशी ओढाताण न करतां, अथवा 'हिंदीहिंदुस्थानी' अशी जोडशब्दाची योजना न करतां कॉंग्रेसच्या घटनेला अनुसरून 'हिंदुस्थानी' (म्हणजे हिंदुस्थानच्या लोकांची सर्वसाधारण अशी राष्ट्रभाषा) असाच सर्वत्र शब्दप्रयोग रूढ करणें हें सोयीचें व सर्वमान्य होणारें आहे.]

## भाग १ ला (असेंब्लीच्या बैठकी)

५ स्पीकरनें चर्चा होऊं न देतां किंवा मतें न घेतां असेंब्लीचें कामकाज तहकूब करावें, मात्र सरकारची विनंति किंवा संमति असल्याखेरीज सात दिवसांपेक्षां अधिक काळ ही तहकुबी असतां कामा नये.

## भाग २ रा (असेंब्लीचे अधिकारी)

६ (१) स्पीकरची निवडणूक करण्याकरितां सरकार तारीख नेमील....(पूर्वीच्या नियमांत ही बाब गव्हर्नरच्या मर्जीवर सोपविलेली होती; परंतु 'गव्हर्नर'च्या जागीं आतां हा अधिकार 'गव्हर्मेंट'ला म्हणजे मंत्रिमंडळाला देण्यांत येत आहे.)

६ ( ३ ) या नियमांत, '६५ व्या कलमाच्या तिसऱ्या व पांचव्या पोटकलमां'चा हवाला दिला आहे. परंतु स्पीकरच्या निवडणुकीशीं पांचव्या पोटकलमाचा काडीमात्र संबंध नाहीं.

**भाग ३ रा ( कामकाजाची व्यवस्था )**

११ ( १ ) 'गव्हर्नर' या शब्दाऐवजीं 'गव्हर्मेंट' हा शब्द घालून 'गव्हर्नरचे' अधिकार काढून घेण्याचा ६ ( १ ) नियमाप्रमाणेंच हा प्रयत्न आहे.

१७ ( १ ) शनवारच्या कामकाजाची वेळ दुपारीं ११ ते २ अशी दिली आहे.

**भाग ४ था ( कामकाजाच्या पद्धतीचे सर्वसाधारण नियम )**

२० ( १ ) असेंब्लीची भाषा:—( या नियमांत मूळ कायद्यांतील ८५ वें कलम जसेंच्या तसें उतरलें आहे; मात्र त्याला पुढील भाग जोडला आहे मात्र ज्या भाषेचा ज्या सभासदाला चांगला परिचय असेल त्या भाषेंत त्याला बोलण्याची स्पीकरनें परवानगी द्यावी. मात्र अशा माणसाला इंग्रजी भाषा चांगली अवगत नसली पाहिजे ).

( २ ) इंग्रजी किंवा मान्य भाषांखेरीज- इतर भाषेंत सभासद बोलला तर त्याचा अनुवाद इंग्रजी किंवा इतर मान्य भाषांत करावयाची तजवीज स्पीकरनें केली पाहिजे.

२७ ( ५ ) उपसूचनेच्या उपसूचनेला पुनः उपसूचना सुचवितां येणार नाहीं. ( या प्रकारांना कोठें तरी आळा हा घातलाच पाहिजे. )

३२ ( २ ) (i) कोर्टापुढें असलेल्या कोणत्याही गोष्टीचा उल्लेख करतां कामा नये.

( iv ) प्रांतिक सरकारचा उल्लेख करावयास हरकत नाहीं परंतु त्यांतून 'गव्हर्नर'ला फोडून म्हणजे वेगळा करून त्यावर टीकास्त्र फेकतां येणार नाहीं.

( vi ) असेंब्लीनेंच केलेल्या निकालावर शिंतोडे उडवितां येणार नाहींत.

(viii) असेंब्लीनें नेमलेल्या कमिटीच्या कामकाजांत घडलेल्या गोष्टी असेंब्लींत उल्लेखिलया जातां कामा नयेत.

३३ खासगी सभासदानें आपलें भाषण वाचतां कामा नये; परंतु स्मरण ताजेतवानें करण्याकरितां त्यानें स्वतः काढलेल्या टिपणाकडे मधून मधून पाहण्यास हरकत नाहीं. ( 'खासगी सभासद' असा या नियमांत स्पष्ट उल्लेख असल्यामुळें या नियमाच्या पकडींतून अर्थमंत्र्याचें बजेट-विषयक भाषण सुटतें हें उघड आहे. )

३६ ( १ ) 'सभागृहाच्या परवानगीशिवाय कोणाही सभासदाला आपलें बिल परत घेतां येतें' या अपवादाखेरीज कोणाही सभासदाला ठराव अगर उपसूचना, सभागृहांत हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांचा बहुसंख्येनें पाठिंबा असल्याखेरीज, परत घेतां येणार नाहीं.

३७ ( २ ) असेंब्लीनें अगोदर केलेल्या निर्णयाला एखादी उपसूचना विरोधी आहे असें स्पीकरला वाटल्यास ती मताला न घालण्याचा स्पीकरला हक्क आहे.

३८ ( १ )......... सभागृहाची अस्तिनास्तिपक्षीं विभागणी करून मतें घेण्याबद्दल विनंति करण्याचा प्रत्येक सभासदाला हक्क आहे. उगीच विनाकारण मतमोजणी मागितली आहे असें स्पीकरला वाटल्यास त्याला विभागणी करून मतें घेण्याचें काम नाकारतां येईल.

( ३ ) एखादा सभासद चुकून मतें देण्याच्या भलत्याच खोलींत गेला आणि त्यानें आपलें मत तेथें नोंदलें तर कोणत्याही कारणास्तव आपलें मत बदलून घेण्याचा सभासदाला अधिकार राहणार नाहीं.

४२ असेंब्लीच्या बैठकीचा कोरम कायद्यांतील ६६ ( ३ ) कलमा-प्रमाणें $\frac{1}{6}$ असावा ( कमिटीनें कायद्याचें कलम जसेंच्या तसेंच उतरून घेतलें आहे. १७५ या संख्येचा सहावा भाग म्हणजे किती सभासद हें सांगण्याचें साधें गणित करण्याची कमिटीनें तसदी घेतलेली नाहीं.)

## भाग ५ वा ( प्रश्न )

५३ पुढील मुळांतील भाग गाळून टाकण्यांत आला आहे. "( ३ ) कांहीं गोष्टी ( उदा० वर्तमानपत्रांत आलेलीं जाहीर पत्रकें ) खऱ्या आहेत काय असा प्रश्न विचारतां येणार नाहीं."

## भाग ६ वा ( अविश्वासाचे ठराव )

६४ ( १ ) 'प्रधानमंडळावर अगर विशिष्ट प्रधानावर अविश्वास व्यक्त करणारा ठराव, किंवा प्रधानमंडळाचें अगर विशिष्ट प्रधानाचें विशिष्ट बाबतींतील धोरण नापसंत करणारा ठराव....' अशी शब्दयोजना नवीन नियमांत आढळून येतें. प्रधानमंडळाच्या संयुक्त व सामुदायिक जबाबदारीचें तत्त्व या नियमांत ग्रथित करण्यांत आलें आहे.

## भाग ७ वा ( चर्चेकरितां तहकुबीची सूचना )

६७ ( १ ) पुढीलप्रमाणें तहकुबीच्या सूचनेबाबत जादा नियंत्रण घातलेलें दिसतें:—

'ज्या विषयासंबंधीं असेंब्लीचें अधिवेशन अगर तहकूब झालेलें अधिवेशन सुरू होण्यापूर्वी १५ दिवस अगोदर ठरावाची सूचना देतां आली असती त्याबाबत तहकुबीची सूचना मांडतां येणार नाहीं.'

६८ ( १ ) तहकुबीची सूचना मांडूं इच्छिणाऱ्या सभासदानें असेंब्लीच्या रोजच्या बैठकीस सुरवात होण्यापूर्वी निदान दोन तास तरी सदर सूचना स्पीकरकडे दिली पाहिजे

( ३ ) सदर सूचनेस ३० सभासदांचा पाठिंबा असेल तर दिवसाचें काम संपण्यापूर्वी दोन तास अगोदर इतर काम थांबवून सदर सूचना चर्चेला घेण्यांत यावी. ( पूर्वीच्या नियमांत ३६ ही संख्या होती. परंतु मुस्लिम लीगच्या विरोधी पक्षाला सवलत म्हणून ही संख्या ३० पर्यंत उतरवत खालीं आणली आहे. तथापि यानेंही समाधान न होऊन ही संख्या याहीपेक्षां खालीं आणावी असें भिन्न मत अलीमहमदखान देहलवी यांनीं जोडलें आहे. हा मोघमपणा घालवून ही संख्या २४ असावी असें भिन्न मत फैजमहमदखान यांनीं जोडलें आहे. याचा अर्थ, मुस्लिम लीगच्याच सभासदांना, इतर पक्षांच्या मतांची गरज न राहतां, केव्हांही तहकुबीची सूचना आणतां यावी, याहून दुसरा कांहींही दिसत नाहीं. पूर्वीच्या नियमांत 'दुपारीं ४ वाजतां' असे शब्द होते ते काढून 'काम संपण्यापूर्वी दोन तास अगोदर' हे योग्य व सर्वकाळीं लागू पडणारे शब्द घातले हें ठीकच झालें. )

६९ ( ३ ) तहकुबीची सूचना निकालांत निघाल्यावर जर वेळ राहिला तर इतर कामकाज चालू ठेवण्यास हरकत नाहीं. ( याप्रमाणें नियम नव्हता परंतु वहिवाट होती, ती नियम घालून पक्की केली आहे. )

## भाग ८ वा ( ठराव )

७० ( २ ) 'साता' ऐवजीं 'पांच' ठराव असा फरक करण्यांत आला आहे.

( ३ ) एखाद्या सभासदाचे ठराव कोणत्या क्रमानें चर्चेला घ्यावेत हें स्पष्ट दिसत नसल्यास स्पीकरनें आपल्या मर्जीप्रमाणें याबाबत ठरवावें.

७४ प्रधान, पार्लमेंटरी सेक्रेटरी, ॲडव्होकेट जनरल व ५७ (२) कलमाप्रमाणें गव्हर्नरनें नेमलेला अधिकारी यांच्याबाबत ७० व ७१ या नियमांतील भाग ( ठरावांची संख्या ३० ) लागू नाहीं. 'सात दिवसांची सूचना अवश्य आहे' हा नियम मात्र सररहा सर्वांना लागू आहे.

८० ( १ ) कायद्याच्या ८२ ( १ ) या कलमांतील तरतुदी लागू पडणारें बिल अथवा उपसूचना तें बिल अथवा उपसूचना ज्या खात्या-संबंधींची असेल त्या खात्याच्या प्रधानानें गव्हर्नरची त्या बिलाच्या अथवा उपसूचनेच्या चर्चेसाठीं परवानगी आहे असें सांगितल्याशिवाय प्रविष्ट करितां येणार नाहीं किंवा वाचनार्थ मांडतां येणार नाहीं.

( २ ) कायद्याचें ८२ ( ३ ) हें कलम लागू पडणारें बिल तिसऱ्यांदा वाचून मंजूर करावें अशी सूचना, वरीलप्रमाणेंच गव्हर्नरची परवानगी आहे असें त्या खात्याच्या प्रधानानें सांगितल्याशिवाय, सभागृहा-पुढें मांडली जाणार नाहीं. ( गव्हर्नरची शिफारस आहे अगर नाहीं हें प्रधानाच्या तसें सांगण्यावर सोपविलेलें आहे. )

९४ एखादें बिल मंजूर झाल्याचा दाखला स्पीकर पुढीलप्रमाणें देतोः—

" या बिलाचें तीनदां वाचन होऊन मुंबई प्रांताच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें १९........ च्या........ महिन्याच्या........ तारखेला मंजूर केलें.

..........................

स्पीकर."

## भाग १० वा ( कमिट्या )

१११ ( ५ ) कौन्सिलच्या ठरावानें नेमण्यांत आलेल्या संयुक्त कमिटींचें कामकाज चालविण्याचे नियम कौन्सिलनें ठरविणेचे आहेत.

११३ ( १ ) ( ग ) गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें तयार केलेल्या अथवा फिनॅन्स खात्यानें बनविलेल्या नियमाप्रमाणें एखाद्या खर्चाच्या मागणींतील रकमांची फेरवाटणी करावी.

## भाग ११ वा ( नियमांत दुरुस्त्या सुचवण्याकरितां ठराव )

## भाग १२ वा ( फिनॅन्ससंबंधींचे नियम )

१२२ गव्हर्नराच्या शिफारसीशिवाय खर्चाच्या मागणीची सूचना मांडतां येणार नाहीं. त्या त्या खात्याच्या प्रधानानें असेंब्लीला सदर शिफारस कळवावयाची आहे ( कलम ७९ [ ३ ] ).

१२४ ( १ ) खर्चाच्या मागण्या मंजूर होत असतांना एखाद्या मागणींत काट मारतां येईल किंवा ती अजीबात गाळतां येईल किंवा त्या मागणींतील एखादी पोटमागणी कमी करितां येईल; परंतु सदर मागणींत वाढ करितां येणार नाहीं किंवा ती निराळ्याच कामाला लावतां येणार नाहीं [ 'पोटमागणी'—आयटेम—कमी करितां येईल असें जें म्हटलें आहे तें १९१९ च्या कायद्याला धरून आहे; परंतु नवीन कायद्यांतील ७९ ( २ ) कलमाप्रमाणें वरील म्हणणें कायदेशीर मानतां येणार नाहीं. गव्हर्नरनें ८४ ( ३ ) कलमान्वयें केलेल्या व सध्यां चालू असलेल्या नियमांत सदरहू पोटमागणीचें कलम गाळण्यांत आलेलें आहे तें बरोबर आहे].

( ३ ) 'चार्ज्ड' खर्चाबाबत रकमा कमी करणें अगर गाळून टाकणें याबद्दलची सूचना मांडतां येणार नाहीं. 'व्होटेड' व 'चार्ज्ड' हीं दोन्ही सदरें मिळून जर खर्चाची मिश्रमागणी असेल तर 'व्होटेड' खर्चापेक्षां अधिक रक्कम गाळावी अशी सूचना मांडतां येणार नाहीं. ( हा नियम ओघानेंच प्राप्त होणारा आहे. कपातसूचना मांडायला परवानगी केव्हां असणार तर जेव्हां ती सूचना मंजूर झाल्यास त्याप्रमाणें अंमल करतां येईल तेव्हां. 'चार्ज्ड' रकमांबाबत असेंब्लीला मताचा अधिकार नाहीं. )

( ६ ) एखादी कपातसूचना मंजूर झाली तर तेवढी रक्कम कमी करून बाकीच्या रकमेची मागणी शेवटीं असेंब्लीपुढें मांडली जाईल.

## भाग १३ वा ( अर्ज )

१२६ असेंब्लीकडे पाठविण्यांत आलेला कोणताही अर्ज एखाद्या सभासदामार्फतच आला पाहिजे. त्या सभासदाला त्या अर्जाच्या खरेपणाबद्दल व त्यांतील मजकुराबद्दल जबाबदार धरलें जाईल ( हें कलम मुंबई कायदेमंडळाच्या नियमांत नवीनच घातलें आहे. अशा प्रकारचें कलम मद्रास असेंब्ली नियमांत आहे. )

१३१ असेंब्लींत ठराव रीतसर मंजूर झाल्यावर स्पीकरच्या द्वारा असेंब्लीनें आपलें म्हणणें गव्हर्नराला कळवावें.

## भाग १५ वा ( किरकोळ )

१३४ ( ५ ) एखाद्या सभासदाची जागा खाली झाल्याचें असेंब्लीनें जाहीर केलें तर तसें असेंब्लीच्या सेक्रेटरीनें गव्हर्नरास व त्या सभासदास कळवावें.

( ६ ) सेक्रेटरीनें सभासदांकरितां एक हजिरीपुस्तक ठेवावें. त्या पुस्तकांत दर दिवशीं प्रधान आणि स्पीकर यांच्या खेरीज प्रत्येक सभासदानें हजर असल्याबद्दल सही करावी ( प्रधान आणि स्पीकर यांच्या जोडीला पार्लमेंटरी सेक्रेटरींचा समावेश करावयास हवा होता. कारण त्यांनाही सभासदांचा पगार किंवा भत्ता मिळत नाहीं, म्हणून त्यांच्या हजिरी गैरहजिरीबद्दल विचारपूस करण्याचें कारण नाहीं. )

१४१ ( २ ) स्पीकरच्या हुकमाला बाध न आणतां, असेंब्लीच्या सेक्रेटरीनें आपलें काम आपल्या मदतनिसावर सोपविण्यास प्रत्यवाय नसावा.

वरील नियमांना श्री० जमनादास मेथा यांनीं एक लांबलचक भिन्नमतपत्र जोडलें आहे. त्यांतील रहस्य त्यांनींच पुढील चार सूत्रांत निवेदिलें आहे:—

( १ ) नवीन व्याख्या सुचविल्या आहेत.

( २ ) नियमांचा खरा अर्थ दर्शविणारे शाब्दिक फरक सुचविले आहेत.

( ३ ) सभासदांच्या हक्कांवर गैरवाजवी बंधन लादणारे नियम पालटले आहेत आणि तीं बंधनें नष्ट केलीं आहेत.

( ४ ) स्पीकर किंवा प्रधान यांना वाजवीपेक्षां फाजील दिलेले अधिकार तोडले आहेत व सभासदांचे आणि सभागृहाचे हक्क कमी होणार नाहींत अगर न्याय्य तऱ्हेनें संभाळले जातील अशी दखलगिरी घेण्यांत आली आहे.

श्री० राऊत यांनीं 'इंग्रजी भाषेंत आपले विचार व्यक्त करतां न येणाऱ्या सभासदानें कोणत्याही मान्य भाषेंत बोलावें' अशी दुरुस्ती सुचविली आहे.

लेजिस्लेटिव्ह कौन्सिलनें नेमलेल्या कमिटीनेंही वरीलसारखेच नियम तयार करून प्रसिद्ध केले आहेत. त्यांतील कांहीं खालीं देतों:—

१० अध्यक्षाला काढून टाकण्याच्या सूचनेस जर कमींत कमी १० सभासदांनीं पाठिंबा दिला तर त्या सूचनेस परवानगी देतां येईल ( पूर्वींच्या नियमांत ही संख्या ९ होती ).

६३ ( ३ ) प्रधानावर अविश्वास दर्शविणाऱ्या ठरावास जर १० सभासदांची संमति असेल तरच त्या ठरावाला परवानगी देण्यांत येईल. ( मद्रास असेंब्ली व कौन्सिल यांची नियम तयार करण्याकरितां जी जोड-कमिटी नेमली आहे तिनें असें ठरविल्याचें कळतें कीं, कौन्सिलांत प्रधानावर अविश्वास दाखविणारा ठराव मांडूं दिला जाणार नाहीं. कौन्सिलचे अधिकार सर्व बाजूंनीं संपुष्टांत आणण्याच्या धोरणांतील वरील नियम ही एक पायरी आहे. )

६७ तहकुबीच्या सूचनेस कमींत कमी सात सभासदांनीं पाठिंबा दिला पाहिजे.

७९ ( १ ) कायद्याच्या ८२ ( १ ) या कलमांतील तरतुदी लागू होणारें बिल किंवा उपसूचना, गव्हर्नरची शिफारस आहे असें प्रधानानें सांगितल्याशिवाय, कौन्सिलांत प्रविष्ट करितां येणार नाहीं ( हा नियम चुकीचा केलेला दिसतो. कौन्सिलांत सदर बिल प्रथमतः कायद्याच्या कलमान्वयें मांडतांच येणार नाहीं; गव्हर्नरच्या शिफारशीनें मांडल्यानंतर तें असेंब्लीकडून मंजूर होऊन आलेलें असल्यासच, पुढें चालू करितां येईल.)

सबंध नियमांत फिनॅन्शियल कामाचा नामनिर्देश सुद्धां नाहीं. चुकीनें वगळून न राहतां तसें हेतुपूर्वक केलें असल्यास यापुढें कौन्सिलपुढें बजेट मांडण्याचें कारण नाहीं किंवा सर्वसाधारण चर्चेकरितां तीन दिवस राखून ठेवण्याचेंही प्रयोजन उरत नाहीं. परंतु असा नियम करणें कायद्याला सोडून आहे. कारण कायद्याच्या ७८ ( १ ) व ८१ या कलमांन्वयें वार्षिक अंदाजपत्रक व पुरवणीपत्रक कायदेमंडळाच्या दोन्ही सभागृहांपुढें ठेवविण्याचें काम गव्हर्नरवर सोपविलें आहे; तेव्हां तें त्याला केलेंच पाहिजे. ७९ ( १ ) कलमान्वयें **कायदेमंडळांत** अंदाजपत्रकावर चर्चा होण्यास [ ७८ ( ३ ) ( क ) या खर्चाखेरीज ] कोणताच प्रत्यवाय येणार नाहीं, असें स्पष्ट लिहिलें आहे. **कायदेमंडळ** ( लेजिस्लेचर ) या शब्दांत 'असेंब्ली' व 'कौन्सिल' या दोघांचाही समावेश होतो. तेव्हां कायद्याप्रमाणें बजेटवर चर्चा कौन्सिलांत होऊं दिलीच पाहिजे. जुन्या नियमांत हें प्रकरण गाळलेलें नाहीं तें अगदीं बरोबर आहे. त्या नियमांत ( १ ) बजेट सादर करणें, ( २ ) बजेटचें स्वरूप, ( ३ ) सर्वसाधारण चर्चा, ( ४ ) जादा मागण्या सादर करणें, ( ५ ) पुरवणीखर्चाचें पत्रक इत्यादि सर्व गोष्टींचा उल्लेख विस्तारानें आलेला आहे. तेव्हां हें सर्व प्रकरण चुकून गाळण्यात आलेलें आहे असें वाटतें.

कौन्सिलचे एक सभासद रा. वीरकर यांनीं 'कमिटीच्या चेअरमनच्या जागीं प्रधानाची निवड करावी' या नियमास ( १०६ ) हरकत घेतली असून त्यांची हरकत वाजवी दिसते. बंगाल असेंब्ली कमिटीनें तयार केलेल्या नियमांत असेंब्लीचा सभासद ( पूर्ण ) नसलेल्या प्रधानाला सिलेक्ट कमिटीचा चेअरमन होतां येणार नाहीं असा नियम [ ५४ (४) ] केलेला आहे. कौन्सिलनें एखादी कमिटी नेमली व जर एखादा प्रधान कौन्सिलचा पूर्ण सभासद ( मत देण्याचा अधिकार असलेला ) नसला आणि अशा प्रधानास कमिटीचा चेअरमन म्हणून निर्णायक मत देण्याचा प्रसंग आला तर कायद्याच्या ६४ व्या कलमाप्रमाणें त्याला मत देतां येणार नाहीं आणि समसमान मतें पडून जी अडचण उभी राहते, तिचा निरास होऊं शकत नाहीं.

(ए) ८४ (१) (ग) व (घ) मधील (iii) या भागांत हिंदी संस्थानिकांचा उल्लेख असल्यामुळें या कलमांतील हे भाग हिंदी संस्थानिकांच्या संमतीशिवाय पार्लमेंटाला कायदा करून बदलतां येणार नाहींत, कारण मागें सांगितल्याप्रमाणें त्या योगें त्यांच्या सामिलनाम्याला धक्का पोंचतो.

प्रांतिक कायदेमंडळांतून इंग्रजीचा उपयोग.

८५.—प्रांताच्या कायदेमंडळांतील सर्व कामकाज इंग्रजी भाषेंतून चालविलें जाईल; मात्र एका अथवा दोन्ही सभागृहांच्या कामकाजासंबंधींच्या नियमांत, तसेंच जरूर तेथें, जोडबैठकांबाबतच्या नियमांत, इंग्रजी भाषेशीं परिचय नसलेल्या अथवा पुरेसा परिचय नसलेल्या लोकांना दुसरी भाषा वापरतां यावी म्हणून तरतूद करण्यांत येईल.

(अ) थोड्या फार फरकानें फीडरल कायदेमंडळाबाबतही ३९ व्या कलमांत हेच शब्द आले आहेत. फीडरल कायदेमंडळ दुहेरी आहे; म्हणजे तेथें दोन सभागृहें कायमचीं असणार आणि म्हणून जोडबैठकींचेही प्रसंग वारंवार उपस्थित होणार. प्रांतांच्या बाबतींत मात्र वरील फेडरेशनसारखी परिस्थिति फक्त सहा प्रांतांत कधीं कधीं उपस्थित होण्याचा संभव आहे, बाकीच्या पांच प्रांतांत एकच कायदेमंडळ असल्यामुळें तेथें जोडबैठकीचा प्रश्नच नाहीं. तेव्हां पहिल्या सहा प्रांतांच्या जोडबैठकीसुद्धां वट्ट बारा अधिक सहा मिळून अठरा सभागृहें तयार होतील आणि दुसरीं पांच सभागृहें मिळून हा भाषेचा प्रश्न एकंदर तेवीस सभागृहांना लागू होणारा आहे हें स्पष्ट आहे; शिवाय जोडबैठकीसुद्धां तीन फीडरल सभागृहें आहेत तीं निराळींच. या सर्व बैठकींतून नियम असा कीं, इंग्रजीमधूनच काम चाललें पाहिजे. त्याला अपवाद म्हणून इंग्रजीचें पुरें ज्ञान नसलेले अगर इंग्रजी न येणारे लोक यांच्याकरितां दुसरी कोणतीही भाषा वापरण्याची या कायद्यानें मुभा ठेविली आहे. याबाबत ८४ कलमांत उल्लेखिलेले नियम तरतूद करतील असें सांगितलें आहे. हिंदुस्थानांत साक्षरतेचा प्रसार अत्यंत कमी असल्यामुळें आणि त्यांतूनही इंग्रजी भाषेचें ज्ञान फारच कमी पसरलें असल्यामुळें व ज्यांना इंग्रजी येतें त्यांना ती कायदेमंडळांत पेलतां येणें दुर्घट असल्यामुळें वरील कलमांत अपवाद केला आहे. राष्ट्रीय स्वाभिमान या दृष्टीनें हिंदी कायदेमंडळांनीं इंग्रजींत आपलें कामकाज

काय म्हणून चालवावें? " पाहुण्याला वाडा आणि मालकाला पडवी " अशी उलटी स्थिति आपल्या परवशतेमुळें निर्माण झाली आहे. व ही स्थिति इतकी अंगवळणीं पडून गेली आहे कीं, त्याची हिंदी लोकांना कांहींच खंती वाटेनाशी झाली आहे. स्वराज्यसमुद्राच्या भरतीबरोबर भाषारूपी खाड्यांतही स्वाभिमानाचें पाणी वाढूं लागलें आहे. " मराठी भाषेंत हुकूम असल्याशिवाय आपण तो पाळणार नाहीं " या वाक्यांत कै० डॉ. केतकर यांनीं जो उत्कट भाषाभिमान दाखविला होता त्याचें रहस्य लक्षांत घेतलें पाहिजे. आयर्लंड, तुर्कस्थान इ० ठिकाणचे भाषा-पुनरुज्जीवनाचे प्रयत्न पाहिले म्हणजे स्वराज्यप्राप्ति व स्वभाषोद्धार या दोन्ही गोष्टी म्हणजे एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत हें दिसून येईल. न्याया-लयें किंवा वरिष्ठ कोर्टें यांचेकडे पाहिलें तर, फीडरल कोर्टाची भाषा [ कलम २१४ ( ५ ) ] आणि प्रत्येक हायकोर्टाची भाषा ( कलम २२७ ) इंग्रजीच ठरविण्यांत आली आहे. याप्रमाणें कायदेमंडळें व कोर्टें या ठिकाणीं इंग्रजी भाषेचें महत्त्व प्रस्थापित केलें गेलें आहे. राज्यकार-भाराच्या कामांत कोणती भाषा वापरावी याचें स्पष्ट दिग्दर्शन नसलें तरी अनुमानानें व ओघानें ती इंग्रजीच असणार हें उघड आहे. भाषेच्या या बाबतींत स्वायत्त वसाहतींचा विचार बोधप्रद आहे. कानडामध्यें फ्रेंच आणि इंग्रजी या दोन भाषा राजमान्य आहेत; याचें कारण कानडांतील प्रजा, फ्रेंच आणि इंग्रजी या मातृभाषा बोलणारी आहे. दक्षिण आफ्रिकेंत इंग्रजी आणि डच ( या भाषेला 'आफ्रिकान्स' म्हणतात ) या भाषा मान्यता पावल्या आहेत; कारण दक्षिण आफ्रिका हें बोअर ( डच शेतकरी ) आणि इंग्रज ह्यांचें एकराष्ट्र बनलेलें आहे.

कानडांत काय किंवा दक्षिण आफ्रिकेंत काय तद्देशीय मूळ प्रजेचा कोणी हिशेबच करीत नाहींत. खुद्द इंग्लंडचा विचार केला तर तिसऱ्या एडवर्डाच्या कारकीर्दींत ( इ. स. १३७७ ) फ्रेंच आणि लॅटिन यांचा उपयोग राजदरबारीं, पार्लमेंटांत व कोर्टांत होत असे. लॅटिन ही विद्येची भाषा म्हणून ( आपल्या इकडील संस्कृत भाषेप्रमाणें ) व फ्रेंच ही नॉर्मन ( उत्तर फ्रान्स—नॉर्मंडी ) राजाबरोबर आलेली म्हणून. सातव्या हेनरीच्या कारकीर्दींत ( इ. स. १५०९ ) इंग्रजी भाषेला थोडें बहुत

प्रोत्साहन मिळूं लागलें. १७०६ मध्यें लॉर्डांच्या सभेनें " पार्लमेंटांतील व न्यायकोर्टांतील कामकाजांतून फ्रेंच भाषेची हकालपट्टी करणारें " बिल मंजूर केलें (अर्स्किन मेकृत पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ० ३९५). आपल्या हिंदुस्थानचा इतिहास या दृष्टीनें तपासला तर जुन्या हिंदु राजवटींत संस्कृत व प्राकृत यांना मान असे; मोंगल दरबारांत फारशी आणि उर्दू यांची चहा असे; मराठेशाहींत संस्कृत, मराठी व फारसी यांचा सररहा व सरमिसळ उपयोग होई. आज इंग्रजांचें राज्य आहे म्हणून इंग्रजीचा वरचष्मा आहे. भावी स्वराज्याच्या काळांत " हिंदुस्थानी " व निरनिराळ्या " प्रांतिक भाषा " यांना महत्त्व चढणार यांत तिळमात्र शंका नाहीं. स्वभाषा ही स्वराज्याची नेहमीं पाठ शिवत राहणार ! आपण ज्याप्रमाणें प्रस्तुतच्या १९३५ च्या कायद्यांतून खऱ्या-खुऱ्या स्वराज्याचा विकास करूं पाहतो त्याचप्रमाणें या ८५ व्या कलमांतून स्वभाषांचा विकास करून घेतला पाहिजे. नियम करण्याच्या सत्तेचा उपयोग या कामीं करितां येण्यासारखा आहे. एवढ्याच पुरता कायदा बदला अशीं कित्येक कायदेमंडळांतून मागणी होत आहे ती गोष्ट बरी नाहीं. सबंध कायदाच जेथें नष्ट करावयाचा आहे तेथें या कलमाची काय बिशाद ! म्हणून कायद्याच्या सुधारणेकडे या प्रसंगीं लक्ष न देतां कायदेमंडळाची नियम करण्याची सत्ता व स्पीकरची अर्थ करण्याची सत्ता व खुबी यांच्या द्वारा जेवढा कार्यभाग होईल तेवढ्यावर समाधान मानून घेणें प्राप्त आहे. या संबंधांत निरनिराळ्या प्रांतिक कायदेमंडळांतून काय चर्चा झाली ती उद्बोधक असल्यामुळें त्याबद्दलची थोडी माहिती या ठिकाणीं देतों:—

(१) सिंध असेंब्लींत कांहीं सभासद 'सिंधी' मध्यें बोलूं लागल्यावर युरोपियन सभासद कर्नल महोन हे म्हणाले कीं, " माझी व्हर्नाक्युलर आयरिश भाषा आहे तेव्हां मला आयरिश भाषेंत बोलण्याची परवानगी आहे काय ? " 'व्हर्नाक्युलर' हा शब्द कायद्यांत नाहीं; त्यांत 'दुसरी कोणतीही भाषा' एवढेच शब्द आहेत. कदाचित् सिंध असेंब्ली नियमांत हे शब्द असतील. सरळ नियमाप्रमाणें पाहिलें असतां 'आयरिश' ही सिंध प्रांताची मूळभाषा नसल्यामुळें सदर प्रश्न टिंगल करण्याच्या

हेतूनें विचारला असला पाहिजे अशी स्पीकर ना. भोजसिंग पहालजानी यांना शंका आली व त्यांनीं महोनच्या प्रश्नाबद्दल तीव्र नापसंती दर्शविली. 'आपण परकी आहोंत व आपणाला आयरिशमध्यें नियमान्वयें बोलतां येईल असें वाटलें, अध्यक्षाचा अवमान करण्याचा आपला हेतु कधींच नाहीं व नव्हता. येणेंप्रमाणें कर्नल महोननीं स्पीकरची माफी मागितली व हें प्रकरण संपलें. 'नेटिव्ह' व 'व्हर्नाक्युलर' हे शब्द एतद्देशीय लोकांना व त्यांच्या भाषांना ब्रिटिश लोक अवमानपूर्वक लावीत. त्यामुळें त्या शब्दांच्या वापराबद्दल आपणाला चीड येते. 'नेटिव्ह' म्हणजे जन्माच्या हक्कानें एखाद्या प्रदेशाचा रहिवाशी, एवढाच अर्थ आहे. 'व्हर्नाक्युलर' या शब्दाच्या व्युत्पत्तींत कमअस्सलपणा आहे. लॅटिन शब्द 'व्हर्ना' म्हणजे 'उच्चवर्णीयाच्या घरांत जन्मलेला दास' असा आहे आणि या गुलामाची भाषा ती 'व्हर्नाक्युलर'. पुढें त्याचा अर्थ 'सामान्य प्रजेची भाषा' असा झाला. 'व्हर्ना' या लॅटिन शब्दानजीक 'यो दासं वर्णं अधरं गुहा अकः' या वेदमंत्रांतील **'दासं वर्णं'** हा शब्द येत आहे हें व्युत्पत्तिशास्त्रज्ञांच्या लक्षांत येईलच. खासदार सत्यमूर्ति यांनीं मध्यवर्ती असेंब्लींत या 'व्हर्नाक्युलर' शब्दावर हत्यार उपसलें होतें; परंतु हा प्रश्न निरनिराळ्या प्रांतांतील विद्यापीठांच्या कक्षेंतला आहे असें म्हणून मध्यवर्ती सरकारनें वेळ मारून नेल्याचें प्रसिद्धच आहे. तेव्हां ज्या शब्दांना वहिवाटीनें कदर्थ म्हणजे वाईट अर्थ प्राप्त झाला असेल त्या शब्दांना व त्यांच्या बरोबर त्या वाईट कल्पनांना गचांडी देणें हेंच श्रेयस्कर होय.

'व्हर्नाक्युलर' शब्द यापुढें वापरण्यांत येऊं नये, असा मुंबई-सरकारनें नुकताच ठराव केला आहे. यामुळें शिक्षणखात्यांत उपयोगांत येणाऱ्या पुढील शब्दांत खालीं दिल्याप्रमाणें बदल करण्यांत आले आहेत:—

(१) 'व्हर्नाक्युलर फायनल परीक्षे'ऐवजीं 'प्रायमरी स्कूल लीव्हिंग सर्टिफिकेट परीक्षा'; (२) 'अँग्लो व्हर्नाक्युलर स्कूल'ऐवजीं 'सेकंडरी स्कूल'; (३) 'व्हर्नाक्युलर स्कूल'ऐवजीं 'प्रायमरी स्कूल'; (४) 'व्हर्नाक्युलर भाषा'ऐवजीं 'प्रादेशिक भाषा'; (५) 'डिपार्टमेंटल व्हर्नाक्युलर रीडिंग सीरीज'ऐवजीं 'डिपार्टमेंटल उर्दू, मराठी, गुजराती,

कानडी रीडिंग सीरीज'; ( ६ ) 'व्हर्नाक्युलर ट्रेनिंग संस्था'ऐवजीं 'प्रायमरी ट्रेनिंग संस्था' इत्यादि.

( २ ) बिहार व संयुक्तप्रांत येथील कौन्सिलांत त्या त्या अध्यक्षानें कायद्यांतील कलमाचा शब्दार्थ घेऊन काम चालविल्याचें दिसून येतें. संयुक्तप्रांत कौन्सिलचे अध्यक्ष सर सीताराम यांनीं, पंडित राधाकांत मालवीय हे उत्तम इंग्रजी वक्ते असतांना जेव्हां हिंदींत बोलूं लागले तेव्हां त्यांना अडथळा केला व इंग्रजींत भाषण करण्यास लाविलें. बिहार असेंब्लींत प्रधान डॉ. सय्यद महमूद यांनीं हिंदींत बोलण्याचा पायंडा पाडला व अर्थमंत्री ना. अनुग्रह नारायण सिंह यांनीं आपलें भाषण हिंदींतच केलें. इंग्रजींतून भाषणें झालीं तर आपण मत न देण्याचा सत्याग्रह करूं अशी बंगाल असेंब्लींत कांहीं प्रधानपक्षीय सभासदांनीं मुख्य प्रधानांना धमकी दिली. मध्यप्रांत असेंब्लींत स्पीकर यांनीं एक महत्त्वाचा निर्णय दिला त्यांतील भाग पुढें देत आहे:—" कायदा अगदीं निःसंदिग्ध आहे. त्याअन्वयें ज्याला पुरेसें इंग्रजी ज्ञान आहे त्यानें इंग्रजींतच बोललें पाहिजे. याबाबत मी कांहीं माझी कसोटी लावणार नाहीं. प्रत्येक सभासदच आपापल्या ज्ञानाविषयीं सांगूं शकेल. त्याच्या शब्दावर मी विश्वास ठेवणार; आणि त्यानें आपणास इंग्रजींत बोलतां येणार नाहीं असें सांगितल्यास त्याला मराठींत किंवा हिंदींत बोलण्याची पूर्ण परवानगी आहे. परंतु हें ठरविण्याची जबाबदारी जर सभासद माझ्यावरच टाकणार असतील तर मला कायद्याप्रमाणेंच वागलें पाहिजे. तशा स्थितींत मला सभासदांचें ज्ञान पारखावें लागेल. दुसरा मुद्दा असा कीं, ज्या वेळीं मला वाटेल कीं एखादा विषय विशिष्ट सभासदानें देशी भाषेंतून विवेचिल्यास सभासदांना चांगला समजेल त्या वेळीं त्या सभासदाला मी मराठी अगर हिंदी यांपैकीं एखाद्या भाषेचा आश्रय करण्यास सांगेन; एरवीं मला कायद्याच्या आधारानेंच चाललें पाहिजे." संयुक्तप्रांतीय स्पीकर पुरुषोत्तमदास तंडन यांच्या प्रेरणेवरून या भाषाप्रकरणाबाबत नियम बदलून घेतला गेला आहे. त्या नवीन नियमान्वयें स्पीकरला वाटल्यास इंग्रजी भाषेचें चांगलें ज्ञान असलेल्या एखाद्या सभासदास इंग्रजीऐवजीं हिंदुस्थानींत बोलण्यास परवानगी देतां

येईल किंवा भाग पाडतां येईल. 'परवानगी देणें' एथपर्यंत जाण्यास बरेच लोक तयार आहेत, परंतु 'भाग पाडणें' या शब्दानें कित्येक लोक बिथरले आहेत व ८५ कलमांतील तत्त्वाचा हा भंग आहे असें प्रतिपादूं लागले आहेत. ही भाषेची बाब अशी आहे कीं, ८४ कलमाप्रमाणें त्या-बाबत नियम करण्याचा हक्क कायदेमंडळाला आहे; गव्हर्नराला कोण-त्याही कलमाच्या आधारें ढवळाढवळ करितां येत नाहीं. बरें, न्यायकोर्टा-कडे धाव घ्यावी तर ८७ कलमान्वयें कायदेमंडळाच्या कामकाजांत कांहीं गैरशिस्त गोष्टी घडल्या तरी त्यांत न्यायकोर्टाचें बोट शिरकत नाहीं. एतावता, अम्मलबजावणी खातें व न्यायखातें यांच्या अधिकारक्षेत्रांतून अलिप्त अशी ही एकच बाब दिसते. या गोष्टीचा कायदेमंडळाच्या सभासदांनीं जास्तींत जास्त फायदा घेतला पाहिजे. ८७ कलमांतील 'एक्सरसाइज'—'गाजविणें, वापरणें' या शब्दाचा व्हॅलिड (योग्य) व लीगल (कायदेशीर) वापर असा अर्थ करून न्यायकोर्टाच्या क्षेत्रांत या बाबीला ओढण्याचा कांहीं लोकांकडून प्रयत्न केला जातो. परंतु तो निष्फळ आहे. हायकोर्ट किंवा हायकोर्टाकडून फीडरल कोर्ट हाही मार्ग मोकळा नाहीं. गव्हर्नर जनरलला जर यांत कायद्याचा, महत्त्वाचा प्रश्न गोवला गेला आहे असें वाटलें—तसें याबाबत वाटणें ही एक अद्भुतच गोष्ट मानली जाईल—तर २१३ कलमान्वयें हा भाषेचा प्रश्न फीडरल कोर्टाकडे मताकरितां सोपवितां येईल. फीडरल कोर्टाला मत देण्यापलीकडे अधिकार नाहीं व गव्हर्नर जनरलला फीडरल कोर्टाचें मत प्रांतिक कायदेमंडळावर लादण्याचा कोणत्याही कलमानें आधार सापडणार नाहीं. तेव्हां अशा परिस्थितींत लोकमताला मान तुकविण्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं.

संयुक्तप्रांतीय कौन्सिलमध्यें या भाषेच्या प्रश्नावरील नियमांची चर्चा चालू असतां कॉंग्रेस पक्षातर्फे " हिंदी किंवा उर्दूमध्यें भाषण करणें हें सभासदांच्या मर्जीवर सोपवावें " अशा अर्थाची उपसूचना मांडली गेली. ती कायद्यांतील कलमाला विरुद्ध आहे या कारणास्तव अध्यक्षांनीं ती नियमबाह्य ठरविली. या प्रसंगीं झालेला वादविवाद सारांशरूपानें पुढें देत आहे:—

अध्यक्षः—" आपली उपसूचना कायद्यांतील कलमाला सुसंगत आहे काय ? "

श्री. चंद्रभालः—" कायद्यांतील कलमाशीं विसंगत असा नियम कौन्सिलला करितां येणार नाहीं हें मला कबूल आहे. परंतु नियमांत 'इंग्रजीचा परिचय ज्यांना नाहीं' हे कायद्यांत असलेले शब्द गाळण्यास कांहीं हरकत आहे असें मला वाटत नाहीं. आपणाला कायदेमंडळांतील सभासदांचें स्वातंत्र्य वाढवावयाचें आहे. आपण एक नवीन प्रघात पाडूं. अमक्या भाषेंत बोलावयास सांगण्याचा अधिकार अध्यक्षाला असतां कामा नये. " यानंतर अध्यक्षांनीं ॲडव्होकेट जनरलचें मत विचारलें. ॲ. ज. म्हणाले: " इंग्रज़ी भाषेशीं पुरासा परिचय असलेल्या सभासदांना हिंदींत अथवा उर्दूत बोलण्याची कलम ८५ अन्वयें परवानगी देतां येणार नाहीं." याप्रमाणें चर्चा झाल्यावर अध्यक्षांनीं श्री. चंद्रभाल यांची उपसूचना नियमबाह्य ठरवून मांडूं दिली नाहीं.

कायदेमंडळातील वाद-विवादांवर बंधने

८६.--( १ ) फीडरल कोर्टाच्या अथवा एखाद्या हायकोर्टाच्या कोणत्याही न्यायाधीशाकडून आपलीं कामें पार पाडीत असतांना घडणाऱ्या वर्तनाबाबत कोणतीही चर्चा प्रांतिक कायदेमंडळांत होणार नाहीं.

ह्या पोटकलमांत हायकोर्टाचा जो उल्लेख आहे त्यांत, ह्या कायद्याच्या नवव्या खंडांतील कोणत्याही हेतूकरितां जें फीडरेटेड संस्थानांतील कोर्ट हायकोर्ट आहे, त्याचा उल्लेखही अंतर्भूत होतो असा अर्थ लावण्यांत येईल.

( २ ) जर गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें असें प्रमाणपत्र दिलें कीं, प्रांतिक कायदेमंडळांत प्रविष्ट झालेल्या अथवा प्रविष्ट करावयाचें म्हणून योजिलेल्या बिलाची, अथवा बिलाच्या एखाद्या विशिष्ट कलमाची, अथवा बिलाला मांडलेल्या अथवा मांडावयाची म्हणून योजिलेल्या एखाद्या उपसूचनेची चर्चा, प्रांताच्या किंवा प्रांताच्या कोणत्याही भागाच्या शांततेस अथवा स्वस्थतेस गंभीर तऱ्हेचा कोणताही धोका पोंचूं न देण्याची आपली खास जबाबदारी पार पाडण्याचे कामी बाध आणणारी होईल तर त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें तें बिल, कलम अथवा उपसूचना या संबंधांत कोणतेंही पाऊल टाकतां कामा नये किंवा कांहीं पावलें टाकलीं असल्यास त्यानंतर पुढील पाऊल टाकतां कामा नये, असा हुकूम काढावा व त्याप्रमाणें सदर हुकमाची अंमलबजावणी केली जाईल.

(अ) ३११ (२) कलमाप्रमाणें 'हायकोर्ट' या शब्दांत तसा त्या त्या ठिकाणीं स्पष्ट उल्लेख केलेला असल्याशिवाय फेडरेशनमध्यें सामील झालेल्या संस्थानांतील हायकोर्टांचा अन्तर्भाव होत नाहीं. या कलमांत तसा स्पष्ट उल्लेख केलेला असल्यामुळें वरील प्रकारच्या संस्थानी हायकोर्टांचा-ही समावेश या कलमाच्या हेतूस्तव केला पाहिजे हें उघड आहे.

३११ (३) कलमाप्रमाणें फेडरेशनची स्थापना होईपर्यंत कोणतेंही हिंदी संस्थान, या कायद्यांतील फीडरेटेड संस्थानाच्या उल्लेखांबाबत, फीडरेटेड म्हणजे फेडरेशनमध्यें सामील झालेलें संस्थान असें मानलें जाणार नाहीं. अद्याप फेडरेशनची स्थापना झालेली नाहीं. ५ व्या कलमाप्रमाणें राजेसाहेबांनीं फेडरेशन स्थापित झाल्याचा जाहिरनामा काढावयास पाहिजे. ह्या फेडरेशनच्या स्थापनेला दोन महत्त्वाच्या अटी पुऱ्या झाल्या पाहिजेत. पहिली अट म्हटली म्हणजे फीडरल कौन्सिल ऑफ स्टेटला ५२ प्रतिनिधि सर्वांनीं मिळून निवडून देण्याचा ज्या संस्थांनांना अधिकार पोंचतो इतक्या तरी कमींत कमी संस्थानांनीं फेडरेशनमध्यें सामील होण्यास मान्यता दिली पाहिजे. दुसरी अट अशी कीं, जीं संस्थानें सामील होणार त्यांची लोकसंख्या कमींत कमी सर्व संस्थानांच्या लोकसंख्येच्या निम्याइतकी तरी भरली पाहिजे. या दोन अटी पुऱ्या झाल्या असतां जीं संस्थानें सामील होऊन फेडरेशनची उभारणी करण्यांत येईल त्या संस्थानांतील हायकोर्टांचा उल्लेख वरील कलमांत करण्यांत आला आहे. २१७ व्या कलमाप्रमाणें, अशा फेडरेशनमध्यें सामील झालेल्या संस्थानांच्या अधिपतींबरोबर वाटाघाट अथवा पत्रव्यवहार करून राजेसाहेब संस्थानांतील कोर्टास तें या कायद्याच्या नवव्या खंडाच्या (न्यायदानाची व्यवस्था) हेतूंच्या पूर्तीसाठीं 'हायकोर्ट' आहे असें जाहीर करतील. या नवव्या खंडांत फीडरल कोर्ट आणि ब्रिटिश हिंदुस्थानांतील हायकोर्टें असे दोन भाग आहेत; त्यांपैकीं पहिल्या भागांत २०७ व २११ या कलमांत संस्थानी हायकोर्टांचा निर्देश केला गेला आहे. वरील २०७ कलमांत संस्थानी हायकोर्टांकडून फीडरल कोर्टाकडे करण्यांत आलेल्या अपिलाबाबत फीडरल कोर्टाचें अधिकारक्षेत्र आणि २११ कलमांत सदर संस्थानांना पाठविण्याचीं विनंतिपत्रें याबाबत

योजना आली आहे. कायद्याच्या सहाव्या कलमांत ज्या दुसऱ्या शेड्यूलचा उल्लेख आला आहे त्यांत संस्थानांच्या फेडरेशनमध्यें सामील होण्याच्या कृत्याला बाध न आणतां १९३५ च्या कायद्यांतील कोणकोणत्या कलमांत पार्लमेंटाला दुरुस्ती करितां येईल त्यांची खंडवार यादी दिली आहे. त्यांत तिसऱ्या खंडांतील तिसऱ्या भागांतील या ८६ व्या कलमाचा उल्लेख असून त्यांत असें म्हटलें आहे कीं, " फीडरल कोर्टाचे न्यायाधीश आणि संस्थानी हायकोर्टांचे न्यायाधीश यांच्या वर्तनाबाबत कायदेमंडळांत चर्चा होऊं न देणें या बाबीशिवाय" पार्लमेंटाला १९३५ च्या कायद्यांत दुरुस्ती करितां येईल. याचा अर्थ, या ८६ व्या कलमांतील सदर भाग इतर भागापेक्षां 'अच्छेद्य' आहे, हा होय.

( आ ) ८४ ( १ ) ( ग ) आणि ( घ ) कलमांत हिंदी संस्थानांशीं संबंध असलेल्या कोणत्याही गोष्टीबाबत चर्चा बंद करणें अगर प्रश्न विचारूं न देणें याबाबतचे नियम गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचे आहेत. या ८६ व्या कलमांत फक्त कायदेमंडळांतील 'चर्चेचा'च उल्लेख आहे; 'प्रश्न विचारण्या'बाबतचा नाहीं. त्यावरून ८६ व्या कलमानें कायदेमंडळांत, फीडरल कोर्टाच्या अथवा संस्थानी हायकोर्टाच्या कोणत्याही न्यायाधीशाच्या कृत्याबद्दल प्रश्न विचारण्यास कोणतीही आडकाठी नाहीं. अर्थात् ८४ कलमान्वयें त्यांत प्रांताच्या हितसंबंधांचा अथवा प्रांतांत राहणाऱ्या ब्रिटिश प्रजाजनाच्या हितसंबंधांचा कांहीं तरी धागा अनुस्यूत असला पाहिजे हें उघड आहे. 'चर्चे'ला बंदी करण्याचें कारण त्यांत न्यायदानाचें काम निःपक्षपातीपणानें करणाऱ्या न्यायाधीशावर टीका होण्याचा संभव अधिक, हें होय. 'प्रश्ना'चा हेतु फक्त माहिती मिळविण्याचा असतो. 'प्रश्नां'तून पुरवणीप्रश्न उत्पन्न होऊन त्याचें 'चर्चे'त रूपांतर होऊं लागलें असें दिसून आल्यास स्पीकरला किंवा प्रेसिडेंटाला ती बंद करितां येते.

( इ ) गव्हर्मेंट ऑफ इंडिया बिलांत 'आपलीं कामें पार पाडीत असतांना' या शब्दांऐवजीं 'आपलीं न्यायदानविषयक कामें करीत असतांना' असे शब्द होते. हायकोर्टांना न्याय देण्याचें काम करणें व सर्व न्यायखात्याचें अम्मलबजावणीचें काम पाहणें अशीं दोन तऱ्हेचीं कामें

पाहावीं लागतात. त्यांपैकीं दुसऱ्या कामावर कायदेमंडळाचा ताबा—चर्चेच्या रूपानें का होईना—असण्यास हरकत नाहीं अशी बिल तयार करतेवेळीं ब्रिटिश मुत्सद्द्यांची कल्पना होती, परंतु पुढें असा श्लेष निघाला कीं, कायदेमंडळांतील ज्या सभासदाला फीडरल कोर्टावर व हायकोर्टावर तोंडसुख घ्यावयाचें आहे त्याला कोर्टाच्या अंमलबजावणीखात्यावरील टीकेच्या मिषानें अप्रत्यक्षपणें व पर्यायानें कोर्टाच्या न्यायदानाच्या कामावरही टीका करितां येण्यासारखी आहे. आणि या भीतीनें ग्रस्त होऊन बिलांतील भाषा जास्त व्यापक करण्यांत आली आहे. मनुष्य एकदां भयाच्या तावडींत सापडला म्हणजे त्याच्या भयाची मजल कोठपर्यंत जाईल हें कांहीं सांगवत नाहीं. थेट तीच स्थिति पार्लमेंटची या 'संरक्षक बंधना'-बाबत झालेली आढळून येते.

( ई ) फेब्रुवारी १९३८ मध्यें ओरिसा असेंब्लींत कॉंग्रेसपक्षीय सभासद श्री. गोदावरी मिश्र यांनीं "पाटणा हायकोर्टानें एका अस्सल दाव्यांत नुकत्याच दिलेल्या निकालांत ब्रिटिश राज्यकारभारावर व उरिया लोकांच्या शीलावर ठेवलेल्या ठपक्या"ची चर्चा करण्याकरितां तहकुबीची सूचना आणिली. ही सूचना मांडतांना ते म्हणाले: "पाटणा हायकोर्टानें जो शेरा प्रस्तुत निकालांत मारला आहे त्यानें ओरिसा सरकारचेच नव्हे तर सर्व प्रांतिक सरकारांचे डोळे उघडले पाहिजेत. निकालपत्रकानें पोलिस, मॅजिस्ट्रेट, न्यायकोर्टें आणि प्रांतांतील लोक या सर्वांवर ताशेरा झाडला आहे. तेव्हां ही परिस्थिति सुधारण्याकरितां सध्यांच्या लोकप्रिय सरकारनें ताबडतोब उपाययोजना करावी." यावर उत्तर देतांना मुख्य प्रधान ना. विश्वनाथ दास म्हणाले: "न्यायाधीशांच्या वर्तनांवर टीका करण्याचें स्वातंत्र्य १९३५ च्या गव्हमेंट ऑफ इंडिया कायद्यानें काढून घेतलें आहे, ही गोष्ट या वेळीं डोळ्यांआड करून चालणार नाहीं.. प्रांतांतील अधिकाऱ्यां-कडून पुनः असें गर्ह्य वर्तन होणार नाहीं, याबद्दल इतःपर जरूर ती खबरदारी घेण्यांत येईल." या खुलाशानंतर तहकुबीची सूचना परत घेण्यांत आली. परंतु या प्रकारावरून कायदेमंडळांचें स्वातंत्र्य चोहों-बाजूंनीं कसें आवळत आणलें गेलें आहे याची चांगलीच कल्पना येते.

(उ) दुसऱ्या पोटकलमांत कायदेमंडळांतील चर्चेवर आणखी नियंत्रण घालण्यांत आलेलें आहे. प्रांतिक स्वराज्यापैकीं 'कायदा आणि सुव्यवस्था' हें महत्त्वाचें व प्राणभूत खातें लोकनियुक्त प्रतिनिधींच्या व मंत्र्यांच्या ताब्यांत देण्यास ब्रिटिश मुत्सद्दी तयार नव्हते. परंतु तसें केल्यास 'प्रांतिक स्वराज्य दिलें' असा बाह्यात्कारी देखावा करावयास सापडत नाहीं. अशा परिस्थितींत वरील प्रकारच्या नियंत्रणांची व बंधनांची उत्पत्ति झाली आहे. 'हिंदुस्थानांत राज्ययंत्र उलथून टाकण्याकरितां बंड केव्हां होईल याचा नेम नाहीं' अशा भीतीनें या सर्व कलमांची योजना केलेली आहे. सांगतांना धार्मिक व सामाजिक कलह हे निमित्त म्हणून पुढें केले जातात. भीतीनें मन पछाडलें म्हणजे मनुष्य काय वाटेल तें करण्यास प्रवृत्त होतो. ५२ व्या कलमांत गव्हर्नरास जादा जबाबदारीचे अधिकार किती तरी देण्यांत आलेले आहेत; परंतु या कलमांत 'शांततेस जबरदस्त धोका येईल' या सबबीवर कायदेमंडळांतील कोणत्याही बिलावर, त्यांतील कलमांवर किंवा उपसूचनेवर एकदम घाला घालण्याचे अधिकार गव्हर्नर-ला दिले आहेत. शिवाय हे अधिकार त्यानें मंत्र्यांचा सल्ला न घेतां आपल्या मर्जीप्रमाणें गाजवावयाचे आहेत. पार्लमेंटांत या कलमावर चर्चा झाली त्या वेळीं 'एखाद्या खासगी सभासदानें प्रश्न विचारण्यास किंवा ठराव मांडण्यास या कलमानें हरकत येणार नाहीं' असें सॉलिसिटर जनरलनीं आश्वासन दिलें व गव्हर्नरला दिलेल्या 'आज्ञापत्रां'त (कलम १८) या ८६ (२) पोटकलमाला उद्देशून स्पष्ट करण्यांत आलें कीं, "बिलाच्या जाहीर चर्चेमुळेंच दंग्याधोप्याची परिस्थिति निर्माण होईल असा प्रसंग असल्याखेरीज कायदेमंडळांतील चर्चेवर नियंत्रण घालण्याचा जादा अधिकार गव्हर्नरनें वापरतां कामा नये." या 'आज्ञापत्रां'तील खुलाशानें ८६ (२) कलमाचें स्वरूप जरा सौम्य करण्यांत आलें आहे; तथापि 'आज्ञापत्र' ही केवळ सूचना आहे; तो कांहीं कायदा नव्हे. प्रसंग आला म्हणजे आज्ञापत्रांतील सूचना मागें पडून कायद्याचा बडगा कायदे-मंडळाच्या पाठींत केव्हां बसेल याचा नेम नाहीं. कायद्यानें सर्व प्रकारची तजवीज करून ठेविली आहे. तो कायदा निरुपयोगामुळें नष्टप्राय करण्याचें

सामर्थ्य प्रबळ हिंदी लोकमताला आहे हें पुनः पुनः सांगण्याचें कांहींच कारण नाहीं.

कायदेमंडळांत झालेल्या कामकाजासबंधीं कोर्टी-नीं चौकशी न करणें

८७.—( १ ) प्रांतिक कायदेमंडळांत झालेल्या कोणत्याही कामकाजाच्या प्रामाण्याबाबत, कामकाजाच्या पद्धतींतील गैरशिस्तपणाच्या सबबीवर, कोर्टांत हरकत उपस्थित करितां येणार नाहीं.

( २ ) ज्याच्यावर या कायद्यान्वयें कायदेमंडळांतील कामकाजाच्या पद्धतीचें अथवा काम चालविण्याचें नियंत्रण करण्याचें अगर बंदोबस्त राखण्याचे अधिकार सोपविले आहेत असा प्रांतिक कायदेमंडळाचा कोणताही अधिकारी अथवा दुसरा सभासद, ते अधिकार त्यानें चालविण्याच्या बाबतींत कोणत्याही कोर्टाच्या अधिकारक्षेत्रांत येणार नाहीं.

( अ ) या कलमांतील भाषा इतकी व्यापक आहे कीं, कायदेमंडळाचे स्पीकर, प्रेसिडेंट इ० अधिकारी हे कायद्याच्या जाळ्यांत सापडण्याच्या पलीकडे नेऊन ठेवले आहेत. प्रांतिक कायदेमंडळानें जे नियम बनविले आहेत त्यासंबंधांत कांहीं चूक अगर गैरशिस्तपणा कोणा अधिकाऱ्याकडून झाल्यास त्याबाबत कोर्टाकडे धाव घेतां येणार नाहीं. एखादा इसम सभासद नसतांना असेंब्लींत अगर कौन्सिलांत बसला व त्यानें मत दिलें तरी त्यामुळें कायदेमंडळांतील कामकाजाच्या खरेपणाला धक्का पोंचला व तें बेकायदेशीर झालें असें मानलें जाणार नाहीं असें ६६ ( २ ) कलमांत यापूर्वींच सांगण्यांत आलें आहे. १९३५ च्या या कायद्यांतील कोणत्याही कलमाचा भंग झाल्यास त्याबाबत हायकोर्ट किंवा फीडरल कोर्ट याकडे प्रकरण जाण्यास या कलमामुळें प्रत्यवाय येण्याचें कांहीं कारण नाहीं.

( आ ) दुसरें पोटकलम बनविण्यास एक कारण घडलें आहे. १९२४ सालीं बॅ. चित्तरंजन दास यांच्या नेतृत्वाखालीं बंगाल कौन्सिलांत बहुमताच्या जोरावर प्रधानांचे पगार नामंजूर करण्यांत आले व अशा तऱ्हेनें द्विदळ राज्यपद्धतीचें पेकाट मोडण्याचा प्रयत्न झाला. अशा तऱ्हेनें ज्या दिवाणांचा पगार एकदां कौन्सिलनें फेटाळून लावला त्या दिवाणांच्या पगाराकरितां खर्चाची मागणी ज्या वेळीं कौन्सिलापुढें ठेवण्यांत आली त्या वेळीं स्वराज्यपक्षाचे चिटणीस व बंगाल कौन्सिलचे एक

सभासद के. एस्. रॉय यांनीं कलकत्ता हायकोर्टाकडून बंगाल कायदे-कौन्सिलच्या अध्यक्षांना सदर खर्चाची मागणी मांडूं देण्यास बंदी करणारा मनाईहुकूम ( इंजंक्शन ) आणविला, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. अशा गोष्टीची पुनरावृत्ति होऊं नये म्हणून हें पोटकलम योजण्यांत आलें आहे. तथापि या पोटकलमाच्या अनिश्चित, लवचीक अतएव व्यापक शब्दयोजनेवरून कायदेमंडळाच्या अधिकाऱ्यांना हायकोर्टापासून किती मर्यादेपर्यंत संरक्षण मिळालें आहे याची शहानिशा प्रत्यक्ष खटले झाल्या-वांचून होणार नाहीं हें अगदीं उघड आहे.

## भाग ४ था

## गव्हर्नरचे कायदे करण्याचे अधिकार

कायदेमंडळाच्या सुटी-च्या मुदतींत वटहुकूम काढण्याचा गव्हर्नरचा अधिकार

८८.—( १ ) प्रांताच्या कायदेमंडळाची बैठक चालू नसतांना एखाद्या प्रसंगीं जर गव्हर्नरची खात्री झाली कीं, तावडतोब उपाय योजणें भाग आहे अशी परिस्थिति विद्यमान आहे, तर त्यानें, परिस्थितीला ज्यांच्या योगानें तोंड देतां येईलसें वाटेल असे वटहुकूम काढावेत :

मात्र गव्हर्नर—

( क ) त्याच तरतुदी असलेल्या बिलाला या कायद्यान्वयें कायदेमंडळांत प्रविष्ट होण्याकरितां त्याची अथवा गव्हर्नर जनरलची आगाऊ संमति जर लागली असती तर या कलमाखालीं कोणताही वटहुकूम जारी करण्याच्या संबंधांत आपलें वैयक्तिक मत वापरील; आणि

( ख ) त्याच तरतुदी असलेल्या बिलाला या कायद्यान्वयें कायदेमंडळांत प्रविष्ट होण्याकरितां गव्हर्नर जनरलची आगाऊ संमति जर लागली असती, अथवा त्याच तरतुदी असणारें बिल गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेवणें जरूर आहे असें जर त्याला वाटलें असतें तर आपल्या मर्जीप्रमाणें वागणाऱ्या गव्हर्नर जनरलच्या हुकमाशिवाय असा कोणताही वटहुकूम जारी करणार नाहीं.

( २ ) या कलमाखालीं जारी करण्यांत आलेल्या वटहुकमाला, गव्हर्नरनें मंजुरी दिलेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याइतकीच शक्ति आणि परिणाम राहील परंतु असा प्रत्येक वटहुकूम—

(क) प्रांतिक कायदेमंडळापुढें ठेवला जाईल आणि कायदेमंडळाची बैठक पुनः भरलेल्या दिवसापासून सहा आठवडे संपतांक्षणीं, अथवा जर वटहुकूम नापसंत करणारा ठराव लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें मंजूर केला आणि लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असल्यास त्यानें सदर ठरावाला मान्यता दिली तर तो ठराव मंजूर झाल्याबरोबर अथवा लेजिस्लेटिव्ह कौन्सिल असल्यास कौन्सिलनें त्या ठरावाला मान्यता दिल्याबरोबर, आपोआप रद्द होईल.

(ख) गव्हर्नरनें संमति दिलेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याइतकाच, राजेसाहेबांच्या कायदे नामंजूर करण्याच्या अधिकाराबाबत ह्या कायद्यांत असणाऱ्या तरतुदीच्या अधीन राहील; आणि

(ग) गव्हर्नरकडून केव्हांही परत घेतला जाईल.

(३) गव्हर्नरनें संमति दिलेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यांत कायद्याचें स्वरूप प्राप्त झाली असतां जी तरतूद बंधनकारक मानली जाणार नाहीं अशी कोणतीही तरतूद या कलमाखालीं कोणत्याही वटहुकमानें जर आणि जितक्या मर्यादेपर्यंत केली असेल तर आणि तेवढ्यापुरता तो वटहुकूम बंधनकारक राहणार नाहीं.

(अ) या चौथ्या भागांत तीन कलमें आहेत. त्या सर्वांतून गव्हर्नराला असलेल्या कायदे करण्याबाबतच्या अधिकारासंबंधीं उल्लेख आलेला आहे. नेहमींची कायदे करण्याची पद्धत मागें येऊन गेलीच आहे. ती अशी:—एखादें बिल असेंब्लीनें, अथवा कौन्सिल असल्यास कौन्सिलनेंही, मंजूर करावयाचें, दोघांमध्यें मतभेद उत्पन्न झाल्यास दोघांच्या जोडबैठकींत उपसूचनांसह अथवा उपसूचनारहित बिल मंजूर करून घ्यावयाचें; नंतर तें गव्हर्नराची संमति मिळण्याकरितां गव्हर्नरकडे जावयाचें; त्यानें फेरविचाराकरितां वाटेल तर तें बिल पुनः कायदे-मंडळाकडे पाठवावें अगर बिलाला संमति द्यावी अथवा गव्हर्नर जनरलकडे विचाराकरितां पाठवून द्यावें. गव्हर्नर जनरलनें पुनः परत पाठवावें, संमति द्यावी अथवा राजेसाहेबांकडे त्यांची 'मर्जी संपादून' अनुमति मिळविण्याकरितां पाठवून द्यावें. अशा सर्व भानगडींतून बिलाला एकदांचें कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें तरीही तो कायदा नामंजूर करून नाहींसा करण्याचा अधिकार राजेसाहेबांच्या हातांत ठेवण्यांत आला आहे. हा झाला नित्याचा प्रकार; परंतु ८८, ८९ व ९० या कलमांतून नैमित्तिक व आणीबाणीच्या प्रसंगाकरितां वटहुकूम जारी

करण्याची व कायदे करण्याची तरतूद करून ठेवण्यांत आली आहे. असेच अधिकार थोड्या फार फरकांनीं फीडरल कार्यक्षेत्रांत गव्हर्नर जनरलला देण्यांत आले आहेत. या ८८ कलमांत कायदेमंडळ चालू नसतांना आणीबाणीची परिस्थिति निर्माण झाली तर वटहुकूम काढण्याचा अधिकार गव्हर्नराला म्हणजे मंत्रिमंडळाला देण्यांत आला आहे. कारण 'गव्हर्नर'पुढें 'आपल्या मर्जीप्रमाणें' अगर 'आपलें वैयक्तिक मत चालवून' ही शब्दयोजना आलेली नाहीं. परिस्थिति आटोक्यांत आणण्याकरितां जरुरी वाटल्यास मंत्र्यांना वटहुकूम काढतां येईल. ब्रिटिश पार्लमेंट-सारख्या स्वायत्त व सर्वतंत्रस्वतंत्र कायदेमंडळाबाबत सुद्धां त्याला न विचारतां ब्रिटिश मंत्रिमंडळाला 'इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्स' (आणी-बाणीच्या वेळच्या अधिकारांचा वटहुकूम) जारी करण्याचा अधिकार आहे तोच या कलमाच्या आधारें प्रांतिक गव्हर्नरांना म्हणजे प्रांतिक मंत्रि-मंडळांना दिलेला आहे. या मुद्द्याबाबत लिहीत असतांना जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें 'गव्हर्नर' असें न लिहितां 'गव्हर्नराचे मंत्री' असें स्वच्छच लिहिलें आहे (जॉ. पा. क. चा रिपोर्ट—परिच्छेद १०८ पहा.)

या ८८ कलमाखालीं वटहुकूम काढल्याचें पहिलें उदाहरण म्हटलें म्हणजे बंगालचे गव्हर्नर लॉर्ड ब्रॅबोर्न यांनीं '१९३८ चें बंगाल टेनन्सी ऑर्डिनन्स' काढलें हें होय. त्याचा अम्मल ३१ मे १९३८ पासून सुरू झाला. बंगाल प्रांतिक कायदेमंडळानें बंगाल टेनन्सी ॲक्ट अमेंडमेंट बिल मंजूर केलें; परंतु त्यासंबंधीं जमीनदारवर्गाकडून अनेक हरकती उपस्थित करण्यांत आल्या. या कारणास्तव त्या बिलाला गव्हर्नरची संमति मिळ-ण्याला दिरंगाई होत आहे. कदाचित् तें बिल गव्हर्नर जनरलच्या विचारा-करितां धाडलें जाण्याचाही संभव आहे. या बिलाला ३१ मे १९३८ पूर्वी कायद्याचें स्वरूप प्राप्त होईल या आशेनें कित्येकांनीं दस्तैवज केले असून सुद्धां ते नोंदण्याकरितां सादर केलेले नाहींत. तेव्हां १९०८ च्या नोंदणीकायद्यानें विहित अशी मुदत (ज्या मुदतीच्या आंत दस्तैवज नोंदलेच पाहिजेत) वाढविण्याचा या ऑर्डिनन्सचा उद्देश आहे. तसेंच, जमिनीची विक्री कायम होण्यापूर्वी ट्रान्सर फी ज्याबाबत डेपॉझिट म्हणून ठेवावी लागते, आणि ज्याबाबत प्रोबेट मिळण्यापूर्वी डेपॉझिट ठेवावें लागतें

अशाबाबतही या वटहुकमांत तरतूद केलेली आहे. या ऑर्डिनन्समुळें बिलाला गव्हर्नरची संमति मिळेल अगर मिळणार नाहीं याबाबत कांहींही अनुमान काढणें बरोबर होणार नाहीं असा इशारा देण्यांत आला आहे. कायदेमंडळ भरल्यापासून सहा आठवडेपर्यंत या ऑर्डिनन्सची मुदत राहील. दरम्यान कौन्सिल व असेंब्ली यांनीं त्याबद्दल नापसंतीदर्शक ठराव मंजूर केला तर तें ऑर्डिनन्स ताबडतोब रद्द होईल. मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानेंच ऑर्डिनन्स निघालें असल्यामुळें त्याला प्रांतिक स्वायत्ततेच्या दृष्टीनें आक्षेप घेण्यास जागा नाहीं.

याच ८८ व्या कलमाखालीं सरहद्दप्रांताच्या गव्हर्नरनें ता. २८ जून १९३८ रोजीं 'वायव्य सरहद्दप्रांत दारूबंदीचा वटहुकूम (१९३८ चा वटहुकूम नं. १)' काढल्याचें जाहीर झालें आहे. वटहुकूम काढण्याची कारणपरंपरा वटहुकमाच्या प्रास्ताविक भागांत ( प्रीॲम्बल ) पुढीलप्रमाणें दिलेली आहे:—" ( १ ) वायव्य सरहद्द प्रांतिक लेजिस्लेटिव्ह असेंब्लीनें १८ मार्च १९३८ रोजीं 'वायव्य सरहद्दप्रांत दारूबंदी बिल' मंजूर केलें; ( २ ) १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ७५ व्या कलमाखालीं गव्हर्नरनें सदर बिल गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेविलें: ( ३ ) कांहीं तांत्रिक दोष काढून टाकण्यासाठीं प्रांतिक कायदेमंडळानें सदर बिलाचा फेरविचार करावा म्हणून गव्हर्नर जनरलच्या हुकमानें सदर बिल परत धाडण्यांत आलें; ( ४ ) प्रांतिक सरकारचें दारूबंदीबाबतचें धोरण अमलांत आणण्याकरितां सदर बिलांतील महत्त्वाचा भाग ताबडतोब चालू करणें जरूर झालें; तसेंच, जमाखर्चाच्या अंदाजांत विस्कळितपणा उत्पन्न होऊं न देणें प्राप्त झालें; आणि ( ५ ) अशा प्रसंगीं प्रांतिक कायदेमंडळाचें अधिवेशन चालू नव्हतें."

या वटहुकमाचे एकंदर सात भाग असून त्यांत ५६ कलमें आहेत. लोकहिताच्या कामाकरितां इतक्या तातडीनें वटहुकूम निघाल्याचें हें तुरळकच उदाहरण होय. याचें सर्व श्रेय डॉ. खानसाहेबांच्या मंत्रिमंडळाला आहे. ८८ ( १ ) ( ख ) कलमांतील तजविजीप्रमाणें सदर वटहुकमाच्या धर्तीवरचें बिल गव्हर्नरनें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेवलेलें होतें म्हणून गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें दिलेल्या हुकमाशिवाय

गव्हर्नरनें सदर वटहुकूम जारी केलेला नसणार हें उघड आहे. वटहुकमाच्या प्रस्तावनेंत अगर जाहिरनाम्यांत याबद्दल कांहींच उल्लेख नसल्यामुळें कायद्याच्या कलमाच्या आधारें वर जास्त फोड करून दाखविलेली आहे. यानंतर योग्य वेळीं प्रांतिक कायदेमंडळाची बैठक भरून वटहुकमाबाबत पुढील सर्व सोपस्कार पार पडतील.

८८ ( १ ) पोटकलमाच्या शेवटीं जो प्रोव्हिजो अथवा मर्यादात्मक भाग आहे त्यांतील ( क ) भागांत गव्हर्नरनें आपलें वैयक्तिक मत चालवावें असें म्हटलें आहे. वटहुकमाच्या ऐवजीं तींच कलमें असलेलें बिल जर असतें आणि त्या बिलाला १०८ ( २ ) व ( ३ ) या कलमांप्रमाणें अथवा इतर कलमांप्रमाणें कायदेमंडळांत प्रविष्ट होण्याकरितां गव्हर्नरची किंवा गव्हर्नर जनरलची आगाऊ मंजुरी जर लागली असती, तर त्या वटहुकमाबाबत गव्हर्नरनें मंत्रिमंडळाचा सल्ला ऐकलाच पाहिजे असें तर्कशास्त्रदृष्ट्या म्हणतां येणार नाहीं. आगाऊ मंजुरी आणि शेवटची संमति या गोष्टी जरी एरवीं औपचारिक असल्या तरी गव्हर्नराचा मंत्रिमंडळाशीं विरोध झाल्यास वटहुकूम जारी करण्याच्या वेळीं तो आपलें वैयक्तिक मत चालविल्याशिवाय राहणार नाहीं म्हणजे वटहुकूम काढण्यास संमति देणार नाहीं. वर उल्लेख आलेल्या १०८ ( २ ) कलमांत गव्हर्नर जनरलची आगाऊ संमति असल्याखेरीज प्रांतिक कायदेमंडळांतून खालीलपैकीं कोणतेंही बिल आणतां येणार नाहीं असें सांगितलें आहे:—

( १ ) ब्रिटिश हिंदुस्थानला लागू असणारा पार्लमेंटचा कोणताही कायदा रद्द करणारें, दुरुस्त करणारें वा तद्विरोधी असणारें कोणतेंही बिल; अथवा

( २ ) गव्हर्नर जनरलचा कायदा किंवा गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें जारी केलेला कोणताही वटहुकूम रद्द करणारें, दुरुस्त करणारें वा तद्विरोधी असणारें कोणतेंही बिल; अथवा

( ३ ) या कायद्यान्वयें ज्या गोष्टींसंबंधीं गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें वागावयाचें आहे त्या गोष्टींना बाध आणणारें कोणतेंही बिल; अथवा

( ४ ) युरोपियन ब्रिटिश प्रजाजनाचा ज्या फौजदारी खटल्यांत संबंध आहे अशा खटल्यांतील कार्यपद्धतलिा बाध आणणारें कोणतेंही बिल.

तसेंच खालील बिलांना गव्हर्नरची आगाऊ संमति असल्याशिवाय तसलें कोणतेंही बिल कायदेमंडळांत प्रविष्ट करितां येणार नाहीं:—

( i ) गव्हर्नराचा कायदा किंवा गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें जारी केलेला कोणताही वटहुकूम रद्द करणारें, दुरुस्त करणारें अथवा तद्विरोधी असणारें बिल; अथवा

( ii ) पोलिस फोर्ससंबंधींचा कोणताही कायदा रद्द करणारें, दुरुस्त करणारें किंवा त्याला बाध आणणारें कोणतेंही बिल.

याखेरीज पुढील बाबीसंबंधांत गव्हर्नरची आगाऊ संमति असल्याखेरिज कोणतेंही बिल कायदेमंडळांत आणतां येणार नाहीं:—

( १ ) कलम ११९ (१) धंद्याबद्दल पात्रता ठरविणें अगर उद्योग-धंदा करण्याबद्दल मनाई करणें इ० गोष्टींबद्दलचें बिल.

( २ ) कलम २२६ महसूल वसूल करण्याबाबत अस्सल दावे घेण्याचा हायकोर्टाला अधिकार देणारें बिल.

( ३ ) कलम २६७ प्रांतिक पब्लिक सर्व्हिस कमिशनवर जादा काम सोपविण्याबाबतचें कोणतेंही बिल.

( ४ ) कलम २७१ क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या १९७ कलमान्वयें किंवा सिव्हिल प्रोसीजर कोडाच्या ८० ते ८२ या कलमांन्वयें हिंदुस्थानांतील कांहीं सरकारी नोकरांना मिळणारें संरक्षण रद्द करणें अगर कमी करणें याबाबतचें बिल.

( ५ ) कलम २९९ ( ३ ) एखादी जमीन सार्वजनिक मालकीची करणें अथवा त्या जमिनीवरील जमीन-महसुलाबाबतच्या हक्कांसह सर्व हक्क नाहींसे करणें अगर त्यांत फेरबदल करणें या गोष्टींची तरतूद करणारें कोणतेंही बिल.

८८ ( १ ) ( क ) सदरांत गव्हर्नरनें आपलें " वैयक्तिक मत चालवावें " असें म्हटलें आहे; याचा अर्थ गव्हर्नरनें मंत्रिमंडळाचा सल्ला न ऐकतां वटहुकमास बंदी करावी असा होतो. तथापि या कामांत 'पुढाकार घेण्याचा अधिकार (इनीशिएटिव्ह)' प्रधानमंडळाच्या हातांत आहे हें निर्विवाद आहे. ८८ ( १ ) (ख) सदरांत सांगितल्याप्रमाणें गव्हर्नरला गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें पाठविलेल्या हुकमाशिवाय, वटहुकूम काढतां येणार नाहींत. फीडरल क्षेत्रांतही अशाचसारख्या कलमांत [ ४२ ( १ ) (ख)] " राजेसाहेबांच्या हुकमाशिवाय गव्हर्नर जनरलला वटहुकूम काढतां येणार नाहींत' असें म्हटलें आहे. तेथें 'आपल्या मर्जीप्रमाणें' हे शब्द 'राजेसाहेबांच्या' या शब्दापुढें गाळले आहेत, हा फरक लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ८८ कलमांत फीडरल सरकारला कांहींही अधिकार ठेवण्यांत आलेला नाहीं. तेंच ४२ कलमाकडे पाहिल्यास 'राजेसाहेब' म्हणजे 'ब्रिटिश सरकार' त्याला सर्व अधिकार सुपूर्त केल्याचें दिसून येईल. या ८८ ( १ ) ( ख ) कलमांत 'ज्या बिलाला शेवटीं गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां धाडणें गव्हर्नरला जरूर वाटलें असतें अशा बिलाच्या नमुन्याबरहुकूम असलेला वटहुकूम गव्हर्नर जनरलच्या आज्ञेशिवाय गव्हर्नरला काढतां येणार नाहीं' हें गव्हर्नर जनरलच्या ७५ कलमांत वर्णिलेल्या अधिकाराच्या दृष्टीनें ओघानेंच प्राप्त होणारें आहे.

पहिल्या पोटकलमांतलि प्रोव्हिजोचा तात्पर्यार्थ असा:—ज्या बिलांना गव्हर्नरची किंवा गव्हर्नर जनरलची आगाऊ संमति लागते अशा बिलांच्या धर्तीवर वटहुकूम जारी करण्याचें मंत्रिमंडळानें मनांत आणल्यास गव्हर्नराला आपलें वैयक्तिक मत चालविण्याचा अधिकार आहे. त्यानें मंत्रिमंडळाचें म्हणणें अमान्य केल्यास वटहुकूम निघणार नाहीं. बरें, गव्हर्नरानें मंत्रिमंडळाचें म्हणणें मान्य केलें आणि वटहुकूम गव्हर्नरानें आगाऊ संमति देण्याच्या बिलाच्या धर्तीवर असला तर ताबडतोब वटहुकूम काढला जाईल; त्यावर ५४ ( १ ) कलमाप्रमाणें गव्हर्नर जनरलचें मागाहून नियंत्रण राहील हा भाग वेगळा. गव्हर्नरानें मंत्रिमंडळाचें म्हणणें मान्य केलें, पण वटहुकूम गव्हर्नर जनरलनें आगाऊ संमति देण्याच्या अगर गव्हर्नरनें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां पाठविण्याच्या बिलाच्या धर्तीवर

असला तर गव्हर्नर जनरलच्या मर्जीप्रमाणें दिलेल्या हुकमाशिवाय गव्हर्नरला वटहुकूम काढतां येणार नाहीं.

(आ) या कलमांतील वटहुकमाबाबत मंत्रिमंडळच जबाबदार असल्यामुळें व कायदेमंडळाचें अधिवेशन सुरू नसल्यामुळेंच केवळ मंत्रिमंडळाला वटहुकूम जारी करण्याचा प्रसंग येत असल्यामुळें तो वटहुकूम ताबडतोब कायदेमंडळापुढें मंजुरीकरितां ठेवला पाहिजे असें (२) ऱ्या पोटकलमानें सांगितलें आहे तें अगदीं बरोबर आहे. वटहुकूम काढणें न्याय्य समजण्याला परिस्थिति तशीच गंभीर स्वरूपाची असली पाहिजे व कायदेमंडळाच्या सभासदांची खात्री पटवितां आली पाहिजे. असेंब्ली व कौन्सिल या दोन्ही सभागृहांत सदर वटहुकमाला पसंती वा नापसंती मिळाली पाहिजे. नापसंती व्यक्त झाल्यास तो वटहुकूम ताबडतोब रद्द होईल. त्या वटहुकमाचें आयुष्य कायदेमंडळाच्या अधिवेशनाला सुरवात झाल्यापासून सहा आठवड्यांपेक्षां जास्त असणार नाहीं. सदर मुदतींत वटहुकमाच्या धर्तीवर जरूर तो कायदा कायदेमंडळांत मंजूर करून घेतला पाहिजे. ७७ कलमाप्रमाणें राजेसाहेबांना कायदे नामंजूर करण्याची जी सत्ता आहे ती या वटहुकमाबाबतही लागू आहे. तसेंच सदर वटहुकूम वाटेल तेव्हां जारी करण्याचा अधिकार गव्हर्नराला म्हणजे त्याच्या मंत्रिमंडळाला ज्याप्रमाणें आहे तसेंच तो वाटेल तेव्हां परत घेण्याचाही अधिकार त्यालाच असावा हें उघड आहे. (३) ऱ्या पोटकलमांतील तरतुदीनें, प्रांतिक कायद्याप्रमाणेंच वटहुकूम, जर तो अधिकाराच्या कक्षेबाहेर अगर मर्यादेबाहेर केला गेला असें ठरलें तर, निर्बल ठरेल म्हणजे कायदा म्हणून त्याचा अमल चालूं शकणार नाहीं.

वटहुकूम किंवा ऑर्डिनन्स म्हटला कीं तो सहा महिन्यांपर्यंत चालू राहावयाचा असा समज, १९१९ च्या कायद्यानें व त्याहीपेक्षां १९३० ते १९३२ दरम्यानच्या काळांत प्रत्यक्ष वटहुकमांच्या ग्रहणाच्या छायेंत राहण्याचा प्रसंग आल्यानें, सर्वत्र रूढ झालेला आहे. 'मोर नाचतो म्हणून लांडोरही नाचते' या न्यायानें कांहीं हिंदी संस्थानांनीं चळवळ थोपवून धरण्याकरितां ऑर्डिनन्स काढले; परंतु त्याला मुदतबिदत कांहीं नाहीं. साहजिकच आहे कीं, जेथें नेहमीं कायद्याचें राज्य नाहीं तेथें

संस्थानिकांच्या लहरीचा वटहुकूम हाच सततचा कायदा असणार. मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें काढावयाच्या या वटहुकमांचें आयुष्य, कायदेमंडळाचें अधिवेशन सुरू होण्यापूर्वीचे दिवस अधिक सहा आठवडे एवढेंच धरलें पाहिजे. १९१९ च्या कायद्याप्रमाणें एकदां काढलेला ऑर्डिनन्स पुनः सहा महिनेपर्यंत काढतां येतो का नाहीं असा संशय १९३० सालीं प्रकट करण्यांत आला होता. ब्रिटिश सरकारच्या अनुमतीनें गव्हर्नर जनरल लॉर्ड आयर्विन व लॉर्ड विलिंग्डन यांनीं आपापल्या कारकीर्दीत एकदां सोडून दोनदां म्हणजे १ वर्षपर्यंत ऑर्डिनन्स जारी ठेवले. पैकीं लॉर्ड आयर्विनच्या कारकीर्दीत दुसऱ्या सहामाहींत कॉंग्रेस व सरकार यांच्या दरम्यान तह होऊन ऑर्डिनन्स परत घेण्यांत आले; व ऑर्डिनन्सच्या धर्तीवर असेंब्लींत आणलेलें बिल आपोआप गळून गेलें. लॉर्ड विलिंग्डनच्या कारकीर्दीत ऑर्डिनन्सच्या दोन्ही सहामाही पुऱ्या होण्याच्या आधींच ऑर्डिनन्सच्या कलमांच्या धर्तीवर असेंब्लीकडून कायदा मंजूर करून घेण्यांत आला. ८९ कलमान्वयें गव्हर्नरनें स्वतःचे जबाबदारीवर काढावयाच्या वटहुकमांची मुदत ६ महिने ठेवली आहे. परंतु ती आणखी ६ महिनेपर्यंत वाढवितां येईल अशी स्पष्ट तरतूद त्या कलमांत करून ठेवली आहे.

( इ ) मंत्रिमंडळाच्या सल्ल्यावरून गव्हर्नरनें वटहुकूम काढण्याचा जो अधिकार वरील कलमान्वयें देण्यांत आला आहे तो देण्यांत येऊं नये असें पाटण्याचे श्री. सच्चिदानंद सिंह यांनीं जॉ. पा. क. पुढें दिलेल्या आपल्या साक्षींत सांगितलें होतें. दुसरी एक गोष्ट कमिटीच्या ध्यानांत आणली गेली होती. ती अशी कीं, या कलमांत कायदेमंडळाचें अधिवेशन बोलावण्याचा जो उल्लेख आहे त्याबाबतची सत्ता कलम ६२ ( २ ) अन्वयें गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें गाजवावयाची आहे. परंतु गव्हर्नर आपल्या सत्तेचा योग्य उपयोग करील असें गुळमुळीत व वेळ मारून नेणारें उत्तर सर सॅम्युअल होअर यांनीं दिलें.

८९.—( १ ) ह्या कायद्यान्वयें आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें जीं कामें गव्हर्नराला करणें भाग आहे तीं समाधानकारकपणें पार पाडण्यास स्वतःस समर्थ करण्याच्या हेतूस्तव ताबडतोब उपाययोजना करणें जरूर आहे अशी परिस्थिति निर्माण झाल्याची एखाद्या वेळीं गव्हर्नराला खात्री पटली

कांहीं विषयांबाबत वाटेल त्या वेळीं वटहुकूम जारी करण्याबाबत गव्हर्नरचा अधिकार

तर त्यानें आपल्या मताप्रमाणें परिस्थिति आटोक्यांत आणण्यास योग्य असे वटहुकूम जारी करावेत.

(२) ह्या कलमाखालीं जारी करण्यांत आलेला वटहुकूम, त्यांत निर्दिष्ट केलेल्या सहा महिन्यांपेक्षां अधिक नाहीं इतक्या मुदतीपर्यंत, चालू राहील; परंतु त्यानंतर पुनः वटहुकूम काढून ही मुदत आणखी जास्तींत जास्त सहा महिन्यांनीं वाढवितां येईल.

(३) या कलमाखालीं जारी करण्यांत आलेल्या वटहुकमाला गव्हर्नरनें मंजुरी दिलेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याइतकीच शक्ति आणि परिणाम राहील, परंतु असा प्रत्येक वटहुकूम—

(क) प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याइतकाच राजेसाहेबांच्या कायदे नामंजूर करण्याच्या अधिकाराबाबत ह्या कायद्यांत असणाऱ्या तरतुदींच्या अधीन राहील;

(ख) गव्हर्नरकडून केव्हांही परत घेतला जाईल;

(ग) पूर्वीच्या वटहुकमाची मुदत आणखी कांहीं मुदतीपर्यंत वाढविणारा सदर वटहुकूम असल्यास, गव्हर्नर जनरलच्या मार्फत ताबडतोब स्टेटसेक्रेटरीकडे कळविला जाईल आणि त्याच्याकडून तो पार्लमेंटच्या प्रत्येक सभागृहापुढें ठेवला जाईल.

(४) प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यांत कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें असतां जी तरतूद बंधनकारक मानली जाणार नाहीं अशी कोणतीही तरतूद या कलमाखालीं कोणत्याही वटहुकमानें जर आणि जितक्या मर्यादेपर्यंत केली असेल, तर आणि तेवढ्यापुरता तो वटहुकूम बंधनकारक राहणार नाहीं :

मात्र फीडरल कायदेमंडळाच्या कायद्याला विरोधी असणाऱ्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याचा अंमल होण्यासंबंधींच्या ह्या कायद्यांतील तरतुदीकरितां या कलमाखालीं जारी करण्यांत आलेला वटहुकूम, गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेवलेला व त्यानें संमति दिलेला प्रांतिक कायदेमंडळाचा कायदा म्हणून मानण्यांत येईल.

(५) या कलमाखालीं गव्हर्नरचीं कामें तो आपल्या मर्जीप्रमाणें करील, परंतु गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें दिलेल्या अनुमोदनाखेरीज गव्हर्नर या कलमांतील आपले अधिकार चालविणार नाहीं :

मात्र गव्हर्नर जनरलचें अनुमोदन वेळेवर मिळविणें अव्यवहार्य आहे असें गव्हर्नराला दिसून आल्यास त्याला गव्हर्नर जनरलच्या अनुमोदनाशिवायच वटहुकूम जारी करतां येईल. परंतु गव्हर्नर जनरलनें अशा परिस्थितींत आपल्या मर्जीप्रमाणें वटहुकूम परत घेण्याबाबत गव्हर्नराला हुकूम सोडल्यास सदर हुकमाप्रमाणें तो वटहुकूम परत घेण्यांत येईल.

( अ ) मागील अनेक कलमांतून गव्हर्नराला आपल्या मर्जीप्रमाणें अगर आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें कराव्या लागणाऱ्या बाबींचें वर्णन आलें आहे, त्या बाबी योग्य तऱ्हेनें पार पाडण्याला जर कायद्याची मदत लागली तर ती जवळ असावी या हेतूनें गव्हर्नरला हे वटहुकूम काढण्याचे अधिकार दिले आहेत. खुद्द, लोकमताला जबाबदार असलेल्या मंत्रिमंडळांना जर ८८ कलमाप्रमाणें सदर अधिकार दिले आहेत तर गव्हर्नराला त्याच्या खास अधिकारांतील गोष्टीकरितां वटहुकूम काढण्याचा अधिकार देण्यांत यावा हें ओघानेंच प्राप्त होतें. मंत्रिमंडळानें सदर वटहुकूम कायदेमंडळापुढें मांडला पाहिजे हें जसें त्यांच्या या सुलतानी अधिकारांवर नियंत्रण आहे, त्याप्रमाणें गव्हर्नरच्या ऑर्डिनन्सवर सहा महिन्यांच्या मुदतीचें नियंत्रण आहे; तसेंच गव्हर्नर जनरलच्या अनुमोदनाची आवश्यकताही ठेवण्यांत आली आहे. दुसऱ्यांदा जर तोच आर्डिनन्स चालू ठेवला तर तो स्टेटसेक्रेटरीकडे पाठवून पार्लमेंटपुढें ठेवला पाहिजे हेंही नियंत्रण ठेवण्यांत आलें आहे. या वटहुकमांच्या संबंधांत हिंदी लोकमताच्या व लोकप्रतिनिधींच्या नियंत्रणाचा कोठेंच पत्ता नाहीं. ब्रिटिश पार्लमेंटनें आपल्या दृष्टीनें गव्हर्नरच्या या सुलतानी सत्तेवर गव्हर्नर जनरलचें, स्टेटसेक्रेटरीचें म्हणजे पर्यायानें आपलें स्वतःचें नियंत्रण ठेवलें आहे. प्रांताचा सर्व कारभार आपल्यावर आहे अशी जबाबदारी वागविणाऱ्या मंत्रिमंडळाला ही गव्हर्नरची सुलतानशाही कितपत रुचेल व ते आपल्या पदावर अशा वटहुकूमशाहींत राहतील अगर न राहतील हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न आहे. या अधिकारांचा वापर करण्याची पाळीच बहुधा येणार नाहीं असें वाटतें; तथापि या अधिकारांचा बुजगावण्यादाखल उपयोग करण्यांत येईल हें तितकेंच निश्चित आहे.

( आ ) (४) थ्या पोटकलमांत 'फीडरल कायद्यांना विरोधी असणाऱ्या प्रांतिक कायद्यांचा अंमल होण्याबाबत या कायद्यांतील तरतुदीं'चा जो उल्लेख आला आहे तो १०२ (२) आणि १०७ ( १ ) व (२) या कलमांना उद्देशून आहे. १०२ (२) कलम पुढीलप्रमाणें आहे:—

"..........प्रांतिक कायद्यांतील एखादें कलम जर फीडरल कायद्यांतील कलमाला विरोधी असेल तर प्रांतिक कायद्याच्या अगोदर अगर

मागाहून मंजूर झालेला फीडरल कायदा ग्राह्य मानला जाईल आणि प्रांतिक कायद्याचें तेवढें कलम बंधनकारक मानलें जाणार नाहीं; आणि ही स्थिति फीडरल कायदा चालू असेपर्यंत तशीच राहील.''

१०७ (१) व (२) हीं पोटकलमें पुढीलप्रमाणें आहेत:—

"उभय यादींतील वर्णिलेल्या एखाद्या विषयाबाबत फीडरल कायद्याच्या अगर सध्यां चालू असलेल्या कोणत्याही हिंदी कायद्याच्या विरुद्ध जर कोणताही प्रांतिक कायदा असेल तर फीडरल कायदा किंवा कोणताही हिंदी कायदा-मग तो प्रांतिक कायद्याच्या पूर्वींचा असो अगर मागाहूनचा असो—ग्राह्य मानला जाईल आणि तेवढ्या विरुद्ध भागापुरता, प्रांतिक कायदा बंधनकारक मानला जाणार नाहीं.''

"वरीलप्रमाणें एखादा प्रांतिक कायदा फीडरल कायद्याला अथवा सध्यांच्या हिंदी कायद्याला विरोधी असेल, परंतु जर त्या कायद्याला तो गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां अगर राजेसाहेबांच्या संमतीकरितां राखून ठेवण्यांत आल्यानंतर त्यांच्याकडून मंजुरी मिळाली असेल तर तो प्रांतिक कायदा त्या प्रांतापुरता ग्राह्य मानला जाईल, परंतु त्याच विषया-संबंधीं पुढें केव्हांही फीडरल कायदेमंडळाला कायदा करितां येईल....''

या कलमावरून हें ध्यानांत येईल कीं, गव्हर्नरनें काढलेल्या वट-हुकमांतील कांहीं तरतुदी फीडरल कायद्यांना विरोधी असल्या तरी १०७ ( २ ) कलमांतील व्यवस्थेसारख्या ग्राह्य मानण्यांत येतील. मात्र अशा तरतुदींना गव्हर्नर जनरलची आगाऊ संमति असली पाहिजे हें ( ५ ) व्या पोटकलमांत स्पष्ट केलें आहे. सध्यांच्या काळांत तारायंत्रें, बिनतारी संदेश, टेलिफोन इत्यादि साधनें हाताशीं असल्यामुळें ही संमति मागविणें अतिशय सुलभ झालें आहे. त्यांतूनही तें शक्य न झाल्यास गव्हर्नरनें स्वतःच्या वैयक्तिक जबाबदारीवरच वटहुकूम काढण्यास प्रत्यवाय नाहीं. मात्र मागाहून गव्हर्नर जनरलला वाटल्यास त्यानें तो वटहुकूम परत घेण्याबद्दल गव्हर्नरास हुकूम काढावा; आणि मग गव्हर्नरनें ताबडतोब तो वटहुकूम परत घेतला पाहिजे. हा सर्व भाग सुयंत्रित राज्य-कारभाराच्या दृष्टीनें योग्य असाच आहे. वास्तविक इतका पाल्हाळ करण्याचेंही कारण नव्हतें. कारण ५४ ( १ ) कलमान्वयें गव्हर्नर हा

गव्हर्नर जनरलच्या हुकमतीखालीं, त्याच्यावर खास सोपविण्यांत आलेलें काम करणार व गव्हर्नर जनरल हा त्याच्यावर सोपविलेली जबाबदारी १४ ( १ ) कलमान्वयें स्टेट सेक्रेटरीच्या देखरेखीखालीं व हुकमतीखालीं पार पाडणार व स्टेट सेक्रेटरी हा ब्रिटिश प्रधानमंडळ व ब्रिटिश पार्लमेंट यांना जबाबदार. तेव्हां गव्हर्नरची ही वटहुकमाची सत्ता म्हणजे पार्लमेंटनें गाजविलेली, प्रांतिक कायदेमंडळांना नामशेष करणारी सत्ताच होय.

कांही प्रसंगी कायदे करण्याबाबत गव्हर्नरचा अधिकार

९०.—( १ ) ह्या कायद्यान्वयें आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें जीं कामें गव्हर्नराला करणें भाग आहे तीं समाधानकारकपणें पार पाडण्यास स्वतःस समर्थ करण्याच्या हेतूस्तव कायद्यानें तरतूद करणें अगत्याचें आहे असें गव्हर्नराला एखाद्या वेळीं वाटल्यास त्यानें कायदेमंडळाच्या सभेला अथवा सभांना संदेश पाठवून आपल्या मतानें कायदा करणें कां जरूर आहे ती सर्व परिस्थिति समजावून सांगावी आणि—

( क ) त्यानें तावडतोब त्याला आवश्यक वाटणारीं कलमें असलेल्या बिलाचा 'गव्हर्नराचा कायदा' म्हणून कायदा करून टाकावा; किंवा

( ख ) त्याला आवश्यक वाटणाऱ्या बिलाचा मसुदा संदेशाबरोबर जोडून पाठवावा.

( २ ) मागील पोटकलमांतील ( ख ) परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें ज्या ठिकाणीं गव्हर्नर उपाययोजना करील त्या ठिकाणीं त्यानें एक महिना संपल्यानंतर केव्हांही, कायदेमंडळाच्या सभेला अथवा सभांना धाडलेल्या मसुद्याच्या स्वरूपांत अथवा त्याला आवश्यक वाटणाऱ्या दुरुस्त्यांसह कायदेमंडळाला त्यानें सुचविलेल्या बिलाचें 'गव्हर्नराचा कायदा' म्हणून कायद्यांत रूपान्तर करावें, परंतु असें करण्यापूर्वी, त्या बिलासंबंधांत अगर त्या बिलांत करण्याकरितां सुचविलेल्या दुरुस्त्यांसंबंधांत वरील अवधींत एका सभागृहानें अथवा दोहोंपैकीं कोणत्याही सभागृहानें त्याच्याकडे विनंतिअर्ज सादर केला असल्यास, त्याचा त्यानें विचार करावा.

( ३ ) गव्हर्नरनें मंजुरी दिलेल्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याइतकीच 'गव्हर्नरच्या कायद्या'ला शक्ति आणि परिणाम राहील आणि त्याच पद्धतीनें तो राजेसाहेबांकडून नामंजूर होण्यास पात्र राहील; आणि त्या कायदेमंडळाच्या कायद्यांत कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें असतां जी तरतूद बंधनकारक मानली जाणार नाहीं अशी कोणतीही तरतूद या कायद्यांत जर आणि जितक्या मर्यादेपर्यंत केलेली असेल तर आणि तेवढ्यापुरता तो कायदा बंधनकारक राहणार नाहीं :

मात्र फीडरल कायदेमंडळाच्या कायद्याला विरोधी असणाऱ्या प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्याचा अंमल होण्यासंबंधींच्या या कायद्यांतील तरतुदींकरितां 'गव्हर्नराचा कायदा' गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेवलेला व त्यानें संमति दिलेला कायदा म्हणून मानण्यांत येईल.

(४) गव्हर्नराचा प्रत्येक कायदा गव्हर्नर जनरलच्या मार्फत स्टेटसेक्रेटरीकडे, (भारतमंत्री) ताबडतोब कळविण्यांत येईल आणि त्याच्याकडून पार्लमेंटच्या प्रत्येक सभागृहापुढें ठेवण्यांत येईल.

(५) या कलमाखालील गव्हर्नराचीं कामें तो आपल्या मर्जीप्रमाणें करील परंतु गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें दिलेल्या अनुमोदनाखेरीज या कलमांतील आपले अधिकार गव्हर्नर चालविणार नाहीं.

(अ) ज्या कारणास्तव ८९ व्या कलमांत गव्हर्नराला वटहुकूम काढण्याचा अधिकार देण्यांत आला आहे त्याच कारणास्तव ९० व्या कलमांत 'कायदा' करण्याचा अधिकार देण्यांत आला आहे. फरक इतकाच कीं, वटहुकूम काढल्यापासून सहा महिनेपर्यंत चालू शकतो व फार झालें तर त्याची मुदत आणखी सहा महिने वाढवितां येते. तसें बंधन गव्हर्नराच्या कायद्यावर नाहीं; त्या कायद्यांत गव्हर्नराला जी मुदत घालावीशी वाटेल तितक्या मुदतीपर्यंत त्याचें आयुष्य असणार; मग तें सहा महिने असो किंवा सहा वर्षें असो, त्याला मर्यादा म्हणून नाहीं. हा कायदा त्यानें मनांत आल्याबरोबर ताबडतोब करून टाकावा किंवा कायदेमंडळाकडे बिलाचा खर्डा पाठवून द्यावा. त्याच्यावर विचार करून कायदेमंडळानें आपलें मत कळवावें; गव्हर्नरनें त्याचा स्वीकार करावा किंवा त्याग करावा; एक महिन्यापेक्षां अधिक वेळ कायदेमंडळाला विचार करण्याकरितां मिळणार नाहीं; तेवढी मुदत संपल्याबरोबर आपल्या बिलाचा दुरुस्त्यांसह अगर तशाचा तसाच कायदा करून टाकण्याचा अधिकार (२) पोटकलमानें गव्हर्नरास दिला आहे. मागील ८९ व्या कलमांत गव्हर्नराच्या या सुलतानी सत्तेला जीं बंधनें घालण्यांत आलीं आहेत तींच जशींच्या तशींच या ९० व्या कलमांत घालण्यांत आलीं आहेत. त्यासंबंधींचा ऊहापोह मागील कलमावरील टिप्पण्यांत केलेला असल्यामुळें या ठिकाणीं पुनः त्याचा प्रपंच करण्याचें प्रयोजन नाहीं. एवढें सांगितलें म्हणजे बस्स आहे कीं, ही कायदा करण्याची योजना व तरतूद मात्र अजब व अभूतपूर्व अशी आहे.

तात्पर्य, १९३५ च्या कायद्यांत हिंदुस्थानांतील गव्हर्नरांना व गव्हर्नर जनरलला कायदे व वटहुकूम करण्याचे जे अधिकार दिले आहेत तसे सिंहलद्वीपासारख्या मागासलेल्या प्रदेशांच्या गव्हर्नरांना सुद्धां देण्यांत आलेले नव्हते. परंतु एकदां ही सुलतानी अधिकार हातीं ठेवण्याची साम्राज्यवाद्यांना चटक लागल्याबरोबर हिंदुस्थानचें उदाहरण त्यांनीं सिलोनपुढें ठेविलें आणि सिलोनमंत्र्यांनीं सिलोन गव्हर्नराच्या अधिकारावर अतिक्रमण करूं नये, एवढ्याकरितां जानेवारी १९३८ मध्यें गव्हर्नराला ऑर्डिनन्स काढण्याचे अधिकार देणारी ऑर्डर इन कौन्सिल काढण्यांत आली. शेजारधर्माचा हा लाभ !

## भाग ५ वा

## वगळलेले प्रदेश आणि अंशतः वगळलेले प्रदेश

वगळलेले प्रदेश आणि अंशतः वगळलेले प्रदेश

९१.—(१) ह्या कायद्यांत 'वगळलेला प्रदेश' आणि 'अंशतः वगळलेला प्रदेश' या शब्दसमुच्चयांचा अर्थ, राजेसाहेब ऑर्डर इन कौन्सिलअन्वयें ज्या प्रदेशांना अनुक्रमें वगळलेले अथवा अंशतः वगळलेले प्रदेश असें जाहीर करतील ते प्रदेश, असा आहे.

हा कायदा मंजूर झाल्यापासून सहा महिन्यांच्या आंत ऑर्डरीचा मसुदा सेक्रेटरी ऑफ स्टेट पार्लमेंटपुढें ठेवील—सदर ऑर्डर या पोटकलमान्वयें करण्यांत यावी अशी शिफारस पार्लमेंटनें राजेसाहेबांना करावयाची अशी योजना करण्यांत येत आहे.

(२) राजेसाहेबांनीं वाटेल त्या वेळीं ऑर्डर इन कौन्सिल काढून—

(क) सबंधच्या सबंध वगळलेला प्रदेश अथवा त्यापैकीं कोणताही विशिष्ट भाग हा अंशतः वगळलेला प्रदेश अथवा अशा प्रदेशाचा भाग होईल असें फर्मावावें;

(ख) सबंधच्या सबंध अंशतः वगळलेला प्रदेश अथवा त्यापैकीं कोणताही विशिष्ट भाग हा अंशतः वगळलेला प्रदेश किंवा अशा प्रदेशाचा भाग म्हणून रद्द करण्यांत येईल असें फर्मावावें;

(ग) कोणताही वगळलेला अथवा अंशतः वगळलेला प्रदेश, फक्त सीमा दुरुस्त करण्याच्या दृष्टीनें, बदलावा;

(घ) प्रांताच्या सीमा बदलल्या असतांना अथवा नवीन प्रांत निर्माण केला असतांना, कोणत्याही प्रांतांत पूर्वी अन्तर्भूत नसलेला कोणताही टापू हा वगळलेला प्रदेश अथवा अंशतः वगळलेला प्रदेश अथवा त्याचा भाग झाला असें जाहीर करावें,

आणि अशा कोणत्याही ऑर्डरींत राजेसाहेबांना आवश्यक आणि योग्य वाटतील त्या अवान्तर आणि क्रमप्राप्त अशा तरतुदी करण्यांत येतील, पण वर सांगितलेल्याखेरीज या कलमाच्या (१) पोटकलमाखालीं काढलेली ऑर्डर इन कौन्सिल मागाहूनच्या कोणत्याही ऑर्डरीनें बदलतां येणार नाहीं.

(अ) पोटकलम (१) मध्यें उल्लेखिलेली ऑर्डर इन कौन्सिल राजेसाहेबांनीं ३ मार्च १९३६ रोजीं 'गव्हमेंट ऑफ इंडिया (वगळलेले आणि अंशतः वगळलेले प्रदेश) ऑर्डर, १९३६' या नांवानें काढली. त्या ऑर्डरीच्या शेड्यूलच्या पहिल्या भागांत प्रांतवार 'वगळलेल्या प्रदेशां'ची व दुसऱ्या भागांत प्रांतवार 'अंशतः वगळलेल्या प्रदेशां'ची यादी देण्यांत आली आहे. या याद्या खालीं उतरून घेतों:—

**वगळलेले प्रदेश**

**मद्रास**

*लखदीव बेटें (मिनीकॉय धरून) व अमीनदिवी बेटें.*

**बंगाल**

*चित्तगाँग डोंगराळ प्रदेश.*

**पंजाब**

कांगरा जिल्ह्यांतील स्पिती आणि लहौल.

**आसाम**

ईशान्य सरहद्द (सादिया, बलिपरा आणि लखीमपूर) प्रदेश.

नागा डोंगराळ जिल्हा

लुशाई ,, ,,

काचर जिल्ह्यांतील उत्तर काचर डोंगराळ टापू.

**वायव्यसरहद्दप्रांत**

हजारा जिल्ह्यांतील उत्तर तनावल.

## अंशतः वगळलेले प्रदेश

### मद्रास

पूर्व गोदावरी एजन्सी व ओरिसा प्रांताकडे न गेलेला विजगापट्टम एजन्सीचा भाग.

### मुंबई

१ पश्चिम खानदेश जिल्ह्यांतील शहादें, नंदुरबार आणि तळोदें हे तालुके, नवापूर पेटा आणि अक्रानीमहाल, आणि पुढील मेहवासी चीफांच्या ताब्यांतील खेडीं ३० (१) काठीचा पर्वी (२) नालचा पर्वी (३) सिंगपूरचा पर्वी (४) गावहळीचा वालवी (५) चिखलीचा वस्सावा आणि (६) नवलपूरचा पर्वी.

२ पूर्वखानदेश जिल्ह्यांतील सातपुडा टेकड्यांवरील राखीव जंगलांचा प्रदेश.

३ नाशीक जिल्ह्यांतील कळवण तालुका आणि पेंट पेटा.

४ ठाणें जिल्ह्यांतील डहाणू आणि शहापूर हे तालुके व मोखाडा आणि उंबरगांव हे पेटे.

५ भडोच आणि पंचमहाल जिल्ह्यांतील दोहद तालुका आणि झालोद महाल.

### बंगाल

१ दार्जिलिंग जिल्हा.

२ मैमनसिंग जिल्ह्यांतील दिवाणगंज, श्रीबर्डी, नलिताबारी, हलुआघाट, दुर्गापूर आणि कलमाकांड हीं पोलिस ठाणीं.

### संयुक्तप्रांत

१ डेहराडून जिल्ह्याचा जौनसर-बवर परगणा.

२ कैमूर टेकडीच्या दक्षिणेस मिर्झापूर जिल्ह्याचा भाग.

### बिहार

१ छोटा नागपूर डिव्हिजन.

२ संताळ परगणे जिल्हा.

## मध्यप्रांत आणि वऱ्हाड

१ चांदा जिल्ह्यांतील सिरोंचा तहासिलींतील अहिरी जमीनदारी, आणि गरचिरोली तहसिलींतील धानोरा, दुधमाळा, गेवर्धा, झारपप्रा, खुतगांव, कोतगल, मुरमगांव, पळसगढ, रांगी, शिरसुंडी, सोनसरी, चंडला, गिलगांव, पै-मुरंडा आणि पोटेगांव या जमीनदाऱ्या.

२ छिंदवाडा जिल्ह्यांतील हर्राई, गोरखघाट, गोरपाणी, बटकागढ, बरदागाढ, प्रतापगढ (पगरा), अलमोद आणि सोनपूर या जहागिरी आणि पचमरी जहागिरीपैकीं छिंदवाडा जिल्ह्यांतील भाग.

३ मंडला जिल्हा.

४ बिलासपूर जिल्ह्यांतील पेंद्रा, केंदा, मातीन, लफा, उपरोरा, छुरी आणि कोरबा या जमीनदाऱ्या.

५ द्रुग जिल्ह्यांतील औंढी, कोरचा, पानबरस आणि अंबागढ चौकी या जमीनदाऱ्या.

६ बालाघाट जिल्ह्यापैकीं बाइहर तहसील.

७ अमरावती जिल्ह्यापैकीं मेलघाट तालुका.

८ बेतुल जिल्ह्यापैकीं भैंसदेही तहसील.

## आसाम

१ गारो टेकड्या जिल्हा.

२ मिकिर टेकड्या ( नवगांव व शिवसागर जिल्ह्यांतील ).

३ शिलांग म्युनिसिपालिटी आणि कँटोन्मेंटखेरीज खासी आणि जैंतिया डोंगराळ प्रदेशांतील ब्रिटिश भाग.

## ओरिसा

१ अनगुल जिल्हा.

२ संबळपूर जिल्हा.

३ मध्यप्रांतांतून बदलून आलेले प्रदेश.

४ गंजम एजन्सी टापू.

५ मद्रास इलाख्यांतील विझगापट्टम एजन्सीपैकीं बदलून आलेले प्रदेश.

वरील याद्यांवरून दिसून येईल कीं, मद्रास, बंगाल आणि आसाम या तीन प्रांतांत दोन्ही तऱ्हेचे प्रदेश आहेत आणि पंजाब, वायव्यसरहद्द, ओरिसा, मुंबई, संयुक्तप्रांत, बिहार आणि मध्यप्रांत-वऱ्हाड या सात प्रांतांत कोणत्या तरी एक प्रकारचा वगळलेला प्रदेश आहे. एकट्या सिंध प्रांतांत वरील दोन्हींपैकीं एकही प्रकारचा वगळलेला प्रदेश नाहीं. गव्हर्मेंट ऑफ इंडिया बिलांत आसाम व बंगाल या दोन प्रांतांत कांहीं प्रदेश पूर्णपणें वगळलेले होते व ओरिसा, बिहार, बंगाल व मद्रास या चार प्रांतांत कांहीं प्रदेश अंशतः वगळलेले होते. परंतु वरील बिलाची कमिटींत चर्चा सुरू झाली तेव्हां सभासदांच्या मनांत अशी भीति उत्पन्न झाली कीं, " अरे, आतां किती तरी मागासलेली प्रजा हिंदी कायदेमंडळांच्या व प्रधानमंडळांच्या ताब्यांत सांपडणार, आणि त्यांचें पुढें होणार तरी काय ?" यामुळें ब्रिटिश सरकारनें पुनः दुरुस्त शेड्यूल तयार केलें आणि यांत किंवा त्यांत असें कोठें तरी आणखी कित्येक प्रदेश ढकलले. अशा तऱ्हेनें शेवटीं तयार झालेली यादी वर दिली आहे. १८७४ चा शेड्यूल्ड डिस्ट्रिक्ट ॲक्ट व १९१९ च्या कायद्यांतील बॅकवर्ड ट्रॅक्टसंबंधींचा भाग याअन्वयें या मागासलेल्या व वन्य जातींनीं भरलेल्या प्रदेशांचा राज्यकारभार चालत असे. १९३५ च्या कायद्यानें ( ९१ व ९२ या कलमांनीं ) त्या राज्यकारभारास एक प्रकारचें निश्चित वळण लावलें आहे. ज्या टापूंत एकसलग रानटी जातींचा भरणा असेल तो टापू संपूर्णपणें वगळण्यांत आला आहे आणि ज्या टापूंत रानटी जातींबरोबरच शेतकरी, कुणबी वगैरे जाती मिसळून राहत आहेत अशा टापूला 'अंशतः वगळलेला' मानण्यांत आला आहे.

( आ ) दुसऱ्या पोटकलमांत हें वर्गीकरण विशिष्ट बाबतींत बदलण्याची व्यवस्था केली आहे. कालांतरानें रानटी जातींत सुधारणा होऊन त्यांना निराळ्या राजवटींत आणणें जरूर होईल. दुसरी ऑर्डर इन कौन्सिल काढून वरील ऑर्डर इन कौन्सिलमधील प्रदेश वाढवितां येणार नाहींत; कमी मात्र करितां येतील. तसेंच 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांना 'वगळलेल्या' प्रदेशांत ढकलतां येणार नाहीं. राजेसाहेबांची सत्ता 'वगळलेल्या' प्रदेशांना 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशांत सामील करणें व 'अंशतः

**वगळलेले' प्रदेश प्रांताच्या इतर प्रदेशांत सामील करणें या दोन बाबीं-पुरतीच नियमित करण्यांत आली आहे ही मोठी खैर झाली म्हणावयाची.**

वगळलेल्या आणि अंशतः वगळलेल्या प्रदेशाची राज्यव्यवस्था

९२:—( १ ) प्रांताची अम्मलबजावणीबाबतची सत्ता त्यांतील वगळलेल्या आणि अंशतः वगळलेल्या प्रदेशावर चालते परंतु या कायद्यांत तद्विरुद्ध कांहींही असलें तरी गव्हर्नरनें तसें जाहीर खबरद्वारा फर्मावल्याशिवाय फीडरल कायदेमंडळाचा अथवा प्रांतिक कायदेमंडळाचा कोणताही कायदा वगळलेल्या प्रदेशाला अगर अंशतः वगळलेल्या प्रदेशाला लागू होणार नाहीं आणि एखाद्या कायद्याबाबत असें फर्मान काढतांना गव्हर्नरनें असें फर्मावावें कीं, त्या प्रदेशाला अथवा त्या प्रदेशाच्या विशिष्ट भागाला सदर कायदा लागू केला जात असतांना त्यांत गव्हर्नराला योग्य वाटतील ते अपवाद अथवा फेरफार केल्यानंतरच तो अमलांत येईल.

( २ ) प्रांतांतील जो प्रदेश त्या वेळेपुरता वगळलेला अथवा अंशतः वगळलेला प्रदेश असेल अशा कोणत्याही प्रदेशाच्या शांततेकरितां आणि सुराज्याकरितां गव्हर्नरनें रेग्युलेशन करावेत आणि अशा तऱ्हेनें केलेले रेग्युलेशन, विशिष्ट प्रदेशाला त्या वेळेपुरता लागू असणारा फीडरल कायदेमंडळाचा अगर प्रांतिक कायदेमंडळाचा कोणताही कायदा अथवा सध्यां अस्तित्वांत असलेला कोणताही हिंदी कायदा रद्द अथवा दुरुस्त करितील.

या पोटकलमाखालीं केलेले रेग्युलेशन गव्हर्नर जनरलला ताबडतोब सादर करण्यांत येतील आणि त्यांना आपल्या मर्जीप्रमाणें तो संमति देईपर्यंत ते अमलांत येणार नाहींत, आणि राजेसाहेबांच्या कायदे नामंजूर करण्याच्या अधिकाराबाबतचीं या कायद्याच्या या खंडांतील कलमें, जशीं तीं गव्हर्नर जनरलनें संमति दिलेल्या वरील प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यांना लागू होतात तशीं, गव्हर्नर जनरलनें संमति दिलेल्या रेग्युलेशनच्या बाबत लागू होतील.

( ३ ) प्रांतांतील त्या वेळेपुरत्या वगळलेल्या प्रदेशाबाबत गव्हर्नर आपलीं कामें आपल्या मर्जीप्रमाणें करील.

**( अ ) पहिल्या पोटकलमांत प्रांताची राज्यकारभार चालविण्याबाबतची सत्ता या वगळलेल्या अथवा अंशतः वगळलेल्या प्रदेशावर चालते असें म्हटलें आहे. तिसऱ्या पोटकलमान्वयें 'वगळलेल्या' प्रदेशावरील सत्ता गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें चालवावयाची आहे; अर्थात् बाकी राहिलेल्या म्हणजे अंशतः वगळलेल्या प्रदेशावरील अधिकार गव्हर्नरनें**

मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें चालवावयाचा हें ओघानें प्राप्त आहे. परंतु ५२ (१) (ङ) कलमाप्रमाणें या अंशतः वगळलेल्या प्रदेशाबाबत गव्हर्नर-वर जादा जबाबदारी सोपविण्यांत आली आहे आणि तेवढ्यापुरती मंत्र्यांची सत्ता मर्यादित केली गेली आहे. या जादा जबाबदारीबाबत गव्हर्नरला दिलेल्या आज्ञापत्रांत ( कलम १५ ) म्हटलें आहे कीं, " ही जादा जबाबदारी पार पाडणें सुलभ जावें म्हणून गव्हर्नरनें त्याला योग्य वाटल्यास त्या प्रदेशांतील लोकांच्या गरजा काय आहेत हें समजून घेण्याकरितां व त्याबाबत सल्ला देण्याकरितां एखाद्या अंमलदाराची नेमणूक करावी." मुंबई प्रांतांत वगळलेल्या प्रदेशांचा प्रश्नच नाहीं; परंतु भिल्ल, वारली, कोळी, ठाकरडे, पटेलिया इ० जाती बव्हंशानें असलेल्या अंशतः वगळलेल्या प्रदेशाकरितां वरील आज्ञापत्रांतील कलमाच्या आधारें मुंबईच्या गव्हर्नरनें सध्यां मुंबईचा म्युनिसिपल कमिशनर असलेल्या डी. सिमिंगटन आय्. सी. एस्. या अधिकाऱ्याची चार महिनेपर्यंत नेमणूक केली होती, हें जातां जातां सांगितल्यास कायदा व आज्ञापत्र यांतील कलमांची कशी अम्मलबजावणी चालू आहे हें दिसून येईल. ही जादा ज़बाबदारी योग्य तऱ्हेनें पार पाडण्याकरितां अनुषंगानें अनेक अधिकार गव्हर्नराला देण्यांत आले आहेत. ७८ ( २ ) कलमाप्रमाणें अंदाजपत्रकांत जादा रकमा घालण्याचा व ८० ( १ ) कलमाप्रमाणें अंदाजपत्रकांतील रकमा असेंब्लीनें कमी केल्यास त्या परत मुळांत होत्या तितक्या घालण्याचा अधिकार गव्हर्नरला देण्यांत आला आहे. ७८ ( ३ ) ( ङ ) कलमाप्रमाणें वगळलेल्या प्रदेशावर खर्च करावयाच्या रकमांवर असेंब्लीचें मत घेतलें जात नाहीं. ७९ ( १ ) कलमाप्रमाणें त्याच्यावर चर्चा करण्यास कोणतीही हरकत नाहीं.

आसाम असेंब्लींतील विरोधी पक्षाचे ( कॉंग्रेस ) पुढारी श्री. गोपीनाथ बारडलोई यांनीं 'या वगळलेल्या प्रदेशाबाबत आसाम प्रांताला दरसाल ८ लाख रुपयांची तूट सोसावी लागत असल्याबद्दल' मध्यवर्ती सरकाराविरुद्ध अतिशय जोराची तक्रार असेंब्लीपुढें मांडली. त्या तक्रारीला मुख्य प्रधान सर सादुल्ला यांनींही पाठिंबा दिला; परंतु मध्यवर्ती सरकारनें या तक्रारीकडे कानाडोळा केला आहे.

तसेंच ८४ ( १ ) ( घ ) ( ii ) कलमान्वयें गव्हर्नराची परवानगी असल्याशिवाय या वगळलेल्या प्रदेशासंबंधींच्या फक्त खर्चाच्या रकमेच्या चर्चेखेरीज कोणत्याही गोष्टीवर चर्चा करितां येणार नाहीं व प्रश्नही विचारतां येणार नाहींत.

( आ ) आतां या प्रदेशाबाबत कायदे करण्याच्या अधिकाराबाबत चर्चा करूं. ९२ ( १ ) कलमाप्रमाणें गव्हर्नरनें प्रांतिक गॅझेटमध्यें जाहीर केल्याशिवाय कोणताही प्रांतिक, हिंदी अथवा फीडरल कायदा या प्रदेशांना लागू करितां येणार नाहीं. या ठिकाणीं 'गव्हर्नर' शब्दानें 'मंत्रिमंडळ' असा अर्थ 'अंशत: वगळलेल्या प्रदेशा'पुरताच घेतला पाहिजे; कारण पोटकमल ( ३ ) प्रमाणें 'वगळलेले' प्रदेश 'मंत्रिमंडळाच्या' कक्षेतून वगळलेले आहेत. 'अंशत: वगळलेल्या' प्रदेशाबाबतही गव्हर्नराच्या 'वैयक्तिक मता'ची तलवार मंत्रिमंडळाच्या मल्ल्यावर नेहमीं टांगती असणार हें उघड आहे. नमुन्यादाखल हे कायदे कसे लागू केले जातात याचीं मुंबई प्रांतांतील दोन चार ताजीं उदाहरणें देतों:—

"

मुंबई कॅसल.

ता० २३।३।३८

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टच्या ९२ कलमानें दिलेल्या अधिकाराप्रमाणें मुंबईचा गव्हर्नर असा हुकूम काढीत आहे कीं, मुंबई तंबाकू ( दुरुस्ती ) कायदा, १९३८ मुंबई प्रांतांतील अंशत: वगळलेल्या प्रदेशांना लागू करण्यांत येत आहे.

मुंबईच्या गव्हर्नरच्या आज्ञेवरून,

इ. डब्ल्यू. पेरी,

सेक्रेटरी टु गव्हर्मेंट."

"

मुंबई कॅसल,

ता० ३१।३।३८

नोटिफिकेशन ९३२६ अ ( १ ).

१९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टच्या ९२ कलमानें दिलेल्या अधिकाराप्रमाणें मुंबईचा गव्हर्नर असा हुकूम काढीत आहे कीं,

मुंबई फिनान्स ( दुरुस्ती ) कायदा, १९३८ ( १९३८ चा ७ वा कायदा ) मुंबई प्रांतांतील अंशतः वगळलेल्या प्रदेशांना लागू करण्यांत येत आहे.

मुंबईच्या गव्हर्नरच्या आज्ञेवरून,
एच्. व्ही. आर. आयंगार,
सेक्रेटरी टु गव्हर्मेंट."

"नो० ११२ ( अ ). १९३५ च्या कायद्याच्या ९२ कलमानें दिलेल्या अधिकारान्वयें मुंबईचा गव्हर्नर असा हुकूम काढीत आहे कीं, मुंबई डिस्ट्रिक्ट म्युनिसिपल आणि म्युनिसिपल बरोज ( अमेंडमेंट ) ॲक्ट, १९३८ ( १९३८ चा ९ वा कायदा ) मुंबई प्रांतांतील अंशतः वगळलेल्या प्रदेशांना लागू करण्यांत येत आहे.

मुंबईच्या गव्हर्नराच्या आज्ञेवरून,
व्ही. एस्. भिडे,
सेक्रेटरी टु गव्हर्मेंट."

"नो० ४७८२ (एफ्). १९३५ च्या कायद्याच्या ९२ कलमानें दिलेल्या अधिकारान्वयें मुंबईचा गव्हर्नर असा हुकूम काढीत आहे कीं, मुंबई प्राथमिक शिक्षण (दुरुस्ती) कायदा, १९३८ (१९३८ चा १२ वा कायदा) मुंबई प्रांतांतील अंशतः वगळलेल्या प्रदेशांना लागू करण्यांत येत आहे.

मुंबईच्या गव्हर्नराच्या आज्ञेवरून,
व्ही. एस्. भिडे,
सेक्रेटरी टु गव्हर्मेंट."

( आ ) दुसऱ्या पोटकलमांत या 'वगळलेल्या' अथवा 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशाच्या शांततेकरितां व स्वस्थतेकरितां आणि राज्यकारभार चांगला चालावा म्हणून 'रेग्युलेशन' करण्याची गव्हर्नराला सत्ता देण्यांत आली आहे. ८८ व ८९ या कलमांत वर्णिलेल्या 'वटहुकमा'सारखाच हा 'रेग्युलेशन'चा प्रकार आहे. नव्या प्रांतिक स्वराज्याच्या राजवटींत १८१८ ( बंगाल), १८२७ ( मुंबई ) या सालांत मंजूर झालेल्या रेग्युलेशनप्रमाणें, रेग्युलेशन प्रांतापुरते तरी अस्तित्वांत राहणार नाहींत अशी

अपेक्षा होती; परंतु ती या कलमांतील 'रेग्युलेशन'मुळें फोल ठरली आहे. ८८ कलमांतील वटहुकूम ज्याप्रमाणें मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें गव्हर्नरनें काढावयाचे आहेत त्याप्रमाणें 'अंशत: वगळलेल्या' प्रदेशापुरते रेग्युलेशन करण्याचें काम गव्हर्नरानें मंत्रिमंडळाच्या सल्ल्यानें केलें पाहिजे; अर्थात् याबाबत मंत्रिमंडळाचा सल्ला प्रसंगवशात् न जुमानतां गव्हर्नराला आपलें वैयक्तिक मत चालवितां येईल [ कलम ५२ ( १ ) ( ङ ) ]. प्रांतिक अथवा मध्यवर्ती अथवा फीडरल कायद्यांना रद्द करण्याचें वा दुरुस्त करण्याचें सामर्थ्य या रेग्युलेशनमध्यें ठेवण्यांत आलें आहे. कॉंग्रेस-प्रांतांत दारूबंदीचें धोरण जाहीर झालें असून त्याअन्वयें कित्येक प्रांतांतून दारूबंदीचे कायदे करण्यांत आले आहेत; कांहीं कांहीं प्रांतांत विशिष्ट टापू 'कोरडे' (दारूदुकानविरहित) करण्यांत येत आहेत. परंतु या वन्यजातींच्या बाबत, युरोपियनांच्या बाबतींत जसें स्वतंत्र धोरण अमलांत आणलें जात आहे तसें, निराळें धोरण ठेवण्यांत येत आहे. पश्चिम खानदेशांतील भिल्लांच्या टापूंत, गैरकायदा दारू गाळणें नाहींसें व्हावें म्हणून, मुंबई सरकारनें स्वस्त दारू विकण्याचें ठरविलें आहे.

या रेग्युलेशनांच्या बाबत गव्हर्नरावर नियंत्रण म्हणजे वरच्या अधिकाऱ्यांचें; म्हणजे गव्हर्नर जनरलनें संमति दिल्याशिवाय तो मुळीं अमलांतच येणार नाहीं. 'ऑर्डिनन्स' आणि 'रेग्युलेशन' यांमध्यें हा असा थोडा बारकाव्याचा फरक आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. त्याचप्रमाणें गव्हर्नर जनरलनें जरी संमति दिली व रेग्युलेशन अमलांत आला तरी तो राजेसाहेबांना नामंजूर करतां येतो. वर 'गव्हर्नर जनरलनें संमति दिल्या-शिवाय तो ( रेग्युलेशन ) मुळीं अमलांतच येणार नाहीं' असें जें म्हटलें आहे त्याला पाठीमागें थोडा इतिहास आहे. सायमन कमिशननें हे मागासलेले प्रदेश प्रांतांकडून काढून घेऊन मध्यवर्ती सत्तेकडे सोपवावेत अशी शिफारस केलेली होती. त्यानंतरच्या व्हाइटपेपर योजनेंत हे प्रदेश गव्हर्नराच्या ताब्यांत द्यावेत परंतु त्यांच्यावर मंत्र्यांचा ताबा मात्र चालतां कामा नये अशी दुरुस्ती सुचविली गेली. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें सुचविलेली योजना मान्य होऊन ती कायद्यांत ग्रथित झाली आहे. रेग्युलेशन गव्हर्नर जनरलनें काढले काय किंवा गव्हर्नरनें काढलेले असले

तरी त्याच्या मंजुरीशिवाय ते अंमलांत येणार नाहींत अशी स्थिति असलेली काय, दोहोंमध्यें फरक फारच थोडा आहे. दुसऱ्या परिस्थितींतील गव्हर्नर हा जवळ असतो व 'अंशतः वगळलेल्या' प्रदेशापुरती का होईना, मंत्र्यांची सत्ता थोड्याफार अंशानें चालूं शकते, हा तो फरक होय.

( इ ) नवीन घटना सुरू झाल्यानंतरच्या पहिल्या वर्षांत निरनिराळ्या गव्हर्नरांनीं आपल्या प्रवासांत या विशिष्ट प्रदेशांना भेटी दिल्या व तेथल्या लोकांना आपल्यावर असलेल्या जबाबदारीची जाणीव दिली:—

( १ ) डुमका ( संताळ परगणा ) येथें भाषण करतांना बिहारचे गव्हर्नर म्हणाले : " आपल्या टापूंत वैद्यकीय मदतीची वाढ माझें मंत्रिमंडळ केल्याशिवाय राहणार नाहीं. रस्त्यांची सुधारणा व वैद्यकीय मदतीची वाढ या गोष्टी मी सरकारच्या नजरेस आणून देण्याचा प्रयत्न करीन."

( २ ) दार्जिलिंग येथें भाषण करतांना बंगालचे माजी गव्हर्नर सर जॉन अँडरसन म्हणाले : " माझ्यावर दार्जिलिंग जिल्ह्याबाबत जादा जबाबदारी आहे याचा अर्थ प्रधानमंडळावरील जबाबदारी दूर झाली असा बिलकुल नाहीं. माझा या जिल्ह्याशीं जो नेहमीं संबंध येत असे त्यामुळें मला असेंच म्हणावेंसें वाटतें कीं, राजकीय खळबळ व पक्षनिविष्ट राजकारण यांपासून सरकार अलिप्त राहून सुद्धां आपल्या या प्रदेशाकडे नेहमीं सरकारचें लक्ष असे."

( ३ ) मुंबईचे गव्हर्नर सर रॉजर लमली यांनीं आपल्या गुजराथच्या दौऱ्यांत दोहद झालोद या अंशतः वगळलेल्या भागाला भेट दिली त्या प्रसंगीं तेथील लोकांना त्यांनीं सांगितलें कीं, " आपल्या कल्याणाची माझ्यावर विशेष जबाबदारी सोपविण्यांत आली आहे. आपणाला फायदेशीर होणार नाहींत असे कोणतेही हुकूम मी मंजूर करणार नाहीं व असे कोणतेही कायदे मी आपल्या टापूला लावणार नाहीं."

गव्हर्नरांच्या खेरीज निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं अशा प्रदेशांच्या उन्नतीस्तव प्रयत्न चालविले आहेत. मुंबईच्या बॅकवर्ड क्लास बोर्डानें अंशतः वगळलेल्या प्रदेशांतील जातींच्या सुधारणेकरितां स्वतंत्र जादा रक्कम वेगळी काढून ती शिक्षण इत्यादि उद्धाराच्या कामाकरितां खर्च करण्याचें ठरविलें आहे. भिल्लसेवामंडळाच्या लक्ष्मीदास श्रीकांत एम्. एल्. ए. यांच्या सूचने-

प्रमाणें भिल्लांना लोकसंख्येच्या प्रमाणांत लोकल बोर्डावर व ग्रामपंचायतीवर प्रतिनिधी देण्याची खटपट चालू आहे. ओरिसा प्रांतांत शेंकडा ६० इतका टापू 'अंशतः वगळलेला' आहे. सर्व दृष्टींनीं तो अतिशय मागासलेला आहे. त्याची सुधारणा करण्याचा खर्च मध्यवर्ती सरकारनें द्यावा अशी सायमन कमिशननें शिफारस केली होती. दळणवळणाचे चांगले रस्ते, सार्वजनिक आरोग्य, वैद्यकीय मदत आणि शिक्षण इ. सर्व बाजूंनीं सुधारणा होणें अत्यंत निकडीचें होऊन बसलें आहे. परंतु द्रव्याभावीं ओरिसा मंत्रिमंडळाचे सर्व मनोरथ विलीन होऊं पाहत आहेत. संयुक्त प्रांतांतील कुमाऊन हा विभाग १९३५ च्या कायद्यान्वयें 'वगळलेला' अगर 'अंशतः वगळलेला' प्रदेश मानण्यांत आलेला नाहीं. परंतु १९१९ च्या कायद्याप्रमाणें तो मागासलेला प्रदेश होता व त्या वेळचे कित्येक रेग्युलेशन व कायदे अद्याप कुमाऊनमध्यें चालू राहिलेले दिसून येतात. हा अन्याय दूर व्हावा व बाकीच्या प्रदेशाप्रमाणें आपल्यावर राज्य चालावें अशी न्याय्य मागणी तेथील लोकांनीं संयुक्तप्रांत सरकारकडे केली आहे. सरकारनें या सर्व प्रकरणाची चौकशी करण्याकरितां कमिटी नेमली आहे. अशा तऱ्हेनें या मागासलेल्या लोकांची उन्नति करणें हें आपलेंच पहिलें कर्तव्य आहे हें मंत्र्यांनीं ओळखून त्याप्रमाणें त्या प्रदेशांचा कारभार चालविला पाहिजे. या वन्य लोकांची काळजी आपणाला नाहीं व परकी सरकारला आहे हा विपरीत दिसणारा देखावा शक्य तितक्या लौकर नाहींसा केला पाहिजे व ही जी द्विदल राज्यपद्धति निर्माण केली गेली आहे तिचा हरिपुरा काँग्रेसच्या या विषयावरील ठरावाप्रमाणें नाश केला पाहिजे व " इतर भागाप्रमाणेंच याही टापूला लोकशाही राज्यकारभाराचा अनुभव आणून दिला पाहिजे."

## भाग ६ वा

## राज्यघटनायंत्र बंद पडलें असतां करण्याच्या तरतुदी

जाहिरनामा काढण्याबाबत गव्हर्नरचा अधिकार

**९३.**—(१) ह्या कायद्याच्या तरतुदीनुसार प्रांताचा राज्यकारभार चालवितां येणें शक्य नाहीं अशी स्थिति निर्माण झाल्याची जर गव्हर्नराला एखादे वेळेस खात्री पटली तर त्यानें जाहिरनामा काढून—

(क) त्या जाहिरनाम्यांत निर्दिष्ट केलेल्या मर्यादेपर्यंत आपलीं कामें आपण आपल्या मर्जीप्रमाणें करणार असल्याचें प्रसिद्ध करावें;

(ख) एखाद्या प्रांतिक संस्थेला अगर सत्ताधारी मंडळाला दिलेल्या अथवा त्यांनीं चालवावयाच्या अधिकारांपैकीं कांहीं अथवा सर्व आपण स्वतः धारण करावेत;

आणि अशा कोणत्याही जाहिरनाम्यांत, त्या जाहिरनाम्याच्या उद्देशांना मूर्त स्वरूप देण्याकरितां त्याला इष्ट अथवा आवश्यक वाटतील त्या अवान्तर व क्रमप्राप्त तरतुदी असाव्यात—त्यांत कोणतीही प्रांतिक संस्था अगर मंडळ यासंबंधींच्या ह्या कायद्यांतील एखाद्या कलमाची अम्मलबजावणी पूर्णतः अथवा अंशतः तात्पुरती बंद ठेवण्याची तरतूद असावी :

मात्र या पोटकलमांतील कोणत्याही गोष्टीच्या आधारें हायकोर्टाकडे सोपविलेले अगर हायकोर्टानें चालवावयाचे कोणतेही अधिकार धारण करण्याचा हक्क, अथवा हायकोर्टासंबंधींच्या ह्या कायद्यांतील एखाद्या कलमाची अम्मलबजावणी पूर्णतः अथवा अंशतः तहकूब ठेवण्याचा हक्क गव्हर्नराला असणार नाहीं.

(२) वरीलसारखा कोणताही जाहिरनामा मागाहून दुसरा जाहिरनामा काढून परत घेतां येईल अगर बदलतां येईल.

(३) या कलमाखालील जाहिरनामा—

(क) सेक्रेटरी ऑफ स्टेटला ताबडतोब कळविण्यांत येईल आणि त्याच्याकडून तो पार्लमेंटच्या प्रत्येक सभागृहापुढे ठेवला जाईल;

(ख) पूर्वी काढलेला जाहिरनामा रद्द करणारा जाहिरनामा तो नसल्यास, सहा महिन्यांची मुदत संपल्यावर आपोआप नष्ट होईल:

मात्र वरीलसारखा जाहिरनामा चालू ठेवण्यास पसंती दर्शविणारा ठराव जर आणि जितक्यांदा पार्लमेंटच्या दोन्ही सभागृहांकडून मंजूर केला जाईल तर आणि तितक्यांदा तो जाहिरनामा, परत घेतला गेला नसल्यास, या पोटकलमाखालीं ज्या तारखेला तो एरवीं नष्ट झाला असता त्या तारखेपासून आणखी बारा महिन्यांच्या अवधीपर्यंत अमलांत राहील, परंतु कांहीं झालें तरी वरीलसारखा जाहिरनामा तीन वर्षांपेक्षां जास्त काळपर्यंत अमलांत राहणार नाहीं.

(४) या कलमाखालील जाहिरनाम्यान्वयें जर गव्हर्नर कायदे करण्याचा प्रांतिक कायदेमंडळाचा एखादा अधिकार स्वतः धारण करील तर तो अधिकार चालवून त्यानें केलेला कोणताही कायदा, त्यांतील अटींच्या मर्यादेंत, तो जाहिरनामा नष्ट झाल्या दिवसापासून दोन वर्षें संपून जाईपर्यंत अमलांत राहील, याला अपवाद म्हणजे या काळांत केव्हांही योग्य त्या कायदेमंडळाच्या कायद्यानें तो रद्द करितां येईल किंवा त्याला पुनः कायद्याचें रूप देतां येईल आणि प्रांतिक ॲक्ट अथवा प्रांतिक लॉ अगर प्रांतिक कायदेमंडळाचे ॲक्ट अथवा लॉ यांचा ह्या

कायद्यांत जेथें जेथें उल्लेख येईल तेथें तेथें त्यांत वरीलसारख्या (जाहिरनाम्यांतील) कायद्यांचा अन्तर्भाव होतो असा अर्थ केला जाईल.

(५) या कलमाखालील गव्हर्नराचीं कामें आपल्या मर्जीप्रमाणें त्याच्याकडून केलीं जातील आणि गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें अनुमोदन दिलेलें असल्याशिवाय या कलमाखालीं कोणताही जाहिरनामा गव्हर्नरला काढतां येणार नाहीं.

(अ) या ९३ व्या कलमापूर्वीं प्रांतिक राज्यकारभाराचें वर्णन करणारीं जीं कलमें येऊन गेलीं आहेत त्यांच्याअन्वयें प्रांताचा राज्यकारभार चालविणें अशक्य होऊन बसलें तर गव्हर्नरनें त्याला या कलमाअन्वयें दिलेल्या सुलतानी अधिकाराचा उपयोग करण्याचा आहे. १९३७ च्या एप्रिल, मे, जून या महिन्यांत असा प्रसंग हिंदुस्थानच्या सहा प्रांतांत अगदीं नजीक येऊन ठेपला होता. या प्रांतांतील बहुसंख्याक कॉंग्रेस पक्षानें आपली आश्वासनमागणी प्रांतिक गव्हर्नरांनीं मान्य न केल्यामुळें अधिकारसूत्रें धारण करण्याचें नाकारलें होतें. गव्हर्नरला दिलेल्या आज्ञापत्रांत (कलम ७) कायदेमंडळाचें स्थिर बहुमत ज्याच्या पाठीशीं आहे अशा इसमाच्या सल्ल्यानें मंत्रिमंडळ नेमावें असें स्वच्छ म्हटलें आहे. ही आज्ञा धाब्यावर बसवून गव्हर्नरांनीं ज्यांच्या पाठीमागें कायदेमंडळांतील बहुमत नाहीं अशा चार माणसांना हाताशीं धरून कशींबशीं मंत्रिमंडळें बनविलीं. वास्तविक याचा खरा अर्थ गव्हर्नरनें ९३ कलमाचाच अप्रत्यक्ष उपयोग करून अम्मलबजावणीची सर्व सत्ता आपल्याच हातीं घेतली व या कामीं आपणांस मदत करण्याकरितां त्यानें कायदेमंडळांतील चार सभासद 'प्रधान' हें भपकेदार नांव देऊन नोकरीला ठेवले, त्यांचा पगारही त्यानेंच ठरविला व लोकांच्या डोळ्यांत धूळ टाकून त्यांच्याकडून आपल्या सुलतानी सत्तेला दृष्टीआड लपविण्याचा प्रयत्न केला, हा होय. आतां कायदे करण्याची सत्ता— यासंबंधीं बोलावयाचें तर त्यानें कायदेमंडळाचीं अधिवेशनेंच बोलावण्याचें नाकारलें; म्हणजे एक प्रकारें कायदेमंडळेंच गुंडाळून ठेवलीं असें म्हणावयास बिलकुल हरकत वाटत नाहीं. वास्तविक अशा परिस्थितींत इतर लोकशाहीप्रधान देशांत बंडच झालें असतें; इतकी गंभीर व क्रांतीला पोषक अशी स्थिति त्या वेळीं निर्माण झाली होती. प्रो. कीथ यांनीं

आपल्या 'गव्हर्मेंट्स ऑफ दि ब्रिटिश एम्पायर' ( पृ. ३८८ ) ग्रंथांत म्हटलें आहे कीं, " जो गव्हर्नर खऱ्या ( नामधारी नव्हे ) प्रधाना-शिवाय अम्मल गाजविण्याचा प्रयत्न करील त्याला आपलें काम करण्या-करितां खालील अधिकाऱ्यांकडून मदतच मिळणार नाहीं." हिंदुस्थानांत अद्याप ही परिस्थिति निर्माण होण्याला अवधि आहे. आपली राज्य-क्रांतीची तऱ्हा शांततेची असली तरी त्या क्रांतींत नोकर वर्गानें, गव्हर्नरा-ला व त्यानें नेमलेल्या अधिकाऱ्यांना मान न तुकवितां, लोकप्रतिनिधीं-चा हुकूमच मानला पाहिजे, अशी स्थिति जोंपर्यंत निर्माण झालेली नाहीं तोंपर्यंत कॉंग्रेसनें केलेली आश्वासनमागणी पुरी झाली नाहीं तरी राज्ययंत्र चालविण्याची जबाबदारी अंगावर घेण्याशिवाय—शांतिमय बंडाच्या मार्गाची तयारी नसल्यास—दुसरें कांहीं करण्याचें उरत नाहीं. अशासारखीच परिस्थिति जमेका बेटांत १८३८ सालीं उत्पन्न झाली होती. 'जमेका असेंब्लीनें मायदेश जें इंग्लंड त्याची ढवळाढवळ सहन न झाल्यामुळें, खर्चाकरितां पैसे देण्याचें नाकारलें आणि आपलें इतर काम करण्याची टाळाटाळ चालविली. " विशिष्ट मुदतींत पैसे मंजूर करा आणि आपलें कामकाज पाहूं लागा, नाहींपेक्षां घटना तहकूब करूं" अशी धमकी पार्लमेंटनें घालून जमेका असेंब्लीला वठणीवर आणिलें.' ( अर्स्किन मेकृत पार्लमेंटरी प्रॅक्टिस पृ. ४५ ). हुबेहुब अशीच जरी नाहीं तरी थोड्या फार अंशानें लॉर्ड लिनलिथगो यांनीं जून १९३७ च्या अखेरीस जी घोषणा केली तींत हाच सूर होता. कायद्याच्या कलमाला जितकें जास्तींत जास्त ताणून अर्थ करणें शक्य होतें तितकें त्यांनीं केलें; परंतु कॉंग्रेसची आश्वासनमागणी स्पष्ट शब्दांत व निःसंदिग्ध रीतीनें मान्य केली नाहीं. उभयपक्षीं तंटा सुरू करण्याची वृत्ति नसल्यामुळें समेट होऊन प्रांतिक स्वराज्याचें गाडें निमूटपणें चालूं झालें. परंतु अलीकडच्या बिहार-संयुक्तप्रांतांतील राजीनाम्यांनीं व ओरिसा प्रांतांतील गव्हर्नराच्या नेमणुकीबाबत राजीनाम्याचे धमकीनें हीच गोष्ट सिद्ध होत आहे कीं, या ९३ व्या कलमाकडे उभयपक्ष केव्हां खेचले जातील याचा नेम उर-लेला नाहीं. याचें कारण घटनाकायद्यांतील आंगिक दोषांत आहे हें कोणीही सांगूं शकेल. म्हणून हा कायदा परत घ्या व त्याच्या जागीं

राष्ट्राची आकांक्षा पूर्ण करणारा व राष्ट्रानें निवडलेल्या घटनासमितीनें तयार केलेला कायदा मान्य करा अशी राष्ट्राची सतत मागणी चालू आहे. ९३ कलमाप्रमाणें एक तर घटना तहकूब करून पुनः गव्हर्नराधिष्ठित नोकरशाहीचा अम्मल चालू व्हावयाचा, का संपूर्ण स्वराज्याकडे राष्ट्रानें झपाट्यानें पाऊल टाकावयाचें हा प्रश्न निर्णयाची वाट पाहत आहे; अशी या ९३ कलमाबाबत खरी परिस्थिति आहे.

( आ ) इतर कित्येक कलमांच्या बाबत ज्याप्रमाणें प्रांतिक आणि फीडरल क्षेत्रांत पुष्कळच साम्य आहे त्याचप्रमाणें या ९३ कलमांत व ४५ कलमांत थोड्या फार फरकाखेरीज साम्य आहे असें दोन्ही कलमें ताडून पाहिलीं असतां दिसून येईल. पहिल्या पोटकलमांत जो ( क ) भाग आहे त्याचा विचार करितांना ५० ( १ ) हें पोटकलम डोळ्यां-पुढें ठेविलें पाहिजे. त्यांत म्हटलें आहे कीं, गव्हर्नरनें ज्या बाबी आपल्या मर्जीप्रमाणें केल्या पाहिजेत असें स्पष्टपणें कायद्यांत सांगितलें असेल त्या-खेरीज बाकी सर्व बाबतींत सल्ला आणि मदत करण्याकरितां एक प्रधान-मंडळ असेल. हीच 'जबाबदारीच्या स्वराज्या'ची कल्पना आज्ञापत्रांत ( कलम ८ ) जास्त विशद करून सांगितली आहे. या ९३ कलमाच्या पहिल्या पोटकलमांतील ( क ) भागांत हीं गव्हर्नराचीं कामें त्यानें मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणें न करतां स्वतःच्या मर्जीप्रमाणें करणार असल्या-चें जाहीर करावें असें म्हटलें आहे. याचा अर्थ मंत्रिमंडळ गुंडाळून ठेवणें हा होय. अर्थात् जीं जीं कामें मंत्रिमंडळानें करावयाचीं तीं सर्व गव्हर्नराच्या खास हुकमानें चालू लागणार. ( ख ) भागांत प्रांतिक संस्थांचीं सर्व अगर कांहीं कामें तो आपल्याकडे घेऊं शकेल. उ० प्रांतिक कायदेमंडळ तो बोलावणारच नाहीं; व बोलावलेंच तर त्याच्यापुढें वार्षिक अंदाजपत्रक तेवढें ठेवणार नाहीं अथवा ठेवीलही. कांहीं बिलें मंजुरीकरितां ठेवील किंवा स्वतःच्या अधिकाराच्या जोरावर ऑर्डिनन्स काढील किंवा कायदेही निर्माण करील. तात्पर्य, अम्मलबजावणीचे व कायदे करण्याचे अधिकार गव्हर्नर या पोटकलमान्वयें बळकावूं शकतो. मात्र हायकोर्टाचे न्यायदानाचे अधिकार मात्र या झंझावातांत शाबूत ठेवण्यांत आले आहेत. हिंदुस्थानांतील प्राचीन राजे कायदे करीत व

राज्यकारभार चालवीत; परंतु या राजांच्या दंडपशाही व प्रजाभक्षक अधिकारांना ब्राह्मण न्यायाधीशांच्या सत्यवाणीच्या प्रभावाचाच काय तो लगाम असे, असें मनुस्मृतीचा प्रख्यात टीकाकार कुल्लूकभट्ट यानें मनुस्मृतीच्या प्रारंभींच लिहिलें आहे. अशा प्रकारच्या प्राचीन राजनीतीचें वर्णन प्रख्यात इतिहासज्ञ के. पी. जयस्वाल यांनीं आपल्या प्राचीन भारतविषयक ग्रंथांत केलें आहे. अगदीं अलीकडील उदाहरण म्हणजे पेशवाईतील रघुनाथराव दादासाहेब व रामशास्त्री प्रभुणे यांचें देतां येईल.

गव्हर्नरनें सगळीच घटना तहकूब केली पाहिजे असा त्याच्यावर बिलकुल निर्बंध नाहीं. थोड्यानेंच जर काम भागण्यासारखें असेल तर जास्ती कडक उपाययोजना कोणता शाहणा मनुष्य करील ? पण प्रस्तुतच्या राजकीय परिस्थितींत हा 'अर्धजरतीयन्याय' कितपत कामाला येईल हा प्रश्नच आहे. १९१९ च्या कायद्याखालीं जे डेव्होल्यूशन नियम केले होते त्यांतील ६ व्या नियमान्वयें प्रांतिक सोपीव खात्यांतील विषय राखीव खात्यांत ढकलण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलकडे देण्यांत आला होता; तसेंच त्या कायद्याच्या ५२ ( ३ ) कलमान्वयें तयार केलेल्या 'सोपीव खात्यांच्या तात्पुरत्या कारभारासंबंधींच्या नियमां'च्या आधारें प्रांतिक गव्हर्नराला सोपीव खातीं प्रधानांच्याकडून काढून घेतां येत असत अथवा प्रधानांच्या अभावीं आपल्या हातांत त्याबाबत सर्व सत्ता घेतां येत असे. असा प्रकार हा केवळ स्वकपालकल्पित नसून मॉंटफर्ड सुधारणांच्या काळांत बंगाल व मध्यप्रांत वऱ्हाड या दोन प्रांतांत स्वराज्यपक्षीयांच्या बहुमतानें व त्यांनीं प्रधानपदें स्वीकारण्याचें नाकारल्यामुळें निर्माण होऊन गव्हर्नरांना सोपीव खात्यांचा कारभार कांहीं महिने आपणाकडे घेणें भाग पडलें होतें व अशा तऱ्हेनें या द्विदल राज्यपद्धतीची शोभा करण्यांत आली होती. हेंच भय १९३५ ची घटना तयार करणाऱ्यांच्या मनांत वास करीत होतें हें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीच्या रिपोर्टांत ( परिच्छेद १०९ ) दिसून येतें:—" १९१९ च्या सुधारणांनंतर एकाहून अधिक प्रांतांत ज्या गोष्टी घडून आल्या त्यावरून हें सिद्ध झालें आहे कीं, गव्हर्नराच्या या अंतिम अधिकारांची गरज उरली नाहीं असें दुर्दैवानें अद्याप म्हणतां येत नाहीं; आणि आम्ही सुचविणार आहोंत त्या जबाबदार राज्यपद्धतीच्या युगांतही

या अधिकारांचें अस्तित्व अनावश्यक होईल असें भविष्य वर्तविणें हें फार घाईचें होईल असें वाटतें.........उद्देश असा आहे कीं, अंशतः राज्ययंत्र बंद पडलें तर तेवढ्यापुरती तरतूद करावी. आमच्यापुढें एक परिस्थिति उभी राहते ती अशी : कायदेमंडळाच्या मनांत असें आलें कीं बैठकच भरूं द्यावयाची नाहीं; अशा परिस्थितींत गव्हर्नराला मदत करण्यास मंत्रिमंडळ मिळालें तर तें नेमून राज्यकारभाराचा गाडा हाकावयाचा." वरील विधानांत कायदेमंडळाच्या इतक्या संपूर्ण विरोधानंतरही राज्य-कारभाराच्या गाड्याचें जूं उचलण्यास कांहीं नंदीबैल मिळूं शकतील ही गोष्ट गृहीत धरली आहे. परंतु दिवसेंदिवस ही शक्यता कमी कमीच होत जाऊन एक तर खरेंखुरें प्रांतिक स्वराज्य नाहीं तर गव्हर्नराचा लष्करी अम्मल याशिवाय तिसरी परिस्थिति उरणार नाहीं.

( इ ) या कलमांतील अधिकारान्वयें गव्हर्नरनें काढलेला जाहिर-नामा त्यानें ताबडतोब स्टेट सेक्रेटरीकडे कळविला पाहिजे व त्यानें तो पार्लमेंटपुढें ठेविला पाहिजे. प्रांतिक कायदेमंडळाला तो जबाबदार नसला तरी तो कोणाला तरी जबाबदार असलाच पाहिजे या दृष्टीनें वर वर्णिलेलें बंधन ठीक आहे. परंतु हा पार्लमेंटच्या आधिराज्याचा प्रश्न नसून हिंदी स्वराज्याचा प्रश्न आहे. वर वर्णिलेला जाहिरनामा हा प्रथम सहा महिन्यां-च्या मुदतीचा असणार. मूळ गव्हर्मेंट ऑफ इंडिया बिलांत ही मुदत वाढविण्याचा अधिकार गव्हर्नराला देण्यांत आला नव्हता, पुढें कायद्यांत तो घालण्यांत आला. तसेंच चौथें पोटकलम मूळ बिलांत नव्हतें; तेंही सगळेंच्या सगळें कायद्यांत प्रविष्ट करण्यांत आलें आहे. सदर जाहिरनामा पहिली मुदत संपल्यानंतर पुनः बारा महिनेपर्यंत वाढवितां येतो व जास्तींत जास्त मुदत तीन वर्षांची ठेवण्यांत आली आहे. हाच नियम फीडरल क्षेत्रांत लागू करण्यांत आला आहे. अशा तऱ्हेनें एकदां जाहिरनामा तीन वर्षांपर्यंत चालू राहिल्यावर त्यानंतर या ४५ कलमान्वयें (फीडरल क्षेत्रां-तील) पुनः जाहिरनामा काढतां येणार नाहीं. म्हणजे हें ४५ कलम आपलें काम संपवून संपुष्टांत आलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हेच शब्द ९३ व्या कलमांत नसले तरी दोघांच्या समान रचनेवरून असें अनुमान काढतां येईल कीं हें ९३ वें कलमही तीन वर्षांनंतर असून

नसल्यासारखेंच होणार. " ततः किम् " या प्रश्नास सर सॅम्युअल होअर यांनीं उत्तर दिलें कीं, " तीन वर्षांचे शेवटीं हिंदुस्थान सरकार कांहीं नष्ट होणार नाहीं. ४५ वें कलम ( ९३ वें कलम ) वगळून बाकीची घटना चालू होईल; नाहीं तर पार्लमेंट कायद्यांत दुरुस्ती करील."

इतक्या दीर्घ काळानंतर काय होईल हें राजकारणी पुरुषांना कोणी विचारूं नये व कोणी विचारल्यास त्याला मिळालेल्या उत्तरावर केव्हांही भिस्त ठेवूं नये. हेच होअरसाहेब लावलच्या संमतीनें अबिसीनियाची विभागणी करण्यास निघाल्यावेळीं लोकक्षोभ होऊन त्यांना परराष्ट्रमंत्रिपद सोडावें लागलें. इटलीविरुद्ध सामुदायिक दडपण आणण्याचा प्रयत्न करणारे एडन यांना अलीकडे मंत्रिमंडळांतून गचांडी देण्यांत आली आहे; व हिंदुस्थानांत गांधीजींशीं एका वेळीं तह करणारे व ध्येयवादी म्हणून ख्याति असलेले लॉर्ड आयर्विन (सध्यां लॉर्ड हॅलिफॅक्स) हे परराष्ट्रमंत्री झाले असून त्यांनीं इटालीशीं नमतें घेतलें असून, व्यावहारिक दृष्टीचा आश्रय करून त्यांनीं जगाच्या शांतीकरितां ( ? ) अबिसीनियाचा विश्वासघात केला आहे. याला म्हणतात राजकारण ! तेव्हां तीन वर्षांनीं काय होणार व पांच वर्षांनीं काय होणार हें विचारण्यांत व याचें उत्तर ऐकण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

या जाहिरनाम्याच्या काळांत गव्हर्नरनें केलेला कायदा जाहिरनामा संपल्या दिवसापासून दोन वर्षेपर्यंत अमलांत राहण्याची तरतूद पोटकलम ( ४ ) नें केली आहे. म्हणजे तीन आणि दोन अशीं पांच वर्षें ही दडपशाहीची स्थिति चालू ठेवण्याची तजवीज करून ठेविली आहे. तीनपासून पांच वर्षांपर्यंतच्या या काळांत योग्य त्या कायदेमंडळाला सदर जाहिरनाम्यांतील कायदा रद्द करण्याचा किंवा त्याचा रीतसर कायदा करण्याचा अधिकार दिला आहे. आणीबाणीचा प्रसंग गव्हर्नर जनरलनें जाहीर केला असतांना कायद्यांतील १०२ कलमान्वयें फीडरल कायदेमंडळ कोणत्याही प्रांताकरितां कायदा करूं शकेल किंवा खुद्द प्रांतिक कायदेमंडळाची बैठक भरविली असतां कायदेमंडळ जाहिरनाम्यांतील कायदा रद्द करील किंवा आपण केलेला म्हणून त्याचें रीतसर कायद्यांत रूपांतर करील.

( ई ) ( ५ ) व्या पोटकलमांत सदर जाहिरनामा गव्हर्नर जनरलच्या संमतीशिवाय गव्हर्नरला काढतां येत नाहीं असें म्हटलें आहे. गव्हर्नर जनरलला मात्र ४५ कलमाखालीं जाहिरनामा काढतांना त्याच्यावरचा अधिकारी जो स्टेटसेक्रेटरी त्याची संमति घेण्याचें प्रयोजन ठेवण्यांत आलेलें नाहीं. वरील संमति सुद्धां गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें द्यावयाची आहे; यांत फीडरल मंत्रिमंडळाचा कांहींही अधिकार ठेवण्यांत आलेला नाहीं म्हणजे ही सर्व हुकुमशहांची परंपरा आहे. यांत लोकमताच्या प्रभावाला कोठेंच वाव ठेवण्यांत आलेला नाहीं.

( उ ) आतां सरतेशेवटीं राज्ययंत्र बंद पडण्याला व गव्हर्नरनें सर्व सत्ता आपल्या हातांत घेण्याची परिस्थिति निर्माण होण्याला कोणते प्रसंग कारण होतील या प्रश्नाचा थोडक्यांत विचार करूं. लोकमताचा भरपूर पाठिंबा असलेल्या मंत्रिमंडळाचें व गव्हर्नरचें अमुक एका महत्त्वाच्याच प्रश्नावर बिनसेल असें कांहीं सांगतां येणार नाहीं. प्रश्न तपशिलाचा नसून तत्त्वाचा आहे. कोणाचें म्हणणें अखेर चालावयाचें ? गव्हर्नराचें का मंत्र्यांचें ? या प्रश्नाच्या उत्तरावर राज्ययंत्र सुरळीत चालणें वा बंद पडणें हें अवलंबून आहे. जाईल तर हत्तीही जाईल, नाहीं तर सुईही शिरकणार नाहीं. पांच गांवेंही दुर्योधन पांडवांना द्यावयास तयार झाला नाहीं यांत त्याच्या जबर अभिलाषबुद्धीपेक्षां एक महत्त्वाचें राजनैतिक तत्त्व सांठवलेलें होतें असें दुर्योधनाच्या बाजूनें म्हणतां येण्यासारखें होतें. तीच स्थिति इंग्रजी साम्राज्याची आहे. परंतु जेथें योगेश्वर आणि धनुर्धर यांची जोड आहे तेथें म्हणजे या हिंदी राष्ट्राच्या पदरांत विजय प्राप्त झाल्याशिवाय कसा राहील ?

# (गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट, १९३५, इतर खंड)

## प्रांतिक घटनेची पूर्ति

हिंदुस्थानच्या राज्यकारभारासाठीं आणखी अधिक तरतूद करण्याकरितां २ ऑगस्ट १९३५ रोजीं पार्लमेंटच्या सल्ल्यानें आणि संमतीनें राजेसाहेबांनीं पुढील कायदा ( चाप्टर २, २६ जॉर्ज ५ ) केला आहे.

येथून पुढें प्रांतिक घटनेला आवश्यक असणारा इतर खंडांतील भाग थोडक्यांत पण शक्य तों मूळ कलमांच्या भाषेंत उद्धृत करण्याचें योजिलें आहे. असें केलें नाहीं तर प्रांतिक घटनेचें व तत्संबंधीं इतर प्रश्नांचें विवेचन अपुरें राहील हें स्पष्ट आहे. पार्लमेंट ही ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व घटकांसंबंधीं कायदे करणारी सर्वांत श्रेष्ठ संस्था. अलीकडे १९३१ च्या वेस्टमिन्स्टरच्या स्टॅटच्यूटअन्वयें स्वायत्त वसाहतींच्या बाबत पार्लमेंट-ची कायदे करण्याची सत्ता जवळ जवळ संपुष्टांत आली आहे. परंतु हिंदुस्थान व इतर क्राउन कॉलनी, तसेंच संरक्षित प्रदेश व मँडेटरी प्रदेश याबाबत सर्व व्यवस्था पार्लमेंटकडेच अबाधितपणें चालू आहे. हिंदुस्थान-च्या राज्यकारभारांत फेरबदल सुचविण्याकरितां १९२७ सालीं सायमन कमिशनची नेमणूक झाली. तेव्हांपासून जवळ जवळ आठ वर्षांनीं हा कायदा मंजूर झाला. दरम्यानच्या काळांत अनेक चळवळी, परिषदा, कमिट्या यांना नुसता ऊत येऊन गेला होता. हा कायदा राजेसाहेबांनीं केला असें जरी वर म्हटलें आहे तरी सर्व श्रेय पार्लमेंट सभेलाच आहे; राजाची मंजुरी ही केवळ औपचारिक आहे. मुळांत सदर कायद्यांत 'ब्रह्मदेशा' बाबतच्या तजविजींचाही अंतर्भाव होता. त्या वेळीं त्या कायद्याचें, अनुक्रमाच्या दृष्टीनें चाप्टर ४२, २५ व २६ जॉर्ज ५

असें रूप होतें. चाप्टर म्हणजे एखाद्या अधिवेशनांत मंजूर झालेल्या कायद्यांचा विशिष्ट अनुक्रम. पांचव्या जॉर्ज राजाच्या कारकीर्दींतील २५ व्या व २६ व्या अधिवेशनांत मिळून हा कायदा तयार होत होता व त्याचा अनुक्रम ४२ होता. 'चाप्टर' या इंग्रजी शब्दाचा 'कॅप, च, सी' असा संक्षेप दिला जातो. बहुधा पार्लमेंटचें दरवर्षाला एक अधिवेशन (सेशन) भरतें. पार्लमेंटच्या या ४२ नंबरच्या कायद्यांत १५ खंड, ४७८ कलमें व १६ शेडयूलें होतीं. ब्रह्मदेशाबद्दलचा १४ वा खंड, त्यांतील १५७ कलमें व तत्संबंधीं ६ शेडयूलें वजा करून राहिलेला भाग 'गव्हमेंट ऑफ इंडिया (रिप्रिंटिंग) ॲक्ट, १९३५' या नांवानें प्रसिद्ध आहे व त्याचा अनुक्रम (चाप्टर २, २६ जॉर्ज ५) असा आहे. या केवळ हिंदुस्थानच्या कायद्यांत १४ खंड, ३२१ कलमें व १० शेडयूलें आहेत. शेडयूलें हा कायद्याचाच भाग असून त्याला कायद्याइतकेंच महत्त्व आहे. शेडयूल हा शब्द 'शीडा' या लॅटिन शब्दापासून निघाला आहे. 'पापीरस' नांवाच्या पाण्यांत वाढणाऱ्या वनस्पतीपासून तयार केलेल्या कागदास अगर पत्रास 'शीडा' म्हणत. यावर लिहिलेल्या मजकुरास 'शेडयूल' म्हणूं लागले आणि पुढें तो शब्द 'विशिष्ट मजकुरा'संबंधीं वापरण्यांत येऊं लागला; त्याचा अर्थ 'माहितीचा विस्तृत तक्ता, यादी इ०' असा असून अलीकडे तो शब्द 'मुख्य लेखाची पुरवणी' या अर्थी योजिला जातो.

प्रत्येक कायद्याला 'प्रिॲंबल' म्हणजे प्रास्ताविक भाग असतो. यांत कायदा करणाऱ्याचा हेतु व उद्देश स्पष्टपणें मांडलेला असतो. परंतु या कायद्याला 'प्रिॲंबल' नाहीं. ३२१ (क) कलमांत सांगितलें आहे कीं, १९१९ चा कायदा रद्द समजण्यांत यावा, परंतु त्या कायद्याचें 'प्रिॲंबल' शिल्लक राहावें. याचा अर्थ, १९१९ पासून १९३५ पर्यंत दरम्यानच्या काळांत कितीही घडामोडी झालेल्या असल्या व हिंदी लोकांच्या आकांक्षा व सामर्थ्य कितीही वाढलेलें असलें तरी पार्लमेंट उद्देश बदलावयास तयार नाहीं, असा होतो. १८५८ सालीं राणीसरकारनें हिंदुस्थानचा राज्यकारभार कंपनी सरकारकडून आपणाकडे घेतल्यापासून हिंदुस्थानच्या *राज्यव्यवस्थेबाबत पुढीलप्रमाणें कायदे करण्यांत आले आहेत. त्यांची* वंशपरंपरा अशी:—

इंडियन कौन्सिल्स ॲक्ट, १८६१ (२४ व २५ व्हिक्टोरिया, चा० ६७)
,, ,, ,, १८९२ (५५ व ५६ व्हिक्टोरिया, चा० १४)
,, ,, ,, १९०९ (९ एडवर्ड ७, चा० ४)
गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट, १९१९ (९ व १० जॉर्ज ५, चा० १०१)
,, ,, ,, १९३५ (२६ जॉर्ज ५, चा० २)

१९१९ च्या कायद्याच्या 'प्रिॲंबल' ऊर्फ सरनाम्यांत मुख्यतः पुढील तत्त्वें गोविलीं आहेतः—

(१) हिंदी राज्यकारभारांत हिंदी लोकांना अधिक अधिक भाग घेण्यास संधि देणें; (२) **ब्रिटिश इंडियांत** जबाबदार राज्यपद्धतीची **हळूहळू** वाढ करणें; (३) ही होणारी प्रगति **क्रमशः** पण भरीव स्वरूपाची असणें; (४) केव्हां, किती व कशा प्रकारची प्रगति करावयाची तें **पार्लमेंटनें** ठरविणें; (५) प्रांतांना मध्यवर्ती सरकारापासून हळूहळू पण अधिक **स्वतंत्र** करणें इ०

या सरनाम्यांतील तत्त्वांना धरूनच, पण त्यांत संस्थानांशीं फेडरेशन करण्याचें तत्त्व मिसळून, १९३५ चा कायदा पार्लमेंटनें केलेला आहे.

## खंड १ ला

### प्रास्ताविक

१ ह्या कायद्याचें 'गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट, १९३५' हें नांव राहील. २ हिंदुस्थानविषयक सर्व अधिकार व सत्ता ब्रिटनचे राजे व हिंदुस्थानचे बादशहा यांनीं चालवावयाची आहे; मात्र या कायद्यांतील कलमांनीं अगर राजेसाहेबांनीं स्वतंत्रपणें काढलेल्या हुकमांनीं दुसऱ्या कोणास आपल्या वतीनें अधिकार दिले असल्यास ते त्यांनीं वापरावयाचे आहेत. ३ हिंदुस्थानाकरितां राजेसाहेब एका गव्हर्नर जनरलाची नेमणूक करतील; तसेंच संस्थानिकाबाबतचीं कर्तव्यें पार पाडण्याकरितां आपला एक प्रतिनिधी नेमतील. या दोन्ही हुद्द्यांवर एकाच इसमाला नेमलें तरी चालेल.

# खंड २ रा

## हिंदुस्थानचें फेडरेशन

**५ गव्हर्नरांचे प्रांत** व सामिलनामा लिहून देणारी **हिंदी संस्थानें** या दोघांचें मिळून एक **'हिंदी फेडरेशन'** अस्तित्वांत आणल्याचें राजेसाहेब जाहिरनामा काढून प्रसिद्ध करतील; या फेडरेशनमध्यें मागाहून **चीफ कमिशनरांचे प्रांत** अन्तर्भूत करण्यांत येतील. हें फेडरेशन घडून येण्याला मुख्य अट म्हणजे कौन्सिल ऑफ स्टेट-मध्यें कमींत कमी ५२ प्रतिनिधी निवडून देण्याचा ज्या संस्थानांना हक्क आहे व ज्या संस्थानांची लोकसंख्या कमींत कमी सर्व संस्थानांच्या लोकसंख्येच्या निम्याइतकी भरेल अशा संस्थानिकांनीं फेडरेशनमध्यें सामील होण्यास मान्यता दिलेली असली पाहिजे, ही होय.

यावरून केवळ ब्रिटिश हिंदुस्थानांतील प्रांतांचें फेडरेशन या कायद्याप्रमाणें कायदेशीररीत्या घडून येणें अशक्य आहे. संस्थानांना कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें १०४ प्रतिनिधी निवडून पाठविण्याचा हक्क आहे. ५२ म्हणजे त्याच्या निम्मे कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें मानसन्मान, पदव्या, तोफा इत्यादि गोष्टी लक्षांत घेऊन संस्थानांचे प्रतिनिधी निरनिराळ्या संस्थानांना वाटून दिले आहेत. संस्थानांना फीडरल असेंब्लींत दिलेल्या १२५ प्रतिनिधींची वाटणी सर्वसाधारणपणें लोक-संख्येला धरून केलेली दिसते. अशा रीतीनें पिढीजाद महत्त्व व लोकसंख्या या दोन्ही तत्त्वांची जोड घालण्याचा हा प्रयत्न आहे. ही वाटणी संस्थानिकांनीं आपापसांत केलेली नसून 'जातिनिर्णया'प्रमाणेंच ती ब्रिटिश सरकारनें ठरवून दिली आहे, ही गोष्ट जातां जातां लक्षांत ठेवण्यासारखी आहे. अद्यापि एकाही संस्थानिकानें सामिलनामा लिहून दिलेला नाहीं.

८ ज्या बाबीसंबंधीं प्रांतिक कायदेमंडळांना कायदे करण्याचा अधिकार आहे त्या बाबीसंबंधीं, ह्या कायद्यांतील विशेष तरतुदी खेरीजकरून, अम्मलबजावणीचे अधिकार फीडरल सरकारला चालवितां येणार नाहींत. १६ फेडरेशनच्या ॲडव्होकेट जनरलला ब्रिटिश हिंदुस्थानांतील सर्व कोर्टांतून आपलें काम करण्याकरितां उपस्थित राहण्याचा हक्क आहे. १८ कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें ब्रिटिश हिंदुस्थानचे १५६ प्रतिनिधी व फीडरल असेंब्लीमध्यें २५० प्रतिनिधी पुढीलप्रमाणें असतीलः—

| प्रांत अथवा जात | कौन्सिल | असेंब्ली |
| --- | --- | --- |
| मद्रास | २० | ३७ |
| मुंबई | १६ | ३० |
| बंगाल | २० | ३७ |
| संयुक्तप्रांत | २० | ३७ |
| पंजाब | १६ | ३० |
| बिहार | १६ | ३० |
| मध्यप्रांत व वऱ्हाड | ८ | १५ |
| आसाम | ५ | १० |
| वायव्य सरहद्दप्रांत | ५ | ५ |
| ओरिसा | ५ | ५ |
| सिंध | ५ | ५ |
| ब्रिटिश बलुचिस्थान | १ | १ |
| दिल्ली | १ | २ |
| अजमीर मेरवारा | १ | १ |
| कुर्ग | १ | १ |
| अँग्लोइंडियन | १ | बिगर-प्रांतीय जागा } ४ |
| युरोपियन | ७ | |
| हिंदी ख्रिस्ती | २ | |
| गव्हर्नर जनरलनें नेमलेले | ६ | |
| | १५६ | २५० |

२६ फीडरल कायदेमंडळाच्या निवडणुकीकरितां एखादा प्रांतिक मंत्री उमेदवार म्हणून उभा असल्यास तो उमेदवार होण्यास व निवडून येण्यास, केवळ तो नगाराच्या जागेवर विराजमान आहे या सबबीवर, अपात्र ठरणार नाहीं.

३३ प्रांतांतील 'वगळलेल्या प्रदेशां'च्या राज्यकारभाराकरितां फीडरल सरकाराकडून दिल्या जाणाऱ्या रकमांवर फीडरल कायदेमंडळाला मत देण्याचा अधिकार असणार नाहीं. ३८ प्रांतिक काराभाराबद्दल गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें योजिलेल्या उपायांची चर्चा अगर त्याबद्दल प्रश्न विचारणें यासंबंधीं बंदी करण्याबाबत नियम करण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलला आहे. ४० कोणत्याही हायकोर्ट न्यायाधीशाच्या, त्याच्या कामाबाबतच्या वर्तनासंबंधीं फीडरल कायदेमंडळांत चर्चा करितां येणार नाही.

## खंड ४ था

## चीफ कमिशनरांचे प्रांत

९४ चीफ कमिशनरांची नेमणूक गव्हर्नर जनरलानें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाची आहे; परंतु त्या प्रांतांचा राज्यकारभार गव्हर्नर जनरलनें ( म्हणजे फीडरल मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणें ) पहावयाचा आहे. ९५ ब्रिटिश बलुचिस्थानाचा राज्यकारभार गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें पहावयाचा आहे.

प्रांतांमध्यें ज्याप्रमाणें 'वगळलेल्या' प्रदेशाचा कारभार गव्हर्नरांनीं आपल्या मर्जीप्रमाणें चालवावयाचा आहे, त्याचप्रमाणें ब्रिटिश बलुचिस्थानचा कारभार गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्ज़ीप्रमाणें पहावयाचा आहे. १९१९ च्या कायद्यांतील द्विदळ राज्यपद्धतीपेक्षां ही पद्धति अधिक बेजबाबदारीची आहे असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. सिंध आणि बलुचिस्थान यांमधील 'बुगटी' या टापूसंबंधीं चौकशी करून अहवाल सादर करण्यास कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें श्री. जयरामदास दौलतराम यांना सांगितलें होतें. त्यांच्या अहवालावर वर्किंग कमिटीनें बुगटीसंबंधीं पुढील ठराव मंजूर केला आहे—" ब्रिटिश सरकारला या टापूच्या राज्यकारभाराची जबाबदारी योग्य प्रकारें पार पाडतां आलेली नाहीं; लोकशाहीच्या तत्त्वावर आधारलेली राज्यपद्धति या प्रदेशांत सुरू करावी अशी कमिटीची सरकाराला शिफारस आहे." वगळलेल्या प्रदेशाप्रमाणेंच ब्रिटिश बलुचिस्थानाला

गव्हर्नर जनरलनें हुकूम काढून हिंदी कायदे लागू करावयाचे असतात. या नियमाला अनुसरून १९३८ चा इंडियन फिनान्स ॲक्ट ब्रिटिश बलुचिस्थानाला गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें लागू केला आहे. याशिवाय या प्रांताकरितां ६ सप्टेंबर १९३७ रोजीं गव्हर्नर जनरलनें रेग्युलेशन केले आहेत. अजमीर-मेरवारा या प्रांतांतील कांहीं गांवें उदेपूर व जोधपूर या दरबारांकडे परत देण्यांत आलीं आहेत. त्यांची व्यवस्था पाहण्याकरितां मेजर ॲस्टर या ब्रिटिश अंमलदाराची नेमणूक करण्यांत आली आहे. ही तजवीज १ एप्रिल १९३८ पासून अमलांत आली आहे. अंदमान-निकोबार बेटांतील प्रवेशपरीक्षेला बसणारे विद्यार्थी कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या परीक्षेला बसतात. कुर्ग प्रांताची लोकसंख्या दीड लाख असून त्यांत लेजिस्लेटिव्ह कौन्सिल, डिस्ट्रिक्ट बोर्ड या प्रातिनिधिक संस्था आहेत. म्हैसूरचा रेसिडेंट हाच कुर्गचा चीफ कमिशनर.

९८ तिसऱ्या खंडांतील कलम ५६ (पोलिस नियम), कलम ५८ (माहिती कोठून मिळाली ते गुप्त राखणें) व कलम ५७ (अत्याचारी गुन्हे) हीं गव्हर्नरांच्या प्रांतांप्रमाणेंच चीफ कमिशनरांच्या प्रांतांनाही लागू होतील. मात्र गव्हर्नर'च्या जागीं 'गव्हर्नर जनरल' व 'प्रांतिक कायदेमंडळा' ऐवजीं 'फीडरल कायदेमंडळ' एवढा फरक केला पाहिजे.

## खंड ५ वा

## कायदे करण्याचे अधिकार

९९ या कायद्याच्या तरतुदींना बाध न आणतां, प्रांतिक कायदेमंडळानें प्रांताकरितां अगर प्रांताच्या कोणत्याही भागाकरितां कायदे करावेत. १०० प्रांतिक कायदेमंडळाला तिसऱ्या यादीतील (उभय कायदे विषय यादी) बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार आहे; प्रांतिक कायदेमंडळाला दुसऱ्या यादींतील (प्रांतिक कायदे विषय यादी) कोणत्याही बाबींसंबंधीं प्रांतापुरते कायदे करण्याचा अधिकार आहे. गव्हर्नरांच्या प्रांतांखेरीज इतर प्रांतांकरितां म्हणजे चीफ कमिशनरांच्या प्रांतांकरितां फीडरल कायदेमंडळाला दुसऱ्या म्हणजे प्रांतिक यादींतील बाबींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार आहे.

मुंबई कॉर्पोरेशननें आपणाला नोंदलेल्या कंपन्यांवर कर बसविण्याची परवानगी देण्याकरितां कायदा करण्याबद्दल मुंबई सरकारला विनंति केली होती. या विनंतीला मुंबई सरकारनें पुढील उत्तर पाठविलें:—

" कंपन्यांच्या भांडवलावर कर बसविण्याची योजना ही फीडरल यादींतील ५५ व्या सदरांत पडते आणि या यादींतील विषयांबद्दल कायदा करण्याचा अधिकार फीडरल कायदेमंडळाचा आहे, प्रांतिक कायदेमंडळाचा नाहीं. सबब आपली विनंति मान्य करितां येत नाहीं याबद्दल वाईट वाटतें."

१०२ गव्हर्नर जनरलनें " आणीबाणीच्या प्रसंगाचा जाहिरनामा " पुकारल्यास फीडरल कायदेमंडळाला एखाद्या गव्हर्नराच्या प्रांताकरितां प्रांतिक यादींतील विषयासंबंधीं कायदे करण्याचा अधिकार आहे; फीडरल कायदा आणि प्रांतिक कायदा यामध्यें विसंगतता असल्यास फीडरल कायदा प्रभावी ठरेल. १०३ दोन अथवा अधिक प्रांतांच्याकरितां त्यांच्या संमतीनें कायदे करण्याचा अधिकार फीडरल कायदेमंडळाला आहे. १०४ वरीलपैकीं तिन्ही यादींत नसलेल्या बाबीसंबंधीं कायदा फीडरल कायदेमंडळानें करावयाचा का प्रांतिक कायदेमंडळानें करावयाचा याचा निर्णय गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाचा आहे. १०६ पहिल्या म्हणजे फीडरल यादींत 'इतर देशांशीं केलेले तह आणि करार हे अमलांत आणणे' याबद्दलचा अन्तर्भाव होत आहे एवढ्याच कारणास्तव त्याबाबत कोणत्याही प्रांताकरितां, एखादा कायदा, त्या प्रांताच्या गव्हर्नराच्या (म्हणजे मंत्रिमंडळाच्या) संमतीखेरीज फीडरल कायदेमंडळाला करितां येणार नाहीं. १०७ 'उभय' यादींतील म्हणजे तिसऱ्या यादींतील एखाद्या बाबीसंबंधीं प्रांतिक कायदेमंडळानें केलेला कायदा फीडरल अगर हिंदी कायद्याला विरोधी असला तरी तो कायदा, गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां राखून ठेवल्यानंतर अगर राजेसाहेबांच्या पसंतीकरितां पाठविल्यानंतर त्याला त्यांची संमति मिळाली तर, त्या प्रांतापुरता चालू राहील. १०८ गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें आगाऊ मंजुरी दिलेली असल्याशिवाय प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही सभागृहांत पुढीलपैकीं कोणतेंही बिल प्रविष्ट करितां येणार नाहीं किंवा उपसूचना मांडतां येणार नाहीं:—

(क) पार्लमेंटचा ब्रिटिश हिंदुस्थानला लागू असणारा कोणताही कायदा रद्द करणारें, दुरुस्त करणारें अगर त्याला विरोधी असणारें;

(ख) गव्हर्नर जनरलचा कायदा अगर गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें काढलेला वटहुकूम रद्द करणारें, दुरुस्त करणारें अगर त्याला विरोधी असणारें;

(ग) या कायद्यान्वयें ज्या गोष्टी गव्हर्नर जनरलला आपल्या मर्जीप्रमाणें करणें भाग आहे अशा गोष्टींशीं संबंध असणारें;

(घ) ज्या फौजदारी खटल्यांत युरोपियन ब्रिटिश प्रजाजनाचा संबंध पोंचतो अशा खटल्यांतील कार्यपद्धतीला बाध आणणारें.

तसेंच प्रांताच्या गव्हर्नरानें आपल्या मर्जीप्रमाणें आगाऊ मंजुरी दिलेली असल्याशिवाय प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही सभागृहांत पुढीलपैकीं कोणतेंही बिल प्रविष्ट करितां येणार नाहीं किंवा उपसूचना मांडतां येणार नाहीं:—

(१) गव्हर्नरच्या कायद्याला अगर गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें काढलेल्या वटहुकमाला रद्द करून टाकणारें, दुरुस्त करणारें अगर विरुद्ध असणारें;

(२) पोलिसफोर्ससंबंधींच्या कोणत्याही कायद्याला रद्द करून टाकणारें, दुरुस्त करणारें, अगर विरोधी असणारें.

कोणतेंही बिल प्रविष्ट करण्यास अगर उपसूचना मांडण्यास गव्हर्नर जनरलची अगर गव्हर्नरची आगाऊ मंजुरी ह्या कायद्याच्या कोणत्याही कलमान्वयें लागत असल्यास त्या तरतुदीला या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें बाध येणार नाहीं.

१०९ ज्याबाबत एखादें बिल प्रविष्ट करण्यास अगर मंजूर करण्यास अथवा एखादी उपसूचना मांडण्यास गव्हर्नर जनरलची किंवा गव्हर्नरची आगाऊ मंजुरी अगर शिफारस यांची जरूरी असेल त्याबाबत तशी मंजुरी पूर्वी दिलेली असली तरी शेवटीं बिलाला संमति देणें वा न देणें हें सर्वस्वी गव्हर्नर जनरलच्या किंवा गव्हर्नरच्या मर्जीवर राहील. तात्पर्य, आगाऊ मंजुरी देणें अगर शिफारस करणें हा केवळ औपचारिक भाग आहे. तसेंच शेवटीं बिलाला मंजुरी दिल्यावर आगाऊ संमति दिली होती किंवा नाहीं या गोष्टीला कांहींच महत्त्व नाहीं. ११० प्रांतिक कायदेमंडळाला पुढील गोष्टींसंबंधीं कायदे करण्याचा अधिकार नाहीं:—

(१) बादशहा अगर राजकुटुंब यांच्यासंबंधींचा कोणताही कायदा;

(२) राजाचा वारस कोण असावा याबाबत, तसेंच हिंदुस्थानांतील कोणत्याही भागांत असणारें बादशहाचें आधिराज्य;

(३) ब्रिटिश नॅशर्नेलिटीचा कायदा; लष्कर, विमानदळ व आरमार यासंबंधींचे कायदे; प्राइझ अथवा प्राइझकोर्टें याबाबतचा कायदा;

(४) या कायद्यानें परवानगी न दिलेल्या भागापुरती या कायद्याची अगर त्याअन्वयें भारतमंत्री, गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर यांनीं आपल्या मर्जीप्रमाणें अगर वैयक्तिक मताप्रमाणें तयार केलेल्या नियमांची दुरुस्ती;

(५) एखाद्या कोर्टाच्या निकालावर खास परवानगीनें अपील करण्याबाबत मंजुरी देण्याचा राजाचा जो स्वयंभू व खास हक्क त्याला बाध आणणारा कोणताही कायदा.

१११ प्रांतांत प्रवेश करण्याला बंदी करणारा किंवा प्रवास करणें, सरकारी नोकरी करणें वगैरे बाबत नियंत्रणें घालणारा कोणताही प्रांतिक कायदा युनायटेड किंगडमचा ( ग्रेट ब्रिटन आणि उत्तर आयर्लंड ) रहिवाशी असलेल्या ब्रिटिश प्रजाजनाच्या बाबतींत लागू होणार नाहीं. मात्र हिंदी लोकांच्या बाबत युनायटेड किंगडमच्या कायद्यांत त्या प्रकारचीच सवलत असली पाहिजे; तरच वरील कलमाचा अंमल होईल. गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें जाहीर केल्यास, आपल्या जादा जबाबदारीच्यासाठीं जरूर वाटल्यास कोणाही युरोपियन ब्रिटिश प्रजाजनास त्याला प्रांतांत येण्यास बंदी करतां येईल. तसेंच या अधिकाराचा गव्हर्नरला अत्याचारी गुन्ह्यांना तोंड देण्याकरितां उपयोग करितां येईल. ११२ युनायटेड किंगडम अथवा ब्रह्मदेश येथील रहिवाशांवर, तसेंच त्या देशांतील कंपन्यांवर जादा कर प्रांतिक कायदेमंडळाला लादतां येणार नाहीं; असला भेदाभेद करणारा कोणताही कायदा तेवढ्यापुरता रद्द समजण्यांत येईल.

१९३८ च्या एप्रिलमध्यें मध्यवर्ती कायदेमंडळांत 'विमाकंपन्यां'-संबंधींचा कायदा मंजूर झाला. त्या वेळीं युरोपियन सभासद सर लेस्ली हडसन यांनीं असा देखावा केला कीं, " आम्हा ब्रिटिश कंपन्यांना जादा मेहेरबानगी नको, न्याय हवा." त्यावर लॉ मेंबर सर नृपेन्द्र सरकार यांनीं पुढीलप्रमाणें चोख उत्तर दिलें : " ब्रिटिश हितसंबंधाविरुद्ध भेदाभेद करण्याचे कामीं घटनाकायद्याची जर अडचण नसती तर मला ब्रिटिश हितसंबंधांना धक्का पोंचल्याचें कांहींच वाईट वाटलें नसतें. मला या लोकांना विचारावयाचें आहे कीं, जगाच्या पाठीवर असा एक तरी देश आहे काय, कीं ज्याच्या नागरिकांबरोबर परदेशी लोकांना समान हक्क देण्यांत आले आहेत ? ब्रिटिश हितसंबंधांतर्फे असें सांगण्यांत येतें कीं, हिंदी कंपन्यांना पुरेसा अनुभव नाहीं किंवा त्यांचे ठिकाणीं संघटना-कौशल्य नाहीं. क्षणभर हें कबूल केलें तरी त्यामुळें अशक्त व अननुभवी हिंदी कंपन्यांना मदत करूं नये असा अर्थ कसा निघतो ? आमचा कमकुवतपणा किंवा नालायकी जर आमच्या आड येते तर मग जपानच्या कापडाला किंवा बेलजमच्या पोलादाला बलाढ्य गणलेल्या इंग्लंडांत सर्रास शिरण्याला हरकत कां घेण्यांत येते व संरक्षक जकाती कां ठेवण्यांत येतात ? "

११३, ११४ व ११५ हाच न्याय इंग्लंडांत व हिंदुस्थानांत नोंदलेल्या ब्रिटिश कंपन्यांना व जहाजें आणि विमानें यांच्या बाबत लागू केला जाईल.

११६ प्रांतिक कायदेमंडळानें कसाही कायदा केला तरी, एखाद्या व्यापाराच्या अगर उद्योगधंद्याच्या उत्तेजनार्थ प्रांतिक तिजोरींतून ग्रँट, बौंटी, अगर सब्सिडी (तऱ्हेतऱ्हेची मदत) या रूपानें जर कांहीं रकमा खर्चीं पडल्या तर त्या मिळण्याचा हक्क ब्रिटिश कंपन्या अगर उद्योगधंदे यांनाही राहील. वरील मदतीला पात्र करून घेण्याकरितां, ब्रिटिश कंपन्यांच्या बाबतींत, प्रांतिक कायदेमंडळाला पुढीलप्रमाणें अटी घालतां येतील:—(१) कंपनी ब्रिटिश हिंदुस्थानांत नोंदलेली असली पाहिजे. (२) निम्मे डायरेक्टर हिंदी लोकांपैकीं असले पाहिजेत. (३) कंपनीनें हिंदी विद्यार्थ्यांना शिकण्याकरितां योग्य त्या सर्व सवलती दिल्या पाहिजेत. ११७ वर जो ठिकठिकाणीं प्रांतिक कायद्याचा उल्लेख आला आहे त्यांत ऑर्डिनन्स (वटहुकूम), ऑर्डर (हुकूम), बायलॉ (पोटनियम), रूल (नियम) अथवा रेग्युलेशन यांचाही अन्तर्भाव होतो. ११८ फेडरेशनची स्थापना झाल्यावर, प्रघात पाडून परस्पर देशांमध्यें (हिंदुस्थान व युनायटेड किंगडम) व्यापार, उद्योगधंदे यांबाबत 'जशास तसें' या न्यायाचा अवलंब करितां येईल. असा व्यापारी तह दोघांच्या अनुमतीनें होईपर्यंत या वर दिलेल्या कलमांचा अंमल चालू राहील. ११९ व १२० विशिष्ट धंद्याबाबत पात्रता व वैद्यकीय पात्रता यासंबंधीं या कलमांतून संरक्षक बंधनें घालण्यांत आलीं आहेत. गव्हर्नराच्या आगाऊ मंजुरीशिवाय ब्रिटिश पदव्यांबाबत भेदाभेद करणारें बिल प्रांतिक कायदेमंडळांत प्रविष्ट होऊं दिलें जाणार नाहीं. सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें अगदीं आवश्यकच असल्यास गव्हर्नरनें सदर बिलास संमति देणेची आहे. प्रांतिक कायद्यान्वयें करावयाचे सर्व रेग्युलेशन, त्यांचा अमल सुरू होण्यापूर्वी, निदान चार महिने तरी आगाऊ प्रसिद्ध करण्याची तजवीज गव्हर्नरानें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें करावयाची आहे. एखाद्यानें केलेली तक्रार गव्हर्नरास जर योग्य वाटली तर त्यानें तो रेग्युलेशन रद्द करावा. ग्रेट ब्रिटनमधील कोणतीही वैद्यकीय पदवी, सर्टिफिकीट, डिप्लोमा इ० अमान्य करितां येणार नाहीं. मात्र कायचिकित्सा, शल्यतंत्र किंवा प्रसूतितंत्र या तिन्ही शाखांतील ज्ञान पुरेसें दिलेलें नाहीं या सबबीवर, सदर पदवी इ०, अमान्य करण्याचा हक्क प्रांतिक सरकारांना आहे. मात्र प्रीव्ही कौन्सिलनें एखाद्या डिप्लोम्याबाबतचें ज्ञान पुरेसें आहे असा निकाल दिल्यास तो डिप्लोमा मान्य करणें प्रांतिक सरकारांना भाग आहे.

## खंड ६ वा

## फेडरेशन व प्रांत यांमधील राज्यकारभारविषयक संबंध

१२२ प्रांताला लागू होणाऱ्या, फीडरल कायदेमंडळाच्या कायद्यांना योग्य मान दिला जाईल अशा बेतानें प्रांतिक राज्यकारभार चालविला जाईल. १२३ रानटी

टोळयांच्या प्रदेशाबाबत (उ० वायव्य सरहद्दप्रांतांतील टापू) आपला मुनीम म्हणून कारभार पाहण्यास गव्हर्नर जनरल प्रांतिक गव्हर्नराला हुकूम काढील; त्याचप्रमाणें संरक्षण, परराष्ट्रसंबंध व ख्रिस्ती भिक्षुक या खात्यासंबंधींही गव्हर्नर जनरलचा मुनीम म्हणून प्रांतिक गव्हर्नर वरून आलेले हुकूम अमलांत आणील; याबाबत गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें वागावयाचें आहे.

मूळ बिलांत हें १२३ वें कलम नव्हतें. परंतु कमिटींत बिल मंजूर झाल्यानंतर हें कलम नवीन घातलें गेलें. फीडरल सरकारनें प्रांतिक सरकारांवर जर कांहीं कामें सोपवावयाचीं तर गव्हर्नर जनरलनें गव्हर्नरावर आपला मुनीम म्हणून कामें सोपविण्याची व्यवस्था या नव्या कलमानें करण्यांत आली आहे.

१२४ प्रांतिक सरकारच्या संमतीने गव्हर्नर जनरलला त्याच्यावर फीडरल क्षेत्रांतील कामें, कांहीं अटी घालून अगर न घालून, सोपवितां येतील. तसेंच फीडरल कायद्यान्वयें, प्रांतिक यादीत अगर उभय यादींत नसलेल्या बाबीसंबंधींचे अम्मलबजावणीचे अधिकार प्रांतिक सरकारांना देतां येतील.

१ एप्रिल १९३७ नंतर वर उल्लेखिलेले अधिकार, मध्यवर्ती सरकाराकडून, प्रांतांवर सोपविल्याचीं अनेक उदाहरणें घडलीं आहेत. १८९९ च्या इंडियन स्टांप ॲक्टान्वयें चीफ कंट्रोलिंग रेव्हिन्यू ॲथारिटीची नेमणूक करण्याचें काम मध्यवर्ती सरकारनें मुंबई, मध्यप्रांत व वऱ्हाड आणि आसाम या प्रांतिक सरकारांवर सोपविलें आहे. त्याच कायद्याखालील इतरही कामें सर्व प्रांतांच्या गव्हर्नरांवर सोपवून दिलीं आहेत. तसेंच मुंबई सरकारच्या संमतीनें हिंदुस्थान सरकारनें मुंबई सरकारवर १९१७ च्या डिस्ट्रक्शन ऑफ रेकर्ड्स ॲक्टान्वयें करावयाचीं कामें सोपविल्याचें १८ जून १९३८ रोजीं जाहीर करण्यांत आलें आहे; आणि १८७८ च्या इंडियन आर्म्स ॲक्टान्वयें करावयाचीं कामें मुंबई सरकारावर सोपविल्याचें २८ जून १९३८ रोजीं जाहीर झालें आहे.

वरील कामाकरितां लागणारा जरूर तो खर्च फेडरेशनकडून प्रांतिक सरकारांना मिळावयाचा आहे; ही खर्चाची रक्कम आपापसांत तडजोडीनें न ठरल्यास हिंदुस्थानच्या चीफ जस्टिसनें नेमलेल्या पंचानें मुक्रर करावयाची आहे.

फीडरल यादींतील ४० वें सदर फीडरल कायदेमंडळाच्या निवडणुकीसंबंधीं आहे. प्रांतिक असेंब्ल्यांकडून व प्रांतिक सर्वसाधारण

मतदारसंघांतून सभासदांची निवडणूक व्हावयाची असल्यामुळें हीं कामें गव्हर्नर जनरलला किंवा फीडरल सरकारला प्रांतिक सरकाराकडे सोपविण्याखेरीज गत्यंतर नाहीं. या कामाकरितां जो खर्च येईल तो अर्थात् मध्यवर्ती सरकारकडून वरील कलमाच्या आधारें मिळावयाचा आहे.

१२६ फेडरेशनच्या अम्मलबजावणीच्या सत्तेला धक्का पोंचणार नाहीं अगर अडथळा निर्माण होणार नाहीं अशा बेतानें प्रांतिक राज्यकारभार चालविला पाहिजे. आणि एवढ्याकरितां जरूर ते हुकूम फीडरल सरकार प्रांतिक सरकारांना देईल. त्याचप्रमाणें उभय यादींतील म्हणजे तिसऱ्या यादींतील दुसऱ्या खंडांतील विषया-संबंधींच्या फीडरल कायद्याचा अम्मल करण्यास हुकूम देण्याचा अधिकार फेडरेशनला राहील. लष्करी महत्त्वाचीं जीं दळणवळणाचीं साधनें प्रांतामध्यें असतील त्याहीबाबत फेडरेशन प्रांतांना हुकूम देईल. सदर हुकूम प्रांतिक सरकारांनीं अमलांत आणले नाहींत तर गव्हर्नर जनरल आपल्या मर्जीप्रमाणें प्रांतिक गव्हर्नरला तसें करवून घेण्याबद्दल पुनः हुकूम काढील. त्याचप्रमाणें हिंदुस्थानच्या कोणत्याही भागाच्या शांततेस व स्वस्थतेस गंभीर स्वरुपाचा धक्का पोंचूं नये एवढ्याकरितां अमुक तऱ्हेनें प्रांतिक राज्यकारभार चालविला जावा असा हुकूम गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जी-प्रमाणें प्रांतिक गव्हर्नरांना काढावा.

कॉंग्रेसचा व इतर राजकीय पक्षांचाही फीडरल राज्यघटनेला विरोध आहे हें जगजाहीर आहे. या विरोधाला न जुमानतां ब्रिटिश सर-कारनें फेडरेशन अस्तित्वांत आणण्याचें ठरविलेंच तर या १२६ व्या कलमाच्या आधारें गव्हर्नर जनरल फीडरल कायदेमंडळांच्या निवडणुकी करण्यास प्रांतिक सरकारांना फर्मावील. तसें करण्याचें त्यांनीं नाकारल्यास गव्हर्नरामार्फत हें काम करण्याचा तो प्रयत्न करील. सदर कृत्याचा निषेध म्हणून प्रांतिक मंत्रिमंडळांनीं राजीनामा दिल्यास एक गंभीर घटनात्मक पेचप्रसंग निर्माण झाल्याशिवाय राहणार नाहीं. दंडुके-शाहीच्या व 'फोडा व झोडा' या राजनीतीच्या जोरावर गव्हर्नर कांहीं लोकांना फीडरल कायदेमंडळांत निवडून पाठवील. परंतु असें झालें म्हणजे राज्यघटनेचा भंग झाला असेंच कोणीही समंजस माणूस म्हणेल. हा प्रसंग नुसताच कपालकल्पित (मूळ शब्द 'कपाल' म्हणजे डोकें असाच आहे व तोच बरोबर आहे. कपोल म्हणजे गाल याचा अर्थाअर्थी कांहींही संबंध नाहीं) नसून नजीकच्या काळांत आपणापुढें वाढून

ठेविला आहे. भारतमंत्र्याच्या कायदेशीर सल्लागारांनीं त्यांना असा सल्ला दिला आहे कीं, " कॉंग्रेसनें प्रांतिक राज्यकारभाराचीं सूत्रें हातांत घेतलीं याचाच अर्थ तिनें फेडरेशनला संमति दिली व फीडरल निवडणुकींत भाग घेण्याचें तिनें कबूल केलें असा होतो." परंतु कॉंग्रेसतर्फे हजारों वेळां अशी घोषणा केली गेली आहे कीं, " प्रांतिक अधिकारग्रहण कॉंग्रेसनें केलें असलें तरी फेडरेशन हाणून पाडण्याकरितां या अल्पस्वल्प फायद्याचा त्याग करावयास कॉंग्रेस एका पायावर तयार आहे." परंतु ब्रिटिश मुत्सद्द्यांना या म्हणण्याची अद्याप खात्री पटत नाहीं. वास्तविक, आश्वासनमागणीचा पेचप्रसंग व संयुक्तप्रांत, बिहार या प्रांतांतील मंत्र्यांचे राजीनामे, व ओरिसा हंगामी गव्हर्नर प्रकरणीं राजीनाम्याची तयारी या अनेक उदाहरणांवरून, कॉंग्रेसला अधिकारपदांची कितपत किंमत व लालसा आहे हें कळून यावयास पाहिजे; परंतु आशेला अंत नाहीं या न्यायानें फीडरल राज्यघटना, गोड गोड बोलून व किरकोळ फरक करण्याची तयारी दाखवून, हिंदुस्थानच्या गळ्यांत बांधण्याचा ब्रिटिश सरकारनें चंग बांधला आहे. परंतु तशी प्रत्यक्ष परिस्थिति निर्माण झाल्यावर, कॉंग्रेसनें आपली घोषणा कृतींत आणल्यावरच ब्रिटिश सरकारचा भ्रमनिरास होईल; तोंपर्यंत तो व्हावयाचा नाहीं हें स्पष्ट दिसत आहे.

या १२६ व्या कलमाच्या शेवटच्या भागांत दिलेल्या अधिकारान्वयेंच गव्हर्नर जनरल लॉर्ड लिनलिथगो यांनीं संयुक्तप्रांत व बिहार येथील गव्हर्नरांना राजबंद्यांची मुक्तता न करण्याबद्दल हुकूम काढला होता. याचा निषेध म्हणून या दोन प्रांतांतील मंत्र्यांनीं राजीनामे दिले होते. पुढें सरकार आणि कॉंग्रेस यांजमध्यें तडजोड झाली हा भाग निराळा. वास्तविक दहावीस कैद्यांना सोडण्यानें प्रांताच्या शांततेस कांहींच धोका पोंचत नव्हता; प्रांतिक गव्हर्नरांनीं ५२ व्या कलमांतील 'जादा जबाबदारी'च्या आधारें मंत्र्यांच्या कृत्याला हरकत घेतली नाहीं यावरून हें उघड आहे. तेव्हां इतर प्रांतांतील उ० पंजाब व बंगाल या प्रांतांतील शांततेस धक्का पोंचेल या सबबीवर ( जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचा रिपोर्ट परिच्छेद २२२ ) गव्हर्नर जनरलनें १२६ कलमाचा उपयोग केला.

परंतु असा हुकूम काढण्याला 'आम्ही गव्हर्नर जनरलला विनंति केली नाहीं' असें बंगाल व पंजाब प्रांतांतील मंत्रिमंडळांनीं जाहीर केल्यामुळें गव्हर्नर जनरलची सबब लंगडी पडून त्याच्या या कृत्याचें सर्वत्र हसें झालें. तात्पर्य, वरून साळसूद दिसणारीं कलमें प्रसंगीं कशीं उत्पात करणारीं ठरतात हें यावरून दिसून येईल.

१२७ फीडरल कामाकरितां जरूर लागल्यास प्रांतांतील जमीन अक्वायर करून देण्यास सांगण्याचा अधिकार फेडरेशनला आहे. अर्थात् याबाबत लागणारी रक्कम प्रांताला फेडरेशनकडून मिळेल.

१२९ ब्रॉड कास्टिंग (रेडिओवरून मतप्रचार करणें इ०) बाबतचीं कामें फेडरेशन प्रांतिक सरकारावर सोपविण्यास, तसें विशेष कारण असल्याशिवाय नाकारणार नाहीं. याबाबत कांहीं तंटा उत्पन्न झाल्यास गव्हर्नर जनरल त्याचा आपल्या मर्जीप्रमाणें निर्णय करील.

रेडिओचा मतप्रचाराचे कामाकरितां उपयोग होऊं देण्याबाबत त्या खात्याचे अधिकारी मि. फील्डेन यांनीं असें सांगितलें कीं, "सर्व मतांच्या लोकांना रेडिओचा मतप्रचाराच्या कामीं उपयोग करूं द्यावा असें माझें वैयक्तिक मत आहे. परंतु हिंदुस्थान सरकारनें रेडिओचा राजकीय कामाकरितां उपयोग करूं द्यावयाचा नाहीं असें आपलें धोरण ठरविलें आहे." मध्यवर्ती असेंब्लीमध्यें, हरिपुरा काँग्रेसला रेडिओचा उपयोग करण्यासाठीं दिलेली परवानगी कां काढून घेतली या प्रश्नास उत्तर देतांना सर थॉमस स्टेवार्ट म्हणाले : "हरिपुरा काँग्रेस ब्रॉड कास्टिंगची व्यवस्था रद्द केली, तिचा बिहार व संयुक्तप्रांत या प्रांतांत उत्पन्न झालेल्या राजकीय पेचप्रसंगाशीं कांहींही संबंध नाहीं. मंत्र्यांनीं राजीनामे देण्यापूर्वी तीन चार दिवस ब्रॉड कास्टिंगबाबत निर्णय करण्यांत आला होता. ती परवानगी कां रद्द केली याच्या पाठीमागें धोरणाची बाब असल्यामुळें तें धोरण पुरवणी-प्रश्नाला उत्तर म्हणून जाहीर करितां येणार नाहीं. राजकीय कामाकरितां रेडिओचा उपयोग करावयाचा नाहीं हें जें सरकारचें सर्वसाधारण धोरण आहे त्याला विसंगत असें कांहीं होऊं द्यावयाचें नाहीं असें सरकारनें ठरविलें आहे. व्हाइसरॉय कधीं कधीं रेडिओवरून आपलें धोरण जाहीर करतात, ती एक 'बातमीची बाब' आहे असें मानण्यांत येतें. त्यांत राजकारणाचा

किंवा राजकीय मतप्रचाराचा कांहींही संबंध नाहीं." अगदीं अलीकडे मुंबई स्टेशनवरून मसानी व सेटलवाड यांनीं आपापल्या पक्षातर्फे मतप्रचार केला, ही गोष्ट वरील जाहीर धोरणाला धरून आहे असें म्हणतां येणार नाहीं. हिंदुस्थानांत अद्यापि ब्रॉड कास्टिंगचा प्रचार झालेला नाहीं. पाश्चात्य देशांतून तेथील सरकारच्या हातांत हें एक मतप्रचाराचें व लोकशिक्षणाचें प्रचंड साधन बनलें आहे.

१३० पाणीपुरवठ्याबाबत दुसरें एखादें प्रांतिक सरकार आपल्या हक्कावर आक्रमण करीत आहे असें एखाद्या प्रांतिक सरकाराला वाटल्यास त्यानें त्यासंबंधीं गव्हर्नर जनरलकडे तक्रार करावी. १३१ या तक्रारीची चौकशी करण्याकरितां गव्हर्नर जनरलनें कालवे, स्थापत्य, राज्यकारभार, अर्थशास्त्र, कायदा या विषयांतील तज्ज्ञांचें एक कमिशन नेमावें व या कमिशननें आपला अहवाल गव्हर्नर जनरलकडे सादर करावा व त्याला धरून गव्हर्नर जनरलनें तंट्याचा निकाल करावा. या निकालाची अम्मलबजावणी प्रांतिक सरकारांनीं केली पाहिजे. एखादा प्रांतिक कायदा दिलेल्या निकालाशीं विसंगत असल्यास तेवढ्यापुरता तो कायदा रद्द मानला जाईल. या कमिशनबाबत जो खर्च येईल तो प्रांतांनीं ठराविक प्रमाणांत द्यावयाचा आहे. या खर्चाच्या रकमेवर कायदेमंडळाला मत देऊन मंजुरी देण्याचा अधिकार नाहीं. १३५ सर्व प्रांतांना सामान्य अशा गोष्टींचा विचार करण्याकरितां एखादें 'आन्तरप्रान्तीय मंडळ' राजेसाहेबांना तशी विनंति केल्यास स्थापितां येईल.

दोन अथवा अधिक प्रांतांनीं समान गोष्टीबद्दल सहकार्य केल्याचें उदाहरण, बिहार आणि संयुक्तप्रांत येथील सरकारांनीं 'उसाची विक्रीची किंमत' परस्परसंमतीनें ठरविल्याचें देतां येईल. तसेंच, तुंगभद्रेच्या पाण्याबाबत तंटा मिटविण्याकरितां हैदराबाद, म्हैसूर व मद्रास प्रांतांचे मुख्य प्रधान बंगलोर येथें जमले व त्यांनीं त्याबाबत आपापसांत वाटाघाट केली. 'फेडरेशन' हिंदी लोकांच्या पसंतीप्रमाणें अमलांत आल्यावर प्रांत व संस्थानें यांच्यामध्यें अधिक अधिक सहकार्य व समान धोरण आंखलें जाईल हें निःसंशय आहे.

## खंड ७ वा

## वसूल, मालमत्ता, करार आणि फिर्यादी

१३६ 'प्रांताच्या वसुलांत' प्रांतानें उभारलेल्या किंवा प्रांताला मिळालेल्या सर्व वसुलांचा व सार्वजनिक पैशांचा अन्तर्भाव होतो. १३७ शेतजमिनीखेरीज इतर

मालमत्तेवरील वारसाकर, स्टांपड्यूटी, टर्मिनल कर, रेल्वेभाड्यावरील कर हे सर्व फेडरेशननें बसवून वसूल करावयाचे आहेत, परंतु खर्चवेच वजा जातां ऐन जमा होणारी रक्कम फीडरल कामाकरितां उपयोगांत यावयाची नसून फीडरल कायद्यानें ठरविलेल्या प्रमाणांत ती रक्कम प्रांतांना वाटून मिळावयाची आहे.

१९३८ एप्रिलमध्यें मध्यवर्ती कायदेमंडळांत स्टांपड्यूटी बिल सरकारनें मांडलें होतें. त्याचा उद्देश 'चेक'वर पुनः कर बसविण्याचा होता. बँकांमार्फत देवघेवीचा व्यवहार करण्याच्या सवयीला या करामुळें धक्का बसणार या भीतीनें व्यापाऱ्यांनीं सदर कराला विरोध केला. मागें दिल्लीस प्रांतिक अर्थमंत्र्यांची परिषद भरली असतांना प्रांतांचें उत्पन्न वाढविण्याच्या दृष्टीनें सदर कर बसविण्यास अर्थमंत्र्यांनीं संमति दिली होती. तेव्हां 'इकडे आड, तिकडे विहीर' अशी काँग्रेसची परिस्थिति झाली. शेवटीं स्टांपड्यूटी बिलाला विरोध करण्याचें काँग्रेसनें ठरविलें.

१३८ प्राप्तीवरील कर फेडरेशननेंच बसवावयाचा व वसूल करावयाचा आहे; मात्र ऐन जमेपैकीं शेंकडा ठराविक रक्कम प्रांतांना वाटून द्यावयाची आहे.

सर ओटो नेमीयर यांनीं दिलेल्या निर्णयाप्रमाणें हें प्रमाण जास्तींत जास्त शेंकडा ५० इतकें ठरविण्यांत आलें आहे. रुपयापैकीं ८ आणे प्रांतांना मिळणार असल्यामुळें या प्राप्तीवरील कराच्या वसुलींत प्रांतांचे आर्थिक हितसंबंध चांगलेच निगडित झाले आहेत. १९३७–३८ या सालांत मध्यवर्ती सरकारनें सव्वा कोटी रुपये पुढीलप्रमाणें अकरा प्रांतांना दिले आहेतः—

| प्रांत | शेंकडा | रक्कम रु. |
|---|---|---|
| १ मद्रास | १५ | १८,७५,००० |
| २ मुंबई | २० | २५,००,००० |
| ३ बंगाल | २० | २५,००,००० |
| ४ संयुक्तप्रांत | १५ | १८,७५,००० |
| ५ पंजाब | ८ | १०,००,००० |
| ६ बिहार | १० | १२,५०,००० |
| ७ मध्यप्रांत आणि वऱ्हाड | ५ | ६,२५,००० |

| प्रांत | शेंकडा | रक्कम रु. |
|---|---|---|
| ८ आसाम | २ | २,५०,००० |
| ९ सरहद्दप्रांत | १ | १,२५,००० |
| १० ओरिसा | २ | २,५०,००० |
| ११ सिंध | २ | २,५०,००० |
| | १०० | १,२५,००,००० |

या रकमा प्रांतांच्या खात्यावर मध्यवर्ती सरकारनें जमा करून ठेवल्या आहेत.

१४०. मिठावरील कर, (निर्माणस्थानाच्या ठिकाणीं घेतलेला) फीडरल एक्साइज कर आणि निर्यात जकाती फेडरेशनकडून बसविल्या जातील व वसूल केल्या जातील; परंतु फीडरल कायद्यानें तसें ठरविल्यास, ऐन जमेपैकीं सर्वच्या सर्व अथवा कांहीं अंश प्रांतांना ठरीव प्रमाणांत वाटून देतां येईल.

आसाममध्यें उत्पन्न होणाऱ्या पेट्रोल व केरोसीनवरील एक्साइज कर सर्वच्या सर्व आसाम प्रांताला मिळाला पाहिजे असा आसाम प्रांतिक कायदेमंडळानें एकमतानें ठराव मंजूर केला आहे. आसामी लोकांचें म्हणणें असें कीं, " आम्ही ब्रिटिश हिंदुस्थानांत अडकलेले आहों म्हणून आम्हांला पेट्रोलवरील कर मिळत नाहीं. तेंच पहा, ब्रह्मदेश स्वतंत्र झाल्यामुळें पेट्रोल कर ब्रह्मदेशाला मिळतो. फेडरेशनपासून फुटून निघण्याला आमच्या बाबत हें आणखी एक महत्त्वाचें कारण आहे " तागाच्या निर्गतीवर कराचें उत्पन्न बंगाल प्रांताला शेंकडा ६६$\frac{2}{3}$ इतकें देण्याची तजवीज करण्यांत आली आहे.

१४२ फेडरेशननें कांहीं प्रांतांना मदतीदाखल देणग्या देण्याची व्यवस्था करण्यांत आली आहे.

१९३६ च्या 'उत्पन्नाची वाटणी' या ऑर्डर इन कौन्सिलअन्वयें पुढीलप्रमाणें रकमा देणगीदाखल देण्याचें ठरविण्यांत आलें आहे:—

१ संयुक्तप्रांत :

१ एप्रिल १९३७ पासून पांच वर्षेपर्यंत दरसाल २५ लाख रुपये.

२ आसाम :

दरसाल ३० लाख रुपये.

३ वायव्य सरहद्दप्रांत :

दरसाल १०० लाख रुपये.

४ ओरिसा :

| | |
|---|---|
| १९३७-३८ सालीं | ४७ लाख रुपये. |
| १९३८-३९ पासून १९४१-४२ अखेर दरसाल | ४३ लाख रुपये. |
| त्यानंतर दरसाल | ४० लाख रुपये. |

५ सिंध :

| | |
|---|---|
| १९३७-३८ सालीं | ११० लाख रुपये. |
| पुढील नऊ वर्षांत दरसाल | १०५ लाख रुपये. |
| त्याच्यापुढील वीस वर्षांत दरसाल | ८० लाख रुपये. |
| ,, पांच वर्षांत दरसाल | ६५ लाख रुपये. |
| ,, पांच वर्षांत दरसाल | ६० लाख रुपये. |
| ,, पांच वर्षांत दरसाल | ५५ लाख रुपये. |

याखेरीज १ एप्रिल १९३७ ला मागील सर्व हिशेब भागवून प्रांतांच्या खात्याला, मध्यवर्ती सरकारच्या हिशेबांत, पुढील प्रांतवार रकमा जमा केल्या गेल्या:—

| | |
|---|---|
| १ मद्रास | ६६ लाख रुपये |
| २ मुंबई | ४७ ,, ,, |
| ३ बंगाल | ४९ ,, ,, |
| ४ संयुक्तप्रांत | ५५ ,, ,, |

| | | |
|---|---|---|
| ५ | पंजाब | ४३ लाख रुपये |
| ६ | बिहार | २१ ,, ,, |
| ७ | मध्यप्रांत व वऱ्हाड | २५ ,, ,, |
| ८ | आसाम | १८ ,, ,, |
| ९ | वायव्य सरहद्दप्रांत | ९ ,, ,, |
| १० | ओरिसा | ९ ,, ,, |
| ११ | सिंध | ९ ,, ,, |
| | एकूण | ३५२ लाख रुपये |

सिंध प्रांताला लॉइड धरणाबाबत असलेल्या जवळ जवळ वीस कोटी रु. कर्जाला १९३७ ते १९४२ पर्यंत पूर्वीचाच व्याजाचा दर लावण्यांत आला आहे. १९४२ पासून मात्र सदर व्याजाचा दर शें. ४½ आकारण्यांत येणार आहे. याबाबत सिंध सरकार व हिंदुस्थान सरकार यांच्या दरम्यान वाटाघाटी चालल्या असल्याबद्दल पूर्वी उल्लेख येऊन गेलाच आहे. हिंदुस्थान सरकारला सिंध सरकारनें द्यावयाचें हें कर्ज ठरीव हप्त्यांनींच दिलें पाहिजे. कर्जाची फेड अधिक द्रुत गतीनें करितां यावयाची नाहीं अशी या कर्जाबाबत एक जादा अट लादण्यांत आलेली आहे. प्रत्येक प्रांतानें मध्यवर्ती सरकारचें जें कर्ज फेडावयाचें आहे तें दर सहा महिन्यांनीं मुद्दल व व्याज यांच्या ठरीव हप्त्यांनीं फेडणेचें आहे. ४५ वर्षांनीं म्हणजे ३१ मार्च १९८२ अखेर सर्व प्रांत हिंदुस्थान सरकारच्या कर्जातून मुक्त होतील. निरनिराळ्या प्रांतांना कर्जाच्या फेडीच्या निरनिराळ्या तारखा ठरविण्यांत आल्या आहेत. मुंबई प्रांताच्या या तारखा ३१ जुलै आणि ३१ जानेवारी या आहेत.

१४३ १ एप्रिल १९३७ पूर्वी कोणत्याही प्रांतिक सरकारनें, म्युनिसिपालिटीनें, अगर स्थानिक स्वराज्य संस्थेनें बसविलेले कर, जकाती, फी इ०, ते सर्व जरी फीडरल यादींत अन्तर्भूत असले तरी, बसविण्यास व वसूल करण्यास प्रत्यवाय येणार नाहीं. मात्र फीडरल कायद्यानें याहून अन्य व्यवस्था करण्याचें ठरविल्यास वरील कर बसवितां येणार नाहींत व वसूल करितां यावयाचे नाहींत.

उदाहरणार्थ, म्युनिसिपालिट्यांनीं बसविलेले टर्मिनल कर. संयुक्तप्रांतीय सरकारनें ५० मैल किंवा अधिक अंतर रेल्वेनें प्रवास करणाऱ्या

उतारूंवर माणशीं एक आणा कर बसविण्याचा विचार केला होता. या करानें ४० लाख रुपये उत्पन्न मिळणार होतें. परंतु मध्यवर्ती सरकारनें या योजनेला संमति दिली नाहीं. संयुक्तप्रांतांतील कांहीं म्युनिसिपालिट्यांनीं टर्मिनल करांच्या दरांत वाढ करण्यास परवानगी देण्याबद्दल प्रांतिक सरकाराला विनंति केली होती. परंतु सदर कर हे फीडरल अधिकारक्षेत्रांतील असल्यामुळें त्याबाबत परवानगी देण्यास आपणास अधिकार नसल्याचें संयुक्तप्रांतीय सरकारनें म्युनिसिपालिट्यांना कळविलें आहे. मध्यवर्ती सरकाराकडे विनंति केल्यास ती मान्य होण्याची फारशी आशा नाहीं.

१५० हिंदुस्थानच्याच कोणत्या तरी भागाच्या कामाव्यतिरिक्त इतर कामाकरितां प्रांतिक उत्पन्नावर कोणताही बोजा लादण्यांत येणार नाहीं. एखाद्या कामाबाबत प्रांतिक कायदेमंडळाला कायदा करण्याचा अधिकार नसला तरी त्या कामाकरितां प्रांताला मदतीदाखल रकमा मंजूर करितां येतील. १५१ प्रांताचें उत्पन्न म्हणून जमा झालेला सर्व पैसा प्रांतिक खजिन्यांत सामील करून घेण्यासंबंधींचे सर्व नियम प्रांतिक गव्हर्नरानें आपलें वैयक्तिक मत चालवून करावयाचे आहेत. हे नियम पैसा भरणें, काढून घेणें व धारण करणें या तिन्ही बाबींसंबंधीं असतील.

मुंबई प्रांतापुरते वरील नियम १ एप्रिल १९३७ रोजीं निघालेल्या मुंबई सरकारच्या गॅझेटमध्यें प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. १५१ कलम मूळ बिलांत नव्हतें; मागाहून घातलेलें आहे. १९१९ च्या कायद्यान्वयें जे 'डेव्होल्यूशन' नियम केले होते त्यांत या कलमांतील व्यवस्था दिलेली होती. ही बाब या कलमान्वयें 'नियमां'तून काढून कायद्याच्या 'कलमां'त आणून ठेविली आहे.

१५५ ब्रिटिश हिंदुस्थानांत असलेल्या जमिनीबाबत अगर इमारतीबाबत किंवा ब्रिटिश हिंदुस्थानांत उत्पन्न होणाऱ्या अगर मिळणाऱ्या प्राप्तीबाबत प्रांतिक सरकारला फीडरल कर द्यावा लागणार नाहीं; मात्र आपल्या क्षेत्राच्या बाहेर एखाद्या प्रांतिक सरकारनें व्यापारधंदा चालविला असल्यास त्याबाबत फीडरल कराची माफी मिळणार नाहीं. १५६ एखादें कोर्ट अगर कमिशन याबाबतचा खर्च, त्याचप्रमाणें सरकारी नोकरांना पेन्शन म्हणून द्यावयाच्या रकमेचा खर्च ठराविक प्रमाणांत प्रांतिक वसुलांतून आकारला जाईल; हें प्रमाण, परस्पर संमतीनें न ठरल्यास, हिंदुस्थानच्या सरन्यायाधीशानें नेमलेल्या पंचानें ठरवावें. १५७ प्रांतांच्या खर्चाकरितां म्हणून विलायतेंत भारतमंत्री किंवा हिंदी हायकमिशनर या दोघांच्या

हातांत भरपूर पैसा राहील याची व्यवस्था प्रांतिक सरकारनें करावयाची आहे. १६३ प्रांतिक वसुलाच्या तारणावर, वेळोवेळीं प्रांतिक कायदेमंडळानें कायद्यान्वयें घालून दिलेल्या मर्यादेच्या आंत, कर्ज काढण्याचा व हमी देण्याचा प्रांतिक सरकारला अधिकार आहे. फेडरेशननें स्वतः प्रांतांना कर्ज द्यावें अगर त्यांच्याबद्दल हमी घ्यावी. फेडरेशनच्या परवानगीशिवाय प्रांतांनीं हिंदुस्थानाबाहेर कर्जें काढूं नयेत. तसेंच कांहीं कारण असल्याशिवाय फेडरेशननें सदर परवानगी नाकारूं नये. याबाबत प्रांतिक सरकार व फीडरल सरकार यांच्यामध्यें तंटा उपस्थित झाल्यास तो गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें मिटवावा.

१९३७-३८ या सालांत शेंकडा ३ व्याजानें व १०० च्या कर्जरोख्याला ९९ या दरानें पुढीलप्रमाणें प्रांतिक सरकारांनीं कर्जें काढलीं:—

| | |
|---|---|
| १ मद्रास | १५० लाख रुपये |
| २ संयुक्तप्रांत | १०० ,, ,, |
| ३ पंजाब | १०० ,, ,, |
| ४ मध्यप्रांत व वऱ्हाड | ५० ,, ,, |
| ५ वायव्य सरहद्दप्रांत | ६० ,, ,, |
| एकूण | ४६० लाख रुपये |

या कर्जांचा विनियोग जुनीं अधिक व्याजाचीं कर्जें फेडण्याकरितां व उत्पादक धंद्यांत भांडवल घालण्याकरितां केला गेला. हीं कर्जें एकाच वेळीं रिझर्व बँकेमार्फत उभारण्यांत आलीं.

१६६ हिंदुस्थानचा ऑडिटर जनरल प्रांतांच्या हिशेबाबाबत ऑर्डर इन कौन्सिलनें सोपविलेलीं सर्व कामें करील व सर्व अधिकार चालवील. १६७ १ एप्रिल १९३९ नंतर एखाद्या प्रांतिक कायदेमंडळानें आपल्या प्रांताकरितां स्वतंत्र ऑडिटर जनरल असावा व त्याचा खर्च प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' असावा असा कायदा केला तर तो कायदा मंजूर झाल्यापासून तीन वर्षांनंतर राजेसाहेबांनीं त्या प्रांताकरितां स्वतंत्र ऑडिटर जनरलची नेमणूक करावी. या प्रांतिक ऑडिटर जनरलला हिंदुस्थानचा ऑडिटर जनरल म्हणून पुनः नेमतां येईल. प्रांतिक ऑडिटर जनरलचा पगार, भत्ता अथवा पेन्शन हीं सर्व प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' मानलीं जातील. हिंदुस्थानचा ऑडिटर जनरल प्रांतिक ऑडिटर जनरलांना प्रांतिक हिशेबाबाबत योग्य त्या सूचना देईल. १६८ गव्हर्नर जनरलच्या संमतीनें हिंदुस्थानचा ऑडिटर जनरल ठरवील त्या पद्धतीप्रमाणें व त्या तत्त्वांना अनुसरून प्रांतिक सरकारांनीं आपापले हिशेब ठेवले पाहिजेत.

'सरकारी निळ्या पुस्तकांतील आंकड्यांचा घोटाळा अगर जादूगिरी उलगडत नाहीं व त्यांतले हिशेबाचे आंकडे अगदींच नीरस असतात' या आमदारांच्या योग्य तक्रारीबद्दल सहानुभूति व्यक्त करून मुंबई सरकारचे अर्थमंत्री ना. लठ्ठे मुंबई असेंब्लींत म्हणाले : "आपण म्हणतां ती अडचण खरी आहे. परंतु त्याचा दोष कॉंग्रेस सरकारवर येत नाहीं. ऑडिटर जनरलनें घालून दिलेल्या पद्धतीप्रमाणेंच अंदाजपत्रक तयार करून आपणासमोर मांडावें लागतें. त्याला आमचा नाइलाज आहे."

१६९ प्रांताच्या हिशेबाबाबत ऑडिटर जनरलनें केलेला रिपोर्ट प्रांतिक गव्हर्नरकडे सादर करण्यांत येईल; गव्हर्नर तो रिपोर्ट कायदेमंडळापुढें ठेवील.

या १९३५ च्या कायद्यांत प्रांतिक कायदेमंडळांतील सभासदांची पब्लिक अकौंट्स कमिटी व तिची घटना याबद्दल कांहींच उल्लेख आलेला नाहीं. त्याबद्दल जुन्या नियमाप्रमाणें, कायदेमंडळाच्या नवीन तयार झालेल्या नियमांत स्पष्ट निर्देश केला आहे. हिशेबांत खर्चीं पडलेल्या रकमा योग्य कामाकरितां व कायदेशीर आधारानें खर्च झाल्या अगर नाहीं, एका बाबीसंबंधीं मंजूर झालेली रक्कम दुसऱ्या बाबीकरितां खर्च झाली ती गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें केलेल्या अथवा फिनॅन्स खात्यानें केलेल्या नियमांना धरून खर्चीं पडली अगर नाहीं, तसेंच व्यापारधंदा, नफाबोटापत्रक इत्यादि तपासणें त्याचप्रमाणें शिलकी सामानाचा झाडा घेणें या सर्व गोष्टी वरील कमिटीनें करावयाच्या आहेत.

१७० एखाद्या प्रांताच्या उत्पन्नाशीं संबंध असणाऱ्या उलाढालीबाबत विलायतेंत इंडियन होम अकौंट्सच्या ऑडिटरनें काम पहावयाचें आहे व अधिकार चालवावयाचे आहेत. त्यासंबंधींचा रिपोर्ट या विलायतेंतील ऑडिटरनें ऑडिटर जनरलकडे सादर करावयाचा आहे; व या हिंदुस्थानच्या ऑडिटर जनरलनें तो रिपोर्ट आपल्या वार्षिक रिपोर्टांत समाविष्ट करून प्रांतिक गव्हर्नराकडे सादर करणेचा आहे.

१७२ प्रांतामध्यें असलेल्या सर्व सरकारी जमिनी व इमारती त्या प्रांताच्या उपयोगाकरितां राजेसाहेबांच्या नांवावर असतील; त्याचप्रमाणें १ एप्रिल १९३७ पासून, राजेसाहेबांच्या नांवावर असलेली सर्व मालमत्ता त्या प्रांताच्या राज्यकारभाराच्या उपयोगाकरितां राजेसाहेबांच्या मालकीची राहील. तसेंच हिंदुस्थान सरकारकडे प्रांतांची असलेली 'जमा' रक्कम व 'नांवें' रक्कम १ एप्रिल १९३७ नंतर त्या त्या प्रांतांच्या नांवावर मांडली जाईल. 'मालमत्ता' या शब्दांत सिक्युरिटी, बँकांतील

शिल्का, आणि सर्व तऱ्हेची जंगम चीजवस्त यांचा अंतर्भाव होतो. १ एप्रिल १९३७ पूर्वी येणें असलेली करांची बाकी, तो कर १ एप्रिल १९३७ नंतर प्रांतिक सरकाराकडे येत असला तर प्रांतिक सरकारनेंच वसूल करावयाची आहे.

सदर कलम मूळ बिलांत नव्हतें; मागाहून घातलेलें आहे.

१७४ योग्य वारस नसल्यामुळें सरकारांत जमा होणारी मालमत्ता ती ज्या प्रांतांत असेल त्या प्रांताच्या सरकारकडे जमा केली जाईल. १७५ प्रांताच्या ताब्यांत असलेली मालमत्ता दुसऱ्यास देणगी म्हणून देणें, विकणें अथवा गहाण टाकणें या सर्व गोष्टींबाबत प्रांतिक सरकारचा अधिकार चालेल; त्याचप्रमाणें एखादी मालमत्ता विकत घेणें अगर सार्वजनिक हिताकरितां अक्वायर करून घेणें किंवा करारनामे करणें या सर्व गोष्टी प्रांतिक सरकारच्या अधिकारकक्षेंत पडतात.

मुंबई सरकारनें 'टॅव्हिस्टॉक' व 'डूमोर' हे दोन सरकारी मालकीचे बंगले अनुक्रमें चार लाख व तीन लाख रुपयांना विकले आहेत. वरीलपैकीं दुसरा बंगला काश्मीर राजघराण्यांतील एका इसमाला विकला असल्यामुळें या व्यवहाराला हिंदुस्थान सरकारची मंजुरी पाहिजे.

गव्हर्नराचें राहतें घर व त्याला लागून असणारी जमीन विकून टाकणें अथवा घर व जमीन याबाबत करावयाचे फेरफार करणें या गोष्टी गव्हर्नराच्या अनुमतीशिवाय, करितां येणार नाहींत. प्रांतिक सरकारनें केलेले सर्व करारमदार प्रांतिक गव्हर्नराच्या नांवानें केल्याचें दर्शविण्यांत येईल, तसेंच वरील करारमदार करणें आणि मालमत्तेचे विमे उतरविणें या गोष्टी गव्हर्नराच्या हुकमाप्रमाणें गव्हर्नर ठरवील त्या पद्धतीप्रमाणें योग्य त्या अधिकाऱ्याकडून केल्या जातील.

मुंबई सरकारतर्फे, भगवानदास गोवर्धनदास या इसमाबरोबर मुंबईच्या कलेक्टरनें एक करारनामा करण्याचें ठरविलें. दस्तैवज न करितां, सदर करारनामा पत्रव्यवहार करून करितां येतो काय हा प्रश्न मुंबई हायकोर्टानें निर्णीत केला. ह्या कायद्यांतील १७५ कलमासारखेंच १९१९ च्या कायद्यांतील ३० वें कलम होतें. या खटल्याचे पूर्वी दुसऱ्या दोन खटल्यांत मुंबई हायकोर्टानें आपलें असें मत प्रदर्शित केलें होतें कीं, करारनाम्याचा दस्तैवज रीतीप्रमाणें केला पाहिजे; केवळ पत्रव्यवहारानें भागणार नाहीं. परंतु या प्रस्तुत खटल्यांत हायकोर्टानें पुढीलप्रमाणें निकाल दिला:—

"रीतसर करारनामा करावयास हवा किंवा नाहीं ही गोष्ट संशयास्पद आहे. 'एक्झिक्युटेड' म्हणजे 'केलेला' ही शब्दयोजना पत्र-

व्यवहाराच्या पद्धतीला तितकीशी चांगली लागू पडत नाहीं. म्हणून करारनाम्याचा प्रत्यक्ष दस्तैवज करून घेणें हा अधिक शहाणपणाचा मार्ग. तथापि वर पत्रव्यवहारानें केलेला करार बेकायदेशीर आहे असें म्हणण्यास आम्ही तयार नाहीं."

वरील करारनाम्याबाबत गव्हर्नर अगर त्यानें नेमलेला अधिकारी व्यक्तिशः जबाबदार धरला जाणार नाहीं. १७६ प्रांतिक सरकारानें प्रांताच्या नांवानें फिर्याद करावी अगर प्रांतिक सरकारावर प्रांताच्या नांवानें फिर्याद चालावी. विलायतेंत वरीलप्रमाणें फिर्याद दाखल झाली तर ती हायकमिशनरनें चालवावी अगर त्याच्यावर प्रांताचा प्रतिनिधी म्हणून चालविली जावी. १७७ १ एप्रिल १९३७ पूर्वी भारतमंत्र्यानें केलेल्या कोणत्याही कराराचा अम्मल, जणूं तो करार प्रांतातर्फेंच करण्यांत आला आहे अशा तऱ्हेनें, चालेल. १७८ ज्या ज्या कर्जांना व हमींना भारतमंत्र्यानें हिंदुस्थानच्या उत्पन्नाचें तारण दिलें होतें त्या कर्जांना व हमींना फेडरेशन आणि प्रांत या दोघांच्या उत्पन्नांचें तारण यापुढें दिलें जाईल असें मानण्यांत येईल. ज्या कर्जेरोख्यांचें व्याज पौंडांत द्यावयाचें ठरलें असेल अशांचें मुद्दल अगर व्याज देतांना, प्रांतिक कायदेमंडळाच्या कायद्यानें, एक छदामही कमी करतां येणार नाहीं. १ एप्रिल १९३७ पूर्वी प्रांतिक उत्पन्नाच्या तारणावर दिलेलीं सर्व कर्जें या कायद्याप्रमाणें ठरविण्यांत आलेल्या योग्य त्या प्रांतांनीं फेडावयाचीं आहेत. १७९ प्रांताविरुद्ध कोणालाही खटला करितां येईल आणि त्या खटल्याच्या निकालांत प्रांतानें कर्ज, नुकसान अगर खर्च या नात्यानें द्यावयाची ठरलेली रक्कम आणि बचावाकरितां झालेल्या खर्चाची रक्कम प्रांताच्या उत्पन्नांतून दिली जाईल. १ एप्रिल १९३७ नंतरच्या कोणत्याही करारनाम्यांत पुढीलप्रमाणें तरतूद केलेली असावी—विलायतेंत प्रांतांतर्फें भारतमंत्र्यानें फिर्याद करावी अगर भारतमंत्र्यावर फिर्याद चालावी आणि कोर्टानें 'भारतमंत्र्यानें अमुक रक्कम द्यावी' असा हुकूम काढल्यास ती रक्कम प्रांतिक उत्पन्नांतून दिली जावी.

## खंड ८ वा

## फीडरल रेलवे ॲथॉरिटी

१८७ फीडरल रेलवे हद्दींत शांतता व सुव्यवस्था राखण्याचे कामीं पोलिसाबाबत प्रांतिक सरकार जो खर्च करील तितकी रक्कम फीडरल रेलवे ॲथॉरिटीनें प्रांतांना देणेची आहे. प्रांत आणि ॲथॉरिटी या दोघांमध्यें रक्कमेबाबत तंटा उपस्थित झाल्यास तो गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें मिटवावयाचा आहे.

फेडरेशनच्या अंगभूत संस्थांपैकीं आतांपर्यंत फक्त 'फीडरल कोर्टा'-ची स्थापना करण्यांत आली आहे. फीडरल रेलवे ॲथॉरिटीची स्थापना

अद्याप झालेली नाहीं. तोंपर्यंत रेल्वेचा सर्व कारभार हिंदुस्थान सरकार-तर्फे रेल्वेबोर्डच पाहत आहे. तेव्हां प्रांतांना रेल्वेहद्दींतील पोलिसांबाबत येणारा खर्च रेल्वेबोर्डाकडून मिळणार हें उघड आहे. वरील कलमांतील 'इक्वीव्हेलंट' या शब्दावरून, त्याप्रीत्यर्थ जितका खर्च येईल तितका सगळाच्या सगळा मध्यवर्ती सरकाराकडून प्रांतिक सरकारांना वास्तविक मिळावयास पाहिजे. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें आपल्या रिपोर्टांत (परिच्छेद २३९) अशी सूचना केली आहे कीं, "रेल्वेपोलिसावर होणारा खर्च बव्हंशीं प्रांतांनींच करावा व रेल्वेकडून सध्यांप्रमाणें प्रांतांना मदतीदाखल कांहीं देणगी देण्यांत यावी." ही सूचना वरील कलमांतील तरतुदीपेक्षां कमी पडते. मुंबई प्रांताच्या १९३८-३९ च्या अंदाजपत्रकांत 'रेल्वेपोलिस' जमेच्या बाजूला ५ लाख रुपये धरले आहेत व खर्चाच्या बाजूला ८ लाख ७० हजार ८ शें रुपये (बी. बी. सी. आय. रेल्वे रु. ३,५७,६००; जी. आय्. पी. व एम्. एस्. एम्. रेल्वे मिळून रु. ५,१३,२००) धरले आहेत. १९३६-३७ सालीं ही जमा रु. १,७०,९०१ होती व खर्च रु. ८,६६,००० होता. त्या मानानें १९३८-३९ सालच्या अंदाजपत्रकांत जमेच्या बाजूला पुष्कळच सुधारणा झाल्याचें दिसून येईल.

तथापि रेल्वे पोलिसांवर प्रांतिक तिजोरींतून जेवढी रक्कम खर्च होईल तितकी रक्कम फीडरल रेल्वे ॲथॉरिटीकडून मिळणें जरूर आहे हें वरील कलमावरून स्पष्ट होतें; याबाबत मुंबई सरकारनें खटपट चालविली असून तिला काय यश येतें हें पाहणें आहे.

## खंड ९ वा

## न्यायदान

२०४ फेडरेशन, कोणताही प्रांत किंवा फेडरेशनमध्यें सामील झालेलें कोणतेंही संस्थान यांपैकीं कोणाही दोघांमध्यें तंटा उपस्थित झाल्यास त्या बाबतींतील अस्सल दावा फीडरल कोर्टाखेरीज दुसऱ्या कोणत्याही कोर्टापुढें चालणार नाहीं. मात्र या तंट्यांत एखाद्या कायदेशीर हक्काचें अस्तित्व अथवा मर्यादा ज्या प्रश्नावर—मग तो कायद्याचा असो अथवा घडलेल्या गोष्टीचा असो—अवलंबून आहे असा प्रश्न उपस्थित होण्याजोगा असला पाहिजे. २०५ ब्रिटिश हिंदुस्थानांतील हायकोर्टाच्या

निकालावर फीडरल कोर्टाकडे अपील गुदरतां येईल; मात्र 'सदर खटल्यांत १९३५ च्या कायद्यांतील कलमांबाबत अगर त्या कायद्यान्वयें निघालेल्या ऑर्डर इन कौन्सिल-बाबत कायद्याच्या अर्थाबाबत भरीव मुद्दा उपस्थित होत आहे' असें हायकोर्टानें सर्टिफिकेट दिलेलें असलें पाहिजे. आणि वरील प्रकारचा मुद्दा निघतो अगर नाहीं तें आपण होऊन ठरविणें व त्याप्रमाणें सर्टिफिकेट देणें अगर न देणें या गोष्टींचा प्रत्येक खटल्याबाबत विचार करणें हें हायकोर्टाच्या कामांपैकीं एक काम राहील. २१२ फीडरल कोर्टानें आणि प्रीव्ही कौन्सिलच्या कोणत्याही निकालानें जाहीर झालेला कायदा ब्रिटिश हिंदुस्थानांतील एकूण एक कोर्टांवर बंधनकारक मानण्यांत येईल व त्यांच्याकडून तो कायदा अनुसरला जाईल. २१३ एखादा, सार्वजनिक महत्त्वाचा, कायद्याचा प्रश्न उत्पन्न झाला आहे अगर होण्याचा संभव आहे आणि त्यासंबंधीं फीडरल कोर्टाचें मत मागविणें शहाणपणाचें होईल असें एखाद्या वेळीं गव्हर्नर जनरलास वाटल्यास त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें सदर प्रश्न विचाराकरितां फीडरल कोर्टाकडे सोपवावा आणि कोर्टानें, त्या प्रश्नाची योग्य ती सुनावणी करून, गव्हर्नर जनरलकडे त्याबाबत रिपोर्ट करावा. सदर रिपोर्ट फीडरल कोर्टाच्या बहुसंख्य न्यायाधीशांच्या ऐकमत्यानें कोर्टांत सांगितला जाईल; कोणाही न्यायाधीशाला आपलें भिन्न मत जाहीर करतां येईल.

हिंदुस्थानांतील फीडरल कोर्ट १ आक्टोबर १९३७ रोजीं अस्तित्वांत आलें. तेव्हांपासून आठ महिनेपर्यंत या कोर्टाकडे कांहींच काम आलें नाहीं. मे १९३८ मध्यें गव्हर्नर जनरलनें वरील कलमाच्या आधारें 'फीडरल कोर्टानें पुढील कायद्याच्या प्रश्नाबाबत आपलें मत द्यावें' अशी विचारणा केली आहे:—

"१९३८ चा मध्यप्रांत व वऱ्हाड मोटार स्पिरिट व लुब्रिकंट (वंगण) यांच्या विक्रीवरील कराचा कायदा हा मध्यप्रांत व वऱ्हाड कायदेमंडळाच्या अधिकारकक्षेंतला आहे अगर नाहीं?"

वरील प्रश्नाचा विचार करण्याकरितां फीडरल कोर्टाचें खुलें अधिवेशन दिल्ली येथें नरेंद्रमंडळाच्या जागेंत ३१ मे १९३८ रोजीं भरलें होतें. सर मॉरिस ग्वायर, सर शहा सुलेमान व मि० जयकर हे तिघेही न्यायाधीश हजर होते. नोटिसा कोणाकोणाला काढाव्या यासंबंधीं कोर्टाची आज्ञा घेण्याकरितां फीडरल ॲडव्होकेट जनरल सर ब्रजेन्द्रलाल मित्र हजर होते. सर ब्रजेन्द्र म्हणाले: "मध्यप्रांत व वऱ्हाड कायदेमंडळानें मोटार स्पिरिट व लुब्रिकंट यांच्या विक्रीवरील करासंबंधींचें बिल २४ मार्च १९३८ रोजीं

मंजूर केलें आणि गव्हर्नरानें त्या बिलाला १४ मे १९३८ रोजीं मंजुरी दिली. याप्रमाणें त्या बिलाचा कायदा झाला असला तरी तो अद्याप अमलांत यावयाचा आहे. त्या कायद्याच्या तिसऱ्या कलमान्वयें मोटार स्पिरिट आणि लुब्रिकंट यांच्या किरकोळ विक्रीवर शेंकडा ५ प्रमाणें कर बसविण्यांत आला आहे. गव्हर्नर जनरलला वाटलें कीं, हा कर एक्साइज करांत (माल निर्माण होतो त्या ठिकाणीं घेतलेला कर) मोडत असून तो मध्यवर्ती कायदेमंडळाच्या क्षेत्रांतील आहे; प्रांतिक कायदेमंडळाचा त्या कराशीं कांहींही संबंध पोंचत नाहीं. या प्रश्नाचा सर्व प्रांतांशीं संबंध येणार असल्यामुळें तो सार्वजनिक महत्त्वाचा होऊन बसणार यांत शंका नाहीं. ........तेव्हां मध्यवर्ती सरकार आणि मध्यप्रांत व वऱ्हाड सरकार या दोघांनाच नोटिसा काढावयाच्या किंवा कसें याबद्दल कोर्टानें हुकूम करावा." चीफ जस्टिस सर मॉरिस ग्वायर म्हणाले: "या प्रश्नाबाबत सर्व प्रांतांचा संबंध येत असला तरी सर्व प्रांतांच्या ॲडव्होकेट जनरलांनीं या खटल्यांत भाग घ्यावा हें इष्ट नाहीं. परंतु चारदोन प्रांतांनीं मिळून आपलें म्हणणें कोर्टापुढें मांडण्यास हरकत नाहीं............आम्ही दोन्हीपेक्षां जास्त वकिलांचें म्हणणें ऐकणार नाहीं. 'एमिकस क्युरीआय' (कोर्टाचा मित्र, निःस्वार्थी सल्लागार) म्हणून उभयपक्षीय वकिलांना हजर राहण्यास प्रत्यवाय नाहीं." यानंतर कोर्ट उठलें. कोर्टाची चार महिन्यांची सुटी संपल्यानंतर आक्टोबर १९३८ मध्यें नव्या दिल्लींत सदर खटला चालू होईल.

२१९ या कायद्याच्या हेतूस्तव ब्रिटिश हिंदुस्थानांत पुढील कोर्टें हायकोर्टें मानण्यांत येतीलः—कलकत्ता, मद्रास, मुंबई, अलाहाबाद, लाहोर, पाटणा व नागपूर येथील हायकोर्टें; औधमधील चीफ कोर्ट; वायव्य सरहद्दप्रांत व सिंध येथील ज्युडीशियल कमिशनरांचीं कोर्टें. २२० प्रत्येक हायकोर्ट हें 'रेकॉर्ड कोर्ट' (म्हणजे ज्यांचें कामकाज, घडलेल्या हकीकतीचा पुरावा म्हणून, नोंदलें जातें व प्रमाणभूत धरलें जातें असें) असेल व त्यांत एक चीफ जस्टिस व इतर जज असतील.

११ मे १९३८ ला पाटणा हायकोर्टांत मि० पी. एन्. सहाय यांच्याकडून एक कायद्याचा मुद्दा उपस्थित करण्यांत आला. तो असाः—

"त्या तारखेला चीफ जस्टिसाची जागा रिकामी होती. जुना गेला होता (सर कोर्टने टेरेल मरण पावले होते) व नवीनाची नेमणूक झाली नव्हती (फाझल अली नेमले नव्हते). अशा परिस्थितींत वरील कलमां-

तील शब्दयोजनेप्रमाणें कायदेशीर तऱ्हेनें हायकोर्ट अस्तित्वांत नव्हतें. म्हणून सुटींत काम पाहणारे न्यायमूर्ति मनोहरलाल व न्यायमूर्ति चतर्जी यांना हायकोर्टाचे न्यायाधीश म्हणून काम करण्याचा अधिकार पोंचत नाहीं." सरकारी वकिलानें सदर हरकतीची दखलगिरी घेतली.

हायकोर्टाच्या प्रत्येक न्यायाधीशाची नेमणूक राजेसाहेबांकडून होईल आणि तो न्यायाधीश वयाला ६० वर्षे पुरीं होईपर्यंत कामावर राहूं शकेल. त्यापूर्वी त्याला स्वतःला राजीनामा देतां येईल किंवा प्रीव्ही कौन्सिलकडून त्याला कामावरून काढून टाकतां येईल. ॲडव्होकेट जनरलांची व हायकोर्ट जजांची नेमणुकीबाबतची पात्रता एकच आहे व ती मागें दिलीच आहे. हायकोर्ट जजानें काम करण्यास सुरवात करण्यापूर्वी गव्हर्नरासमोर अगर गव्हर्नरनें नेमलेल्या कोणाही इसमासमोर शपथ घ्यावयाची अगर प्रतिज्ञा करावयाची आहे.

१ एप्रिल १९३७ च्या पूर्वी नेमलेल्या ॲडिशनल जजास १ एप्रिलनंतर कायम जज नेमलें तर त्याला पुन: शपथ घेण्याचें कारण नाहीं, असा निकाल हिरासिंग विरुद्ध जयसिंग या खटल्यांत अलाहाबाद हायकोर्टानें (चीफ जस्टिस सुलेमान व जस्टिस थॉम, बेनेट, हॅरिस, बाजपेय यांच्या फुलबेंचनें ) २६ एप्रिल १९३७ रोजीं दिला तो या शपथेबाबत लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

२२२ हायकोर्टांचे चीफ जस्टिस व इतर न्यायाधीश यांच्या हंगामी नेमणुका गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें करावयाच्या आहेत.

मुंबई हायकोर्टाचे चीफ जस्टिस बोमंट यांच्या रजेच्या मुदतींत जस्टिस ब्लॅकवेल यांची तात्पुरती नेमणूक गव्हर्नर जनरलनें केली; त्याचप्रमाणें पाटणा हायकोर्टाचे चीफ जस्टिस सर कोर्टने टेरेल हे दिवंगत झाल्यामुळें त्यांचे जागीं जस्टिस फाझल अली यांची नेमणूकही गव्हर्नर जनरलकडूनच झाली. तसेंच नॉर्मन आय्. सी. एस्. यांची मुंबई हायकोर्ट जज म्हणून हंगामी नेमणूक गव्हर्नर जनरलनेंच केली. पाटणा हायकोर्टमध्यें अधिक जज नेमण्याच्या बाबत गव्हर्नर जनरलनें ओरिसा गव्हर्नराचा व विशेषत: ओरिसा मंत्रिमंडळाचा सल्ला घेतला नाहीं याबद्दल बरीच खळबळ उत्पन्न झाल्याचें ऐकिवांत होतें. कायद्यांतील कलमांच्या दृष्टीनें ही सल्लामसलत घेण्याची जरूरी नाहीं असें म्हणतां येईल; परंतु नवीन प्रघात पाडण्याच्या दृष्टीनें मंत्र्यांना विचारून त्यांच्या सल्ल्यानेंच हंगामी काय किंवा कायम काय जजांच्या नेमणुका व्हावयास पाहिजेत हें स्पष्ट आहे.

२२३ सध्यां अस्तित्वांत असलेल्या कोणत्याही हायकोर्टाचें अधिकारक्षेत्र त्याचप्रमाणें हायकोर्टांतून बजावण्यांत येणारा कायदा आणि कोर्टांतील न्यायदाना-संबंधींचे न्यायाधीशांचे ते ते अधिकार, तसेंच कोर्टाचे नियम करण्याचे, कोर्टाच्या बैठ-कींचें नियंत्रण करण्याबाबतचे सर्व अधिकार १ एप्रिल १९३७ पूर्वी जे होते तेच पुढें चालू राहतील. २२४ प्रत्येक हायकोर्टाला म्हणजे चीफ जस्टिस व इतर जज यांना त्या कोर्टाच्या ताब्यांतील हिंदुस्थानांतील सर्व कोर्टावर देखरेख करण्याचा अधिकार राहील; यांत ( १ ) पत्रकें भरून मागविणें, ( २ ) कोर्टाचें कामकाज चालविण्या करितां नियम तयार करणें व नमुने घालून देणें, ( ३ ) पुस्तकें ( वह्या ), सदरें व हिशेब याबाबत नमुने तयार करून देणें, ( ४ ) शेरीफ, ॲटार्नी, कोर्टाचे कारकून व अधिकारी लोक यांना द्यावयाच्या फीचे तक्ते मुक्रर करणें वगैरे गोष्टींचा अंतर्भाव होतो. मात्र सदरहू नियम, नमुने व तक्ते अमलांत असलेल्या कायद्याच्या कोणत्याही तरतुदींशीं विसंगत असतां कामा नयेत व त्यांना गव्हर्नरची आगाऊ संमति मिळविलेली असली पाहिजे.

नुकतेंच मुंबई हायकोर्टानें गव्हर्नरच्या म्हणजे मंत्रिमंडळाच्या आगाऊ अनुमतीनें दिवाणी कोर्टांतील कामाच्या तासांसंबंधीं नवीन नियम अमलांत आणले आहेत. त्याअन्वयें कोर्टाची वेळ दुपारीं ११ वाजल्या-पासून संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत ठरविण्यांत आली आहे. शनवारीं अगर बाजारच्या दिवशीं ही वेळ ११ ते २$\frac{1}{4}$ पर्यंत ठरविण्यांत आली आहे. डिस्ट्रिक्ट जज, असिस्टंट जज व सबजज यांनीं कोर्टांत ( चेंबरमधील वेळ धरून ) ११$\frac{1}{2}$ ते २$\frac{1}{2}$ आणि ३$\frac{1}{2}$ ते ५$\frac{1}{2}$ इतका वेळ म्हणजे पांच तास हजर असलेंच पाहिजे. शनिवारीं किंवा बाजारच्या दिवशीं त्यांनीं ११$\frac{1}{2}$ ते २ पर्यंत म्हणजे अडीच तास कोर्टांत हजर असलेंच पाहिजे. तारखेला लागलेले खटले, ठरलेली वेळ होण्यापूर्वी, संपलेच तर जजांनीं निकाल लिहीत चेंबरमध्यें बसावें किंवा इतर अम्मलबजावणीचीं कामें पाहावीं. हाताखालचे जज वेळेवर व नियमितपणें आपापलीं कामें करीत आहेत अगर नाहीं हें पाहण्याची जबाबदारी डिस्ट्रिक्ट जजावर सोपवि-ण्यांत आली आहे.

ज्या कनिष्ठ कोर्टाच्या निकालावर अपील अगर फेरतपासणी असत नाहीं त्या कोर्टाचें जजमेंट फिरविण्याचे बाबत हायकोर्टाला कोणतेही अधिकार नाहींत.

वरील पोटकलमाच्या आधारें १७ डिसेंबर १९३७ रोजीं मद्रास हायकोर्टचे न्यायमूर्ति सर अबदुर रहमान यांनीं आदिराजु सोमण्णा यांचा

फेरतपासणीचा अर्ज फेटाळून लावला. पूर्व गोदावरी जिल्ह्याचे डिस्ट्रिक्ट जज मि० मॅक यांनीं वरील सोमण्णा यांना लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्टच्या ३६ व्या कलमान्वयें 'टाउट' (अशिलें पकडणारा गुंड) ठरविलें होतें. या निकालाविरुद्ध सोमण्णा यांनीं केलेला अर्ज न्यायमूर्ति रहमान यांनीं फेटाळून लावतांना उद्गार काढले कीं, "१९३५ च्या कायद्याच्या २२४ (२) कलमान्वयें हायकोर्टाला फेरतपासणी करण्याचा अधिकारच पोंचत नाहीं, हें सरकारी वकिलाचें म्हणणें मान्य करणें भाग आहे. १९१९ च्या कायद्यांत व १९३५ च्या कायद्यांत हा मोठाच फरक करण्यांत आला आहे इ०."

२२५ खालच्या कोर्टांत चाललेला एखादा खटला हायकोर्टानें चालवावा असा अर्ज आल्यास आणि तो खटला हायकोर्टाच्या अधिकारकक्षेंतला असल्यास आणि फीडरल अथवा प्रांतिक कायद्याच्या प्रामाण्याबाबत प्रश्न उपस्थित होण्याजोगा असल्यास आणि तशी हायकोर्टाची खात्री पटल्यास हायकोर्टानें आपला अधिकार चालवावा. प्रांतिक कायद्यासंबंधांत वर उल्लेखिलेला अर्ज फेडरेशनच्या अगर प्रांताच्या ॲडव्होकेट जनरललाच करितां येईल. २२६ योग्य त्या कायदेमंडळानें कायदा करून तरतूद केल्याखेरीज कोणत्याही हायकोर्टाला, रेव्हिन्यू अगर रेव्हिन्यूवसुली यासंबंधीं कोणत्याही गोष्टीबाबत, अस्सल दावा चालवितां येणार नाहीं. वर उल्लेखिलेली तरतूद करणारें कोणतेंही बिल अगर उपसूचना गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें आगाऊ मंजुरी दिल्याशिवाय प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही सभागृहांत प्रविष्ट करितां किंवा मांडतां येणार नाहीं. २२७ हायकोर्टाचें सर्व कामकाज इंग्रजी भाषेंत चालेल. २२८ हायकोर्टाप्रीत्यर्थ होणारा सर्व खर्च म्हणजे कोर्टाचे हपीसर व नोकर यांचे पगार भत्ते, पेन्शनें, त्याचप्रमाणें न्यायाधीशांचे पगार आणि भत्ते हे सर्व प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' मानले जातील आणि हायकोर्टानें घेतलेली फी किंवा दुसरें कोणतेंही द्रव्य हें प्रांतिक उत्पन्नांत जमेला धरलें जाईल.

१९३८-३९ सालच्या मुंबई प्रांताच्या अंदाजपत्रकांत जमेच्या बाजूला 'हायकोर्टाची फी' या पोटखात्याला अवघे चौदा हजार रुपये धरले आहेत. आणि हायकोर्टाचा खर्च १४,९३,४०० रुपये धरला आहे. यापैकीं, पुढें दाखविल्याप्रमाणें, ८,७१,४०० रुपये इतका खर्च केवळ ४० अधिकाऱ्यांच्या पगाराकरितां आहे:—

| हपीसर | संख्या | खर्च रुपये |
|---|---|---|
| १ चीफ जस्टिस व इतर न्यायाधीश (४०००—५०००) | (१०) | ४,९२,००० |

| हपीसर | संख्या | खर्च रुपये |
|---|---|---|
| हंगामी न्यायाधीश (४००० ) | ( ३ ) | १,१२,००० |
| २ प्रोथोनोटरी व सीनियर मास्टर आणि इतर अधिकारी (२७५–२००० ) | (१० ) | ७५,८०० |
| ३ रजिस्ट्रार (१०००–२१५०) | ( १ ) | १९,२०० |
| डेप्युटी व असिस्टंट रजिस्ट्रार (५५०–८०० ) | ( २ ) | १६,८०० |
| ४ रिपोर्टर ( १००० ) | ( १ ) | १२,००० |
| ५ मास्टर आणि रजिस्ट्रार इन इक्विटी ( १६०० ) | ( १ ) | १९,२०० |
| ६ टॅक्सिंग मास्टर ( ७५०–२५–८७५ ) | ( १ ) | १०,५०० |
| असिस्टंट टॅक्सिंग मास्टर ( ६००–१५–६७५ ) | ( १ ) | ७,४०० |
| ७ इन्सॉल्व्हन्सी रजिस्ट्रार ( ७२५–२५–८५० ) | ( १ ) | १०,२०० |
| ८ क्लार्क ऑफ दि क्राउन ( ५०० ) | ( १ ) | ६,००० |
| ९ कोर्ट रिसीव्हर व लिक्विडेटर ( २०००–५०–२२५० ) | ( १ ) | २५,९५८ |
| इतर अधिकारी ( २५०–८७५ ) | ( ३ ) | १७,९४२ |
| १० ऑफीशियल असायनी ( २०००–५०–२२५० ) | ( १ ) | २५,३५० |
| इतर अधिकारी ( २५०–८७५ ) | ( ३ ) | २१,०५० |
| एकूण | ( ४० ) | ८,७१,४०० |

बाकीच्या सहा लाख रुपयांत अनेक कारकून, शिपाई यांचे पगार, भत्ते, प्रवासखर्च, सादिलवार इ०चा अन्तर्भाव होतो.

हायकोर्टाकरितां अंदाजपत्रकांत किती रक्कम खर्ची टाकावयाची त्याबाबत गव्हर्नर-नें आपलें वैयक्तिक मत चालवावयाचें आहे. २२९ प्रांतिक कायदेमंडळानें 'आपल्या प्रांतांत हायकोर्टाची स्थापना करावी' असा विनंतिअर्ज प्रांताच्या गव्हर्नरामार्फत राजेसाहेबांकडे केल्यास, राजेसाहेबांनीं त्या प्रांताकरितां हायकोर्टाची स्थापना करावी.

आसाम प्रांताकरितां हायकोर्टाची मागणी करणारा ठराव आसाम कायदेमंडळानें मंजूर केला आहे. या ठरावान्वयें गव्हर्नरमार्फत पाठविलेल्या विनंतिअर्जांत पुढील मागणी व त्याबरोबर येणारी जबाबदारी या दोन्ही गोष्टी स्पष्ट सांगितल्या आहेत:—"आसाम प्रांताकरितां चीफ जस्टिस व इतर दोन न्यायाधीश अशा तिघांचें मिळून एक स्वतंत्र हायकोर्ट असावें. या हायकोर्टाला दिवाणी आणि फौजदारी दावे घेण्याचे अधिकार असावेत; १९३५ च्या कायद्याच्या २९६ (२) कलमाच्या आधारें महसुला-संबंधींच्या खटल्यांत अपिलें घेण्याचा व निकाल फिरविण्याचा अधिकार हायकोर्टाकडे देण्यास आसाम कायदेमंडळ तयार आहे. असें करण्यानें आसाम रेव्हिन्यू ट्रिब्युनलवर होणारा खर्च बांचवितां येईल; इ०"

२३० एका प्रातांतील अधिकारक्षेत्र दुसऱ्या प्रांतावर असूं शकेल.

'आसाम प्रांत' कलकत्ता हायकोर्टाच्या कक्षेंत व 'ओरिसा प्रांत' पाटणा हायकोर्टाच्या कक्षेंत—हीं या कलमाबाबत उदाहरणें देतां येतील.

ज्या प्रांतांत हायकोर्टाचें मुख्य ठिकाण आहे त्या प्रांताच्या कायदेमंडळाला दुसऱ्या प्रांतावरील हायकोर्टाचें अधिकारक्षेत्र वाढवितां, कमी करतां किंवा नाहींसें करतां येणार नाहीं. २३१ हायकोर्टाचे न्यायाधीश आणि हायकोर्टाचा खर्च या संबंधांत गव्हर्नरबद्दल आलेले उल्लेख, तसेंच प्रांताच्या उत्पन्नाबद्दल आलेले उल्लेख हे, हायकोर्टाचें मुख्य ठिकाण असणाऱ्या प्रांताबद्दल समजण्यांत यावेत आणि कनिष्ठ कोर्टाचे नियम, नमुने व तक्ते यांना गव्हर्नरनें अनुमति देण्याबद्दलचा उल्लेख हा कनिष्ठ कोर्ट असणाऱ्या प्रांताच्या गव्हर्नराच्या अनुमतीबद्दल समजण्यांत यावा आणि चीफ कमिशनरांच्या प्रांताबाबत तो गव्हर्नर जनरलच्या अनुमतीबद्दल मानण्यांत यावा.

## खंड १० वा

## हिंदुस्थानांतील सरकारी नोकर

२४० राजेसाहेबांची मर्जी असेल तोंपर्यंत सिव्हिल सर्व्हंट किंवा सनदी नोकर कामावर राहील. ज्या अधिकाऱ्याकडून त्याची नेमणूक होईल त्याच्या खेरीज दुसऱ्या-

करून तो बडतर्फ केला जाणार नाहीं. एखाद्याला बडतर्फ करावयाचें झाल्यास त्याला 'आपणास बडतर्फ कां करूं नये' हें सांगण्याची वाजवी संधि देण्यांत येईल. मात्र त्याला फौजदारी गुन्ह्याबाबत शिक्षा दिली असल्यास किंवा वरीलप्रमाणें योग्य संधि देणें अव्यवहार्य असल्यास ताबडतोब काढून टाकण्यांत येईल. करारनामा करून नोकरीवर ठेवलें असल्यास व कराराची मुदत संपण्यापूर्वींच जागा रद्द करणें जरूर पडल्यास नुकसानभरपाई देण्यांत येईल.

२४१ १ एप्रिल १९३७ नंतर नोकरांच्या नेमणुका प्रांतिक गव्हर्नर किंवा त्यानें अधिकार दिलेला इसम करील. प्रांताच्या कारभाराबाबत नोकरींत असलेल्या माणसांच्या नोकरीबाबतच्या अटी गव्हर्नर किंवा त्यानें नेमलेला इसम यांनीं केलेल्या नियमान्वयें ठरविल्या जातील.

वर उल्लेखिलेले नियम वेळोवेळीं केले जातात. उदाहरणार्थ, १ एप्रिल १९३७, ६ मे १९३७, २५ नोव्हेंबर १९३७ या तारखांना प्रसिद्ध झालेले नियम पहावेत.

नोकरांना गैरफायद्याचा असणारा कोणताही हुकूम, ८ मार्च १९२६ च्या पूर्वीं असा हुकूम काढण्याचा ज्यांना अधिकार होता त्यांचेशिवाय किंवा भारतमंत्र्यांनीं अधिकार दिलेल्या माणसाशिवाय कोणालाही काढतां येणार नाहीं.

३ मार्च १९३८ च्या गॅझेटांत भारतमंत्र्यांनीं वर उल्लेखिलेला अधिकार 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' वागणाऱ्या गव्हर्नरांकडे दिल्याचें जाहीर झालें आहे. प्रांतिक व कनिष्ठ नोकरांना वरील उल्लेख लागू आहे. ९ मार्च १९२६ रोजीं भारतमंत्र्यांनीं 'प्रांतिक गव्हर्नरावर सनदी नोकरांबाबत अधिकार सोपविण्याचे नियम' प्रसिद्ध केले. १९२६ ते १९३५ या दरम्यान भारतमंत्र्याचे अधिकार प्रांतिक सरकारें गाजवीत होतीं. अगदीं अलीकडे निघालेल्या हुकमान्वयें गव्हर्नर याबाबत मंत्र्यांची सल्लामसलत घेईल खरा, परंतु त्या सल्ल्याप्रमाणें त्यानें वागलेंच पाहिजे असें नाहीं. प्रांतिक स्वराज्याची (?) सुरवात झाल्यामुळें प्रांतिक सरकारांची नोकरांवरील हुकमत कांहीं अंशीं काढून घेतलेली दिसते !

मुंबई प्रांताचे मुख्य प्रधान ना० बाळासाहेब खेर यांनीं रावबहादुर चितळे यांच्या 'मुंबई प्रांतांत निरनिराळ्या नोकऱ्यांतून किती युरोपियन नोकर आहेत ?' या प्रश्नास ५ मे १९३८ रोजीं दिलेलें सविस्तर व तुलनात्मक उत्तर खालीं देत आहे; त्यावरून प्रांतिक स्वराज्याच्या सुरवातीला मुंबई प्रांतांत किती युरोपियनांची वर्णी अद्याप चालू आहे तें लक्षांत येईल:—

| अखिल भारत नोकऱ्या | १ एप्रिल १९२० | १ एप्रिल १९२८ | १ एप्रिल १९३७ |
|---|---|---|---|
| इंडियन सिव्हिल सर्व्हिस | १५० | १०८ | ६२ सिंध धरून |
| इंडियन पोलिस | ६९ | ६२ | ५५ |
| इंडियन मेडिकल सर्व्हिस | २८ | १८ | १६ |
| ॲग्रिकल्चरल सर्व्हिस | ५ | ४ | ३ |
| इंडियन फॉरेस्ट सर्व्हिस | २८ | २५ | १९ |
| इंडियन एज्युकेशनल सर्व्हिस | ३९ | २१ | ७ |
| इंडियन सर्व्हिस ऑफ एंजिनीयर्स | ६४ | ५६ | २० |
| प्रॉव्हिन्शियल सर्व्हिस | ९४ | ११० | ४८ |
| एकूण | ४७७ | ४०४ | २३० |

गुजरात कॉलेजचे प्रिन्सिपॉल मि० फिंडले शिरास यांनीं नुकतेंच आबर्डीन ( स्कॉटलंड ) येथिल व्याख्यानांत सांगितलें कीं, "अद्याप हिंदुस्थानांत दरसाल ७५ युरोपियनांची वर्णी लावणें शक्य आहे. त्यांपैकीं ३० सिव्हिल सर्व्हिसमध्यें, १२ ते १५ पोलिसमध्यें व ३० इंडियन मेडिकल सर्व्हिसमध्यें."

२४३ हिंदुस्थानांतील पोलिसफोर्सपैकीं कनिष्ठ दर्जाच्या नोकरांच्या नोकरीच्या अटी वगैरे, पोलिसांबाबत असलेल्या कायद्याअन्वयें ठरविण्यांत येतील. २४४ पार्लमेंट तद्विरुद्ध ठरवीपर्यंत, आय्. सी. एस्., आय्. एम्. एस्. ( सिव्हिल ) व इंडियन पोलिस यांबाबतच्या नोकऱ्यांवर १ एप्रिल १९३७ नंतर भारतमंत्र्याकडून नेमणुका होतील. २४५ त्याचप्रमाणें इरिगेशन खात्याची कार्यक्षमता चांगली राहण्याकरितां भारतमंत्र्याकडूनच त्या खात्यांतील नेमणुका केल्या जातील. २४६ राखीव ( रिझर्व्ह ) जागावरील नेमणुका व बदल्या प्रांतिक गव्हर्नर 'आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें' करील. २४७ भारतमंत्र्यानें भरती केलेल्या नोकरांच्या नोकरीच्या अटी, पेन्शन इ० बाबत नियम भारतमंत्र्यानें करावयाचे आहेत; परंतु ज्याबाबत तसे नियम केले नसतील त्यासंबंधीं प्रांतिक गव्हर्नरानें प्रांतांत नोकरी करणाऱ्या इसमापुरते नियम करावयाचे आहेत. सदर नोकराच्या बढतीचा अथवा तीन महिन्यांपेक्षां जास्त रजेचा अथवा सस्पेंड करण्याचा हुकूम गव्हर्नरनें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें काढावयाचा आहे. सस्पेंड असतांना पगारांतील काट फक्त वरीलप्रमाणें वैयक्तिक मताप्रमाणें वागणाऱ्या गव्हर्नरालाच करितां येईल. या नोकरांचे पगार व भत्ते प्रांताच्या उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजण्यांतील येतील म्हणजे त्यांत प्रांतिक असेंब्ल्यांना कांहींही ढवळाढवळ करितां येणार नाहीं. या नोकरांना द्यावयाचीं पेन्शनें फीडरल उत्पन्नावर 'चार्ज्ड' मानण्यांत येतील.

अर्थात् फीडरल सरकार प्रांतिक सरकारापासून प्रांतांत कामावर असलेल्या नोकरांच्या पेन्शनादाखल योग्य ती रक्कम वसूल करून भारतमंत्र्याकडे पाठविणार हें उघड आहे.

२४८ भारतमंत्र्यानें नेमलेल्या एखाद्या नोकराला 'आपल्याबाबत अन्याय झाला व तो दूर झाला नाहीं' असें वाटल्यास त्यानें गव्हर्नरकडे तक्रार न्यावी व गव्हर्नरनें त्या तक्रारीची योग्य ती चौकशी करावी व आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें त्या तक्रारीबाबत योग्य वाटेल तो निकाल द्यावा. त्याचप्रमाणें एखाद्या नोकराला शिक्षा करणारा किंवा त्याच्या वर्तणुकीवर ठपका ठेवणारा हुकूम वरीलप्रमाणें गव्हर्नरनें काढावयाचा आहे. नोकराला 'गव्हर्नरकडून योग्य न्याय मिळाला नाहीं' असें वाटल्यास त्यानें भारतमंत्र्याकडे अपील करावें. भारतमंत्र्यानें 'कांहीं रक्कम द्यावी' असा हुकूम

काढल्यास ती रक्कम प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' मानण्यांत येईल. २४९ एखाद्या नोकराला 'नुकसानभरपाई'दाखल रक्कम देण्याबद्दल भारतमंत्र्यानें हुकूम दिल्यास ती रक्कम प्रांतिक उत्पन्नांतून द्यावी.

वरील कलम हें प्रांतिक किंवा फीडरल सरकारापासून सनदी नोकरांच्या हक्कांचें व पगारांचें संरक्षण करण्याकरितां योजिलें आहे हें उघड आहे. परंतु हा नोकररूपी भस्मासुर आपल्या निर्माणकर्त्या भारतमंत्रीरूपी शंकराच्या डोक्यावर कसा हात ठेवूं पाहत आहे हें पार्लमेंटांतील १६ मे १९३८ रोजीं झालेल्या पुढील प्रश्नोत्तरावरून लक्षांत येईल:—

सर जॉन वार्डला मिल्न : " सिव्हिल सर्व्हंटांना मिळणारे प्रेसिडेन्सी टाउन्स कॉंपेन्सेटरी अलावन्स हिंदुस्थान सरकारनें कोणत्या कारणास्तव रद्द केले ? "

लॉर्ड स्टॅनले ( उपभारतमंत्री ) : " माझ्या माहितीप्रमाणें मुंबई व कलकत्ता येथील मध्यवर्ती खात्यांतील अधिकाऱ्यांना मिळणारे अलावन्स हे 'इतःपर **नुकसानभरपाई करणारे** राहिले नसून **चांगल्या फायद्याच्या बाबी**' झाले आहेत त्याबाबत नोकरांनीं हिंदुस्थान सरकारविरुद्ध आपलें म्हणणें भारतमंत्री लॉर्ड झेटलंड यांना कळविलें असून ते हिंदुस्थान सरकारच्या मताची वाट पाहत आहेत.

२५४ डिस्ट्रिक्ट जजांच्या नेमणुका, बदल्या, बढत्या प्रांतिक गव्हर्नरानें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें करावयाच्या आहेत; याबद्दलची शिफारस गव्हर्नरकडे करण्यापूर्वीं हायकोर्टाचा सल्ला घेतला जाईल. 'डिस्टिक्ट जज' यामध्यें ॲडिशनल डि० ज०, जॉइंट डि० ज०, असिस्टंट डि० ज०, स्मॉल कॉज कोर्टाचा चीफ जज, चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट, सेशन्स जज, ॲडिशनल से० ज०, असिस्टंट से० ज० या सर्वांचा अन्तर्भाव होतो.

गव्हर्मेंट ऑफ बर्मा ॲक्ट, १९३५, मध्येंही डिस्ट्रिक्ट जज इ० बाबत या २५४ कलमाबरहुकूम व्यवस्था करण्यांत आली आहे. रंगूनच्या स्मॉलकॉज कोर्टाच्या चीफ जजाच्या जागेवर नेमणूक करावयाची होती. त्या जागेकरितां प्रधानमंडळानें— त्यांतल्या त्यांत मुख्य मंत्री व गृहमंत्री यांनीं— सेकंड जज मि. यू. थडिंगी या ब्रह्मी इसमाची शिफारस केली. परंतु गव्हर्नरानें ती अमान्य करून चीफ जजाचे जागेवर बॅ. एफ्. जीजीभॉय या हिंदी गृहस्थाची नेमणूक केली. अशा तऱ्हेनें मंत्र्यांच्या सल्ल्याला

घाब्यावर बसवून गव्हर्नररनें आपले जादा अधिकार अमलांत आणले. अशी प्रधानमंडळानें राजीनाम्याचा धाक न घालतां फक्त एवढेंच जाहीर केलें कीं, "सदर नेमणूक आमच्या सल्ल्याप्रमाणें झालेली नाहीं व म्हणून त्याबाबतची जबाबदारी आमच्यावर येत नाहीं."

२५५ प्रांतिक सरकारी नोकरी कमिशन व हायकोर्ट यांचा सल्ला घेऊन प्रांतिक गव्हर्नरानें सबजजांच्या पात्रतेची कसोटी ठरविण्यासाठीं नियम करावेत. प्रांतिक सरकारी नोकरी कमिशननें परीक्षा घेऊन लायक उमेदवारांची एक यादी तयार करावी आणि प्रांतांतील निरनिराळ्या जातींना किती जागा द्यावयाच्या याबाबत असलेल्या नियमान्वयें गव्हर्नरानें वरील यादींतील इसमांची नेमणूक करावी.

मुंबई-सिंध सरकारी नोकरी कमिशननें सिंधकरितां सबजजांच्या १२ जागा भरण्याकरितां उमेद्‌वारांचे अर्ज़ १८ जून १९३८ पर्यंत मागिवले होते. 'अर्जदार ब्रिटिश इंडियन प्रजाजन असून शिवाय सिंधचे रहिवाशी असले पाहिजेत. त्यांचें नांव सिंधच्या ज्युडीशियल कमिशनरच्या कोर्टानें ठेवलेल्या ॲडव्होकेटांच्या यादींत असलें पाहिजे व त्यांनीं सिंधमधील दिवाणी कोर्टांत कमींत कमी तीन वर्षें तरी वकिली केली असली पाहिजे. बारांपैकीं सहा जागा मुसलमानांना व बाकीच्या सहा जागा बिगर-मुसलमानांना, याप्रमाणें जातवार वाटणी व्हावयाची आहे. अर्जदाराचें वय २१ ते ३० पर्यंत असलें पाहिजे. पगाराचें स्केल २७५–१५–३८० इतकें राहील. दोन वर्षेंपर्यंत काम पाहून नंतर नोकरी कायम होईल.' अवतरण पुरें मागें मुंबई प्रांतांत १९३८-३९ या सालांत १४ सबजजांच्या जागा भरावयाच्या असल्याबद्दल उल्लेख येऊन गेलाच आहे. या जागांची प्रांतवार वाटणी २ गुजराथी, ९ मराठी व ३ कानडी अशी करण्यांत आली आहे. जातवार दृष्टीनें पाहिल्यास वरील चौदा जागांपैकीं कमींत कमी पांच जागा मुसलमान धरून मध्यम व मागासलेल्या वर्गांकरितां राखून ठेवल्या आहेत.

२६२ प्रांताच्या राज्यकारभाराबाबत अमुक एक जागा एखाद्या विशिष्ट संस्थानाच्या अधिपतीनें अगर प्रजाजनानें भरण्यास हरकत नाहीं असें प्रांतिक गव्हर्नरानें जाहीर करावें. एखादा इसम ब्रिटिश प्रजाजन नसला तरी त्याची तात्पुरती नेमणूक करण्याचा गव्हर्नराला अधिकार आहे. याबाबत गव्हर्नरनें आपलें वैयक्तिक मत अमलांत आणावयाचें आहे.

मुंबई-सिंध सरकारी नोकरी कमिशनच्या अर्जाच्या नमुन्यांत एक कलम पुढीलप्रमाणें असतें:—"अर्जदार संस्थानी प्रजाजन असल्यास त्याला नोकरीवर नेमून घेण्यासाठीं २६२ कलमाखालीं गव्हर्नरनें त्याची पात्रता जाहीर केलेली असली पाहिजे." मुंबई प्रांतानें अद्याप संस्थानी प्रजाजनांना नोकरीबाबत लायक ठरविल्याचें दिसत नाहीं. १६ मे १९३८ रोजीं चीफ इन्स्पेक्टर ऑफ बॉयलर्सच्या जागेकरितां संयुक्त-प्रांतीय सरकारी नोकरी कमिशननें दिलेल्या जाहिरातींत अर्जदार युरोपियन किंवा हिंदी ब्रिटिश प्रजाजन किंवा **हिंदी संस्थानचा प्रजाजन** असला पाहिजे असें म्हटलें आहे. त्यावरून संयुक्तप्रांतीय गव्हर्नरानें संस्थानी प्रजाजनांची नालायकी दूर केली आहे हें स्पष्ट आहे. बंगाल गव्हर्नरानें कुचबिहार व त्रिपुरा संस्थानांच्या प्रजाजनांची अपात्रता नाहींशी केली आहे. याबाबत एप्रिल १९३८ मध्यें कलकत्ता येथें भरलेल्या कॉंग्रेस वर्किंग कमिटीनें पुढील ठराव मंजूर केला आहे:—"अखिल भारतीय मारवाडी फेडरेशनच्या पत्राचा विचार केला. संस्थानी प्रजेला ब्रिटिश प्रांतांत नडणाऱ्या, सरकारी नोकरी व मतदानाचा अधिकार याबाबतच्या, सर्व अपात्रता नाहींशा केल्या जाव्या. २६२ कलमान्वयें योजावयास लागणारे सर्व उपाय कॉंग्रेस सरकारांनीं करून पहावेत अशी वर्किंग कमिटीची त्यांना विनंति आहे." दक्षिण आफ्रिकेंतील ऱ्होडेशिया प्रांतांत हिंदी संस्थानांच्या प्रजाजनांना निवडणुकींत मत देण्याचा अधिकार नाकारण्यांत आला आहे. याचें कारण असें सांगण्यांत आलें आहे कीं संस्थानी प्रजाजन हे ब्रिटिश प्रजाजन नसून ब्रिटिशसंरक्षित इसम आहेत, आणि 'संरक्षित' इसम हे 'प्रजाजन' होत नाहींत असें कायद्यानें ठरविलें आहे. दुसऱ्या देशाच्या रहिवाशाचे हक्क मिळावयास पाहिजे असतील तर त्या देशाला ठरीव पद्धतीनें व ठरीव मुदतींत आपला समजलें पाहिजे म्हणजे त्या देशांत नॅचरलाइझ व्हावयास पाहिजे. वास्तविक, हिंदी लोकांना **हिंदी प्रजाजन** म्हणून सर्व जगांत प्रतिष्ठा मिळाली पाहिजे व ती प्राप्त करून घेणें, हाच स्वातंत्र्यप्राप्तीचा, परदेशीय राजकारणाच्या दृष्टीनें, अर्थ होय; तात्पर्य, ब्रिटिश कवच फोडून बाहेर पडल्याशिवाय हिंदी लोकांना खराखुरा जिवंतपणा प्राप्त होणार नाहीं.

सदर कलम मूळ बिलांत नव्हतें; मागाहून घातलेलें आहे.

२६४ प्रत्येक प्रांताकरितां एक पब्लिक सर्व्हिस (सरकारी नोकरी) कमिशन असेल. दोन अथवा अधिक प्रांतांनीं आपल्याकरितां एक संयुक्त कमिशन नेमण्याचें ठरविण्यास हरकत नाहीं. असें संयुक्त कमिशन नेमल्यास प्रत्येक प्रांताच्या अधिकाराबाबत जरूर ते क्रमप्राप्त नियम सर्वांच्या संमतीनें तयार करावेत. एखाद्या प्रांतिक गव्हर्नरानें तशी विनंति केल्यास फीडरल पब्लिक सर्व्हिस कमिशन त्या प्रांताकरितां काम करील.

हिंदुस्थानांतील अकरा गव्हर्नरांच्या प्रांतांकरितां वरील कलमान्वयें पुढीलप्रमाणें सात पब्लिक सर्व्हिस कमिशनें नेमण्यांत आलीं आहेत. त्यांतील तीन कमिशनें एकापेक्षां अधिक प्रांतांकरितां नेमल्याचें दिसून येईल:—

१ मुंबई-सिंध

२ मद्रास

३ बंगाल

४ संयुक्तप्रांत

५ पंजाब-सरहद्दप्रांत

६ बिहार-ओरिसा-मध्यप्रांतवऱ्हाड

७ आसाम

सिंध प्रांत हा पूर्वी मुंबई इलाख्यांत मोडत असल्यामुळें, सरहद्दप्रांताची राज्यव्यवस्था पंजाबबरोबर पूर्वी असल्यामुळें व बिहार आणि ओरिसा हा एकच प्रांत समजला असल्यामुळें, त्या प्रांतांतील नोकरांचे लागेबांधे परस्परनिगडित असणार व म्हणून त्यांच्याकरितां संयुक्त कमिशन असणें हें युक्त दिसतें. परंतु बिहार-ओरिसाच्या जोडीला मध्यप्रांतवऱ्हाड कां चिकटवून दिला आहे हें बरोबर लक्षांत येत नाहीं. मुंबई-सिंध कमिशनची कचेरी मुंबईस, पंजाब-सरहद्द कमिशनची लाहोरास व बिहार-ओरिसा-मध्यप्रांतवऱ्हाड कमिशनची रांची (बिहार) येथें आहे. स्वतंत्र सिंध प्रांताकरितां वेगळें पब्लिक सर्व्हिस कमिशन हवें अशी मागणी व त्याप्रीत्यर्थ चळवळ सिंध प्रांतांत चालू आहे. प्रांतिक कमिशनांच्या धर्तीवर इंदूर, धार इ० संस्थानांनीं पब्लिक सर्व्हिस कमिशन किंवा कमिटी नेमल्याचें जाहीर केलें आहे.

२६५ प्रांतिक पब्लिक सर्व्हिस कमिशनचा चेअरमन व इतर सभासद यांची नेमणूक प्रांतिक गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणें करील. त्यांतील निम्मे सभासद निदान दहा वर्षें तरी सरकारी नोकरींत असलेले पाहिजेत. प्रांतिक गव्हर्नरानें या कमिशनबाबत आपल्या मर्जीप्रमाणें नियम करावेत.

कांहीं प्रांतिक कमिशनांचे चेअरमन व सभासद यांचीं नांवें पुढें देत आहे:—

### १ मुंबई-सिंध

१ एच्. बी. क्लेटन, सी. आय्. ई., चेअरमन
२ सर शहा नवाझखान गुलाम मूर्तजाखान भुट्टो, सी. आय्. ई., ओ. बी. ई., सभासद
३ सी. डब्ल्यू. ई. आर्बेथनॉट, सी. आय्. ई., सभासद

आर्बेथनॉट यांच्या रजेच्या मुदतींत मुंबईच्या गव्हर्नरानें १ मे १९३८ पासून मि० ई. एम्. नानावटी, आय्. सी. एस्. (रिटायर्ड) यांची पब्लिक सर्व्हिस कमिशनवर नेमणूक केली आहे. सर भुट्टो यांची नेमणूक सिंध प्रांताचा प्रतिनिधी म्हणून करण्यांत आली आहे; आणि मुंबई प्रांताकरितां दोन युरोपियन प्रतिनिधी, हा खासा न्याय आहे !

### २ बंगाल

१ एफ्. डब्ल्यू. रॉबर्टसन, चेअरमन
२ सर हसन सुऱ्हावर्दी, सभासद
३ मि० एस्. एम्. बोस, ,,

### ३ संयुक्तप्रांत

१ डिग्बी लिव्हिंग्स्टन ड्रेक बॉक्मन, चेअरमन
२ रायबहादुर मानसिंग, सभासद
३ सय्यद अबू महमद, ,,

### ४ आसाम

१ जे. हॅझलॅट, चेअरमन
२ मौलवी फैजनूर अली, सभासद
३ रायबहादुर जानकीनाथ दास, ,,

आतां मुंबई-सिंध प्रांतिक कमिशनाबाबत थोडा जास्त विचार करूं :—

कायद्याच्या कलमांतील गव्हर्नरानें करावयाचीं कामें मुंबई गव्हर्नरानें करावींत याबद्दल सिंध गव्हर्नरानें मान्यता दिली आहे. कमिशनचे चेअरमन व सभासद यांच्या बाबत पुढील व्यवस्था करण्यांत आली आहे:—सिंध गव्हर्नराच्या अनुमतीनें मुंबई गव्हर्नर चेअरमनची नेमणूक करील. बाकीच्या दोन सभासदांपैकीं एक सभासद मुंबईचा गव्हर्नर नेमील व दुसरा सभासद सिंधचा गव्हर्नर नेमील. चेअरमनला दरमहा तीन हजार रुपये पगार व इतर सभासदांना दरमहा दोन हजार रुपये पगार देण्यांत येईल. सेवानिवृत्त नोकराला त्याच्या पेन्शनशिवाय वरील पगार मिळेल. ही नेमणूक पांच वर्षांपुरती असेल. नोकरीची मुदत आणखी पांच वर्षेपर्यंत गव्हर्नराला वाढवितां येईल. ६५ वर्षांचें वय पुरें झाल्यानंतर ‘कमिशन’वर काम करितां येणार नाहीं. वर्षांतून एक महिना पूर्ण पगारी रजा मिळेल; परंतु ही रजा जास्तींत जास्त चार महिनेपर्यंत घेतां येईल. आजारी रजा अर्ध्या पगारावर मिळेल. कमिशनचा सभासद निवृत्त झाल्यावर त्याला पेन्शन मिळणार नाहीं. मुख्य मुख्य खात्यांच्या प्रमुखांना जो प्रवासभत्ता मिळतो तोच कमिशनच्या सभासदांना मिळेल. सुपीरियर सिव्हिल सर्व्हिसच्या लोकांना मिळणाऱ्या परदेशप्रवासाबाबतच्या सर्व सोयी या सभासदांना मिळतील; कुटुंबीयांकरितांही स्वतंत्र प्रवासभत्ता मिळेल; कुटुंबांत बायको, बारा वर्षांखालील मुलगा अगर सावत्र (?) मुलगा आणि एकवीस वर्षांखालील अविवाहित मुलगी अगर सावत्र (?) मुलगी यांचा समावेश होतो. कमिशनच्या कामाकरितां सेक्रेटरी, सुपरिंटेंडेंट, असिस्टंट, लघुलेखक, कारकून, टायपिस्ट, शिपाई इ० ची नेमणूक करावी लागेल. चेअरमनची सल्लामसलत घेतल्यानंतर सिंध गव्हर्नरच्या अनुमतीनें मुंबई गव्हर्नर कमिशनच्या सेक्रेटरीची नेमणूक करील. त्याची मुदत पांच वर्षांची राहील. ती मुदत आणखी पांच वर्षांपर्यंत वाढवितां येईल. त्याचा किमान पगार दरमहा रु. ७५० राहील. कचेरींतील नोकरलोक सेक्रेटरीनें नेमावयाचे; मात्र शंभर रुपये दरमहा पगाराच्या जागा कमिशनच्या चेअरमनच्या आगाऊ मंजुरीनंतर

सेक्रेटरीनें भरावयाच्या आहेत. पहिल्यांदा कमिशन नेमल्यावर वर उल्लेखिलेल्या सर्व जागांवर मुंबई गव्हर्नरानें नेमणुकी करावयाच्या आहेत.

कमिशनच्या कामकाजाच्या पद्धतीचे कांहीं नियम पुढीलप्रमाणें बनविले आहेत:—

१ कमिशनपुढील प्रत्येक प्रश्नाचा निकाल हजर असलेल्या व मत देणाऱ्या सभासदांच्या बहुमतानें लागेल. समसमान मतें पडल्यास चेअरमननें आपलें दुसरें अथवा निर्णायक मत द्यावयाचें.

२ कमिशनच्या बैठकीला दोन हा कोरम राहील.

३ घेण्यांत आलेले सर्व निर्णय सेक्रेटरीनें लिहून ठेवावयाचे.

४ निरनिराळ्या खात्यांची जबाबदारी असणारे मंत्री व आपल्या मर्जीप्रमाणें वागणारा गव्हर्नर यांच्या खेरीज दुसऱ्या कोणीही कमिशनचा सल्ला घेतां कामा नये.

५ चेअरमननें कमिशनच्या मदतीकरितां त्याला वाटेल तर कमिट्यांची नेमणूक करावी.

६ १९३५ च्या कायद्याच्या ५८ व्या कलमाला बाध न आणतां कमिशननें सरकारकडून किंवा गव्हर्नराच्या सेक्रेटरीकडून जरूरी असलेले कागदपत्र, अहवाल अगर माहिती मागवून घ्यावी आणि सरकारनें किंवा गव्हर्नरच्या सेक्रेटरीनें ती माहिती गैरवाजवी उशीर न लावतां कमिशनकडे पाठवावी. माहिती काढण्यास अतिशय जिकीर पडत असेल तर किंवा सार्वज़निक हितासाठीं, माहिती पुरवली नाहीं तरी चालेल. कामिशननें तीन तऱ्हांनीं नोकरीच्या जागा भरावयाच्या असतात:—( १ ) **चढाओढीच्या परीक्षा** घेऊन; ( २ ) अर्जदारांना भेटीला बोलावून त्यांच्यांपैकीं कांहींची **निवड** ( सिलेक्शन ) करून; व ( ३ ) खालच्या जागेवरून वरच्या जागेवर **बढती** (प्रमोशन) करून. याबाबत कमिशनला मार्गदर्शन मिळावें म्हणून विस्तृत व तपशीलवार नियम करण्यांत आले आहेत; परंतु विस्तारभयास्तव ते सर्व या ठिकाणीं उतरून घेण्याचा मोह आवरणें भाग आहे.

२६६ कांहीं अपवाद खेरीजकरून पब्लिक सर्व्हिस कमिशनचा पुढील बाबतींत सल्ला घेतला जाईल:—

(क) सिव्हिल सर्व्हिसमध्यें भरती करण्याच्या पद्धतीसंबंधीं सर्व गोष्टी.
(ख) नेमणुकी करतांना, तसेंच बढती व बदली करतांना, व वरील सर्व बाबींबाबत उमेदवारांची योग्यता ठरवितांना अमलांत आणावयाचीं मूल तत्त्वें.
(ग) शिस्तीचे उपाय इत्यादि आणि कमिशनकडे दिलेल्या व वेळोवेळीं गव्हर्नर आपल्या मर्जीप्रमाणें सोपवील त्या सर्व गोष्टींसंबंधीं सल्ला देणें हें कमिशनचें एक काम राहील. प्रांतांतील निरनिराळया जातींत नोकऱ्यांची वाटणी कोणत्या प्रमाणांत करावयाची याबाबत कमिशनचा सल्ला घ्यावयाचा नाहीं.

कांहीं कांहीं जागांवरील (उ० डेप्युटी डायरेक्टर ऑफ इन्फर्मेशन) नेमणुकीबाबत निवड करण्याचा आपला हक्क आहे, असा संयुक्तप्रांतीय प्रधानमंडळानें आग्रह धरला आहे; त्याचप्रमाणें त्या प्रधानमंडळाचें असें म्हणणें आहे कीं, डेप्युटी कलेक्टर, नायब तहसिलदार, एक्साइज इन्स्पेक्टर, सबरजिस्ट्रार इ० जागांबाबत कमिशननें जरूर असलेल्या उमेदवारांच्या संख्येच्या दुप्पट अगर तिप्पट लोकांची निवड करावी व त्यांपैकीं वाटेल त्यांची निवड करण्याचें काम प्रधानमंडळानें करावें. नोकऱ्या प्रधानमंडळाच्या राजकीय दडपणांतून काढून घ्याव्या असा कमिशन नेमण्याचा उद्देश सांगितला जातो; त्या दृष्टीनें प्रधानमंडळाचा आग्रह कायद्याच्या मूलभूत कल्पनेशीं विसंगत दिसतो.

२६७ कायद्यांत सांगितलेल्यापेक्षां प्रांतिक पब्लिक सर्व्हिस कमिशनवर अधिक कामें सोपविणेचीं असल्यास तसें प्रांतिक कायदेमंडळाला कायदा करून ठरवितां येईल. मात्र अशा तरतुदी असलेल्या कोणत्याही बिलाला, कायदेमंडळांत प्रविष्ट करण्यापूर्वी, गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें आगाऊ मंजुरी दिलेली असली पाहिजे. तसेंच त्या प्रांतिक कायद्यांत असें एक कलम असलें पाहिजे कीं, "भारतमंत्र्यानें नेमलेल्या अगर सैन्यांतल्या नोकरांबाबत भारतमंत्र्याच्या संमतीशिवाय पब्लिक सर्व्हिस कमिशननें कोणतेंही पाऊल टाकतां कामा नये" आणि "प्रांताचा नोकर नसलेल्या इसमाबाबत गव्हर्नर जनरलच्या संमतीशिवाय कमिशननें कांहींही करितां कामा नये." २६८ प्रांतिक पब्लिक सर्व्हिस कमिशनचा सर्व खर्च प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' मानला जाईल.

मुंबई प्रांताच्या १९३८-३९ च्या अंदाजपत्रकांत मुंबई-सिंध पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या खर्चाकरितां १ लाख २१ हजार २ शें रु. खर्च धरला असून, त्यांपैकीं २५ हजार रु. सिंध प्रांतानें सोसावयाचा असून बाकीचा ९६ हजार २ शें रुपये खर्च मुंबई प्रांतावर पडत आहे.

२७० गव्हर्नराच्या आपल्या स्वतःच्या मर्जीप्रमाणें दिलेल्या मंजुरीशिवाय कोणाही सरकारी नोकराविरुद्ध सरकारी कामाबाबत दिवाणी किंवा फौजदारी काम चालवितां येणार नाहीं. ज्याच्याविरुद्ध तक्रार उपस्थित झाली आहे असें कोणतेंही कृत्य करण्याचे कामीं कांहीं तरी काळेंबेरें असलें पाहिजे अशी कोर्टाची खात्री झाली नाहीं तर सदर दिवाणी अगर फौजदारी दावा काढून टाकण्यांत येईल आणि प्रतिवादी नोकराला करावा लागलेला खर्च प्रांताच्या उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजला जाईल.

याच कलमाबरहुकूम १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ बर्मा ॲक्टांत १२४ वें कलम आहे. रायमहाल पांडे विरुद्ध माँग पो सीन या खटल्यांत रंगून हायकोर्टाच्या जस्टिस मोसलेनीं ७ आक्टोबर १९३७ रोजीं दिलेल्या निकालांत म्हटलें आहे कीं, "ज्या कृत्याविरुद्ध तक्रार केलेली असेल तें कृत्य भल्या बुद्धीनें केलें नाहीं असा मॅजिस्ट्रेटच्या मनाचा पक्का निश्चय झालेला असल्याखेरीज त्या कृत्याबाबत कोणत्याही सरकारी नोकराचा खटला सेशनकमिट करितां येत नाहीं. म्हणून मॅजिस्ट्रेटनें केलेला हुकूम बेकायदेशीर आहे. म्हणून हा खटला फेरतपासणीकरितां सदर मॅजिस्ट्रेटकडे पाठविण्याचा हुकूम देण्यांत येत आहे."

२७१ क्रिमिनल अगर सिव्हिल प्रोसीजर कोडानें विशिष्ट नोकरांना दिलेलें संरक्षण नाहींसें करणें किंवा कमी करणें याबद्दलचें कोणतेंही बिल गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें दिलेल्या आगाऊ मंजुरीवांचून कायदेमंडळांत प्रविष्ट करितां येणार नाहीं. सरकारी नोकरांविरुद्ध खटले भरण्यास मंजुरी देण्याबाबत प्रांतिक सरकारांना दिलेले अधिकार प्रांतिक गव्हर्नरानें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें वापरावयाचे आहेत. मात्र गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें दिलेल्या आगाऊ मंजुरीनें सदर कोडांतील कलमांत दुरुस्त्या करण्याच्या, प्रांतिक कायदेमंडळाच्या अधिकाराला या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें बाध येणार नाहीं.

मूळ बिलांत सदर कलम नव्हतें; मागाहून घातलेलें आहे.

२७२ हिंदुस्थानाबाहेर राहणाऱ्या सेवानिवृत्त सरकारी नोकरास प्रांतिक तिजोरींतून पेन्शन दिलें जाईल व त्यावर प्रांतिक कायदेमंडळानें केलेल्या कायद्यान्वयें

लादलेला कोणताही कर बसविला जाणार नाहीं. २७५ स्त्री आहे या सबबीवर कोणीही नोकरीला अपात्र ठरणार नाहीं; मात्र कांहीं कांहीं जागांबाबत, अपात्रता ठरविण्याचा अधिकार भारतमंत्री, गव्हर्नर जनरल व प्रांतिक गव्हर्नर यांना देण्यांत आला आहे.

इंडियन सिव्हिल सर्व्हिस व इंडियन पोलिस यांतील नोकऱ्यांवर स्त्रियांना घेतां येणार नाहीं असें भारतमंत्र्यांनीं जुलै १९३७ मध्यें जाहीर केलें आहे. मुंबई प्रांतांत दारूबंदीच्या कामीं मदत करण्यास व संयुक्त-प्रांतांत मजुरांचे संपाचे वेळीं स्त्रीनिरोधकांचा बंदोबस्त करण्याचे कामीं दोन्हीही प्रांतिक सरकारांनीं स्त्री-पोलिसांची नेमणूक केल्याचें प्रसिद्ध झालें आहे. 'नवी परिस्थिति, नवा प्रघात' हें घडणारच.

२७७ या दहाव्या खंडांत गव्हर्नरानें एखाद्या गोष्टीबाबत आपलें वैयक्तिक मत प्रभावी करण्याबद्दल आलेले उल्लेख गव्हर्नरावर सरकारी नोकरांसंबंधीं सोपविण्यांत आलेल्या जादा जबाबदारीला धक्का लावणार नाहींत अगर कमीपणा आणणारे ठरणार नाहींत.

## खंड १२ वा

## किरकोळ व सर्वसाधारण

२८८ या कलमाखालीं 'एडन कॉलनी ऑर्डर' काढलेली आहे.

त्यामधील २० व्या कलमाप्रमाणें एडनमधील सुप्रीम कोर्टाच्या निकालावर मुंबई हायकोर्टांत अपील दाखल करितां येईल. दिवाणी दावा पांच हजार रुपये अगर अधिक इतक्या रकमेचा असला पाहिजे व फौजदारी खटल्यांत सहा महिन्यांपेक्षां अधिक शिक्षा व पांचशें रुपयांपेक्षां अधिक दंड झाला असला पाहिजे, अशी अट ठेवण्यांत आली आहे. एखाद्या आरोपीला देहान्त शिक्षा झाली असल्यास व त्यानें अपील केलें नसल्यास त्या खटल्यांतील कागद एडन सुप्रीम कोर्टानें मुंबई हायकोर्टा-कडे पाठविले पाहिजेत. मुंबई हायकोर्टाच्या निकालावर प्रीव्ही कौन्सिल-कडे अपील करितां येईल. मुंबई हायकोर्टानें दिलेल्या निकालाची एडन कॉलनीमध्यें अम्मलबजावणी केली जाईल.

२८९ सिंध प्रांत मुंबई इलाख्यांतून स्वतंत्र करण्यांत येत आहे. तसेंच ओरिसा प्रांत निराळा करण्यांत येत आहे व राहिलेल्या प्रांतास 'बिहार' प्रांत असें

नांव देण्यांत येत आहे. २९० नवीन प्रांत बनविणें, एखाद्या प्रांताची सीमा वाढविणें, कमी करणें किंवा बदलणें इत्यादि अधिकार, राजेसाहेबांनीं फीडरल सरकार आणि कायदेमंडळ व संबंध असलेलीं प्रांतिक सरकारें व कायदेमंडळें यांचीं मतें मागवून त्या अनुरोधानें चालवावयाचा आहे. २९१ मतदाराची पात्रता व निवडणुकी यासंबंधींच्या पुढील बाबींबाबत राजेसाहेबांनीं तरतूद करणेची आहे:—(१) प्रादेशिक मतदारसंघ निश्चित करणें; (२) मतदारांची पात्रता व मतदारांच्या याद्या तयार करविणें; (३) निवडणुकीला उभे राहणाऱ्या उमेदवारांची लायकी; (४) मध्येंच रिकाम्या झालेल्या जागा भरणें; (५) निवडणुकींची व्यवस्था ठेवणें व मतदानाची पद्धत ठरविणें; (६) उमेदवारांनीं केलेले खर्च; (७) लाचलुचपतीचे प्रकार व इतर गुन्हे; (८) शंका आणि तंटे याबाबत निर्णय; आणि (९) इतर आनुषंगिक गोष्टी. २९२ योग्य तें कायदेमंडळ बदलीपर्यंत अगर रद्द करीपर्यंत अगर दुरुस्त करीपर्यंत सध्यां प्रचलित असलेले हिंदुस्थानांतील सर्व कायदे चालू राहावयाचे आहेत. २९४ 'फॉरेन ज्युरिसडिक्शन'बाबत या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें या कायद्यांतील वऱ्हाडबाबतच्या तरतुदींना बाध येणार नाहीं. २९५ एखाद्या प्रांतांत कोणाही इसमास मृत्यूची शिक्षा झाली असल्यास ती शिक्षा रद्द करण्याचा, तहकूब करण्याचा व जन्मठेपीची करण्याचा, गव्हर्नर जनरलखेरीज प्रांताबाहेरील कोणाही इसमास अधिकार असणार नाहीं.

लॉर्ड ब्रॅबोर्न यांनीं बंगालच्या गव्हर्नरीचीं सूत्रें धारण केल्यापासून पहिल्यांदाच, पांसग सर्पा या वन्य जातीच्या इसमास फाशीची शिक्षा झाली असतांना ती शिक्षा जन्मठेप काळ्यापाण्याची केल्याचें नुकतेंच (मे १९३८) प्रसिद्ध झालें आहे. दया दाखविण्याचा हा राजाचा खास व स्वयंभू हक्क राजाचे प्रतिनिधी जे गव्हर्नर जनरल व प्रांतिक गव्हर्नर त्यांना प्राप्त झालेला आहे. १९३१ सालीं भगतसिंग, राजगुरु आणि सुखदेव यांच्या बाबत गांधींनीं चालविलेली खटपट गव्हर्नर जनरल लॉर्ड आयर्विन यांनीं कशी निष्फळ केली तें सर्वश्रुतच आहे.

२९६ प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणाही सभासदाला ब्रिटिश हिंदुस्थानांत जमीनमहसुलाच्या खटल्याबाबत अपिलें घेण्याचा अगर निकालाचा फेरविचार करण्याचा अधिकार असलेल्या कोणत्याही ट्रिब्युनलचा म्हणजे पंचमंडळाचा सभासद होतां येणार नाहीं.

आसाम प्रांतामध्यें मि० डॉसन यांना वरील कलमाप्रमाणें पंच नेमण्यांत आलें आहे.

२९७ कोणत्याही प्रांतिक सरकारला किंवा कायदेमंडळाला आंतरप्रांतीय व्यापार बंद करण्याचा किंवा जकातीबाबत भेदाभेद करण्याचा अधिकार असणार नाहीं.

सदर कलम मूळ बिलांत नव्हतें; मागाहून घालण्यांत आलें आहे. प्रांतांतील चुरस वा तेढ नाहींशी करण्याचा सदर कलमाचा उद्देश आहे.

२९८ वंश, जात, धर्म इ० कारणांमुळें कोणाही इसमाला अपात्रता चिकटणार नाहीं. या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें प्रांतिक गव्हर्नरावर अल्पसंख्याक जमातींच्या न्याय्य हितसंबंधसंरक्षणाबाबत असलेल्या जादा जबाबदारींत कमतरता येणार नाहीं.

२९९ कायद्याच्या सत्तेखेरीज ब्रिटिश हिंदुस्थानांतील कोणाही इसमाची मालमत्ता हिरावून घेतली जाणार नाहीं. नुकसानभरपाई देण्याची तरतूद केलेली असल्याशिवाय सार्वजनिक उपयोगाकरितां जबरदस्तीनें जमीन अगर इतर स्थावर, जंगम मालमत्ता अक्वायर करण्याबाबत कोणत्याही प्रांतिक कायदेमंडळाला कायदा करितां येणार नाहीं. एखादी जमीन सार्वजनिक मालकीची करण्याबाबत अगर त्या जमिनीवरील जमीनमहसुलासहित असलेले हक्क नष्ट करण्याबाबत अगर त्यांत बदल करण्याबाबत तरतूद करणारें बिल अगर उपसूचना प्रांतिक कायदेमंडळाच्या कोणत्याही सभागृहांत गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें आगाऊ मंजुरी दिलेली असल्याखेरीज, प्रविष्ट करितां येणार नाहीं किंवा मांडतां येणार नाहीं. जमीन या शब्दांत कोणत्याही स्थावर मालमत्तेचा अंतर्भाव होतो.

मुंबई प्रांतांतील किरकोळ जमीनदारांना तात्पुरती सवलत देणारें बिल मुंबई असेंब्लींत प्रविष्ट झालें तेव्हां एका सभासदानें विचारलेल्या 'सदर बिलास २९९ कलमान्वयें गव्हर्नरची आगाऊ संमति आहे काय?' या प्रश्नास गृहमंत्री ना. मुनशी यांनीं उत्तर दिलें : "सरकारनें सदर बिल मांडलें आहे हीच गोष्ट, गव्हर्नरची जरूर असलेली संमति मिळाली आहे हें दाखविण्यास, पुरेशी आहे." मुंबई कायदेमंडळानें मंजूर केलेलें सदर बिल मुंबई गव्हर्नरनें गव्हर्नर जनरलच्या विचाराकरितां धाडून दिलें व गव्हर्नर जनरलनें त्या बिलाला संमति देऊन त्या बिलाचें कायद्यांत रूपांतर झालें (१९३८ चा मुंबई कायदा ८ वा); संयुक्तप्रांतीय असेंब्लींत जमीन-महसूलमंत्री ना. रफी अहमद किडवाई यांनीं 'टेनन्सी बिल' मांडलें त्या वेळीं झालेली चर्चा व हकीगत या कलमाच्या दृष्टीनें महत्त्वाची असल्यामुळें खालीं उतरून घेतों:—

छतारीचे नबाब ( विरोधी पक्षाचे पुढारी ):—" २९९ ( ३ ) कलमाप्रमाणें टेनन्सी बिल प्रविष्ट करण्यास गव्हर्नरची आगाऊ संमति असणें आवश्यक नाहीं काय ? "

ना० पंडित गोविंद वल्लभ पंत ( मुख्य प्रधान ):—" सरकारच्या मताप्रमाणें गव्हर्नरच्या आगाऊ संमतीची जरूरी नाहीं. "

डॉ. नारायणप्रसाद अस्थना ( ॲडव्होकेट जनरल ):—" बिलाला गव्हर्नरची संमति पाहिजे अगर नाहीं ही सरकार आणि गव्हर्नर यांच्या दरम्यानची बाब आहे. त्याबाबत स्पीकरनें निर्णय देण्याची आवश्यकता नाहीं."

ना० पुरुषोत्तमदास तंडन ( स्पीकर ):—" या प्रश्नावर निर्णय देण्यापूर्वी, गव्हर्नरची आगाऊ संमति आवश्यक आहे किंवा नाहीं याबद्दल मी गव्हर्नरचें म्हणणें मागवितों."

त्यानंतर सदर बिल प्रविष्ट करण्याबाबत गव्हर्नरनें पाठविलेली संमति पुढीलप्रमाणें स्पीकरनें वाचून दाखविली:—" गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टप्रमाणें संयुक्तप्रांत टेनन्सी बिलास गव्हर्नरची आगाऊ संमति लागते अगर नाहीं हा प्रश्न थोडासा वादग्रस्त आहे. तेव्हां अशा परिस्थितींत आगाऊ संमति आवश्यक आहे असें धरून चालणें हें मी दूरदर्शीपणाचें व शहाणपणाचें समजतों. आणि ही दृष्टि स्वीकारून मी टेनन्सी बिलास असेंब्लींत प्रविष्ट करण्यास संमति देतों."

३०० १ जानेवारी १८७० पूर्वी देण्यांत आलेली अगर कायम केलेली जमिनीची अगर जमिनीबाबत अगर जमीनमहसुलाबाबत असलेल्या एखाद्या हक्काची देणगी कोणत्याही तऱ्हेनें बाधित करण्याचा प्रांतिक सरकारचा अधिकार, गव्हर्नरनें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें काढलेल्या हुकमाखेरीज, चालणार नाहीं. हीच गोष्ट १ जानेवारी १८७० नंतर नोकरीच्या मोबदल्यांत दिलेल्या वतनाबाबत लागू पडते. राजकीय हेतूनें अथवा दयार्द्र बुद्धीनें प्रांतिक सरकारनें द्यावयाचें पेन्शन, गव्हर्नरनें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें काढलेल्या हुकमाखेरीज, बंद करितां येणार नाहीं किंवा कमी करितां येणार नाहीं; मात्र पेन्शन देण्याच्या हुकमांतच तें बंद अथवा कमी करण्याची व्यवस्था असल्यास गोष्ट निराळी. असें पेन्शन देण्यासाठीं लागणारी रक्कम प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजली जाईल. देणगी अगर पेन्शन देतांना घातलेल्या कोणत्याही अटीचा भंग झाल्यास सदर कलमांतील कोणत्याही गोष्टीनें प्रांतिक सरकारचे हात बांधले जाणार नाहींत.

१९३० सालच्या सोलापूरच्या लष्करी कायद्याच्या अंमलाच्या दिवसांत सोलापूरचे रहिवासी श्री. काशिनाथ गोपाळ रानडे यांचा मुलगा सोल्जरांच्या भरमसाट गोळीबाराला बळी पडला. सदर नुकसानीबद्दल निदानपक्षीं कांहीं तरी भरपाई मिळावी म्हणून रानडेमजकुरांनीं सहा वर्षे सतत खटपट चालविली होती. कॉंग्रेसनें अधिकारसूत्रें घेतल्यानंतर त्या खटपटीला कांहींसें यश येऊन सदर रानडे यांना मुंबई सरकाराकडून तीन हजार रुपये देण्यांत आले. ते या कलमांत उल्लेखिलेल्या 'दयार्द्र बुद्धीनें दिलेल्या' पेन्शनच्या सदरांत पडतात हें जातां जातां सांगणें योग्य होईल.

३०२ लंडन येथें असणाऱ्या हिंदी हाय कमिशनरनें हिंदुस्थानच्या गव्हर्नर जनरलच्या संमतीनें व परस्परांत ठरतील त्या अटींवर प्रांतातर्फे करार करणें इत्यादि गोष्टी अंगावर घ्याव्यात. ३०३ बंगालच्या गव्हर्नरानें, कलकत्ता हायकोर्टानें पसंत केलेल्या तिघाजणांच्या यादींतून ( पॅनेल ), दरसाल एका इसमाची कलकत्त्याचा शेरीफ म्हणून नेमणूक करावी. त्याची नेमणूक, पगार, बडतर्फी याबाबतचे अधिकार गव्हर्नरनें आपल्या वैयक्तिक मताप्रमाणें चालवावयाचे आहेत.

'शेरीफ' हा शब्द 'शायर' ( परगणा ) या शब्दापासून निघाला आहे. मुळांत त्याचा अर्थ 'वसूल गोळा करणारा व बंदोबस्त राखणारा राजप्रतिनिधी'. अलीकडे त्याच्याकडे समारंभाखेरीज विशेष कामकाज नसतें. वेगवेगळ्या परगण्यांतील जमीनदारांना एकामागून एक अशा क्रमानें सदर हुद्दा इंग्लंडच्या फडणविसाकडून देण्यांत येतो. तसेंच लंडन, हल्ल व यॉर्क या शहरांतील प्रमुख नागरिकांनाही हा हुद्दा देण्यांत येतो. त्याचेंच अनुकरण हिंदुस्थानांत मुंबई, कलकत्ता, मद्रास या शहरांतून करण्यांत आलेलें आहे. कलकत्त्याच्या शेरीफला न्यायखात्यासंबंधीं काम असतें, म्हणून त्याचा उल्लेख कायद्यांत केला आहे.

३०४ एखादा गव्हर्नर हिंदुस्थानाबाहेर गेला असेल अगर कोणत्याही कारणामुळें आपलें काम करण्यास असमर्थ झाला असेल तर त्याच्या गैरहजेरींत त्याचें काम पाहण्यास राजेसाहेबांनीं नेमलेल्या इसमास गव्हर्नरच्या जागेचे सर्व अधिकार प्राप्त होतील व कायद्यानें गव्हर्नरला ज्या सवलती व जें बन्धनराहित्य मिळतें तें सर्व त्या हंगामी गव्हर्नराला प्राप्त होईल; आणि तो दुसऱ्या अधिकाराच्या जागेवर असल्यास त्याला सदर मुदतींत त्या जागेचें काम करितां येणार नाहीं किंवा त्या जागेचा पगार व भत्ता मिळणार नाहीं.

प्रांतिक स्वराज्याच्या सुरवातीपासून निरनिराळ्या प्रांतांत खालीं दिलेल्याप्रमाणें गव्हर्नरीच्या जागेवर हंगामी नेमणुका झाल्या आहेत:—

१ मध्यप्रांत वऱ्हाड:— **बॉफर्ड** ( पूर्वीचा संयुक्त प्रांतांतील रेव्हिन्यू कमिशनर )

२ ओरिसा:— **डेन** ( पूर्वीचा त्याच प्रांतांतील रेव्हिन्यू कमिशनर. ओरिसा गव्हर्नरनें आपली रजा रद्द केल्यानें ही नेमणूक शेवटीं रहित झाली. नुकतीच मि० **बोग** मद्रास गव्हर्नरचे सेक्रेटरी, यांची 'हंगामी गव्हर्नर' म्हणून नेमणूक जाहीर झाली आहे. )

३ पंजाब:— **क्रेक** ( पूर्वीचा हिंदुस्थान सरकारचा होम मेंबर )

४ संयुक्तप्रांत:— **हॅलेट** ( पूर्वीचा बिहार प्रांताचा गव्हर्नर. याला दरमहा सोळाशें-सतराशें रुपये अधिक पगार मिळणार; हुद्दा एकच. त्यांत फरक नाहीं )

५ बिहार:— **स्टेवार्ट** ( पूर्वीचा हिंदुस्थान सरकारचा कॉमर्स मेंबर )

६ बंगाल:— **रीड** ( पूर्वीचा आसाम प्रांताचा गव्हर्नर. याला दरमहा साडेचार हजार रुपये अधिक पगार मिळणार. हुद्दा एकच; त्यांत फरक नाहीं. बंगालचा गव्हर्नर हंगामी गव्हर्नर जनरल झाल्यामुळें )

७ आसाम:— **हॉग** ( पूर्वीचा बंगाल सरकारचा चीफ सेक्रेटरी )

८ सिंध:— **गॅरेट** ( पूर्वीचा मुंबई प्रांतांतील उत्तर विभागाचा कमिशनर )

तात्पर्य, मुंबई, मद्रास व सरहद्दप्रांत या तीन प्रांतांतच हंगामी नेमणुका अद्याप झालेल्या नाहींत. यांत एकाही हिंदी बड्या नोकराची किंवा हिंदी मुत्सद्द्याची नेमणूक झालेली नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

३०५ प्रत्येक गव्हर्नरानें आपल्या मर्जीप्रमाणें आपला स्वतंत्र सेक्रेटरी व इतर नोकर नेमावयाचे आहेत. त्यांचा पगार, भत्ता इ० सर्व गव्हर्नरानें आपल्या मर्जीप्रमाणें मुक्रर करावयाचें आहे. आणि याबाबतचा सर्व खर्च प्रांतिक उत्पन्नावर 'चार्ज्ड' समजला जाईल म्हणजे त्यावर प्रांतिक असेंब्लीचें मत घेतलें जाणार नाहीं.

हें कलम मूळ बिलांत नव्हतें; मागाहून घातलेलें आहे. अकरा प्रांतांतील गव्हर्नरांनीं नेमलेल्या सेक्रेटरींचीं नांवें पुढीलप्रमाणें:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | आसाम—जे. पी. मिल्स, | आय्. सी. | एस्. |
| २ | बंगाल—एल्. जी. पिनेल, | ,, | ,, |
| ३ | बिहार—एम्. ए. जे. मेनवेरिंग, | ,, | ,, |
| ४ | मुंबई—ब्रिस्टौ ( आयर्विन ), | ,, | ,, |
| ५ | मध्यप्रांत व वऱ्हाड—आर्. एन्. बानर्जी, | ,, | ,, |
| ६ | मद्रास—जी. टी. बोग, | ,, | ,, |
| ७ | सरहद्दप्रांत—कॅप्टन ड्रिंग, | | |
| ८ | ओरिसा—जे. बौस्टेड, | आय्. सी. | एस्. |
| ९ | पंजाब—लेफ्टेनंट कर्नल लॉरेन्स, | | |
| १० | सिंध—जे. एम्. कॉरिन, | आय्. सी. | एस्. |
| ११ | संयुक्तप्रांत—जे. सी. डोनाल्डसन, | ,, | ,, |

वरील यादीवरून अकरांपैकीं नऊ प्रांतांत आय्. सी. एस्. सेक्रेटरी आहेत. पंजाब व वायव्य सरहद्द या दोन प्रांतांत लष्करी अम्मलदार सेक्रेटरी आहेत ह्या गोष्टींत त्या प्रांताच्या लष्करी महत्त्वास अनुरूप अशीच निवड करण्याचा हेतु स्पष्ट दिसतो. इतक्या अकरा सेक्रेटरींत फक्त एक सेक्रेटरी (बानर्जी) हिंदी आहे हेंही लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं. कांहीं हिंदी राउंड टेबलवाल्यांनीं हे सेक्रेटरी डेप्युटी गव्हर्नर होतील कीं काय अशी भीति व्यक्त केली होती; परंतु तशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं असें जॉइंट पार्लमेंटरी कमिटीनें आपल्या रिपोर्टांत आश्वासन दिलें आहे; त्याचबरोबर कमिटीनें असें स्वच्छ नमूद करून ठेविलें आहे कीं, "सदर जागांवर आय्. सी. एस्. मधील चांगलीं मुरब्बी माणसें नेमण्यांत यावींत. कारण नवीन घटनेंत गव्हर्नरवर पुष्कळ जादा जबाबदाऱ्या सोपविल्या आहेत; त्या पार पाडण्याकरितां योग्य ती मदत करण्या-

करितां उत्तम सेक्रेटरी असला पाहिजे. नुसत्या प्रायव्हेट सेक्रेटरीनें काम भागणार नाहीं."

मुंबईच्या गव्हर्नरनें पुढील हुकमान्वयें आपला सेक्रेटरी नेमून घेतला:—

हुकूम

" मुंबई, १ एप्रिल १९३७.

१९३५ च्या गव्हमेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ३०५ कलमाच्या (१) पोटकलमान्वयें मी, मायकेल हर्बर्ट रुडोल्फ नॅचबुल, लॉर्ड ब्रॅबोर्न, मुंबईचा गव्हर्नर, या हुकमान्वयें मि. सी. एच्. ब्रिस्टौ आय्. सी. एस्. यांची गव्हर्नराचा सेक्रेटरी म्हणून नेमणूक करितों.

ब्रॅबोर्न,
मुंबईचा गव्हर्नर "

मि० ब्रिस्टौ यांच्या रजेच्या मुदतींत मुंबई गव्हर्नरनें पुढील हुकमान्वयें मि० आयर्विन यांची हंगामी नेमणूक केली आहे:—

हुकूम

" मुंबई, १६ मार्च १९३८.

१९३५ च्या गव्हमेंट ऑफ इंडिया ॲक्टाच्या ३०५ कलमांतील (१) पोटकलमान्वयें दिलेल्या अधिकारांत मी, लॉरेन्स रॉजर लमली, मुंबईचा गव्हर्नर, मि० ब्रिस्टौ आय्. सी. एस्. यांच्या रजेच्या मुदतींत मि. आयर्विन आय्. सी. एस्. यांची हंगामी नेमणूक करीत आहे.

रॉजर लमली,
मुंबईचा गव्हर्नर "

३०६ प्रांतिक गव्हर्नरावर, वैयक्तिक नात्यानें अगर इतर तऱ्हेनें, हिंदुस्थानांतील कोणत्याही कोर्टांत खटला चालणार नाहीं किंवा कोर्टाकडून समन्स निघणार नाहीं; आणि राजेसाहेबांच्या मंजुरीशिवाय कोणत्याही माजी गव्हर्नराविरुद्ध त्यानें आपल्या कारकीर्दींत केलेल्या अगर करावयास चुकलेल्या गोष्टीबाबत फिर्याद चालणार नाहीं. ३०७ प्रांतिक कायदेमंडळांच्या पहिल्या निवडणुकीच्या करितां प्रांतिक गव्हर्नरांच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या बिनसरकारी सभासदांची,

प्रांतांतील प्रधानांची व सरकारचे अर्धवट नोकर असलेल्यांची अपात्रता मानली जाणार नाहीं.

उदाहरणार्थ, (अनुक्रमानें) डॉ. राघवेन्द्र राव (मध्यप्रांत व वऱ्हाड); अली महमदखान देहलवी, सिद्दप्पा कंबळी ( मुंबई ); बॅ. व्ही. एन्. पाटील ( खानदेश ) व डॉ. भीमराव अंबेडकर ( मुंबई शहर ). सध्यां मध्यप्रांतांत सरकारनें डॉ. राव यांच्या निवडणुकीबाबत तक्रारी ऐकण्या-करितां नेमलेल्या कमिटीचें काम चालू आहे. त्या कमिटीपुढें डॉ. रावांना ते सरकारी नोकर नाहींत ( नॉनऑफीशियल मेम्बर ऑफ गव्हर्मेंट ) तर प्रत्यक्ष सरकारचें एक अंग अगर भाग असल्यामुळें, कमिटीपुढें खेचतां आलें नाहीं तें याच कलमांतील तजविजीमुळें.

३०८ मंत्रिमंडळातर्फे एखाद्या मंत्र्यानें १९३५ च्या कायद्याच्या पुढें दिलेल्या कलमाबाबत दुरुस्त्या सुचविणारा ठराव प्रांतिक कायदेमंडळानें मंजूर केला आणि 'राजेसाहेबांनीं पार्लमेंटला सदर ठराव कळवावा' असा विनंतिअर्ज गव्हर्नर-मार्फत करण्याचें ठरविलें तर गव्हर्नरनें आपल्या मर्जीप्रमाणें त्या ठरावावरील आपल्या मतासह तो अर्ज सहा महिन्यांच्या आंत राजेसाहेबांकडे पाठवावा. वर उल्लेखिलेलीं कलमें अशीं:—( १ ) प्रांतिक कायदेमंडळांत किती प्रतिनिधिसभा असाव्यात, त्याचप्रमाणें प्रत्येकींत सभासदांची संख्या किती असावी, किंवा निवडणुकीची पद्धत अथवा सभासदांची निवडणुकीबाबतची पात्रता काय असावी यासंबंधींचीं कलमें; ( २ ) स्त्रियांच्या बाबतींत निवळ साक्षरतेच्या ऐवजीं अधिक उच्च दर्जाच्या शिक्षणाची पात्रता ठरविण्यासंबंधींची किंवा स्त्रियांनीं अगर स्त्रियांतर्फे अर्ज केल्या-शिवाय त्यांचीं मतदारांच्या यादींत नांवें घालणें यासंबंधींचीं कलमें; ( ३ ) मतदारांच्या पात्रतेसंबंधींचीं कलमें, यांपैकीं स्त्रियांच्या संबंधींच्या कलमांखेरीज इतर कलमांत १ एप्रिल १९४७ नंतर दुरुस्त्या सुचवितां येतील. स्त्रियांच्या बाबतींत मात्र ही दहा वर्षांची मुदत लागू केली जाणार नाहीं. ३०९ या कायद्यांत राजेसाहेबां-कडे दिलेले अधिकार ऑर्डर इन कौन्सिलद्वारा अमलांत आणले जातील. एखादी ऑर्डर काढावी असा पार्लमेंटनें राजेसाहेबांना विनंतिअर्ज केल्यासच ती काढतां येईल. एखाद्या निकडीच्या प्रसंगीं पार्लमेंटच्या संमतीशिवायही भारतमंत्र्याला ऑर्डर काढतां येईल. परंतु तिची मुदत पार्लमेंटची बैठक भरल्यापासून अठ्ठावीस दिवसांपेक्षां अधिक असणार नाहीं. माजी प्रांतिक गव्हर्नराविरुद्ध खटला चालविण्यास मंजुरी देण्याबाबत ऑर्डर काढण्याच्या राजेसाहेबांच्या अधिकारास या कलमांतील कोणत्याही गोष्टीनें अडथळा येणार नाहीं. ३१० हा कायदा अमलांत आणतांना काय काय अडचणी येतील त्यांची कायदा मंजूर होण्याच्या वेळीं, कांहींच अटकळ

बांधतां येणार नाहीं; म्हणून या कलमान्वयें अडचणींचें निरसन करण्याचा अधिकार राजेसाहेबांना देण्यांत येत आहे. तिसऱ्या खंडाच्या (प्रांतिक विभाग) सुरवातीनंतर सहा महिने झाल्यावर या कलमाखालीं प्रांतिक बाबींबाबत ऑर्डर इन कौन्सिल काढण्याचा अधिकार राजेसाहेबांना राहणार नाहीं. ३११ या कलमांत कायद्यांत आलेल्या कित्येक संज्ञांचा अर्थ दिला आहे.

३१० वें कलम मूळ बिलांत नव्हतें; मागाहून घातलेलें आहे.

३११ कलमांत दिलेल्या संज्ञा त्यांच्या अर्थासह विस्तारदोष पत्करूनही द्यावयास पाहिजेत. परंतु तिसऱ्या खंडाच्या कलमावरील विवरणांत त्या त्या ठिकाणीं या कलमाचा उल्लेख करून निरनिराळ्या शब्दांचा व शब्दसमूहांचा अर्थ दिला आहे; म्हणून या कलमांत त्यांची पुनरुक्ति करीत नाहीं.

## खंड १३ वा

## दरम्यानच्या काळांतील तरतुदी

३१७ १९१९ चा गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट रद्द झाला असला तरी या कायद्याच्या नवव्या शेड्यूलमधील १९१९ च्या कायद्यांतील कांहीं कलमांचा (उ० गव्हर्नर जनरल, कमांडर इन चीफ, गव्हर्नर जनरलाचें एक्झिक्युटिव्ह कौन्सिल, हिंदी कायदेमंडळ याबाबतचीं) अंमल चालू राहील.

या कलमाच्या आधारें १९१९ च्या कायद्यांतील ८६ (१) कलमान्वयें भारतमंत्र्यानें गव्हर्नर जनरल लॉर्ड लिनलिथगौ याला सार्वजनिक हिताच्या निकडीच्या कामाकरितां नुकतीच चार महिन्यांची रजा दिली आहे. त्या ८६ व्या कलमांत (१) सार्वजनिक हिताचीं निकडीचीं कामें (२) शरीरप्रकृति अस्वस्थ होणें, किंवा (३) खाजगी कामें यांपैकीं कोणत्याही कारणाकरितां रजा देतां येण्याची व्यवस्था केलेली आहे. वर दिलेल्या रजेच्या हुकमावरून शेवटचीं दोन कारणें रजेच्या मुळाशीं नाहींत हें स्पष्ट आहे. प्रस्तुत राजकीय परिस्थितींत 'सार्वजनिक हिताचें निकडीचें काम' म्हणजे दुसरें तिसरें कोणतें नसून 'फेडरेशनची स्थापना लौकरांत लौकर व शक्य तितक्या सर्वांच्या सहकार्यानें कशी करतां येईल यासंबंधीं भारतमंत्री व ब्रिटिश प्रधानमंडळ यांचेबरोबर वाटाघाट करणें व निर्णय ठरविणें' हेंच असणार हें कोणीही सांगूं शकेल.

# खंड १४ वा

## सुरवात, रद्द होणें, इ०

३२० दुसऱ्या खंडाशिवाय, कांहीं अपवाद वगळून, बाकीचा सर्व कायदा राजेसाहेब ठरवितील त्या तारखेला अमलांत येईल; हीच तारीख, या कायद्यांत सांगितलेली तिसऱ्या खंडाच्या सुरवातीची तारीख होय.

१ एप्रिल १९३७ ला या कायद्याच्या अम्मलबजावणीस प्रारंभ झाल्याचें आतां जगजाहीर आहे. फीडरल कोर्टाची सुरवात १ आक्टोबर १९३७ ला झाली. अद्याप फीडरल रेल्वे ॲथॉरिटीची सुरवात झालेली नाहीं. फेडरेशन हें किती दूर आहे व आहे ह्या स्वरूपांत त्याचा अवतार होईल कीं नाहीं या गोष्टीबद्दल भाकित करणारा भविष्यवादी मिळेल कीं नाहीं याची शंकाच आहे.

३२१ १९१९ चा गव्हमेंट ऑफ इंडिया ॲक्ट या कायद्यानें रद्द झाल्याचें समजण्यांत येईल; मात्र त्या कायद्यांतील प्रिॲम्बल किंवा सरनामा याला धक्का लाविला जाणार नाहीं आणि रद्द झालेल्या वरील कायद्यान्वयें झालेल्या कोणत्याही नेमणुकीस बाध येणार नाहीं आणि ती नेमणूक जणू काय या कायद्यान्वयेंच झाली असें मानण्यांत येऊन चालू राहील.

यांत उल्लेखिलेल्या सरनाम्याबद्दल मागें विवेचन येऊन गेलेंच आहे; तसेंच बंगालच्या गव्हर्नरच्या नेमणुकीबद्दल कलकत्ता हायकोर्टीत न्यायमूर्ति लॉर्ट विल्यम्स यांनीं केलेलें वक्तव्य मागें सविस्तर दिलेंच आहे. त्याचा ओझरता उल्लेख करून या प्रकरणाची समाप्ति करतों.

---

# उपसंहार

आतांपर्यंत १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टापैकीं तिसऱ्या खंडांतील ( गव्हर्नरांचे प्रांत ) सर्व म्हणजे ४८ कलमांवर विस्तृत विवरण केलें असून बाकीच्या सर्व खंडांतील प्रांतिक भागाला अनुलक्षून असलेल्या कलमांचा सारांश देण्यांत आला असून, त्यावर त्रोटक विवेचन जातां जातां केलेलें आहे. आतां या शेवटच्या प्रकरणांत १९३५ च्या कायद्याचें एकंदरींत स्वरूप समालोचनपूर्वक प्रकट करून दाखविण्याचा प्रयत्न करीत आहे. त्याच्याच बरोबर आपणा हिंदी लोकांच्या आकांक्षा काय आहेत व त्या कशा पूर्ण होतील हेंही पहावयाचें आहे.

## मूलभूत तत्त्वें

एक गोष्ट प्रथम नेहमीं लक्षांत ठेवली पाहिजे कीं, सध्यां आपल्या या हिंदुस्थान देशांत ज्या कायद्यान्वयें राज्यकारभार चालू आहे तो १९३५ चा कायदा ब्रिटिश पार्लमेंटनें मंजूर केला आहे, म्हणजे आपल्या देशाच्या राज्यव्यवस्थेबाबत कायदा करण्याचा अधिकार, गेल्या तीन शतकांत एकामागून एक घडत गेलेल्या ऐतिहासिक घालमेलीमुळें, ब्रिटिश पार्लमेंटनें आपल्याकडे घेतला असून तो तसाच आपल्याकडे चिरकाल राहावा अशी ब्रिटिश पार्लमेंटची आजच्या घटकेला ठाम समजूत व दृढ आशा व इच्छा आहे. याच्या उलट, हिंदी राष्ट्रानें राष्ट्रीय सभेच्या मुखानें आपलें स्वातंत्र्य परत हस्तगत करण्याचा निश्चय जाहीर केला असून गेलीं पन्नास वर्षें त्या दिशेनें तिनें हळूहळू खटपट चालविली आहे. १९२९ सालच्या लाहोर काँग्रेसनें ‘पूर्ण स्वराज्य’ हें आपलें ध्येय असल्याचें निःसंदिग्धपणें जाहीर केलें आहे; व तेव्हांपासून याच ध्येयाच्या दृष्टीनें आपली राजकीय

प्रगति आपण मोजूं लागलों आहोंत. या स्वराज्याच्या कल्पनेंतील मूलतत्त्व म्हणजे ज्या घटनेखालीं आपण नांदावयाचें ती आपण स्वत: तयार केलेली असली पाहिजे. यालाच अमेरिकेचे माजी अध्यक्ष विल्सन यांच्या भाषेंत 'स्वयंनिर्णयाचा हक्क' असें म्हणतात. हा आपला जन्मसिद्ध हक्क ब्रिटिश पार्लमेंटनें अद्याप मान्य केलेला नाहीं. पूर्वी अर्ज, विनंत्या, शिष्टमंडळें या द्वारा आपण राज्यकर्त्यांकडे भीक मागत होतों; गेल्या ८।९ वर्षांत राज्य-घटना तयार करण्याचे कामीं हिंदी लोकांपैकीं कांहीं नेमलेल्या लोकांना हाताशीं घेऊन सहकार्य घेतलें जात आहे, असा ब्रिटिश सरकारनें देखावा चालू ठेवला होता; व त्याला आपल्यापैकीं कित्येक लोक भाळलेही. परंतु सरतेशेवटीं १९३५ ची जी घटना पार्लमेंटनें तयार केली ती सर्वस्वी आपल्या जबाबदारीवर व आपल्या मतानें, हिंदी लोकांच्या एकजात विरोधाला न जुमानतां, पार्लमेंटनेंच तयार केली असून ती हिंदुस्थानावर हप्त्याहप्त्यानें पद्धतशीर तऱ्हेनें लादण्याचा प्रयत्न हल्लीं केला जात आहे, ही गोष्ट केव्हांही डोळ्याआड करितां कामा नये. हिंदुस्थानची राज्यघटना हिंदी लोकांनीं निवडून दिलेल्या घटनापरिषदेनें ( कॉन्स्टिटयुअन्ट असेंब्ली ) तयार केली पाहिजे व अशा घटनेखेरीज दुसरी कोणतीही घटना हिंदी लोकांना बिलकुल मान्य होणार नाहीं असा कॉंग्रेसनें अली-कडे वेळोवेळीं ठराव केला आहे. ही घटनापरिषद केव्हां बोलाविली जाईल, कोणाकडून बोलावली जाईल व त्या परिषदेंत काय ठरेल, ठरलेलें कोण अमलांत आणील यासंबंधींची चर्चा महत्त्वाची व आवश्यक असली तरी प्रस्तुत प्रसंगीं घटनापरिषदेचा नुसता उल्लेख करणें हेंच बस्स आहे. कॉंग्रेस सरकारें ज्या प्रांतांत आज राज्य करीत आहेत त्या प्रांतांतील कायदे-मंडळांनीं कॉंग्रेसच्या ठरावाला अनुसरून घटनापरिषदेबाबत ठराव मंजूर केले आहेत व ते हिंदुस्थान सरकारामार्फत विलायत सरकारकडे रवाना झाले आहेत. हें झालें आपणास काय हवें त्यासंबंधीं; आतां देऊं केलेलें आपणास नको याबाबतही सर्व प्रांतिक कायदेमंडळांनीं, तसेंच मध्यवर्ती असेंब्लीनेंही ठराव मंजूर केले आहेत. यावरून १९३५ च्या कायद्यानेंच अस्तित्वांत आणलेल्या मतदारसंघांच्या प्रतिनिधींनीं त्या कायद्याला आपला विरोध सनदशीर तऱ्हेनें व्यक्त केल्याचें निदर्शनास आलें. इतका विरोध

असूनही त्या कायद्यांतील सर्वांत वाईट भाग जी फीडरल राज्यघटना ती कशी अमलांत आणतां येईल याबद्दल सध्यां विलायतेंत कारवाया चालू आहेत. तेव्हां हें फेडरेशन ही काय चीज आहे हें प्रथम समजून घेतलें पाहिजे.

## हिंदी फेडरेशन

ब्रिटिश हिंदुस्थानांतील अकरा गव्हर्नरांचे प्रांत, सहा चीफ कमिशनरांचे प्रांत व हिंदी संस्थानें या सर्वांचें मिळून एक 'हिंदी फेडरेशन' बनविण्याची तरतूद १९३५ च्या कायद्याच्या दुसऱ्या खंडांत करून ठेवली आहे. जगांत जीं फेडरेशनें अस्तित्वांत आहेत त्यांच्या घटनांकडे पाहिल्यास असें दिसून येईल कीं, जे निरनिराळे घटक एकत्र येऊं इच्छितात ते स्वतः स्वयंशासित असले पाहिजेत व त्यांनीं स्वतःच्या राजकीय, आर्थिक इ० सोयीकरितां स्वखुषीनें फेडरेशनमध्यें सामील होण्याची तयारी दर्शविली पाहिजे. परंतु ही परिस्थिति आज हिंदुस्थानांत विद्यमान नाहीं. गव्हर्नरांचे प्रांत म्हणून ज्यांना म्हणण्यांत येत आहे, तेथें संपूर्ण स्वायत्तता बिलकुल नसून नुकता कोठें त्या दिशेनें प्रारंभ करण्यांत आला आहे. चीफ कमिशनरांच्या प्रांतांत जबाबदार राज्यपद्धतीचें अद्याप नांवही नाहीं. तसेंच हिंदी संस्थानांत तर जबाबदार राज्यपद्धतीच्या दृष्टीनें सर्वत्र दाट अंधःकारच पसरलेला दिसून येतो. नागरिक स्वातंत्र्याचे साधे मूलभूत हक्कही त्या ठिकाणीं अस्तित्वांत नाहींत; मग लोकशाही स्वराज्याची गोष्ट तर दूरच ! अशा तऱ्हेनें हे ऊस व भोपळे यांची गांठ घालण्याचा प्रयत्न चालू आहे. हिंदी लोक 'फेडरेशन' या तात्त्विक राज्यपद्धतीच्या विरुद्ध नाहींत; परंतु १९३५ च्या कायद्यानें जें फेडरेशन आरंभिलें जात आहे त्याच्या मात्र ते संपूर्ण विरुद्ध आहेत, यांत तिळमात्र शंका नाहीं. या विरोधाचीं मुख्यतः तीन कारणें पुढीलप्रमाणें देतां येतील:—

(१) द्विदल राज्यपद्धति.

(२) हिंदी संस्थानिकांनीं करावयाची प्रतिनिधींची नेमणूक.

(३) प्रांतांनीं पाठवावयाच्या प्रतिनिधींची जातवार व अप्रत्यक्ष निवडणूक.

प्रथमतः फीडरल राज्यकारभारांत लोकप्रतिनिधींच्या ताब्यांत सत्तेचा किती अंश आला आहे तें पाहूं. सध्यां प्रांतांत मंत्र्यांचा राज्यकारभार चालू आहे त्याच्याशीं फीडरल राज्यकारभाराची तुलना करणें बोधप्रद होईल. या दृष्टीनें पाहूं गेल्यास प्रांतिक सरकारें व कायदेमंडळें यांच्या संबंधींचीं ४६ पासून ९३ अखेर कलमें हींच थोड्याफार फरकानें फेडरेशनसंबंधांत ५ ते ४५ अखेर कलमें आहेत असें तुलनात्मक दृष्टीनें पाहतां दिसून येतें. तेव्हां प्रांतिक घटनेबाबत या ग्रंथांत जें सविस्तर विवरण करण्यांत आलें आहे तें फीडरल घटनेबाबतच्या भागालाही बऱ्याच अंशानें तंतोतंत लागू पडतें. 'एतेनैव व्याख्यातः' असें फीडरल भागासंबंधीं यथार्थतेनें म्हणतां येईल. तथापि दूरान्वयानें ओढून ताणून का होईना, प्रांतिक कारभाराला प्रश्नचिन्हांकित प्रांतिक स्वराज्य असें म्हणण्याचें धारिष्ट केलें तरी तसें फीडरल बाबतींत बिलकुल म्हणतां येणार नाहीं. याचीं कारणें पुढीलप्रमाणें कलमवार देतां येतील:—

(१) घटनाकायदा कलम ६ पोटकलम (५) मधील उल्लेखिलेल्या शेड्यूलप्रमाणें संस्थानिकांच्या सामिलनाम्याला बाध न आणतां ब्रिटिश पार्लमेंटला घटनेंत दुरुस्त्या करितां येतील; परंतु पुढील महत्त्वाच्या गोष्टींबाबत संस्थानिकांच्या संमतीनें सामिलनाम्यांत फरक झाला नाहीं तर घटनेंत पार्लमेंटलाही दुरुस्त्या करितां येणार नाहींत; म्हणजे एका अर्थानें पार्लमेंटनेंही आपल्या कायदे करण्याबाबतच्या संपूर्ण स्वातंत्र्यावर एक प्रकारचें बंधन घालून घेतलें आहे व अशा तऱ्हेनें हिंदी राज्यघटनेच्या प्रगतींत व आपोआप होणाऱ्या विकासांत ही नसती धोंड आणून उभी केली आहे. त्यांपैकीं कांहीं बाबी:—

(अ) लष्कर, आरमार, विमानदल इ० व परराष्ट्रीय संबंध याबाबतचीं गव्हर्नर जनरलचीं कर्तव्यें.

(आ) गव्हर्नर जनरलच्या खास जबाबदाऱ्या.

(इ) आर्थिक स्थिरता व पत.

(ई) आपल्या मर्जीप्रमाणें व वैयक्तिक मताप्रमाणें गव्हर्नर जनरलनें करावयाच्या गोष्टी.

(उ) राजेसाहेबांनीं दिलेलें आज्ञापत्र.

( २ ) हिंदुस्थानचें संरक्षण, परराष्ट्रसंबंध, सरहद्दीवरील टोळ्यांच्या प्रदेशाची व्यवस्था, ख्रिस्ती भिक्षुकखातें या सर्व खात्यांचा राज्यकारभार गव्हर्नर जनरलनें आपल्या मर्जीप्रमाणें पहावयाचा आहे. त्यांत फीडरल मंत्र्यांचा, अधिकार चालविण्याच्या दृष्टीनें कांहींही संबंध नाहीं.

( ३ ) वरील खात्यांना लागणारा चंदा व्यवस्थितपणें व निर्वेध-पणें मिळत राहावा व आर्थिक पत बरोबर संभाळली जात आहे किंवा नाहीं हें पाहावें म्हणून अर्थमंत्र्याच्या डोक्यावर एक फिनॅन्शियल सल्लागार गव्हर्नर जनरलनें नेमण्याची तरतूद कायद्यांत घालून ठेवली आहे.

( ४ ) खास किंवा जादा जबाबदाऱ्यांच्या कलमांत फीडरल मंत्रिमंडळानें ब्रिटिश मालाबाबत जर विरोधी किंवा दंड करण्याच्या स्वरूपाचें धोरण पत्करलें तर त्याला पायबंद घालण्याचा अधिकार गव्हर्नर जनरलला देण्यांत आला आहे.

( ५ ) कलम ३३ ( २ ) ( उ ) व ( ऊ ) प्रमाणें गव्हर्नर जन-रलच्या राखीव खात्यासंबंधींच्या खर्चाला कायदेमंडळाच्या मंजुरीची जरूरी नाहीं, तसेंच संस्थानिकांच्या संबंधाबाबत राजप्रतिनिधीचा जो खर्च होईल त्यालाही कायदेमंडळाची संमति लागणार नाहीं.

अशीं आणखी किती तरी बंधनें घालून मंत्र्यांची सत्ता जवळ जवळ नामशेषच करण्यांत आली आहे. तथापि जबाबदारीच्या तत्त्वाचा मध्यवर्ती किंवा फीडरल क्षेत्रांत एवढाही शिरकाव होऊं नये अशाबद्दल कट्टर साम्राज्यवाद्यांनीं पार्लमेंटांत बिल मंजूर होत असतांना जंग जंग पछाडले. याच्या उलट मजूर पक्षांतील सभासदांनीं हिंदुस्थानाबाबत बिलांतल्यापेक्षां अधिक उदार धोरण स्वीकारलें जावें म्हणून आपापल्या परीनें खटपट केली. या दोन टोकांना न जुमानतां सर सॅम्युअल होअर-प्रभृति ब्रिटिश मंत्र्यांनीं बिलांतील धोरणच हेक्यानें पुढें रेटलें. हीं सर्व मतें प्रतिबिंबित करणारा पार्लमेंटांतील वादविवाद मासला म्हणून पुढें देत आहे:—

१ **सोमरव्हिल:**—गव्हर्नर जनरलनें संस्थानिकांवर जी सार्व-भौमसत्ता ( पॅरामौंट्सी ) गाजवावयाची ती आपल्या सांगण्याप्रमाणें गाज-वावी असें गव्हर्नर जनरलवर कॉंग्रेस दडपण तर आणणार नाहीं ? दुसरें

असें कीं, जी द्विदळ राज्यपद्धति प्रांतांत फसली म्हणून टाकून देण्यांत येत आहे तीच फीडरल क्षेत्रांत कशी यशस्वी होणार हें एक गौडबंगाल होय.

२ **वुलमर:**—सायमन कमिशननें आपल्या रिपोर्टांत स्वच्छ लिहिलें आहे कीं, " जिथें जिथें म्हणून द्विदल राज्यपद्धतीचा प्रयोग करण्यांत येईल तिथें तिथें ती मोडून पडणें हें अपरिहार्य आहे." मग हा फेडरेशनचा फार्स कशाला करितां ? हिंदी लोकांची ही निव्वळ फसवणूक आहे. बरें, या बिलाला तरी हिंदुस्थानांत कोण उचलून धरणारा आहे ? एकटा सप्रूच ना ? मला तर असें वाटतें कीं, कॉंग्रेस या फीडरल घटनेचा पाचर म्हणून उपयोग करणार व गव्हर्नर जनरलचे जादा अधिकार हळूहळू नामशेष करणार व शेवटीं संपूर्ण स्वराज्य मिळविणार.

३ **ॲमरी:**—असें पहा, आज वस्तुस्थिति अशी आहे कीं, हिंदुस्थानांत कोठें ना कोठें तरी दुहेरी राज्यपद्धति चाललीच पाहिजे; त्याशिवाय गत्यंतर नाहीं. अहो, संस्थानिक तरी फेडरेशनमध्यें उगीच येतात काय ? त्यांना देशभक्तीचा एकदम एकाएकीं थोडाच उमाळा आला आहे ! त्यांचे आर्थिक हितसंबंध गोत्यांत येत चालले आहेत याची त्यांना जाणीव होत चालली आहे; तेव्हां फेडरेशनमध्यें शिरून स्वहितार्थ सत्ता कां काबिज करूं नये ? हा त्यांचा विचार !

४ **आल्फ्रेड नॉक्स:**—अरे, माहीत आहे जा, हिंदी लोक अशीच नेहमीं दमदाटी करीत असतात; त्यांना काय किंमत द्यावयाची ?

५ **सॅम्युएल होअर:**—मध्यवर्ती सत्तेंत हिंदी लोकांना भागीदार केल्याखेरीज जगांत काय किंवा ब्रिटिश साम्राज्यांत काय त्यांचा दर्जा हीनच राहणार; तथापि ( १ ) आमचें प्रचंड कर्ज ( २ ) ब्रिटिश लष्कराचा खर्च, ( ३ ) आमच्या पेन्शनरांचें पेन्शन, ( ४ ) चलन, जकाती इ० गोष्टी आपल्या हातांत ठेवल्या पाहिजेत हें मला कबूल आहे.

६ **वुइन्स्टन चर्चिल:**—मजूर सरकार अधिकारावर असतांना हिंदी संस्थानिकांना धास्ती पडली कीं, आतां आपली सद्दी संपली; व कांहीं तरी करार करून घेऊन राखतां येईल तेवढें राखलें पाहिजे, म्हणून त्यांनीं फेडरेशनमध्यें सामील होण्याची तयारी दर्शिवली. परंतु आतां तें

भय नष्ट झालें आहे. आतां फेडरेशन जर स्थापन झालें तर होईल काय कीं, जो संस्थानिक साम्राज्याचे हितसंबंध उचलून धरील त्याची हे काँग्रेस-वाले फजिती करतील.

बरें, तुम्ही बिलान्वयें हिंदी लोकांना सत्ता तरी काय देत आहांत? ज्याला जबाबदारीचें खातें म्हणतां येईल असें प्रत्येक खातें तुम्ही 'राखीव' करून ठेविलें आहे. हां, एवढें मात्र खरें कीं, जादा हक्क उकळण्याचें एक चांगलें हत्यार तुम्ही हिंदी लोकांच्या हातांत देत आहांत.

७ **आयझॅक फूट:**—मि० जयकर यांनीं एकदां मि० चर्चिल यांना विचारलें कीं, "हिंदुस्थानावर राज्य कोणाचें असावें—ब्रिटिश लोकांचें कां हिंदी लोकांचें—हा प्रश्न तुम्ही कसा निर्णीत करणार?" मि० चर्चिल यांनीं कांहींच उत्तर न दिल्यामुळें मि० जयकर यांनीं 'याबाबत हिंदुस्थानच्या सर्वसाधारण जनतेचेंच मत घेतलें पाहिजे' असें सुचविलें होतें, तेंच माझ्या मतें रास्त आहे.

८ **सॅम्युएल होअर:**—कोणत्या कायदेमंडळांचें मतच अजमवावयाचें असेल तर मी म्हणेन कीं, नवीन प्रांतिक कायदेमंडळांचेंच मत घ्यावें; तथापि आमची जबाबदारी आम्ही सोडायला तयार नाहीं; हिंदुस्थानची घटना कशी व केव्हां घडवावयाची हें एकमेव पार्लमेंटच ठरवील. लष्कर इत्यादि खातें फीडरल सरकारच्या कक्षेंतलें असलें तरी त्याचा अर्थ तें मंत्र्यांच्या ताब्यांत गेलें असा बिलकुल होत नाहीं; तें खातें गव्हर्नर जनरलच्या, म्हणजे माझ्या व पर्यायानें तुमच्याच ताब्यांत राहणार याबद्दल शंका बाळगूं नका.

९ **चर्चिल:**—हें काय! एकदां देतां काय व पुनः लगेच परत तें काय घेतां!! तुम्ही हिंदुस्थान अशानें घालविणार!!!

१० **सॅम्युएल होअर:**—भविष्यकाळीं काय घडणार आहे हें कोणालाच सांगतां येणार नाहीं.

११ **मॉर्गन जोन्स:**—ख्रिस्ती भटाभिक्षुकांचा ४२ लाख रुपये खर्च तुम्ही हिंदुस्थानावर काय म्हणून लादीत आहांत? काय कोणी तक्रार केली नाहीं म्हणतां? अरे, आपण जरा कांहीं तरी लाज धरली

पाहिजे. हिंदी लोक फारच सुसंस्कृत असल्यामुळें ते असल्या क्षुल्लक गोष्टी-कडे कानाडोळा करीत असतील; म्हणून काय आपण त्यांच्या चांगुल-पणाचा असा भलता फायदा घ्यावा ?

१२ व्हिस डेव्हिस:—ज्या देशाचें संरक्षण दुसऱ्या देशानें करावें लागतें त्याला 'स्वराज्य' दिलें असल्याची भाषा पोकळ आहे. हिंदी शिपायांवर ब्रिटिश अम्मलदारांची हुकमत चालते, परंतु ब्रिटिश सैन्यावर एकही हिंदी अम्मलदार नाहीं. (हशा). सभासद या माझ्या म्हणण्याला हसताहेत, परंतु ते जर हिंदी असते तर त्यांनीं काय केलें असतें हें काय मला माहीत नाहीं ?

१३ डेव्हिड ग्रेनूफेल:—ज्याच्या हातांत पैशाची सत्ता तो खरा मालक.

१४ कॉक्स:—इंग्लंडच्या बँकेचा गव्हर्नर मँाटेग्यू नॉर्मन हाच वास्तविक इंग्लंडचा खरा राजा आहे व तोच हिंदुस्थानचा खरा बादशहा होणार.

१५ बेव्हन:—द्विदळ राज्यपद्धति वाईटच; परंतु त्यांतल्या त्यांत फिनॅन्स खात्यांतील ही जोडी (सल्लागार व मंत्री) फारच कटकटीची होणार; शिवाय बजेटाची दरवर्षी घासाघीस!

१६ मॅक्गव्हर्न:—या बिलांत येथल्या सावकारांची काळजी घेतली आहे; हिंदी गरीब लोकांची नाहीं.

१७ सॅम्युएल होअर:—हिंदुस्थान देशाशीं इंग्लंडचा व्यापार इतका अफाट व पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेला आहे कीं, त्याबाबत बिलांत स्वतंत्र तरतूद करणें जरूर झालें. दुसरें असें कीं, ब्रिटिश व्यापारानें हिंदुस्थानचें कोटकल्याणच झालेलें आहे. साम्राज्याच्या इतर देशाचेंही सोवळें भांडें या बिलांत ढकलून द्या असें जर आपण म्हणूं लागलांत तर सगळेंच ओंफस होईल; आपली बाजू अधिकच लंगडी व उघडी पडल्यावांचून राहणार नाहीं. 'मुलगा आणि बोरें' ही गोष्ट तुम्हांला माहीत नाहीं काय?

आतां फेडरेशनला विरोध असण्याचें दुसरें महत्त्वाचें कारण म्हटलें म्हणजे हिंदी संस्थानिकांनीं पाठवावयाचे प्रतिनिधी कसे निवडावयाचे याचा कायद्यांत मागमूसही नाहीं. संस्थानिकांच्या लहरीप्रमाणें ते वाटेल त्याला

शेंदूर फासतील व फीडरल कायदेमंडळांत पाठवून देतील. शिवाय लोकसंख्ये-पेक्षां संस्थानांना किती तरी जादा प्रतिनिधी दिले आहेत. त्यांना जास्तींत जास्त शेंकडा २५ प्रतिनिधी द्यावयास पाहिजे होते; पण लालूच म्हणून फीडरल असेंब्लींत व कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें हें प्रमाण अनुक्रमें शेंकडा ३३ व शेंकडा ४० असें देण्यांत आलें आहे. हे बहुतेक सर्व प्रतिनिधी संस्थानांतील बेजबाबदार अधिकारी वर्गातून नेमले जाण्याचा बराच संभव आहे. शिवाय हल्लीं संस्थानांतून ब्रिटिश नोकरांचा सुळसुळाट झाला असल्या-कारणानें कित्येक ब्रिटिश अधिकारी यापुढें संस्थानांचे प्रतिनिधी म्हणून फीडरल कायदेमंडळांत मिरवण्याचा संभव आहे. पूर्वींच्या सरकारानियुक्त सभासदांऐवजीं हे नवीन संस्थानिकनियुक्त लोक साम्राज्यशाहीचे हस्तक बनून स्वराज्यप्राप्तीच्या मार्गांत कायमची धोंड होऊन बसणार कीं काय असा सर्वत्र दाट संशय पसरला आहे. त्याचप्रमाणें या संस्थानी प्रतिनिधींना ब्रिटिश इंडियन कारभारांत हात घालावयास मिळणार; परंतु संस्थानिकांच्या अंतर्गत कारभारांत ब्रिटिश इंडियन प्रतिनिधींचें मुळींच बोट शिरकणार नाहीं, असा बंदोबस्त करून ठेवण्यांत आला आहे. याच्या उलट, कॉंग्रेसचें असें म्हणणें आहे कीं, कायदेमंडळांतील सर्वच प्रतिनिधी लोकांनीं निवडून दिलेले असले पाहि-जेत, असें संस्थानिकांनीं कबूल केल्याशिवाय कॉंग्रेस फेडरेशनला कधींही मान्यता देणार नाहीं. या निश्चयी धोरणाचा थोडाफार परिणाम दिसून येऊं लागला आहे. भारतमंत्र्यांनीं जाहीर केलें आहे कीं, संस्थानांनीं आपल्या प्रजेला स्वराज्याच्या हक्कांत अंशभागी केल्यास ब्रिटिश सरकारची त्या गोष्टीला हरकत नाहीं. आपल्या प्रजेला जबाबदार राज्यपद्धतीची घटना देण्यास व फीडरल कायदेमंडळांतून लोकनियुक्त प्रतिनिधी पाठविण्याची व्यवस्था करण्यास संस्थानिक तयार होतात कीं नाहीं हा महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला आहे. कोचीनच्या महाराजांनीं द्विदल राज्यपद्धति नुकतीच चालू केली आहे. म्हैसुरांतही होऊं घातली आहे. अलीकडे मान्सा, रामदुर्ग, जमखंडी, मिरज, शिकार इ० बारीकसारीक संस्थानांतूनही खळबळ चालू आहे. भोपाळ, हैदराबाद, ग्वाल्हेर, बडोदें, त्रावणकोर इ० बड्या संस्थानांतूनही राजकीय सुधारणांबाबत कमिट्या

नेमल्या गेल्या असून खलबतें चालू आहेत. कॉंग्रेसच्या धोरणाचा सर्वत्र परिणाम प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष घडत आहे हें जरी खरें असलें तरी नजीकच्या काळांत संस्थानांची जितकी प्रगति व्हावयास पाहिजे, तितकी होईल असें दिसत नाहीं. ही गोष्ट मान्य केल्यास १९३५ च्या कायद्यानें संकल्पिलेलें फेडरेशन अस्तित्वांत येणें जवळजवळ अशक्य कोटींतलें आहे, असें म्हटल्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं.

आतां तिसरी बाब, प्रांतांनीं पाठवावयाच्या प्रतिनिधींची जातवार व अप्रत्यक्ष निवडणूक, ही होय. जातवार मतदारसंघाबाबत मागें सविस्तर वर्णन दिलेंच आहे. हिंदुस्थानच्या किती दृष्टींनीं चिरफळ्या केल्या गेल्या आहेत तें त्यावरून चांगलेंच दिसून येतें. या स्वतंत्र मतदारसंघाच्या तत्त्वाविरुद्ध, पार्लमेंटांत वादविवाद चालू असतांना, कर्नल वेजवुड यांनीं अतिशय खटपट केली. परंतु त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. सिंधसारख्या प्रांतांत अल्पसंख्य असलेल्या हिंदूंनीं संयुक्त मतदारसंघ मागितले असतांना ते त्यांना कां देत नाहींत याबद्दल त्यांनीं अतिशय आश्चर्य व्यक्त केलें; पुढें तें असेंही म्हणाले कीं, "जातवार मतदारसंघ व प्रतिनिधित्व हें अल्पसंख्याकांना संरक्षण होत नसून तें बहुसंख्याकांना अल्पसंख्यांकांची पर्वा करण्याचें बिलकुल प्रयोजन ठेवीत नाहीं." शेवटीं नाइलाज म्हणून त्यांनीं अशी उपसूचना मांडली कीं, "अल्पसंख्याकांना स्वतंत्र मतदारसंघाच्या ऐवजीं संयुक्त मतदारसंघ हवेत कीं नकोत हें ठरविण्याची मुभा असावी." परंतु तीही नामंजूर झाली. याप्रसंगीं मुंबई कायदेमंडळांत अगदीं अलीकडे मुस्लिम लीग पक्षानें केलेल्या विरोधाची आठवण होते. वेजवुडसाहेबांनीं दक्षिण आफ्रिकेंतील निग्रो लोकांचें, न्यूझीलंडमधील मावरी लोकांचें, किनीयामधील हिंदी लोकांचें व खुद्द इंग्लंडमधील मजूर वर्गाचें, अशीं नाना प्रकारचीं खात्री पटविणारीं उदाहरणें दिलीं; त्यांना मजूरपक्षाचे सध्यांचे पार्लमेंटांतले पुढारी मेजर ॲटली यांनीं पाठिंबा दिला; परंतु त्याचा काडीमात्र उपयोग झाला नाहीं व जातीय निर्णय हा कायद्यांत न हालेल अशा भक्कम रीतीनें राहून गेला. यांतीलच दुसरा भाग अप्रत्यक्ष निवडणुकीबाबतचा. सर्वांच्या विरोधाला व १९१९ च्या सध्यां चालू असलेल्या निवडणुकीच्या पद्धतीला बाजूला सारून

प्रांतिक असेंब्ल्यांतून फीडरल असेंब्लींतील प्रतिनिधींची निवडणूक व्हावयाची आहे. याच्या उलट, कौन्सिल ऑफ स्टेटकरितां संकुचित धनाढ्य मतदारसंघानें प्रत्यक्ष निवडणुकीच्या द्वारें प्रतिनिधी पाठवावयाचे आहेत. जगाच्या पाठीवर असा विपरीत प्रकार कोठेंही सांपडणार नाहीं. अशा सर्व दृष्टींनीं होऊं घातलेलें फेडरेशन—कायद्याच्या भाषेंत—'दुष्ट' करून ठेवलेलें आहे. अशा फेडरेशनची सुरवात झाल्यास प्रांतिक स्वराज्यालाही त्यापासून पदोपदीं धोका येण्याचा प्रसंग असल्यामुळें प्रांतिक सरकारांनीं व कायदेमंडळांनीं त्याला तीव्र विरोध केला पाहिजे.

## गव्हर्नरांचे जादा अधिकार

प्रांतिक घटनेबाबतच प्रस्तुत ग्रंथ असल्यामुळें प्रांतिक भागांतील प्रत्येक कलमावर विस्तृत विवेचन व त्यांतून निघणाऱ्या अनेक प्रश्नांवर चर्चा व ऊहापोह ठिकठिकाणीं केलाच आहे. तथापि कांहीं महत्त्वाच्या मुद्द्यासंबंधीं ( उ० गव्हर्नरचे जादा अधिकार ) एके ठिकाणीं संकलित विवरण करणें योग्य होईल. स्वराज्याच्या दृष्टीनें प्रांतिक घटनेंत जो उणेपणा आलेला आहे तो गव्हर्नरच्या 'जादा अधिकारां'मुळें उत्पन्न झालेला आहे. या अधिकारांची शेंडी गव्हर्नर जनरल, भारतमंत्री यांच्या हातांत आहे. भारतमंत्री हा ब्रिटिश राष्ट्राचा प्रतिनिधी. म्हणून जोंपर्यंत हे गव्हर्नरचे अधिकार कायद्यानें ठेवले आहेत तोंपर्यंत ब्रिटिश राष्ट्र हिंदुस्थानांतील प्रांतांवर हुकमत गाजविणारें असणार हें उघड आहे. अशा तऱ्हेनें 'दुसऱ्यां'ची सत्ता जोंपर्यंत आपल्यावर असणार तोंपर्यंत 'आपलें' ( स्व ) राज्य झालें असें कदापिही म्हणतां येणार नाहीं. तेव्हां ही परसत्ता कोणत्या अंशानें व किती प्रकारांनीं चालू ठेवण्यांत आली आहे याची जरा विस्तारानें छाननी करणें जरूर आहे.

१९३५ च्या कायद्यानें अस्तित्वांत आणलेले प्रांताचे मुख्य अधिकारी दोन— एक गव्हर्नर व दुसरें त्याला 'मदत' व 'सल्ला' देणारें मंत्रिमंडळ. अशा तऱ्हेनें दोघांचा स्पष्ट उल्लेख केलेला असला तरी, प्रांताचा सर्व राज्यकारभार गव्हर्नराच्या नांवानेंच चालावयाचा अशी कायद्यानें व्यवस्था करण्यांत आली आहे.

ऑस्ट्रेलियन कॉमनवेल्थच्या घटनेंत ( कलम ६१ ) 'राणीच्या प्रतिनिधीनें—गव्हर्नर जनरलनें—सर्व राज्यकारभार पहावयाचा' व ( कलम ६२ ) 'त्याला त्या कामांत **सल्ला** देण्याकरितां एक फीडरल प्रधानमंडळ असावें' अशी योजना केलेली आढळून येते. आयरिश फ्री स्टेटच्या घटनेंत ( कलम ५१ ) 'राज्यकारभारांत **मदत** आणि **सल्ला** देण्याकरितां एक कौन्सिल असेल; हें कौन्सिल **डेल आयरीन**ला जबाबदार राहील; या कौन्सिलांत एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलच्या अध्यक्षाच्या सांगण्याप्रमाणें राजाच्या प्रतिनिधिनें मंत्र्यांची नेमणूक करावयाची आहे' अशी व्यवस्था करण्यांत आलेली होती. गेल्या सोळा सतरा वर्षांत या व्यवस्थेंत बरेच फेरबदल झाले आहेत. डी व्हॅलेरानें फेरफार केलेल्या सध्यांच्या घटनेंत 'राजप्रतिनिधी'ला गचांडी देण्यांत आली असून त्याच्या जागीं आयरिश लोकांनीं निवडलेल्या अध्यक्षाची ( प्रेसिडेंट ) स्थापना करण्यांत आली. डी व्हॅलेरा—जो आतांपर्यंत कौन्सिलचा प्रेसिडेंट होता तो—आतां मुख्य प्रधान झाला आहे. आपल्या येथील प्रांतिक घटनेंतील शब्दयोजनेप्रमाणेंच आयरिश फ्री स्टेटच्या घटनेंत 'मदत' आणि 'सल्ला' हे दोन शब्द आहेत. त्या कलमांत 'मंत्री डेल आयरीनला म्हणजे आयरिश पार्लमेंटला **जबाबदार** असतील' असा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. साम्राज्यांतील स्वायत्त वसाहतींच्या घटनांतून हें जबाबदारीचें तत्त्व, तसा प्रघात पडून, रूढ झालेलें आहे. हा आयरिश घटना व इतर घटना यांच्यांतील फरक लक्षांत घेण्यासारखा आहे. आतां घटनात्मक दृष्टीनें 'मदत' आणि 'सल्ला' या शब्दांचा अर्थ काय हें पाहिलें पाहिजे. राजानें किंवा राजप्रतिनिधी जो गव्हर्नर जनरल किंवा गव्हर्नर त्यानें मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणेंच आपलें राज्यकारभाराचें प्रत्येक कृत्य केलें पाहिजे असा त्या मदतीचा व सल्ल्याचा अंतिम अर्थ आहे. कायदेपुस्तकांतून राजाला किंवा गव्हर्नराला किती तरी अधिकार आहेत असें वर वर पाहणारास दिसून येतें. परंतु विंचवाची नांगी मोडली म्हणजे तो जसा निरुपद्रवी व कित्येक प्रसंगीं उपयुक्तही होतो त्याप्रमाणें लोकशाहीप्रधान राज्यांतील राजांची सध्यांच्या काळीं अवस्था झालेली आहे. याबाबतचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. बाल्डविन यांच्या

सल्ल्यानें १९३६ सालीं इंग्लंडचे राजे आठवे एडवर्ड यांनीं जो राज-पदाचा त्याग केला त्यासंबंधींचें देतां येईल. मतभेदाची बाब तरी काय होती? विशिष्ट बाईबरोबर राजानें विवाह करावा किंवा नाहीं? परंतु ती विशिष्ट बाई राजाची केवळ बायकोच होणार नसून इंग्लंडची राणीही व्हावयाची होती; राजाची वधूपसंती अर्थात् राणीपसंती मुख्य प्रधानांना मान्य न झाल्यामुळें व राजानें आपलाच हेका चालविल्यामुळें राजाला राज्य सोडावें लागलें. या प्रसंगावर प्रख्यात ग्रंथकार बर्नार्ड शॉ यानें एक संवाद लिहिलेला असून तो मौजेकरितां व प्रस्तुत विषयाशीं कांहींसा संबद्ध आहे म्हणून पुढें देत आहे:—

"**एडवर्ड:**—या माझ्या विवाहाच्या मुद्द्यावर माझ्या प्रजेची इच्छा तरी काय आहे याची खात्री करवून घेण्याकरितां पार्लमेंटची पुन: सर्वसाधारण निवडणूक करणें भाग पडलें तरी त्याही प्रसंगाला तोंड देण्याची माझी एका पायावर तयारी आहे.

**बाल्डविन:**—याबाबत निवडणुकीचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. आपण आपल्या प्रधानांच्या सल्ल्याप्रमाणें वागावयास तयार आहांत अगर नाहीं? हा आपणा दोघांमध्यें सरळ, साधा प्रश्न आहे.

**एडवर्ड:**—बरें तर मग, आपला काय सल्ला आहे? मी कुणाशीं लग्न करावें असा आपला सल्ला आहे? माझी पसंती मी केली आहे; आतां तुम्ही आपली पसंती कळवा. उगीच मोघम मोघम बोलून कांहीं उपयोग नाहीं............तुमच्या पसंतीच्या बाईचें नांव घ्या.

**बाल्डविन:**—परंतु मंत्रिमंडळानें या गोष्टीचा विचार केलेला नाहीं. महाराज, आपण आमच्याशीं सरळपणानें वागत नाहींसें दिसतें.

**एडवर्ड:**—मी तुम्हांला कात्रींत धरलें असें तुमचें म्हणणें आहे? अलबत. तसें करावें असें मला वाटलें.

**बाल्डविन:**—महाराज़, तसें कांहीं माझें म्हणणें नाहीं; परंतु तुमची बायको मी कशी पसंत करणार? तसें मला करतां येणें शक्य आहे काय?

**एडवर्ड:**—असें जर आहे तर याबाबत आपण मला सल्ला देऊं

शकणार नाहीं आणि आपणाला सल्ला जर देतां येत नसेल, तर त्या न दिलेल्या सल्ल्यानें मला वागतां येणार नाहीं.

**बाल्डविनः**—असली ही शब्दावरील कोटी मला खपायची नाहीं.........माझा सांगण्यांतील मतलब काय हें आपणाला पक्कें कळून चुकलें आहे. कोणी तरी राजघराण्यांतील पसंत करा; अमेरिकन नको.

**एडवर्डः**—असें जरा ताळ्यावर या; आतां कांहीं तरी निश्चित स्वरूपांत तुम्ही आपलें म्हणणें मांडलेलें दिसतें. इंग्लंडचा मुख्य प्रधान जाहीर रीतीनें असें सांगत आहे कीं, अमेरिकन लोक अस्पृश्य आहेत. पूर्वेकडील माझें साम्राज्य ज्या राष्ट्राच्या मैत्रीवर व भाईबंदपणावर शेवटीं अवलंबून आहे त्या राष्ट्राचा तुम्ही अपमान करीत आहांत. माझ्या कित्येक शहाण्यासुरत्या राजकीय मित्रांचें असें स्पष्ट मत आहे कीं, ब्रिटिश राजाचें एका अमेरिकन बाईबरोबर लग्न झालें तर ती गोष्ट मुत्सद्देगिरींतील एक हातखंडा डाव समजली जाईल.

**बाल्डविनः**—अरेच्या, जें बोलायला नको होतें तें मी बोलून गेलों. सहज चुकून जिव्हेनें झक् मारली.

**एडवर्डः**—आपण अजून १७ व्या शतकांत असला तरी मी २० व्या शतकांतला आहे. लोकसत्ताक राज्यांच्या जगांत, तसेंच एके काळीं रंगारी, पाथरवट, शिपाई, बुटांच्या कारखान्यांतील मजूर असलेल्या लोकांनीं राज्य चालविलेल्या बलाढ्य राष्ट्रांच्या जगांत मी वावरत आहें.

माझ्या सासऱ्याची तुम्हीच निवड करा. पाहिजे तर इराणचा तो शहा आहे! नाहीं तर तो एफेंडी व्हाटातुर्क आहे ना? तो नको असल्यास सीनॉर बंबार्डन आहेच; नाहीं तर तो हर बॅटलर चालेल का? किंवा आपला तो रशियाचा स्टील किंग (स्टालिन) कां नाहीं चालणार? आजचीं राजघराणीं हीं अशीं आहेत.

**बाल्डविनः**—हां हां! तें मला उमगलें. परंतु आपण आतां राज्यसंन्यासाच्या शक्यतेबाबतच चर्चा केली तर अधिक बरें. आपण राज्यावरून खालीं आलेंच पाहिजे. तसें झालें म्हणजे सर्व कटकटी आपोआप मिटतील आणि आमची या सर्व संकटांतून सुटका होईल.

**एडवर्ड:**—तुमचे मित्र मला नेहमीं मोठ्या कळवळ्यानें माझ्या सार्वजनिक कर्तव्याबाबतच्या जबाबदारीची जाणीव देत असतात; त्याला अनुसरून कांहीं एक कारण नसतां मला माझ्या कर्तव्याची जागा सोडणें शक्य होईल काय ?"

(डेली मिरर, डिसेंबर १९३६.)

ही झाली इंग्लंडच्या राजाची स्थिति इंग्लंडांत. १९३१ च्या स्टॅटयूट ऑफ वेस्टमिन्स्टर या कायद्यानें डूमीनियन्सची स्वायत्तता, साम्राज्यान्तर्गत का होईना, परमावधीला पोंचली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. आयर्लंडनें तर गव्हर्नर जनरलची जागाच रद्द करून टाकली आहे, राजनिष्ठेची शपथही काढून टाकली आहे. परंतु हिंदुस्थानांत मात्र राजप्रतिनिधींना म्हणजे गव्हर्नर जनरलला व गव्हर्नरला भरमसाट अधिकार कायद्यानें देण्यांत आले आहेत. मंत्रिमंडळ व गव्हर्नर या दोघां-मध्यें ही अधिकारविभागणी करण्यांत आली असून त्याकरितां निरनिराळ्या तद्दर्शक शब्दयोजनाही ठरविण्यांत आल्या आहेत. पहिला प्रकार असा कीं, ज्या गोष्टींबाबत गव्हर्नरनें 'आपल्या मर्जीप्रमाणें' (इन हिज डिस्क्रीशन) वागणें भाग आहे त्या गोष्टींव्यतिरिक्त इतर गोष्टींत गव्हर्नरला 'सल्ला' व 'मदत' देण्याचें काम मंत्रिमंडळानें करावयाचें आहे. मॉर्गन जोन्स या पार्लमेंटाच्या सभासदानें ही गव्हर्नरची 'मर्जी' बिलांत निदान २०० ठिकाणीं तरी आली आहे अशी उपहासपूर्वक गणना केली आहे. 'मर्जीप्रमाणें' करावयाच्या या गोष्टी कोणत्या तें मागें कलमवार दिलेंच आहे. त्यासंबंधीं गव्हर्नरनें मंत्रिमंडळाची सल्लामसलत घेण्याचें बिलकुल कारण ठेवलेलें नाहीं. याला अपवाद ५९ (५) कलमानें करून ठेवला आहे. प्रांतिक राज्यकारभारासंबंधीं जे नियम गव्हर्नरनें तयार करावयाचे ते गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला घेऊन मग आपल्या मर्जीप्रमाणें करावेत असें स्पष्ट लिहिलें आहे. पार्लमेंटच्या एका कट्टर साम्राज्यवादी सभासदाला एवढी सुद्धां 'मंत्र्यांशीं सल्लामसलत' न खपून त्यानें भारतमंत्र्याला हटकलें. 'ही योजना मुद्दामच करण्यांत आली आहे; नियम करतांना निरनिराळ्या खात्यांबाबत लखोटबंद विभागणी करणें बरोबर होणार नाहीं' असें भारतमंत्री सर सॅम्युएल होअर यांनीं उत्तर दिलें. या अपवादाचा

विपरीत अर्थ न्यायमूर्ति हॉरविल यांनीं बाटलीवाला खटल्यांत केल्याचें मागें लिहिलेंच आहे. " या कलमाखेरीज बाकीच्या कोणत्याही कलमांत 'गव्हर्नरांनीं मंत्र्यांचा सल्ला घेतला पाहिजे' असें सांगितलेलें नाहीं. मंत्र्यांनीं 'सल्ला' व 'मदत' करावयाची एवढेंच म्हटलें आहे. गव्हर्नरनें 'सल्ला' मागितला तर मंत्री तो देणार कीं नाहीं? बरें, त्या 'सल्ल्याप्रमाणें' वागलेंच पाहिजे असें कायद्यांत कोठेंच म्हटलेलें नाहीं; 'आज्ञापत्रां'त तसें म्हटलें आहे; परंतु 'आज्ञापत्र' हा कांहीं कायदा नाहीं. मंत्र्यांना गव्हर्नरनें आपला 'सल्ला' घेतला नाहीं असें वाटल्यास त्यांनीं पाहिजे तर राजीनामा द्यावा, नाहीं तर गव्हर्नरास परत बोलविण्याची भारतमंत्र्यांना विनंति करावी. परंतु 'सल्ला' घेण्याबाबत आपला 'कायदेशीर' हक्क आहे असें मंत्र्यांना कधींही म्हणतां येणार नाहीं " इत्यादि तर्कट हॉरविलसाहेबांनीं आपल्या निकालपत्रकांत रचलें आहे. परंतु राजकारणकोविद त्याला काडीचीही किंमत देणार नाहींत. खुद्द पार्लमेंटांत याबाबत अनेकदां सॅम्युअल होअर, बटलर, ॲटॉर्नी जनरल, सॉलिसिटर जनरल व मुख्य प्रधान चेंबरलेन यांनीं स्पष्ट खुलासे केले आहेत व हिंदुस्थानांत आश्वासनमागणीच्या पेचप्रसंगाचे वेळीं गव्हर्नर जनरल लॉर्ड लिनलिथगो यांनीं स्पष्ट शब्दांत व निःसंदिग्धपणानें 'मंत्र्यांचा सल्ला कोणकोणत्या बाबींत बंधनकारक (मॅंडेटरी) मानला जाईल' त्याची फोड करून सांगितली आहे. ५९ (५) कलमांतील अपवादाप्रमाणेंच असेंब्ली व कौन्सिल यांचे कांहीं विशिष्ट बाबीपुरते नियम करण्याचे कामीं गव्हर्नरनें स्पीकर व प्रेसिडेंट यांची सल्लामसलत घेऊन मग आपल्या मर्जीप्रमाणें नियम करावयाचे आहेत. परंतु ही बाब राज्यकारभारांत येणारी नव्हे; तथापि वरील गोष्टीशीं तिचें साम्य असल्यामुळें नुसता उल्लेख केला इतकेंच. अशाच प्रकारची योजना फीडरल क्षेत्रांत असून त्यांत शिवाय दुसऱ्या खेपेला जो फिनॉन्शियल ॲड्व्हायसर (सल्लागार) गव्हर्नर जनरलनें नेमावयाचा आहे तो 'मंत्र्यांशीं सल्लामसलत' केल्यानंतर त्यानें आपल्या मर्जीप्रमाणें नेमावयाचा आहे.

गव्हर्नरच्या या 'डिस्क्रीशन'च्या क्षेत्राशिवाय आणखी एक 'इंडिव्हिज्युअल जजमेंट'चें (वैयक्तिक मत चालविण्याचें) नवीनच क्षेत्र

या १९३५ च्या कायद्यान्वयें निर्माण केलें आहे. ज्या बाबी मंत्र्यांनीं कारभार पाहण्याच्या आहेत त्यांतील कांहीं कांहीं गोष्टींबाबतचे अखेरचे अधिकार गव्हर्नरकडे ठेवण्यांत आले आहेत. अशा बाबी मागें कलमवार विस्तारपूर्वक देण्यांत आल्याच आहेत. 'इंडिव्हिज्युअल' ( वैयक्तिक ) तारतम्यबुद्धि चालवावयाची, याच्या उलट 'कलेक्टिव्ह' ( सामुदायिक ) जजमेंट प्रधानमंडळाचें असणार हें उघड आहे. तेव्हां प्रधानमंडळाचा सामुदायिक रीतीनें दिलेला सल्ला न जुमानतां तो धाब्यावर बसवून एखादी गोष्ट करावयाची किंवा न करावयाची हें सर्वस्वी गव्हर्नरवर सोपविलें आहे. याचा अर्थ, एकाद्या विशिष्ट योजनेचा उपक्रम किंवा प्रारंभ ( एनीशिएटिव्ह ) मंत्र्याकडे, परंतु अखेरचें होय नाहीं म्हणण्याचा अधिकार गव्हर्नरचा, अशी कायद्यानें तरतूद करून ठेवली आहे. या 'वैयक्तिक मत' चालविण्याच्या बाबींपैकीं सर्वांत ठळक उदाहरण म्हणजे ५२ व्या कलमांत गव्हर्नरावर सोपविलेल्या जादा जबाबदाऱ्या हें देतां येईल. ८४ कलमावर पार्लमेंटांत वादविवाद चालू असतांना सर सॅम्युएल होअर यांनीं अशी स्पष्ट व प्रांजळ कबुली दिली कीं, " गव्हर्नरच्या या जादा जबाबदाऱ्यांचें क्षेत्र फारच व्यापक आहे; त्यांचा एखाददुसऱ्या खात्याशींच संबंध आहे असें नसून राज्यकारभाराच्या सबंध क्षेत्राला त्यांनीं व्यापून टाकिलें आहे." तात्पर्य, सल्ला घेणें वा न घेणें हा आनुषंगिक भाग मानला तर अखेरच्या परिणामाच्या दृष्टीनें 'मर्जी' काय किंवा 'वैयक्तिक मत' काय दोघांचा अर्थ एकच. 'जादा जबाबदाऱ्यां'च्या बाबत गव्हर्नरनें मंत्र्यांचा सल्ला मानला तरी अखेर तो गव्हर्नर जनरल, भारतमंत्री, ब्रिटिश पार्लमेंट यांनाच जबाबदार असणार; याचा अर्थ, गव्हर्नराच्या याबाबतच्या हुकमांत फिरवाफिरव करण्याचा अधिकार या चढत्या दर्जाच्या अधिकाऱ्यांना आहे, असा होतो. ही गोष्ट गव्हर्नर जनरल यांनीं आपला खुलासा करतांना निःसंदिग्धपणें स्पष्ट करून मांडली आहे. यामुळेंच मंत्र्यांना अखेर निर्णय करण्याची सत्ता किती कोती अगर अल्प प्रमाणांत दिलेली आहे याची खात्री पटते. कायद्याच्या कलमांना बगल देऊन आपला मार्ग मंत्र्यांनीं बहुमताच्या जोरावर नेटानें चोखाळत राहणें हा भाग निराळा; तो राजकीय बलाबलाचा प्रश्न ठरतो; घटनेच्या किंवा

कायद्याच्या शुद्धपणाचा ठरत नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. या जादा अधिकारांची जॉइंट पार्लमेंटरी कमिटींत चर्चा चालू असतांना लॉर्ड रीडिंग व सर सॅम्युअल होअर यांच्यामध्यें जीं प्रश्नोत्तरें झालीं तीं पुढें दिलीं आहेत; त्यांवरून या गोष्टीवर बराच प्रकाश पडतोः—

**रीडिंगः**—ज्या ज्या वेळीं गव्हर्नर आपल्या जादा जबाबदारीच्या अधिकारांत वागेल त्या त्या वेळीं तो गव्हर्नर जनरलचा एजंट ( मुनीम ) म्हणून वर्तन करील काय?

**होअरः**—घटनेच्या दृष्टीनें विचार केल्यास 'होय' असें उत्तर देणें भाग आहे. गव्हर्नर, गव्हर्नर जनरल, स्टेटसेक्रेटरी व पार्लमेंट अशी ही जबाबदारीची सांखळी आहे.

**रीडिंगः**—गव्हर्नर हा गव्हर्नर जनरलच्या हुकमतीखालीं वागणार, म्हणूनच ना आपण असें म्हणतां?

**होअरः**—होय, तसेंच.

**रीडिंगः**—गव्हर्नर हा वरचेवर गव्हर्नर जनरलची सल्लामसलत घेईल काय?

**होअरः**—दहांपैकीं नऊ गोष्टींत असा प्रघात पडेल कीं, गव्हर्नर गव्हर्नर जनरलची सल्लामसलत घेणार नाहीं; परंतु घटनेच्या दृष्टीनें व कांटेकोरपणानें बोलावयाचें झाल्यास गव्हर्नर जनरल गव्हर्नरांना हुकूम देईल.

'आज्ञापत्रा'शिवाय इतर तऱ्हांनींही भारतमंत्री गव्हर्नरांना हुकूम काढूं शकतो."

सारांश, या जादा जबाबदाऱ्यांनीं स्वराज्याचें क्षेत्र अर्धे अधिक खाऊन टाकलें आहे असें म्हणण्यास कांहींच हरकत नाहीं. हाच भावार्थ दुसऱ्या तऱ्हेनें व्यक्त करावयाचा झाल्यास पार्लमेंटनें आपली पकड फारच थोड्या प्रमाणांत ढिली केली आहे. यासंबंधीं गतवर्षी जून महिन्यांत कॉंग्रेसनें अधिकारग्रहण करण्यापूर्वी मि० चर्चिल यांच्या प्रश्नास मुख्य प्रधान मि० चेंबरलेन यांनीं दिलेलें सविस्तर उत्तर ब्रिटिशांचें या देशाविषयींचें धोरण व्यक्त करणारें असल्यामुळें खालीं देत आहे. मि० चेंबरलेन

म्हणाले:—" फेडरेशनची स्थापना होईपर्यंत राज्यकारभारांत फार मोठा फरक होईल असें मला वाटत नाहीं. तोंपर्यंत कायद्यांतील १३ वा खंड अमलांत राहील. १९३५ चा कायदा करून पार्लमेंटनें प्रांतिक कायदेमंडळांना जबाबदार असणाऱ्या मंत्र्यांच्या अंगावर प्रांताच्या राज्य-कारभाराची जबाबदारी सोपविली आहे. ही जबाबदारी संपूर्णपणें सोप-विलेली नाहीं, कारण त्याच कायद्यानें कांहीं विशिष्ट हेतूंस्तव गव्हर्ने-राला जादा अधिकार सुपूर्त करण्यांत आले आहेत. कायद्यांतल्या या कलमांचा व पार्लमेंटनेंच मंजूर केलेल्या 'आज्ञापत्रां'चा परिणाम म्हणून गव्हर्नरनें त्याच्यावर सोपविलेल्या जादा जबाबदाऱ्यांबाबत मंत्र्यांचा सल्ला कांहींही असला तरी आपण स्वतः त्याच्या विरुद्ध निर्णय ठर-विण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं. या सर्व विवेचनावरून पहिला सिद्धांत हा निघतो कीं, ज्या मर्यादेपर्यंत प्रांताच्या कारभाराबद्दल मंत्री कायदेमंडळाला जबाबदार आहेत तेथपर्यंत मंत्र्यांच्या धोरणाबद्दल अगर त्यांच्या कृत्याबद्दल पार्लमेंटांत प्रश्न विचारणें व टीका करणें हें अजीबात गैरवाजवी होईल. पार्लमेंटांत जीं प्रश्नोत्तरें होतात त्यांतील ठोकळ मानानें रहस्य हें आहे कीं, 'मंत्री एखाद्या कृत्याबद्दल जबाबदार असल्याशिवाय आणि त्याबाबत त्याला हात घालतां येऊन एखादें धोरण धरावयाचें अगर सोडून द्यावयाचें हें त्याला करतां येण्याची परिस्थिति असल्याशिवाय, मंत्र्याला केव्हांही प्रश्न विचारतां कामा नयेत'. यांतूनच उलटपक्षीं, दुसरा सिद्धांत निघतो तो हा कीं, गव्हर्नरनें आपले जादा अधिकार वापरले—मग त्यानें मंत्र्यांचा सल्ला घेतलेला असो अगर नसो—तर तो पार्लमेंटच्या हुकमतीच्या कक्षेंत येतो. .......तेव्हां सभासदांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, गव्हर्नरनें मंत्र्यांची सल्लामसलत न घेतां किंवा त्यांच्या सल्ल्याविरुद्ध एखादी गोष्ट केली असें दाखवितां आल्याखेरीज, अगर उलटपक्षीं विशिष्ट बाबतींत जादा अधिकार वापरतां येण्यासारखे असून सुद्धां तो ते वापरावयास चुकला असें निदर्शनास आणल्याखेरीज हिंदुस्थानां-तील प्रांतिक कारभाराबाबत प्रश्न विचारणें बरोबर ठरणार नाहीं..... परंतु हाही वर सांगितलेला हक्क सभासदांनीं जरा संयमपूर्वकच वापरला पाहिजे. प्रांतिक स्वराज्याचा गाडा सुरळीतपणें चालावा अशी आमची

इच्छा आहे. तेव्हां नवीन जबाबदारीची विभागणी सर्वांनीं मोकळेपणानें मानली पाहिजे. आणि जोंपर्यंत कांहीं प्रांतांतून बहुमतवाला पक्ष त्याला अधिकारसूत्रें धारण करण्याचें निमंत्रण दिलें असतांना सुद्धां तसें करण्याचें नाकारीत आहे तोंपर्यंत ज्यांनीं राज्यकारभाराचा गाडा चालविण्याचे कामीं आम्हाला मदत केली ते या पार्लमेंटला जबाबदार आहेत असें मी कधींही म्हणावयास तयार होणार नाहीं; ते आपल्या कायदेमंडळांना व मतदारसंघांनाच जबाबदार आहेत असेंच मी म्हणेन."

गव्हर्नरांना दिलेल्या या जादा अधिकाराबाबत इतकें स्पष्टीकरण केल्यानंतर हे अधिकार ( १ ) अम्मलबजावणी खातें, ( २ ) कायदे करण्याचें काम व ( ३ ) बजेटसंबंधींची तजवीज या तिन्ही क्षेत्रांत पसरले आहेत असें दिसून येईल. न्यायदानाच्या क्षेत्रांतही त्या खात्या-बाबत ( मुख्यतः हायकोर्टाबाबतचा ) खर्च ठरविणें व नियम करणें या-बाबतचा अधिकार गव्हर्नरकडे देण्यांत आला आहे. आतां अम्मलबजावणी खात्याकडे वळूं. त्याला स्वतःला लागणारा खर्च अंदाजपत्रकांत किती घालावयाचा हें त्यानेंच ठरवावयाचें; स्वतःच्या नांवावरच सर्व कारभार चालवावयाचा; एखादी गोष्ट मंत्र्यांच्या अधिकारांतली का आपल्या अधिकारांतली हें त्यानेंच ठरवावयाचें; मंत्र्यांना पाचारण करावयाचें व त्यांना घालवावयाचें; प्रांताची शांतता, नोकरांच्या व अल्पसंख्याकांच्या हितसंबंधाचें रक्षण करणें, ब्रिटिश व्यापाऱ्यांचें हित पाहणें, गव्हर्नर जनरलचे हुकूम पाळणें, संस्थानिकांची प्रतिष्ठा संभाळावयाची, हीं सर्व कामें गव्हर्नरनेंच करावयाचीं; ॲडव्होकेट जनरल नेमावयाचा व त्याचा पगार ठरवावयाचा; तसेंच पोलिसांची संघटना व शिस्त यासंबंधींचे नियम करावयाचे; अत्याचारी गुन्हे बंद पाडण्याकरितां, जरूर वाटल्यास, कांहीं खातीं आपल्या ताब्यांत घ्यावयाचीं व त्या-करितां एखादा अंमलदार नेमावयाचा व आपल्यातर्फे त्याला कायदे-मंडळांत भाषण करण्यास पाठवावयाचें; गुप्त गोष्टी फुटूं नयेत म्हणून योग्य ते नियम करावयाचे व बातमी कोठून मिळाली याचा मंत्र्यांनाही पत्ता लागूं द्यावयाचा नाहीं; मंत्र्यांमध्यें कामाची वाटणी करावयाची व आपल्याला सेक्रेटरी व मंत्री यांचेकडून सतत राज्यकारभाराची माहिती

मिळत राहील अशी व्यवस्था करावयाची; अशीं एक ना दोन, किती तरी कामें गव्हर्नरनें अम्मलबजावणीच्या क्षेत्रांत पार पाडावयाचीं आहेत.

आतां कायदे करण्याबाबत हे जादा अधिकार किती विस्तीर्ण अशा क्षेत्रावर पसरले आहेत तें पाहूं. तो स्वतः कायदेमंडळाचा एक घटक या नात्यानें कायदेमंडळ बोलावणार, अधिवेशन बंद करणार, असेंब्ली बरखास्त करणार, कधीं कायदेमंडळापुढें भाषण करणार, तर कधीं संदेश पाठवणार; कायदेमंडळांच्या अध्यक्षाची जागा रिकामी पडल्यास ती जागा भरणार, सभासदांना आपल्यापुढें शपथ घ्यावयाला लावणार; सभासदांची नालायकी तो ठरवणार; कायदेमंडळांच्या जोडबैठकी तोच बोलावणार; कायदेमंडळानें मंजूर केलेल्या बिलांना तो मंजुरी देईल किंवा नही देईल; त्याच्या मर्जीला आल्यास बिल परत पाठविणार किंवा गव्हर्नर जनरलकडे धाडणार; कायदेमंडळाच्या कामकाजाचे कांहीं नियम तोच बनविणार— त्यांत प्रश्न विचारूं देणार नाहीं, चर्चा करूं देणार नाहीं, इतकें सर्व तोच करणार; कायदेमंडळांतील बिलावरील चालू असलेला वादविवाद तो वेळीं आपल्या अधिकारांत बंद पाडणार; वटहुकूम काढील किंवा रद्द करील; इतकेंच काय, एकट्याच्या जबाबदारीवर कायदाही करील; फार काय, मंत्रिमंडळ वा कायदेमंडळ गुंडाळून ठेवून सर्व सत्ताधीश बनण्याचें सामर्थ्य या आमच्या गव्हर्नराला या कायद्यानें दिलें आहे.

सरतेशेवटीं 'पैशा'च्या जमेबाबत व खर्चाबाबत गव्हर्नरचे अधिकार कोणते आहेत तें पाहूं. कायदेमंडळाच्या कक्षेंत न येणारा 'चार्ज्ड' खर्च अंदाजपत्रकांत किती घालावयाचा व एखादा खर्च तशा स्वरूपाचा आहे कीं नाहीं तें त्यानेंच ठरवावयाचें; तसेंच आपल्या जादा जबाबदाऱ्या पार पाडण्याकरितां अंदाजपत्रकांत स्वतंत्र रक्कम खर्ची घालायला लावण्याचें काम त्याच्याचकडे दिलेलें आहे; आपल्या स्वतःच्या खर्चावर कायदेमंडळांनीं चर्चा करण्यास त्याला मनाई करतां येईल; असेंब्लीनें खर्चाची एखादी मागणी नाकारल्यास ती पुनः जशीच्या तशी त्याला जिवंत करतां येईल; त्याच्याच सहीनें खर्चाचें अधिकृत पत्रक बाहेर पडेल; असे पुष्कळच अधिकार गव्हर्नरवर सोपविले आहेत.

या सर्व गोष्टींचा सामग्र्यानें विचार केल्यास प्रांतिक कारभाराची सर्व बाजूनें गव्हर्नरनें कशी गळचेपी केलेली आहे तें लक्षांत येईल.

## मंत्रिमंडळांचा कारभार

१ एप्रिल १९३७ ला अकरा प्रांतांतून १९३५ च्या कायद्यापैकीं प्रांतिक घटनेचा भाग अमलांत आला तेव्हांपासून आतांपर्यंत सोळा महिन्यांचा काळ लोटला आहे. या काळांत प्रांतिक राज्यकारभार कसा काय चालला आहे यासंबंधीं थोडक्यांत सिंहावलोकन करणें अस्थानीं होणार नाहीं. प्रारंभींचे तीन चार महिने सहा प्रांतांत कॉंग्रेसनें अधिकारस्वीकार करण्याचें नाकारल्यामुळें सनदशीर राज्यव्यवस्था जवळजवळ संपुष्टांत येत चालली होती व सर्वत्र एक प्रकारची अस्वस्थता माजून राहिली होती; परंतु पुढें 'दैनंदिन राज्यकारभारांत विनाकारण अडथळा करण्याचा आपला बिलकुल हेतु नाहीं' अशा तऱ्हेचें आश्वासन देण्यांत आल्यामुळें व देशांतील एकंदर परिस्थितीचा आढावा घेऊन कॉंग्रेसनें सहा प्रांतांत अधिकारस्वीकार केला. या सर्वसामान्य पेचप्रसंगानंतर बिहार व संयुक्तप्रांत या दोन प्रांतांतील मंत्रिमंडळांना राजबंदीमुक्ततेच्या प्रश्नावर राजीनामे देण्याचे प्रसंग आले; परंतु 'मंत्र्यांच्या न्याय्य हक्कांत ढवळाढवळ आपणास करावयाची नाहीं' असें गव्हर्नरांकडून पुनः एकदां पूर्वींपेक्षां जास्त स्पष्ट व निश्चित आश्वासन मिळाल्यामुळें सदर पेचप्रसंग दहा दिवसांच्या अवधींतच सुटला. या वेळींही हंगामी मंत्रिमंडळें नेमण्याची पडद्याआड कारवाई चालली होती असें अर्ल विंटर्टन यांनीं, पार्लमेंटांत विचारलेल्या प्रश्नास, जें उत्तर दिलें त्यावरून दिसून येतें. ते म्हणाले:—"या कॉंग्रेस मंत्र्यांनीं नुकताच कोठें राजीनामा दिला आहे, आणि दुसरीं प्रधानमंडळें बनविण्याची शक्यता आहे" (१६ फेब्रुवारी, १९३८). परंतु पुढें ही शक्यताही नाहींशी होत चालल्यामुळें व सरकारही देशांतील प्रचंड खळबळीला तोंड देण्यास तयार नसल्यामुळें सरकारनें माघार घेतली. जवळ जवळ हीच अवस्था ओरिसा हंगामी गव्हर्नरच्या नेमणुकीचे वेळीं झाली. परंतु वेळींच सरकारनें मंत्र्यांचें म्हणणें मान्य केल्यामुळें मंत्र्यांना राजीनामा देण्याचा प्रसंग आला नाहीं. या वेळींही हंगामी मंत्रिमंडळाच्या पुनरुज्जीवनाच्या

कल्पनेनें डोकें वर काढलें होतें, ही लक्षांत घेण्यासारखी गोष्ट आहे. सहा प्रांतांत काँग्रेस मंत्रिमंडळें स्थापन झाल्यानंतर सहरद्दप्रांतांतही सर अबदुल कायूम यांच्या मंत्रिमंडळावर अविश्वासाचा ठराव मंजूर होऊन तेथें काँग्रेस मंत्रिमंडळ अधिकारारूढ झालें. सिंध प्रांतांत हिदायतुल्ला मंत्रिमंडळ जाऊन त्या ठिकाणीं काँग्रेस पक्षानें पाठिंबा दिलेलें मंत्रिमंडळ गेले चार महिने अधिकारावर आहे. आसाम व बंगाल या प्रांतांतील मंत्रिमंडळेंही दुसऱ्यांदा तयार करण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं आसाममध्यें कांहीं जुने मंत्री बदलून त्यांचे जागीं नवीन मंत्री नेमले आहेत. निरनिराळ्या पक्षांच्या अंतर्गत घडामोडीमुळें हा प्रकार घडून आला आहे. बंगालमध्यें प्रधान नौशेरअली यांचें इतर मंत्र्यांशीं न पटल्यामुळें बाकीच्या मंत्र्यांनीं राजीनामा दिल्याबरोबर त्यांनाही राजीनामा देणें भाग झालें. त्यांना एकट्याला वगळून बाकीच्या दहा मंत्र्यांचें मंत्रिमंडळ ना. हक्क यांनीं पुनः बनविलें. जाफर हुसेनच्या मुक्ततेच्या बाबत ठपका दिल्यामुळें वऱ्हाड मध्यप्रांतांतील कायदामंत्री ना. शरीफ यांनीं राजीनामा दिला. तसेंच, त्या प्रांतांतील मंत्र्यांमध्यें परस्परविश्वास व सहकार्य यांच्या अभावामुळें व इतर गोष्टींमुळें तेथलें मंत्रिमंडळ बदलतें कीं काय अशी परिस्थिति उत्पन्न झाली होती. परंतु राज्यकारभारांतील घाण काढून टाकण्याचें ठरल्यामुळें व मंत्र्यांनीं खेळीमेळीनें व सलोख्यानें काम करण्याचें आश्वासन दिल्यामुळें मंत्रिमंडळ बदलण्याचा प्रसंग टळला. या मंत्रिमंडळांच्या उलथापालथींतून एकटें पंजाब मंत्रिमंडळ १ एप्रिल १९३७ पासून आजतागायत शाबूत आहे असें म्हणतां येईल. मंत्रिमंडळांचें अस्तित्व सुस्थिर व भक्कम पायावर असल्याशिवाय त्यांच्या हातून भरीव लोककल्याणाचीं कामें होणें अशक्यप्राय असल्यामुळें एथपर्यंत या महत्त्वाच्या गोष्टीचा प्रथमतः विचार करणें भाग पडलें.

आतां या एवढ्या काळांत त्यांनीं काय काय कामें केलीं याचें केवळ दिग्दर्शन करितों. या कामांत साधारपणें दोन विभाग पडतात. एक, जरूर ते नवीन कायदे करणें व जुन्या कायद्यांत दुरुस्त्या करणें. जमीनदार व कुळें यांचे परस्परसंबंध— हा शेतकऱ्यांच्या कल्याणाच्या व अभ्युदयाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा विषय आहे. या संबंधांत बंगाल, संयुक्तप्रांत,

बिहार, मुंबई इ० प्रांतांतून बिलें तयार झालीं असून त्यांचें योग्य वेळीं कायद्यांत रूपांतर होईल अशी आशा करण्यास हरकत नाहीं. धनको व ऋणको, किंवा सावकार आणि कर्जदार यांच्यामधील व्यवहारांचें कायद्यानें नियंत्रण करण्याचें काम मुंबई, बिहार, पंजाब इ० ठिकाणच्या कायदेमंडळांनीं आरंभिलें आहे. मद्रासमध्यें शेतकऱ्यांच्या कर्जनिवारणाबाबतचा कायदा झाला आहे. बिहारमध्यें शेतीच्या मोठ्या उत्पन्नावर कर बसविण्याचा कायदा मंजूर करण्यांत आला आहे. तसेंच मुंबई प्रांतांत प्राथमिक शिक्षण कायदा, हरिजनमंदिरप्रवेश कायदा, लोकल बोर्डे व म्युनिसिपालिट्या यांच्या दुरुस्तीचा कायदा इ० कायदे करण्यांत आले आहेत. दारूबंदीसंबंधीं निश्चित धोरण आंखण्यांत आलें असून मद्रास, बिहार, मध्यप्रांत इ० प्रांतांतून कोठें कायदे झाले आहेत, तर कोठें कायदेमंडळांत बिलें वाट चालत आहेत. वायव्य सरहद्दप्रांतांत यासंबंधीं वटहुकूम काढण्यांत आला आहे. ओरिसा प्रांतांत बालासूर जिल्ह्यांत अफूबंदी करण्यांत आली आहे. मुंबई प्रांतांत अहमदाबाद शहर व सुरत, अहमदनगर व कारवार या जिल्ह्यांतील कांहीं भागांतून दारूबंदी लौकरच अमलांत येईल. या कार्यक्रमाचा परिणाम कॉंग्रेसेतर प्रांतांवरही थोड्याबहुत प्रमाणांत होऊं लागला आहे. प्रांतांचें उत्पन्न अतिशयच तोकडें असल्यामुळें व दारूबंदीच्या धोरणामुळें उत्पन्नांत खूपच मोठा खळगा पडणार असल्यामुळें नवीन करांची विवंचना चालू झाली आहे. मध्यप्रांतवऱ्हाडांत धंदेवाल्यांच्या विशिष्ट उत्पन्नांवर कर व पेट्रोलच्या विक्रीवरील कर, अशा मार्गांनीं उत्पन्न वाढविण्याकरितां कायदे करण्यांत आले आहेत. ही झाली कायदे करणें व कर बसविणें याबाबतची गोष्ट.

आतां अम्मलबजावणीच्या क्षेत्रांत प्रांतिक सरकारांनीं त्यांतल्या त्यांत कॉंग्रेस सरकारांनीं काय काय गोष्टी केल्या त्यांचा थोडक्यांत आढावा घेऊं. तसें करण्यापूर्वी, कॉंग्रेसच्या निवडणूक जाहिरनाम्याच्या आधारें कोणकोणत्या गोष्टी ताबडतोब केल्या पाहिजेत यासंबंधींचा फेब्रुवारी १९३७ मधील कॉंग्रेस वर्किंग कमिटीचा ठराव देणें जरूर आहे. तो असा:—

" कॉंग्रेस सभासदांनीं कायदेमंडळांतून पुढील गोष्टींकरितां खटपट करावी:—

१ सारा आणि खंड यामध्यें भरीव स्वरूपाची कपात करणें.
२ विशिष्ट रकमेपुढील शेतजमिनीच्या उत्पन्नावर 'प्राप्तीवरील कर' आकारणें.
३ कुळांच्या शाश्वतीसंबंधीं व्यवस्था करणें.
४ कर्ज, आणि सारा व खंड यांच्या थकबाक्या यांच्या ओझ्यांतून शेतकऱ्यांची सुटका करणें.
५ सर्व दडपशाही कायदे रद्द करणें.
६ राजबंदी, स्थानबद्ध इत्यादींची मुक्तता करणें.
७ कायदेभंगाच्या चळवळींत सरकारनें जप्त केलेल्या अगर विकलेल्या जमिनी व इतर मालमत्ता ज्याची त्यास परत देणें.
८ वेतन कमी न करतां मजुरांचा कामाचा दिवस आठ तासांचा करणें; चांगल्या तऱ्हेनें जगतां येईल एवढें वेतन मिळवून देणें.
९ दारू आणि अफू, भांग इ० बंदी.
१० बेकारीचें निवारण
११ बडे बडे पगार व भत्ते कमी करणें; तसेंच सरकारी राज्यकारभाराचा खर्च कमी करणें."

निरनिराळ्या प्रांतांतून पुढील गोष्टी झाल्या आहेत व आस्ते आस्ते होत आहेत:—

१ राजबंद्यांची मुक्तता व सुखसोयी.
२ सरकारी कचेऱ्यांतील लाचलुचपतींना आळा घालणें.
३ जातीय दंगे होऊं न देण्याबद्दल कडक उपाय.
४ ( मद्रास व संयुक्तप्रांत ) गिर्यारोहण बंद करणें.
५ गुन्हेगार जातींबाबत चौकशी कमिट्या.
६ कापडगिरण्या व इतर गिरण्या यांतील मजुरांचा पगार इ० बाबत चौकश्या ( मुंबई, संयुक्तप्रांत, मध्यप्रांत इ० ); तडजोडीनें व मध्यस्थी करून संप मिटविणें.
७ रस्त्यांच्या सुधारणेबद्दल व वाढीबद्दल योजना.
८ खेड्यांतील पाणीपुरवठा, ग्रामोद्योग व खादी यांना मदत व उत्तेजन.

९ राष्ट्रीय बालवीर (बॉयस्काउट) पथकें निर्माण करणें व त्यांना मदत देणें.
१० नागरिकांच्या हक्कांवरील बंधनें नाहींशीं करणें.
११ चळवळींतील बडतर्फ केलेल्या नोकरांना परत कामावर घेणें; जप्त झालेल्या जमिनी व मालमत्ता परत ज्याची त्यास देवविणें.
१२ पगाराचें स्केल शक्य तेथें कमी ठेवणें.
१३ काटकसरीचे सर्व उपाय योजणें.
१४ पोलिस व इतर सरकारी अंमलदार यांना लोकांशीं सभ्यतेनें वागण्याबाबत हुकूम काढणें.
१५ जनता व सरकार यांना एकमेकांच्या अधिक जवळ आणणें ('बिनसरकारी लोकांना सरकारी करणें व सरकारी लोकांना बिनसरकारी करणें'—पंडित पंत).
१६ कालव्यांच्या नवीन योजना आंखणें.
१७ राष्ट्रभाषा—हिंदीचा शिक्षणक्रमांत प्रवेश करणें.
१८ न्याय व अंमलबजावणी खात्यांची फारकत.
१९ जलप्रलयांचें नियंत्रण करण्याची तरतूद करणें.
२० औद्योगिक वाढ करण्याबद्दल सल्लागार मंडळें.
२१ तुरुंगांची सुधारणा (बेड्या काढून टाकणें; अन्न व इतर खाण्याचे जिन्नस बाहेरून देण्यास परवानगी देणें; रजा देणें; राजकीय बंद्यांच्या मुलाखतींच्या वेळीं पोलिसांनीं हजर नसणें इ०)
२२ प्राथमिक शिक्षण सुधारणा व वाढ; शारीरिक शिक्षणाची सुरवात; विद्यापीठांची पुनर्घटना; प्रौढशिक्षणप्रसार इ०.
२३ नवीन मोठे उद्योगधंदे (उ० मोटारी बनविणें, पेट्रोल ऐवजीं कोळशाच्या गॅसचा वापर करणें, दारूपासून यंत्रें चालविण्याकरितां 'शक्ति' निर्माण करणें इ०).
२४ वर्तमानपत्रांच्या जामिनकींच्या रकमा परत करणें.
२५ ब्लॅकलिस्ट (वर्तमानपत्रीय) नष्ट करणें.
२६ जप्त केलेल्या पुस्तकांवरील व वाङ्मयावरील बंदी उठविणें.
२७ साऱ्याची सूट व तहकुबी देणें.

झालें आहे व होत आहे यापेक्षां किती तरी कार्य व्हावयाचें राहिलें आहे. याला मुख्य अडचणी दोन. एक गव्हर्नरच्या जादा अधिकारांची; त्यासंबंधीं विस्तृत विवेचन मागें अनेकदां केलेंच आहे. दुसरी आणि महत्त्वाची अडचण पैशाची; याबाबत प्रांतांची व मध्यवर्ती सरकारची परिस्थिति काय आहे याचा या स्थळीं थोडक्यांत विचार करणें अपरिहार्य आहे. तुलनेकरितां एकाच सालचे अंदाजपत्रकांतील आंकडे घेणें बरोबर असल्यामुळें मध्यवर्ती बजेट व प्रांतिक बजेटें यांचे १९३७-३८ सालचे आंकडे पुढें उद्धृत करीत आहे: —

## हिंदुस्थान सरकारचें बजेट
## १९३७–३८

आंकडे लाख रुपयांचे

| उत्पन्न | | खर्च | |
|---|---|---|---|
| ४२६० | जकात | ३८४ | करवसुलीकरितां होणारा खर्च |
| ७१६ | एक्साइज | २९९९ | रेलवे ( व्याज व इतर खर्च ) |
| १४५ | कॉर्पोरेशन कर | ११ | कालवे |
| १२८५ | प्राप्तीवरील कर | ८० | पोस्ट व तार |
| ८२५ | मीठ | १४१२ | कर्जखातें (व्याज) |
| ५० | अफू | १०४३ | राज्यकारभार |
| ९४ | इतर बाबी | ३४ | चलन व टांकसाळ |
| ३०१४ | रेलवे ( ऐन जमा ) | २८७ | सिव्हिल वर्क्स |
| १ | कालवे | ३८३ | किरकोळ |
| ७७ | पोस्ट व तार | ४९८४ | लष्करखातें |
| ७१ | कर्जखातें | ३१६ | प्रांतांना देणग्या इ० |
| ९२ | राज्यकारभार | १ | जादा बाबी |
| १०६ | चलन व टांकसाळ | | |
| ३५ | सिव्हिल वर्क्स | | |
| १४२ | किरकोळ | | |
| ५२२ | लष्करखातें | ११९३४ | एकूण खर्च |
| ५०७ | जादा बाबी | ८ | शिल्लक |
| ११९४२ | एकूण जमा | ११९४२ | एकूण |

यावरून दिसून येईल कीं, हिंदुस्थान सरकारची जमा व खर्च हीं दोन्ही जवळ जवळ १२० कोटी रुपयांची आहे. आतां अकराही प्रांतांचे उत्पन्नाचे व खर्चाचे ठोकळ आंकडे ( १९३७-३८ ) देतों:—

## प्रांतिक सरकारांचीं बजेटें

१९३७–३८

आंकडे लाख रुपयांचे

| प्रांत | उत्पन्न | खर्च |
|---|---|---|
| १ आसाम | २८५ | २८२ |
| २ मुंबई | १२०० | १२१७ |
| ३ बंगाल | १२५५ | १२२१ |
| ४ मध्यप्रांत वऱ्हाड | ४७५ | ४७५ |
| ५ बिहार | ५०६ | ५०३ |
| ६ सरहद्दप्रांत | १८० | १८५ |
| ७ मद्रास | १५९४ | १५९४ |
| ८ ओरिसा | १९० | १८४ |
| ९ सिंध | ३४८ | ३४७ |
| १० पंजाब | १०९० | १०८९ |
| ११ संयुक्तप्रांत | १२५४ | १२६६ |
| | ८३७७ | ८३६३ |

यांपैकीं कॉंग्रेस सरकारें असलेल्या सात प्रांतांचें उत्पन्न ५३९९ लाख रुपये असून खर्च ५४२४ लाख रुपये आहे. तात्पर्य, मध्यवर्ती व प्रांतिक मिळून २०० कोटी रुपयांचा जमाखर्च होतो. त्यापैकीं मध्यवर्ती शेंकडा ६० व प्रांतिक शेंकडा ४० हें प्रमाण पडतें. या शेवटच्या ४० पैकीं २५ कॉंग्रेस प्रांतांच्या वाट्याला येतात. यांतील $\frac{१}{४}$ रक्कम 'चार्ज्ड' खर्चाची काढून टाकल्यास बाकीची म्हणजे १८–१९ इतक्यांवर कॉंग्रेस-चें बहुमत असलेल्या सात प्रांतिक असेंब्ल्यांचा ताबा आहे असें दिसून येईल.

आतां वर दिलेला ८४ कोटी रुपयांचा जमेचा व खर्चाचा (प्रांतिक) आंकडा कशामुळें जमा होतो व कशावर खर्च होतो याची फोड ठोकळ मानानें पुढीलप्रमाणें देतां येईल:—

आंकडे कोटी रुपयांचे

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| ३२ | जमीन महसूल | ९ | करवसुलीकरितां होणारा खर्च |
| १५ | अबकारी | ७ | कालवे |
| ११ | स्टांप | २ | व्याज |
| ४ | जंगल | २ | कर्जफेड |
| १ | नोंदणी | १० | राज्यकारभार |
| ९ | कालवे | ५ | न्यायदान |
| २ | व्याज | २ | तुरुंग |
| ६ | राज्यकारभार | १२ | पोलिस |
| ४ | किरकोळ | १२ | शिक्षण |
| ८४ | | ५ | वैद्यक व सार्वजनिक आरोग्य |
| | | ३ | शेती व उद्योगधंदे |
| | | ८ | सिव्हिल वर्क्स |
| | | ७ | किरकोळ |
| | | ८४ | |

वर दिलेल्या दोन्ही तिन्ही आंकड्यांचा सामग्र्यानें विचार केल्यास जमाखर्चाची ही अशी परिस्थिति कां याचा ऊहापोह सविस्तर करणें अगत्याचें आहे. परंतु तसें करणें उद्‌बोधक असलें तरी तो मोह आवरणें भाग आहे. १९३५ च्या राज्यघटनेचें या जमाखर्चाच्या दृष्टीनें परीक्षण केल्यास हें असें कां याची कारणपरंपरा सांराशरूपानें अशी देतां येईल :—

१ कांहीं विशिष्ट आर्थिक व राजकीय परिस्थिति याच्या मुळाशीं आहे.

२ आर्थिक दृष्ट्या, जगांतील पुढारलेल्या देशांच्या तुलनेनें, हिंदुस्थान अतिशय मागासलेला देश आहे.

३ लष्कर, पोलिस व नोकरशाहीचा मुलकी कारभार, परकीय सरकार असल्यामुळें, अतिशय डोईजड होऊन बसला आहे.

४ संस्थानिक, जमीनदार व भांडवलवाले यांची या देशांत विशेष चलती आहे.

५ गरीब लोकांवर करांचा बोजा भयंकर आहे.

६ औद्योगिक दृष्ट्या हिंदुस्थान ही ब्रिटिश व इतर परदेशी मालांची बाजारपेठ आहे; तसेंच कच्चीं द्रव्यें हिंदुस्थान इतर देशांना निर्गत करतो.

७ हिंदुस्थानची शेती व ब्रिटिश उद्योगधंदे अशी ही साम्राज्यान्तर्गत जोड घातली गेली आहे; हिंदुस्थाननें राबावें व ब्रिटननें चैन करावी.

८ ब्रिटिश हिताच्या दृष्टीनें हिंदी चलनपद्धति व हुंडणावळीचा भाव ठरविला जातो.

९ रेल्वेचें व जकातीबाबतचें धोरण हें हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें ठरविलें न जातां ब्रिटनच्या हिताच्या दृष्टीनें ठरविलें जातें.

१० प्रांतिक उत्पन्नांतील मोठ्यांतली मोठी बाब जमीन महसुलाची होय. या तडाक्यांतून दरिद्र्यांतला दरिद्री शेतकरी सुटत नाहीं.

११ मालाच्या किंमती शेंकडा ५० इतक्या उतरल्या असल्या तरी जबरदस्तीनें पूर्वींच्या इतकेंच उत्पन्न वसूल करण्यांत कांहीं कमतरता नाहीं.

१२ जमेच्या बाजूला पाहिलें तर आर्थिक दृष्ट्या परदास्य दिसून येतें व खर्चाच्या बाजूला नजर टाकली तर राजकीय दृष्ट्या परदास्य आढळून येतें.

१३ ज्या उत्पन्नांत दिवसेंदिवस वाढ होणें शक्य आहे अशा उत्पन्नाच्या सर्व बाबी मध्यवर्ती सरकारनें आपल्याकरितां खास राखून ठेवल्या आहेत (उदाहरणार्थ, जकातींचें उत्पन्न १९२१-२२ सालीं ३४ कोटी रुपये होतें, तें १९३५-३६ सालीं ५४ कोटी रुपयांपर्यंत वाढलें आहे. मिठाचें उत्पन्न १९२१-२२ सालीं ६ कोटी रुपये होतें, तें १९३५-३६ सालीं ८ कोटी रुपयांपर्यंत चढलें आहे. प्राप्तीवरील कर १९२५-२६ सालीं १५ कोटी रुपये होता, तो १९३२-३३ सालीं १८ कोटी रुपयांपर्यंत गेला. रेल्वेच्या उत्पन्नांत मात्र व्यापारमंदीमुळें, मोटारगाड्यांच्या चढाओढीमुळें व उधळपट्टीचा खर्च पूर्वीप्रमाणेंच चालू ठेवलेला असल्यामुळें अलीकडे घट येऊं लागली आहे.)

१४ प्रांतांची दिवसेंदिवस उपासमारच होत चालली आहे. उत्पन्नाच्या वाढत्या बाबी त्यांना दिलेल्या नाहींत. राष्ट्रसंवर्धक खर्चाचीं खातीं मात्र त्यांच्या स्वाधीन करण्यांत आलेलीं आहेत. १९१३ ते १९२९ या सोळा वर्षांत जमीनमहसुलाचें उत्पन्न अवघें शेंकडा ७½ टक्क्यांनीं वाढलें आहे. अबकारीचें उत्पन्न आहे तसेंच आहे. आतां तर निरनिराळ्या प्रांतिक सरकारांनीं दारूबंदीचें स्तुत्य धोरण अमलांत आणण्याचें ठरविलें असल्यामुळें प्रांतिक जमेंतून तेंही उत्पन्न चारदोन वर्षांत नाहींसें होणार आहे.

१५ हिंदी कायदेमंडळ व हिंदुस्थान सरकार यांच्यामध्यें जकातीबाबत एकमत होण्याचा कपिलाषष्ठीचा योग कधीं नव्हे तो आल्यास त्यांत विलायत सरकारनें ढवळाढवळ करूं नये असा एक प्रघात १९१९ च्या सुधारणानंतर पाडण्यांत आला होता. या प्रघाताला 'फिस्कल ऑटॉनामी कन्व्हेन्शन' असें म्हणतात. १९३५ च्या कायद्यानें या प्रघाताचा मागमूस नाहींसा करून टाकण्याची तरतूद केलेली आहे.

१६ लष्कर, राज्यकारभार, कर्जावरील व्याज, पोलिस, तुरुंग इ० खात्यांवरील भयंकर खर्च व शिक्षण, आरोग्य, शेती, उद्योग-धंदे या खात्यांवरील तुटपुंजा खर्च पाहिला म्हणजे हें 'पोलिसी व लष्करी' राज्य आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

या आर्थिक हलाखींतून वर येण्यास राजकीय सत्ता हातीं येणें याशिवाय दुसरा मार्ग नाहीं. तथापि आर्थिक दृष्टीनें सुधारणा होण्यास काय व्हायला पाहिजे हेंही जातां जातां थोडक्यांत सांगितल्याशिवाय पुढें जाववत नाहीं.

सर्व आर्थिक रचनाच आमूलाग्र बदलली पाहिजे. जकातीच्या द्वारा आपण किती तरी रुपये अप्रत्यक्षपणें सरकारास देतों; तेव्हां हा अप्रत्यक्ष कराचा बोजा हलका व्हावयास पाहिजे. वाढत्या उत्पन्नावर अधिक कर या पद्धतीनें प्रत्यक्ष करांची जास्त प्रमाणांत योजना व्हावयास हवी. जमिनीच्या उत्पन्नावर जो जमीनमहसूल सध्यां आकारण्यांत येतो त्या-बाबतची सर्व पद्धतीच बदलली पाहिजे. छोट्या छोट्या उत्पन्नावर कर अजीबात माफ व्हावयास पाहिजे. पुढील मोठ्या उत्पन्नावर 'प्राप्तीवरील कराच्या' चढत्या वाढत्या दराच्या पद्धतीनें कर बसविण्यांत आला पाहिजे. 'प्राप्तीवरील करा'च्या बाबतींत सुद्धां खूपच फरक झाले पाहिजेत. खूप मोठ्या उत्पन्नावर करांचे दर शेंकडा ४०।५० इतके ठेवले पाहिजेत. 'समाजीकरणा'ची ही एक सर्वमान्य पद्धत आहे. वारसदारीवर कर, कोणाला अचानक मालमत्ता मिळाल्यास त्यावर कर, व्याजबट्टा करून मिळालेल्या व इतर अनार्जित उत्पन्नावर कर असे अनेक नवीन कर सुच-वितां येतील. अबकारी उत्पन्न, अफूच्या उत्पन्नाप्रमाणें, आतां जवळ जवळ लौकरच नाहींसें होणार. मिठावरील कर तर पहिल्यांदा काढून टाकला पाहिजे. स्टांप व नोंदणी याबाबतच्या फी मुख्यतः गरीबांना द्याव्या लागतात त्याही कमी व्हावयास पाहिजेत. सर्वसाधारण उपयोगाच्या आयात मालावर सरसकट जकात न घेतां चैनीच्या वस्तूंवरच जकात घेतली पाहिजे. खर्चाच्या दृष्टीनें पाहिल्यास लष्करी खर्च व सर्वसाधारण राज्यकारभाराचा खर्च झपाट्याला निम्म्यानें कमी झाला तरच प्रांतांकडे

सोपविलेल्या राष्ट्रबलसंवर्धक खात्यांना कांहीं तरी खुराक मिळण्याची आशा आहे. नाहींपेक्षां कितीही दांत कोरले तरी पोट कांहीं भरणार नाहीं.

पैशाच्या या दृष्टीनें विचार केल्यास प्रांतिक मंत्रिमंडळांची कशी केविलवाणी स्थिति होऊन बसली आहे याची कांहींशी वरील विवेचनावरून कल्पना येईल.

## भविष्यकाळाकडे नजर

याप्रमाणें १९३५ च्या कायद्यांतील प्रांतिक घटनेबाबतही विलक्षण बंधनें असून सुद्धां स्वराज्याच्या लढ्यांतील एक पवित्रा म्हणून काँग्रेसनें आपल्या पक्षाचें बहुमत असलेल्या प्रांतांत अधिकारस्वीकार केला आहे. या अधिकारस्वीकाराचा खरा अर्थ न समजल्यामुळें वरवर पाहणाऱ्यांना काँग्रेस, सरकारच्या जाळ्यांत अडकून तिची चांगलीच फसगत होणार असें वाटण्याचा संभव आहे. परंतु सत्यानें आणि न्यायानें सरळ ध्येय डोळ्यांपुढें ठेवून चालणाऱ्या व्यक्तीला काय किंवा संस्थेला काय केव्हांही भिण्याचें कारण नाहीं. अधिकार चालविण्याचा आजपर्यंत सराव नसल्यामुळें व चालू असलेल्या खळबळींत, आपल्या ठायीं असलेले अनेक राष्ट्रीय दुर्गुण उचल खाऊन प्रसंगीं चुका होण्याचा संभव असल्यामुळें जरा जपून चाललें पाहिजे एवढा सावधगिरीचा इशारा देणें जरूर आहे.

आज अनेक पिढ्या आपण स्वराज्याला मुकलों असल्यामुळें भासमान् होणारें स्वराज्यही ( ? ) आपणाला आनंद देत आहे व उत्साह आणि अभिमान वृद्धिंगत करीत आहे. या जनतेंतील उत्साहाचा योग्य तो फायदा राष्ट्रधुरीणांनीं घेतला पाहिजे. उत्साहाबरोबर 'हें झालें पाहिजे, तें मिळालें पाहिजे' अशा प्रकारच्या आकांक्षाही खूपच वाढल्या आहेत; परंतु मर्यादितच सत्ता हातीं असल्यामुळें त्या पुऱ्या होऊं शकत नाहींत हेंही तितक्याच स्पष्टपणें लोकांना पटविलें पाहिजे. जनतेंतील दारिद्य, अज्ञान, बेकारी इत्यादि नाहींसें करण्याला आपलें भवितव्य ठरविण्याची शक्ति म्हणजे संपूर्ण व अनिर्बंधित स्वराज्य हस्तगत केलें पाहिजे, या महत्त्वाच्या राजकीय सिद्धांतावर सामान्य माणसालाही आणून सोडलें पाहिजे. हा सिद्धांत नुसता बुद्धीनेंच पटून उपयोग नाहीं; तर त्या ध्येयाकडे जाण्याच्या मार्गाचाही अवलंब करण्यास लोकांनीं सिद्ध झालें

पाहिजे. हिंदुस्थानच्या सध्यांच्या परिस्थितींत हा मार्ग—महात्मा गांधी यांनीं घालून दिलेला—अहिंसेचाच होय हें सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ आहे. गेल्या वीस वर्षांत राष्ट्रानें त्याचें ज्या प्रमाणांत आचरण केलें आहे त्या प्रमाणांत राष्ट्राला लाभही झालेला आहे, हें विपरीत दृष्टीच्या मनुष्याखेरीज कोणीही प्रांजलपणें कबूल करील. आज जी कॉंग्रेस ही एक शक्तिमान् संस्था आहे असें शत्रूंना वा मित्रांना वाटतें तें यामुळेंच होय. आपल्यांतीलच अत्याचाराच्या मार्गावर विश्वास असणाऱ्या तरुणांचा विश्वास डळमळीत झाला असून अहिंसेच्या मार्गांतच राष्ट्राचें कल्याण आहे हेंही त्यांनीं मुक्तकंठानें मान्य करण्यास सुरवात केली आहे. सरहद्दप्रांतांतील खान अबदुल गफारखानासारखे लोक या मार्गाचे अनुयायी बनले आहेत. जातीजातींतलि भांडणें, जमीनदार व कुळें यांच्यामधील तंटे, गिरणीमालक व मजूर यांच्यामधील कटकटी इ० सर्व द्वैतें या अहिंसात्मक तडजोडीच्या भावनेनें नाहींशीं करितां येतील असा हळूहळू विश्वास व अनुभव येत चालला आहे. आजपर्यंत विधायक कार्यक्रम व वेळप्रसंगीं असहकारिता, कायदेभंग, करबंदी, बहिष्कार, सत्याग्रह या मार्गांचा राष्ट्रानें अवलंब केलेला आहे. आतां या विधायक कार्यक्रमाच्या जोडीला कायदेमंडळांतील कार्यक्रम अधिक येऊन बसला आहे एवढाच फरक. त्यामुळें मूळ सूत्र बिलकुल सुटलेलें नाहीं. पूर्वीं सरकारी अडथळ्यामुळें विधायक कार्यक्रमाची जी प्रगति होत नव्हती ती आज सरकारी पाठिंब्यानें झपाट्यानें होण्याचा मार्ग मोकळा झाला आहे. हीच राष्ट्राचें बळ वाढविण्याची खरी संधि आहे. प्रांतिक सरकारांच्या जवळ वापरावयास पोलिस आहे म्हणून त्याचा वाटेल तसा उपयोग न करितां सलोख्याच्या व शांतीच्या मार्गानेंच भांडणें मिटविलीं पाहिजेत असा गांधींचा आग्रह आहे. याकरितांच त्यांनीं 'शांतिसेने'ची कल्पना राष्ट्रापुढें मांडली आहे. या आपापसांतील निरनिराळ्या भांडणांचे प्रसंगीं या 'शांतिसेने'ला योग्य व आवश्यक असें प्रत्यक्ष शिक्षण मिळणार आहे. ही तयारी व कवायत राष्ट्राला आणीबाणीच्या प्रसंगीं ब्रिटिश सरकाराविरुद्ध अखेरचा लढा देण्यास उपयोगी पडल्याशिवाय राहणार नाहीं. दुसरें असें कीं, जी संस्था राष्ट्राच्या वतीनें परकीय सरकारशीं 'युद्ध' करणार, तीच 'शम'ही करण्यास पुढें येणार

हें उघड आहे. आजच पहा ना, कॉंग्रेसचा प्रभाव सात प्रांतांच्या सीमेपलीकडेही पसरत चालला आहे. बंगालमध्यें राजबंदीविमोचनाचा प्रश्न कॉंग्रेसच्या इतर ठिकाणच्या दडपणामुळेंच सुटण्याच्या पंथास लागला आहे; म्हैसूर, मानसा, रामदुर्ग, जमखंडी, मिरज इ० ठिकाणच्या राजा व प्रजा यांच्यांतील कटकटी कॉंग्रेसच्या मध्यस्थीनें मिटत चालल्या आहेत; फार काय, परदेशी राजकारणांतही कॉंग्रेस अधिकाधिक लक्ष घालूं लागली आहे. याकरितां तिनें एक 'परदेश'-खातें उघडलें असून जगांतील प्रगत राष्ट्रांतील लोकांशीं संबंध जोडण्याचें काम चालू ठेवलें आहे. ॲबिसीनिया, पॅलेस्टाइन, स्पेन, चीन येथें होणाऱ्या खळबळी आम्हांला धक्का देत आहेत; व तेथील स्वातंत्र्या-करितां झटणाऱ्या प्रजेला सहानुभूतीचा ओलावा आम्हीं देऊं लागलों आहोत. झांझीबार लवंग प्रकरणाकडे पाहिलें तर झांझीबार सरकार व तेथील हिंदी व्यापारी यांच्यामध्यें जी तडजोड झाली ती अखेर एका पक्षीं इंग्लंडचे वसाहतमंत्री व दुसऱ्या पक्षीं आपली कॉंग्रेस या दोघांनीं मान्य केल्याशिवाय पुरी होऊं शकली नाहीं; इतकें आपलें बळ दिवसेंदिवस वाढत चाललें आहे. १९३५ च्या कायद्यानें जरी परराष्ट्र-संबंध हें खातें हिंदी प्रधानांच्या ताब्यांत दिलेलें नसलें तरी आज प्रत्यक्ष वस्तुस्थिति असें सांगते कीं, असें करून कधींही भागणार नाहीं; लष्करा-ची सत्ताही आपणाला दिलेली नाहीं. संरक्षणाच्या बाजूनें आपण कम-कुवत आहोंत अशी कबुली आपल्यांतीलच कित्येक लोक देतांना पाहून अचंबा वाटतो. याचें कारण हें असावें कीं, सामर्थ्य मोजण्याचीं आजवरचीं जीं साधनें ( दारूगोळा, शस्त्रास्त्रें, विमानें, आरमार इ० ) तीं आपल्या-जवळ नाहींत परंतु या सर्वांना पुरून उरणारें—नैनं छिन्दन्ति शस्त्राणि—आत्मबल आपणा प्रत्येकाजवळ आहे व त्या बलाचा उपयोग करण्यास आपण बुद्धिपूर्वक प्रयत्न केला पाहिजे एवढी जाणीव सर्वत्र फैलावल्यास व त्या दिशेनें खटपट झाल्यास आपणास कोणत्याही परराष्ट्राची भीति वाटणार नाहीं. ज्या आत्मबलाच्या जोरावर आपण इंग्रजांपासून आपलें गेलेलें स्वराज्य मिळवूं इच्छितों त्याच आत्मबलावर मिळविलेलें स्वराज्य टिकविण्याची धमक आपण सर्वांनीं धरली पाहिजे. इराण, अरबस्तान,

अफगाणिस्तान हीं चिमुकलीं राष्ट्रें शस्त्रास्त्रांच्या सामग्रीवर जिवंत व स्वतंत्र राहिलीं आहेत त्यापेक्षां आपल्या ठिकाणीं असलेल्या शक्तिप्रत्ययावर व स्वातंत्र्यप्रियतेच्या भावनेवर अधिक अवलंबून स्वतंत्र राहिलीं आहेत असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति होणार नाहीं. इंग्रज गेले तर आमचे कसें होईल या काळजींतच आमच्या पारतंत्र्याचें मूळ आहे. रोमन लोक गेल्यावर आमचें कसें होईल अशी ब्रिटिश लोकांना काळजी पडली होती असें म्हणतात. परंतु त्या काळजीचें काय झालें हें गेल्या तीन शतकांतील इंग्लंडचा इतिहास सांगतच आहे. तेव्हां ही भीति दुर्बल मनाची द्योतक होय. जपानचा बागुलबोवा दाखविण्यांत येतो. परंतु आतां नवीन परराज्य हिंदुस्थानांत मूळ धरण्यासारखी परिस्थिति बिलकुल राहिलेली नाहीं. जुनें खोडच सवयीनें व हळूहळू विष भिनल्यानें लवकर हलत नाहीं. तें एकदां उखडून निघालें म्हणजे त्या जागीं स्वराज्याच्या जोमदार वृक्षाखेरीज दुसरें कांहींही उगवणार नाहीं. या दिशेनें आपली झपाट्यानें प्रगति होत आहे. तेव्हां या दृष्टीनें विचार केल्यास मध्यवर्ती सरकारांतील खरेखुरे हक्क आपल्या पदरांत पडल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशी परिस्थिति आज या देशांत निर्माण झाली आहे. जागतिक परिस्थितिही आपल्या स्वराज्याला पोषक बनत चालली आहे. महायुद्धाचा भडका केव्हां उडेल याचा नेम नाहींसा झाला आहे. इंग्रज आधीं स्वतःच्या देशाचें संरक्षण कसें करावें या फिकिरींत पडले आहेत. परवां एका मुत्सद्द्यानें स्पष्टच बोलून दाखविलें कीं, आम्ही आधीं जगलों, तर मग बाकीचें साम्राज्य; नाहीं तर साम्राज्याला घेऊन काय चाटावयाचें आहे? या वेळीं वानरी आणि तिचीं पोरें यांची आठवण झाल्याशिवाय राहत नाहीं. 'आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि.' आपल्यावर बेतलें म्हणजे कोणी कुणाचा नव्हे. जेथें स्तनंधय मुलांना विषारी धुरापासून संभाळण्याची तजवीज चालू आहे तेथें आम्हां पस्तीस कोटी लोकांना कोणी विचारते आहेत काय? अशा वेळीं हिंदुस्थान शांत असावें याकरितां कांहीं सन्माननीय तडजोडीचा मार्ग निघणें अशक्य नाहीं. त्या दिशेनें हळूहळू वारे वाहूं लागले आहेत. भुलाभाई झेटलंडला भेटले, लिनलिथगौ विलायतेस सल्लामसलत घेण्याकरितां गेले, नेहरू झेटलंडला

व हॅलिफॅक्सला तसें लिनलिथगौलाही भेटले, गांधीही विलायतेला जाण्याच्या बातम्या उठत आहेत, काय शिजत आहे याची नक्की कल्पना नसतांच सुभाष बोस व सत्यमूर्ति यांच्यांत चकमकी सुरू झाल्या आहेत. वास्तविक, १९३१ सालच्या अखेरची वेळ आज सात वर्षांनीं पुनरपि येत आहे असें म्हणावें लागतें. सत्याग्रही राष्ट्राची भूमिका नेहमीं 'अलमेव शमायास्मि तथा युद्धाय भारत।'—शांतीला तयारी आहे आणि जरूर पडल्यास लढायचीही तयारी आहे—अशा स्वरूपाची असली पाहिजे. कारण, त्यांत हानि कोणतीच नाहीं. तेव्हां वाटाघाट करण्याला कांहींच हरकत नाहीं. 'स्वातंत्र्याचा गाभा' मिळाला तर ठीकच. नाहीं तर, आपला मार्ग आपणाला मोकळा आहेच. एकी राखूं तर कांहीं तरी जलद प्रगति होईल, नाहींपेक्षां घोंगडें भिजत पडेल व ध्येयाला पोंचण्यास दिरंगाई लागेल. या सर्व बाजू विचारांत घेऊन या आणीबाणीच्या प्रसंगीं आपण वागलों तर खरेंखुरें प्रांतिक स्वराज्यच काय, पण अखिल भारतीय स्वराज्य आपण मिळविल्याशिवाय राहणार नाहीं. कारण "स्वराज्य हा आपला जन्मसिद्ध हक्क आहे व तो आपण मिळविणारच!" असा टिळकांनीं आपणांस मंत्र दिला आहे व त्या मंत्राची उपासना आपण चालविली आहे; हाच मंत्र ओजस्वी अशा गीर्वाण वाणींत—'विमुक्तश्च विमुच्यते' —ऋषींनीं आपणां भारतीयांस हजारों वर्षांपूर्वी देऊन ठेविला आहे. या 'मंत्रा'चें 'तंत्र' आपणास गांधींनीं दिलें आहे. त्याच्या आचरणानें हिंदी राष्ट्र लवकरच स्वतंत्र होणार यांत तिळमात्र संशय नाहीं.

---

# सूची

[ आंकडे पानांचे आहेत; आंकड्यांपुढील (...) याचा अर्थ तो विषय त्या व पुढील एकदोन पानांवरहि आला आहे. **'प्रांतिक स्वराज्य ?'** या मथळ्याखालीं ग्रंथकर्त्याचीं स्वतंत्र मतें व टीका हीं संकलित केलीं आहेत. ]